श्रीमंत होळकरसरकारची ग्रंथमाला ।

ॐ

सचित्र

# वेदांच्या काळाचा इतिहास

## पूर्वार्ध.

---

लेखक.—

परशुराम हरी थत्ते,

१०६४, नासिक.

——:०:——

मज्जेत् त्रयी दण्डनीतौ हतायां सर्वे धर्माः प्रक्षयेयुः ॥

महाभारत ६३,२८

अर्थः—राजनीतीच्या शास्त्राची हेळसांड केल्यास तिन्ही वेद व झाडून सर्व सद्गुण क्षय पावतात.

सन १९२५.

सर्व हक्क ग्रंथकर्त्याकडे.

किंमत रु. २०/-

१ वे. शास्त्रसंपन्न रा. रा. नरहरशास्त्री गोडसे, मुंबई,
कीं ज्यांचेजवळ मी उपनिषदें व योगसूत्रें शिकलों,
२ कै. लोकमान्य विद्वद्वर्य बाळ गंगाधर टिळक, कीं ज्यांस मी
आपला भौगर्भिक कालनिर्णय सादर केला होता, व
३ समानविचारांच्या श्री. नानासाहेब पावगीसारखे
तज्ञ व दुसरे अतज्ञ पण जिज्ञासू लोक यांचे चरणीं
परशुराम संहितेंतील हें पाहिलें पुस्तक,
नम्रतेनें व अत्यादरानें,
अर्पण करणारा,

कृपाभिलाषी,
प. ह. थत्ते.

# प्रस्तावना.

सर्वं खल्विदं ब्रम्ह ।

त्या अक्षरापासून ( ब्रम्हापासून ) आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून जल, जलापासून पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधी, ओषधीपासून अन्न, अन्नापासून जीव, याप्रमाणें क्रमोत्पती झाली.–शांति. अ. २७५.

जसा कोळी आपल्या शरीरांतून जाळें उत्पन्न करितो, त्याप्रमाणें परमेश्वर आपल्या शरिरांतून जगतास उत्पन्न करून तें प्रलयकालीं पुन्हां आपल्यांतच विलीन करितो.

In the Tertiary period which perhaps saw man develop into the most distinctive form of living creature on the earth, a sea was rolling where now the barren wastes of the Gobi desert and the basin of the Tarim extend; new mountains were upraised and mighty masses subsided. When the sea disappeared and Central Asia acquired its present configuration, a long time must have elapsed before the land was changed into the sterile steppe which we know at the present day. The Ice age which filled Siberia with immense glaciers hardly affected that tranformation. The inhabitants of Central Asia, therefore, at the close of the Glacial Period, which must, provisionally, form the starting point of historical investigation in the field were still living in a comparatively well watered and favoured region which later became by slow degrees stappe desert. On the other hand, the elevated character of the country has not changed; and this produces even in the southern parts a temperature and almost a cold climate and in this way exercised a lasting influence on the inhabitants.–P.1439–Hamsworth History of the world.

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ॥–ईशोपनिषत्

अर्थः–या दुनियेंत पडणारें हरयेक काम करीत राहून शंभर वर्षेंही वांचण्याची इच्छा करावी.

भारतीय युद्धारंभीं ( १ ) अर्जुनः—न योत्स्ये । विश्वरूपदर्शनानंतर.–२ श्रीकृष्ण–युध्यस्व । गीताबोध झाल्यावर. ३ अर्जुन–करिष्ये वचनं तव ।–श्रीमद्भगवद्गीता.

न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥

अर्थः—सिंह कितीही पराक्रमी असला तरी तो केवळ निजून राहील तर त्यांच्या तोंडांत सावजें आयतीं येऊन शिरणार नाहींत, असें होण्यास त्याचेकडून दृढ प्रयत्न झालाच पाहिजे.

The natural history of man deals without obscurity and without uncertainty, with great matters. Study it and the mist clear away from

much of political history. We see clearly how little the conscious efforts of man have influenced his destiny. We see forces unrecognised, enormous, uncontrolled, uncontrollable, working slowly but mightily towards tremendous conclusions-forces so irrestible and unchanging that, watching them we are able even to forceast something of the future.—*Dr. G. A. Reid.*

## परशुराम संहितेचा मतितार्थ.

परशुरामसंहिता:—परशुराम संहिता हें या सगळ्या ग्रंथाच्या नांवावरून हें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं हें नांव स्वयंप्रकाशक आहे. म्हणजे तें दाखवितें कीं तें नांव ज्या ग्रंथसंग्रहास दिलेलें आहे, त्यांतील माहिती परशुरामानें अनेक ग्रंथांतून संहित म्हणजे गोळा केलेली आहे. ते ग्रंथ कोणते हें त्यावरून समजणार नाहीं म्हणून सांगणें कीं ते अनादी वेद–प्रभृति देशी-विदेशी ग्रंथ होत. आणखीं, ह्या सामासिक शब्दांतील संहिता ह्या पदांत दुसरा स्वतंत्र व रूढ अर्थ आहे. तो अर्थ कोणता म्हणून पुसाल तर सांगणें कीं संहिता हा शब्द सामान्य ग्रंथांच्या संग्रहास लावीत नाहींत तर ज्या ग्रंथसंग्रहांत विशेषत: धर्मविषयक तत्वज्ञान भरलेलें असतें, त्यासच तो लावितात; जसें, ऋग्वेदसंहिता. आतां या परशुराम–संहितेंत कोणतें धर्मविषयक तत्वज्ञान भरलें आहे ह्मणून पुसाल तर सांगणें कीं मागें हिंदुस्थानची सुधारणा स्वाभाविक अद्वैत मार्गानें कशी करण्यांत आली व ती पुढें अद्वैताप्रमाणेंच द्वैत मार्गानेंही दृढ प्रयत्न करून कशी करण्यांत आली पाहिजे, म्हणजे त्यास हजारों वर्षे दुःसाध्य होऊन पडलेली इतर देशांच्या तोडीची मुक्ती थोडक्या वर्षांत कशी सुसाध्य होईल ?

स्वभावसिद्धियोग व प्रयत्नसिद्धियोग:—स्वस्य ( आत्मनः ) भावेन (सत्तया) सिद्धिः ( सकल भौतिक कार्याणां निष्पत्तिः ) तस्याः योगः ( योजना ) यस्मिन् सः स्वभावसिद्धियोगः। प्रयत्नेन ( भौतिक जड यंत्रादि संचालन कल्पनारूपेण ) सिद्धिः ( समस्तस्थूलसूक्ष्मपदार्थ निर्माणरूपा तस्याः योगः (योजना) यस्मिन् भागे सःप्रयत्नसिद्धियोगः। अनादीकाळापासून आज तागाईत हजारों वर्षे आम्हां हिंदू लोकांपुढें विश्वरूप आहे. त्यांतून आम्ही हिंदू लोकांनीं पंचभूतांची आराधना स्वभावसिद्ध स्वीकारिली म्हणून आमची सुधारणा उत्पत्ती व लय, उन्नती व अवनती, प्रवृत्ती व निवृत्ती, संधी व विग्रह, अहिंसा व हिंसा आस्तिकपणा व नास्तिकपणा, एकी व बेकी, द्वैत व अद्वैत, स्वातंत्र्य व पारतंत्र्य, जन्म व मृत्यू यांच्यां डोंगरदऱ्यांत हेलकावे खात होत आहे. ती नांवाला मात्र धुरी व अखंड मोक्षदायी दिसते, पण ती धुरी व अखंड मोक्षसाधक आढळत नाहीं. उदाहरणार्थ, ब्रह्मज्ञान व व्यवहारज्ञान जरी वस्तुत: मूळांत एक आहे, तरी आमच्या श्रीमच्छंकराचार्यांनीं हिंदुस्थानांतील जनतेस उपपत्तितः अद्वैत पटविलें आहे पण तें त्यांस व्यवहारतः बिलकुल पटलेलें नाहीं. तें द्वैतांत विवरिलें गेलें तरच तें त्यांत वस्तुतः पटणारें आहे.

आतां ज्यांनीं, जसें, पाश्चात्यांनीं व्यवहारांत पंचभूतांची आराधना प्रयत्नसिद्ध स्वीकारिली आहे, त्यांची गोष्ट अशी आढळत नाहीं: त्यांची सुधारणा सर्वांगीण व चिरस्थायी होते असा अनुभव आहे. म्हणून स्वभावसिद्धि योगाच्या ठिकाणीं प्रयत्न-सिद्धियोगानें पंचभूतांची आराधना आम्ही साधावी हें हल्लींच्या देशकालवर्त-मानाप्रमाणें ऊर्फ मनूप्रमाणें सयुक्तिक व स्वसंरक्षक आहे; कारण त्यांत वरील हेलकावे कमी होतात; एवढेंच नाहीं तर त्यांतील साम्यावस्था झटपट व टिकाऊ होते.

उन्नतीः–प्रथम ब्रह्म एक होतें. त्यास अनेक होण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यापासून आकाश उत्पन्न झालें. त्या आकाशांत वायू उत्पन्न झाला. त्या वायू-पासून चिज्जडाचा जळजळित अग्निमेघ उत्पन्न झाला. तो अग्निमेघ सूर्य कुंभा-राच्या चाकाप्रमाणें गरगरां फिरूं लागला असतां त्यापासून अनेक चिज्जडाचे गोळे उडाले. त्यापैकीं ग्रहरूप चिज्जडाच्या सूर्यापासून तिसऱ्या गोळ्यास पृथ्वी म्हणतात. त्या पृथ्वीवर प्रथम चोहोंकडे पाणी होतें. पृथ्वीवरील तें पाणी सूर्याच्या लंबरूप किरणांनीं तिजवरील क्रांतिप्रदेशांत कमी झालें. तेव्हां त्यामध्यें ओषधी उत्पन्न झाल्या. त्या ओषधीपासून क्रांतिप्रदेशांत अन्न उत्पन्न झालें. त्या अन्ना-पासून मच्छ, कच्छ, वराह, नृसिंह, वामन वगैरे प्राणी प्रमुखपरंपरा वैदिककाळीं उत्क्रांत झाली. त्यांत पंचजन होते. ते पांच वर्णांचे होते: (१) पांढरे (२) काळे (३) पिवळे (४) तांबडे (५) फिके. ते अनुक्रमें (१) आर्यावर्त, (२) आफ्रिका (३) चीन. (४) अमेरिका व (५) मलेद्वीपकल्प. त्यांचे प्रथम परस्पर पूर्वपश्चिम दळणवळण होतें. त्यांच्या अन्नाचा पसारा दक्षिणोत्तर वाढत गेला, तसे ते पंच-जन यथाशक्ति दक्षिणोत्तर मुंगीच्या पायांनीं पसरले. यांतील पांढरे आर्यलोक हे हल्लींच्या हिमालय पर्वताच्या जागीं असलेल्या भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर म्हणजे जंबुद्वीप उर्फ हिंदुस्थान याचा विंध्याद्रिकडील गोंडवनाचा उत्तर भाग ऊर्फ आर्यावर्त यांत रहात होते. पृथ्वीचा अक्ष व संपातबिंदू यांच्या चलना-प्रमाणें सूर्याच्या किरणांच्या पाताच्या प्रभावांत न्यूनाधिक्य होत जाऊन ह्या प्रदेशांतील पाणी दक्षिणोत्तर ओसरलें व अन्नाचा पसारा दक्षिणोत्तर वाढत चालला, त्याप्रमाणें सदरहू आर्य त्या दक्षिणआर्यावर्तांतून अथवा पितृदेशांतून उत्तर आर्यावर्तांत ऊर्फ त्रिविष्टप अथवा तिबेट व सुमेरुखंड ऊर्फ समरकंद यांत अथवा स्वर्गांत पसरत गेले. ते सुमेरुखंड तीस दिवसांच्या उषांचें साम्राज्य उत्त-रेस जेथें आढळतें तेथपर्यंत पसरले होते, व त्या सुमेरुखंडात जो सुमेरू पर्वत होता, तो सध्यांच्या मर्व्ह होय. या उत्तर आर्यावर्तांत आल्यावर आमचे आर्य इतके भरभराट पावले, कीं यांतील तिबेट अथवा त्रिविष्टप हा देश स्वर्गवाची होऊन बसला, व त्यांतील लोक देव बनले व हल्लींचे साहेब लोक हिमालयावर सिमला येथें जाऊन मजा करीत बसतात, तसे ते देव अप्सरा, गंधर्व, किन्नर, यक्ष यांसमवेत त्या मेरूवर मजा करूं लागले ! ते येथें काम करून शंभर वर्षें वाचण्याची इच्छा करावी हें कर्तव्य विसरले ! तेव्हां शिकंदर बादशाह आपल्यास

अतिमानुष समजून दारू पिण्याचे चार करूं लागला तसा तो लगेच मेला. त्याप्रमाणें हे आर्य आपल्यास अतिमानुष समजून रागरंग करूं लागले. तसा [बहुधा] पूर्वोक्त भूमध्यसमुद्रांतून तीस हजार फूट उंच हिमालयपर्वत फुटून बाहेर निघाला त्याबरोबर त्रैलोक्यांत जलप्रलय माजला ! व ते लोक मेले, गेले व देशोधडीस लागले. याप्रमाणें चैन ही लोकसमाजास केळीच्या फुलाप्रमाणें घातक असते.

अवनती.—त्या लोकांस त्या जलप्रलयांत व प्रालेयप्रलयांत तुडुंब भरलेल्या पाण्यांत ब्रम्हाचें विश्वरूपदर्शन झालें, व ते शुद्धीवर आले ! त्यांचें बाईलबिऱ्हाड सर्व कांहीं नाहींसें झालें, तेंव्हां ते आपल्या कर्तव्यास पुन्हां जागूं लागले ! त्याबरोबर त्यांस त्यांच्या पितृदेशाची अथवा जंबुद्वीपाची आठवण झाली ! त्यांच्या सदुसष्ट जमाती इतरांस दूर सारून जंबुद्वीपांत घुसावयास आल्या ! पण पाहतात तों जंबुद्वीप जंबुद्वीपकल्प होऊन त्यांच्यापुढें प्राचीन विंध्य व नवीन हिमालय यांमध्यें विंध्य हिमालयावरील वाहत येणाऱ्या हिमनद्यांच्या पाण्यांत व चिखलांत त्यांच्या वस्तीस त्यांच्याप्रमाणें नवीन ब्रह्मवर्तादी प्रदेश इंद्रानें तयार केला होता. ब्रम्हवर्त आदिक प्रदेशांत त्यांनीं नवीन वसाहतीस प्रारंभ केला ! व त्यांत त्यांनीं आपला आहिताग्नी हळूहळू जंगलें साफ करीत सदानीरा नदीपर्यंत पश्चिमेकडून पूर्वेकडे नेला ! सारांश, चंद्रग्रहणामध्यें ज्याप्रमाणें पृथ्वीची सावली चंद्रावर पडूं लागण्यापूर्वी दिसत नसते व ती त्यावरून पलीकडे गेल्यावरही दिसत नसते, त्याप्रमाणें त्यांस त्या विश्वरूपांत मागेंपुढें न दिसणाऱ्या परमात्म्याचें चक्र दर्शन झालें !

उन्नतीः—त्या मनूबरोबरच्या पंचभूतभक्त सदुसष्ट जमातींनीं विंध्यापासून हिमालयापर्यंत प्रदेश आपल्या वसाहतींनीं थोड्या दिवसांत गजबजवून टाकिला ! तो इतका कीं त्यांतील पूर्वोक्त भूमध्यसमुद्रकांठच्या पितृदेशांतील वसाहतींच्या भिन्नतेचा मागमूस राहिला नाहीं. नाहींनच म्हणावयास त्यांतील कांहीं लोक पूर्वी ओलांडावयास कठीण असलेला मधील विंध्याद्री गोड्या तलावांत बसलेल्या अथांग चिखलाच्या सहाय्यानें, सहज, उलटून दक्षिणेस अगस्त्य ऋषीबरोबर जनस्थानांतील नाशकापर्यंत तर काय पण नीलगिरीपर्यंतही गेले व त्यांनीं तेथें अगस्त्याश्रम स्थापिला-पूर्वेकडे महानदीजवळ महेन्द्रपर्वत आहे. त्यावरील परशुरामाबरोबर तेथील कांहीं परशू शूर्पार्क ( सोपारें ) ऊर्फ कोकण यांत पश्चिमेकडे वसाहत करावयास गेले ! पुढें बापानें घालविलेले श्रीराम राजपुत्र अयोध्येहून सीताबाई व लक्ष्मण यांसह गुन्हेगारांप्रमाणें वनवास भोगण्यास दण्डकारण्यांतील जनस्थानांत ( पंचवटींत ) राहण्यास आले असतां, लंकाधिपती रावणानें त्या सीताबाईचें हरण करून लंकेंत नेलें ! तेंव्हां त्या रामलक्ष्मणांनीं कांहीं मारुतीसारख्या तांबड्या व नलासारख्या काळया वानरांच्या [ माणसांच्या ] सहाय्यानें रावणास मारून व त्याचा भाऊ बिभीषण यास राज्य देऊन सीताबाईस जणू दक्षणच्या लक्ष्मीसह अयोध्येंत नेलें ! वरील जमातींपैकीं भरतांनीं साम्राज्याची कल्पना काढिली होती ! ती त्यांतील तद्वत युधिष्ठिर प्रमुख पांडवांनीं राजसूययज्ञांत सर्वत्र भरतखंडभर, म्हणजे आसेतु

हिमाचलापर्यंत दिग्विजय करून मूर्तस्वरूपांत आणिली ! तेव्हां त्यांस पुढें गीतामृत उत्पन्न करणाऱ्या श्रीकृष्णांनीं तनमनधनेंकरून सहाय्य केलें ! द्यूत खेळून सर्वस्व गमावलेल्या युधिष्ठिरास पणाच्या ठरावाप्रमाणें अज्ञातवासानंतर त्याचें राज्य त्यास परत देण्याचें सोडून मदोन्मत्त, लोभी व पापी त्याचे दुर्योधन भाईबंद कौरव आपल्या दुष्ट साह्यसंकेत्यांस घेऊन लढण्यास तयार झाले, तेव्हां मी भाईबंदाशीं लढत नाहीं असें म्हणून समरांगणावर धनुष्य टाकून गप्प बसलेल्या अर्जुनास पूर्वोक्त गीतोपदेशांत विश्वरूपाचें दर्शन करवून अनेक अक्षोहिणी सेना मारून काढिली, व युधिष्ठिरास सगळ्या आसेतुहिमाचल भारताचा अथवा हिंदुस्थानचा सम्राट करून टाकिलें ! तेव्हां हें आपलें हिंदू राष्ट्र श्री व सरस्वती यांचें माहेरघर झालें ! त्यांत कर्म ( यज्ञ ), ज्ञान, व भक्ती यांस जोर आला. पण पुढें त्यांतील प्रवृत्ती व निवृत्ती यांतील समतोलपणा श्रीकृष्णाच्या आज्ञेविरुद्ध काम, क्रोध व लोभ या पापत्रयीनें बिघडत चालला! नरकपुरीचीं तीनहि द्वारें काम क्रोध आणि लोभ सख्यारे ॥ व ॥ यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः नालमेकस्य तत्सर्वम् ॥ हा एवढा उपभोगाचा पसारा एका इसमास पुरे असा वाटेनासा झाला !

अवनतीः—पण या भरभराटींतील यज्ञयागांत निष्कारण हिंसा व समाजांत शास्त्रविहित अनुलोभ विवाहाच्या जागीं शास्त्रनिषिद्ध प्रतिलोम विवाह चालू झाले व त्यांचें योगानें वर्णसंकर सुरू होऊन त्याचा अतिरेक झाला !तो इतका कीं झाडून सर्व जनतेवर वैराग्याची व त्यांत विशेषेंकरून परिणामीं नामर्दपणा आणणाऱ्या पण प्रथम दर्शनी गोड वाटणाऱ्या दयामूलक अहिंसेची लाट उठली ! त्या लाटेवर गौतमबुद्ध बौद्धधर्माची अपूर्व फळी घेऊन दुनियेस पोहून दाखवूं लागला, तेव्हां त्या जनतेस पुन्हां त्या दयाघनाचें विश्वरूप दर्शन झालें ! पण अती त्यांत माती होते.

उन्नति.—त्या गौतमबुद्धानें औपनिषादिक चार आश्रमांतील संन्याशाच्या सांप्रदायास सोडून नवीन नीतिप्रयुक्त वैराग्यास ऊर्फ भिक्षुपंथास उत्तेजन दिलें ! कलौ संघे शक्तिः । ही म्हण लक्षांत आणून त्यानें चोहोंकडे भिक्षू व भिक्षुणी यांचे संघ स्थापिले ! व त्या संघाकरितां चोहोंकडे विहार बांधण्यास प्रारंभ केला. त्या विहारांत पूर्वोक्त भिक्षुभिक्षुणी राहूं लागल्या ! तों इकडे शूद्र सम्राट नंद जाऊन त्याच्या ठिकाणीं प्रसिद्ध मिश्र चंद्रगुप्त अशोक वगैरे मौर्य सम्राट झाले. त्यांतील चंद्रगुप्तानें यवनादी विदेशियांस हिंदुस्थानांतून हाकून देऊन सर्व उत्तर हिंदुस्थान आपले अमलाखालीं आणिलें ! अशा प्रकारें त्यानें हिंदुस्थानांत मौर्य साम्राज्याचा पाया घातला. त्यावर अशोकवर्धनानें साम्राज्याची टोलेजंग इमारत उभी केली. तिची छाया सर्व हिंदुस्थानभर तर काय पण त्या वेळच्या सर्व ज्ञात दुनियेभर पडली. इतकेंच नाहीं तर त्यानें बौद्धधर्मास आश्रय दिला. असा हा धर्म राजाश्रित झाल्याबरोबर त्याच्या भरभराटीचें काय विचारतां ! तो हिंदुस्थानभर तर काय पण त्रैलोक्यांतही पसरला ! त्या धर्माची हीनयानापासून महायानांत उत्क्रांती कनिष्काचे वेळीं झाली ! गौतमबुद्धानें परमेश्वरास आपले संघांतून व विहारांतून हांकून दिलें होतें त्याच्या रिकाम्या झालेल्या जागेवर

ह्या महायानांनीं बुद्धाच्या मूर्ती करून बसविण्यास प्रारंभ केला ! तेणेंकरून मूर्तिकला, चित्रकला, गायनकला वगैरे अनेक कला उदयास आल्या. त्यांनीं माणसांचे व गुरांचे दवाखानें घातले. तेणेंकरून चरक, शुश्रुत, वाग्भट वगैरे प्राणचार्य उत्पन्न झाले. राजे व व्यापारी यांचे वाडे व भिक्षुभिक्षुर्णीचे विहार ह्यांची हिंदुस्थानांत चोहोंकडे रेलचेल झाल्यामुळें येथें स्थपत्यशास्त्र ऊर्जित दशेस आलें. हे बौद्धभिक्षू व व्यापारी—लंका, ब्रम्हदेश, सयाम चीन, जपान, फिलिपाईन, सुमात्रा, जावा, बोर्निओ, बली वगैरे मसाल्याचीं बेटें व अफगाणिस्तान, बलुचिस्तान, मध्यएशिया, इराण, एशिया मायनर, सिरिया, अरबस्तान, इजिप्त, झांझिबारचा किनारा, नाताळ, मोरोको वगैरे ठिकाणीं वसाहत करण्यास गेले. तेव्हां धर्म व व्यापार व नौकानयन ह्यांस अतोनात भरती आली ! तेव्हां येथील लोकांस धुन्दी बेशुद्धी चढली ! ते पाखांडी झाले ! तेव्हां मौर्यानंतर झालेल्या शुंग, कण्व वगैरे राजांच्या कारकीर्दींत वैदिकांनीं बौद्धांवर चढाई करण्यास प्रारंभ केला ! पण तेवढ्यावर त्या बौद्धांचा मद कमी झाला नाहीं ! त्यांतील भिक्षुभिक्षुर्णी ह्यांचे संघ केवळ भोजनभाऊ होऊन बसले ! ते अनीतिमान झाले ! कारण त्यांस कांहींही करण्यास देवाची भिती म्हणून कशी ती राहिली नाहीं ! म्हणून त्यांचेवर यवन, शक, युएची, हूण ह्यांच्या टोळ्यांच्या धाडी पडल्या ! त्यांनीं त्यापुढील गुप्त साम्राटांच्या साम्राज्यांची धुळधाण उडवून दिली ! तेव्हां वैदिकांचे प्रतिक्रियेस जोर चढला ! सौति बादरायण वगैरे विद्वानांनीं वैदिक धर्माचे ग्रंथ जे रामायण, भारत, भागवत वगैरे अठरा पुराणें, मनुस्मृती याज्ञवल्क्यस्मृती वगैरे कायदे ह्यांत बौद्धांतील चांगल्या चांगल्या गोष्टींची भर घालून ते विनय, पिटक वगैरे बौद्ध ग्रंथांपेक्षां सरस करून ठेविले ! पुढें प्रत्येक दहा वर्षांनीं वाढलेली संपत्ती प्रजांत वाटणाऱ्या हर्षवर्धन नामक बौद्धराजानें हिंदू साम्राज्याचा डोलारा बौद्धधर्मासह उभा ठेवण्याचा कसाबसा प्रयत्न केला, पण तो निपुत्रिक निवर्तल्याबरोबर त्याचें साम्राज्य व त्यांतील साम्राटाश्रित बौद्धधर्म धडाडून पडूं लागला !

अवनती.—विलक्षण विवाह व धंदे यांनीं हर्षवर्धनाच्या साम्राज्याचे व बौद्धधर्माचे तुकडे तुकडे झाले ! ते असे कीं त्यांत सामान्य बलिष्ट शत्रूंशीं सामना करण्याकरितां एक जूट ( संघटना ) करण्यास शिकविणारा आपलेपणा बिलकुल वसत नव्हता ! त्यांचें ऐक्य करणें हें वाळूच्या कणांचा किल्ला बांधण्याप्रमाणेंच दुःसाध्य होतें ! पण अशा दुःखद स्थितींत वैदिक धर्मियांचे कुमारिल, शंकराचार्य वगैरे पुढाऱ्यांनीं त्या पाखांडी बौद्धजैनांचा पाडाव करून त्यांच्या ठिकाणीं बादरायण सूत्रांच्या आधारावर अद्वैत वेदान्त स्थापिला. म्हणून येथील एक भक्तिज्ञानविशिष्ट धर्माची बाब बरीच सुधारली ! व येथें हिंदू धर्म पुष्कळ बळकट झाला ! तो इतका कीं महंमदाचा व येशुखिस्ताचा धर्म राजाश्रित होऊन व जोडे व पेढे घेऊन एक, अलल व दुसरा, बाबादादा करीत आला असतांही त्याचा परिणाम हिंदू धर्मावर टोणग्याच्या पाठीवरील पाण्याप्रमाणेंच झाला ! पण त्याचे

मागें असलेलें वैराग्याचें शुष्ककाष्ट मात्र अजून सुटलें नाहीं ! त्यानीं बौद्धांच्या भिक्षुभिक्षुणींच्या ठिकाणीं हिंदू यतियतिणी किंवा जोगीजोगीणी आणून बसविल्या ! म्हणून शंकराचार्यांच्या या तडजोडीच्या हिंदू धर्मास तज्ञ लोक हे प्रच्छन्न बौद्ध धर्म असें निखालस म्हणतात; कारण ह्या कुटुंबविघातक जोगीजोगीणींच्या मुळाशीं कर्मनष्टपणा व फुकटखाऊपणा घरफोड्या भिक्षुभिक्षुकिणींच्या पंथाइतकाच कायम राहिला होता ! हें जगजाहीर आहे. फार तर काय हा कर्मनष्टपणा व फुकटखाऊपणा ह्या राष्ट्रांत इतका कळसास जाऊन पोहोचला होता कीं ह्या सगळ्यांस जुलुमाचा रामराम करावयास लावणें मोठें गैरमुत्सद्दीपणाचें झालें होतें. तें इतकें कीं त्यांनीं हातीं घेतलेलें धर्मक्रांतीचें म्हणजे बौद्धधर्माच्या जागीं वैदिक धर्माची स्थापना करण्याचें कार्य त्यांस साधितां आलें नसतें. त्यांस आपल्या अद्वैत वेदान्ताचें बीं आपल्या भारतीय सम्राज्याच्या भूमींत पेरतां आलें नसतें. आतां कोणी म्हणेल कीं त्या संन्याशाजवळ ही क्रांती घडवून आणण्यास बाहुबळ कोठें होतें ? तर तुह्मी ह्या जोरानें बी पेरणीच्या गोष्टी सांगता ! त्यास उत्तर कीं त्यांस इच्छा असली तर त्यांस तें पाहिजे तितकें साध्य होतें. तें कसें व कोठील म्हणून पुसाल तर सांगणें कीं त्यांस सहाय्य पुढील तीन ठिकाणीं उपलब्ध होतें: [१] दशनाम गोसावी, [२] जुने क्षत्रिय व (३) नवीन क्षत्रिय. ह्या तीन लोकसंघांच्या शस्त्रास्त्रांचा त्या आचार्यांस पूर्ण पाठिंबा होता. पण त्यांनीं ह्या सामर्थ्याचा उपयोग आपले लोकांवर केला नाहीं व आपलें काम युक्तीनें आटोपलें ह्यांत त्यांचें मुत्सद्दीपण विशेष दिसून येतें. कारण त्यांस हें पक्कें समजत होतें कीं जुलमाचा रामराम हा कायमच्या नम्रतेस कधींच कारण होत नाहीं. पण त्यास त्यांनीं व त्या वेळच्या लोकांनीं एक मोठी शहाणपणाची गोष्ट करून ठेविली. ती ही कीं त्यांनीं नवीन क्षत्रिय किंवा रजपूत मोठ्या दूरदर्शीपणानें उत्पन्न केले होते व आमच्या राष्ट्रास त्यांचा आणीबाणीचा प्रसंगीं मोठा उपयोग झाला. ते रजपूत कसे व कोठील ? आमच्या देशांत पूर्वोक्त यवन, शक, युएची, हुण वगैरे रानटी लोकांच्या टोळ्या आल्या होत्या. त्यांस बौद्धांनीं बौद्ध धर्माची दीक्षा दिली होती, व त्यांस आपलेसे केलें होतें. त्यांस त्या वेळच्या मुत्सद्दी धर्मवीरांनीं मिळमिळित बुद्धभक्तीच्या ठिकाणीं कडकडीत शिवशक्तिभक्तिची दीक्षा देऊन जाज्वल्य व जलाल क्षत्रिय बनविलें. तसे ते अत्यंत कार्यक्षम झाले. ते इतके कीं त्यांनीं आपल्या राजवेत्राच्या जरबेनें वरील कर्मनष्ट व फुकटखाऊ लोकांस पुष्कळ ताळ्यावर आणिलें, एवढेंच नाहीं तर बायकांचा जोहार करून व स्वतः केशरी पोषाख चढवून मारे मारे शत्रूस मारीत असतां मरून जाण्यांत जन्मसार्थक्य मानणाऱ्या त्या रजपूत वीरांनीं एका हातांत कुराण व एका हातांत तलवार घरून या आपल्या राष्ट्रांत वायव्येकडून नवीन घुसणारे आरब, इराणी, अफगाण, तारतर, मोंगल वगैरे लोकांच्या टोळ्यांचा कर्दनकाळपणा नरम पाडून त्यांस हिंदूंबरोबर गुण्यागोविंदानें राहण्यासारखें शांत केलें ! पण बौद्ध व जैन यांच्या अहिंसातत्त्वानें व वैराग्यतत्त्वानें व विवाह तत्त्वानें आमच्या समाजाचे असे

असंख्यात तुकडे करून टाकिले होते कीं ह्या सामान्य शत्रूशीं सामना करण्यास एकजूट ( संघटण ) करणें त्यांस समजलें असलें तरी त्यांस उमजलें खचित नाहीं. त्या प्रत्येक तुकड्यांतील जयचंदासारख्या लोकांस महंमदघोरीसारख्या सामान्य शत्रूच्या वैराच्या महत्वापेक्षां पृथ्वीराजासारख्या आपसांतील वैराचें महत्व जास्त वाटत असलें पाहिजे, म्हणून त्या मुसलमानांचे पाय येथें कायमचे लागले !

उन्नती:—बौद्ध व जैन लोकांनीं बुद्ध व जिन ह्यांची मूर्तिपूजा चालू केली होती. त्याच्याशीं मेळ ठेऊन शंकराचार्यांनीं पंचायतनाची व विशेषतः विष्णू, शिव, शक्ती, गणपती ह्यांच्या पूजेस प्राधान्य दिलें होतें, पण त्यांच्या मुळांशीं अद्वैत तत्व स्थापल्या वांचून सोडिलें नव्हतें. पण सांगावयास दुःख वाटतें कीं शंकराचार्यांपुढें त्यांच्या गादीवर जे आचार्य आले ते त्यांच्यापेक्षांही कदाचित विद्वान् असतील व पंचदशी करण्यासारखे विद्वान खास होते. पण ते इतके कर्तृत्वशून्य होते कीं त्यांनीं ह्या प्रथमाचार्यांप्रमाणें संघटनात्मक कार्य केल्याचें एकही चिन्ह कोठें दृष्टीस पडत नाहीं. फार तर काय सांगावें पण त्यांच्या साम्राज्यांत त्यांच्या डोळ्यादेखत रामानुज, मध्व व वल्लभ यांनीं त्यांच्या एकीची बेकी नव्हे तर पुरी फुकी करण्यास कमी केली नाहीं. पण त्यांच्या चारी धामातील आचार्य असे गाढ निद्रेंत मग्न होते कीं त्यांनीं त्यांजकडे नुस्ते डोळे उघडून पाहण्यापुरती ही जागृती दाखविली नाहीं ! असा त्यांचा अद्वैत वेदान्ताचा संन्यास पहिल्या मुत्सद्दी कर्मनिष्ट आचार्यांच्या विरुद्ध व माजी बौद्धसंघाच्या भिक्षुपणासारखा पुरा कर्मनष्टपणाचा होता ! नाहींतर ते पहिल्या शंकराचार्यांनीं पूर्वींच करून ठेविलेलीं द्वैताचीं वगैरे खंडणें पुढें करण्याची कर्मनिष्ठा ठेविते तर ते त्या नवीन होऊं पाहणाऱ्या आचार्यांस डोकीं वर काढूं देतेना ! पण असें कोणी कर्तव्यास जागणारे आचार्य नसल्यामुळें रामानुज, मध्व व वल्लभ यांनीं नीवींर उर्वीतलावर आपल्या पीठांची स्थापना केली, व त्यावर रामानुजांनीं बसून पावमैलावरून दिसेल असा त्रिपुंड लावण्याची व त्यावर मध्वांनीं बसून अंत्यसंस्कारांतच जे नष्ट होतील असे तप्तमुद्रांचे कठीण डाग देण्याची व त्यावर वल्लभांनीं बसून आपल्या मंदिराच्या दारांशीं हरघडी राजभोग घेऊन वल्लभांस ( प्रेमळ स्त्रिया ) आणून तिष्ठत बसविण्याची मोठी उपयुक्त संघटना आपल्या फलद्रूप मेंदूतून मोठ्या वेणा देऊन काढिली. त्या वेणांनीं हे नवीन आचार्य विव्हळत पडले असल्यामुळें त्यांस आपला धर्म, समाज, कुटुंबें व व्यक्ती यांचा येथें येऊन राहिलेला मुसलमान राजांनीं जो रात्रंदिवस—होतोस मुसलमान का उडवूं मान—म्हणत छळ चालविला होता, त्याकडे लक्ष देण्यास सुचलें नाहीं. त्याशीं विचारे एकटे रजपूत व मराठे आत्मनिरपेक्ष लढत राहिले होते. मुसलमानी व मराठी रियासती पहा ) पण त्यांस इतर जातीचे लोक मदत करते तर त्यांस हराम कोण म्हणतें ! काय तो अल्लाउद्दिन व काय तो अवरंगजेब, काय त्यांचा जुलूम व काय त्यांची जबरदस्ती, पण त्या अल्लाउद्दीनास राजपुतान्यांतील रजपुतांनीं व अवरंगजेबास महाराष्ट्रांतील मराठ्यांनीं जिवावर उदार होऊन अल्ला

अल्ला करीत हूरीसह दरबारीं बसलेल्या अल्लापुढें फिर्यादी गुदरण्यास गेलेलें पाहिलें. पण त्या रजपुतांस व मराठ्यांस मुसलमानांच्या वीरांस उत्तेजनपर 'दीन दीन' ह्या युद्धारवाचें अनुकरण करून 'हरहर महादेव' म्हणत नुसतें फुकाचें आश्वासन द्यावयास इतर हिंदू गेले नाहींत ! व उलट तेंच मुसलमानाबरोबर ' हैदोस ' घालूं लागले ! बाकी शेतकरी शेतें नागरीत राहिले ! कोष्टी कपडे विणीत राहिले ! तांबट भांडीं घडून राहिले ! सुतार घरें बांधून राहिले ! व्यापारी देवघेव करून राहिले ! ह्या चमत्कारांतील अत्यंत मोठा चमत्कार हा कीं महाराष्ट्रांतील शिवाजी महाराजांचें नितान्तमोहक स्वराज्य रामदासांच्या भगव्या झेंड्यामागून प्रत्येक हिंदू संस्थानाच्या दाराशीं नव्हे, उमऱ्यावर नेऊन मराठे उभे करीत असत, पण त्यांवरील तक्ताधिपती असे असमंजस होते कीं ते त्यास लाथाडून टाकीत व मुसलमानांचे सासरे, जावई, किंवा खानजोडे ( दासानुदास ) होत व त्या मराठ्या जातभाईच्या गोतास काळ * होत ! मग बाकीच्यांची गोष्ट काय पुसता ! म्हणून मुसलमानांची तेहतीस कोटींत एक तृतियांश इतकी संख्या ह्या बाट्यांनीं फुगवून सोडिली आहे ! पण जुलमाच्या जोड्यांनीं जर्जर करीत जाणाऱ्या जंगली मुसलमानांपुढें करडे पण साधे रजपूत नामशेष झाले, त्याप्रमाणें त्यांच्यापुढें मराठेही नामशेष व्हावयाचें, पण मराठे हे प्रसंगानुरूप करडे व साधे होणारे असल्यामुळें ते हिंदुस्थानचे साम्राट होऊन सगळ्या हिंदी लोकांस स्वराज्य व सुराज्य ह्यांची जोड करून देण्याच्या ऐन रंगांत होते ! पण इतक्यांत दैवानें वैर साधलें ! त्यांच्यांत पाश्चात्यांच्या प्रयत्नसिद्ध प्रातिनिधिक सत्तेच्या संजिवनी विद्येच्या तोडीस तोड करणारी प्राचीन कचाची संजीवनी विद्या मागील ढंगांनीं व आफतींनीं नामशेष झाली होती. म्हणून त्यांच्यांत एक नाना फडनवीस निवर्तल्याबरोबर त्याचे कामाचे जूं बरोबर मानेवर घेण्यास एकही स्वभावसिद्ध पराक्रमी पुरुष जिवंत नव्हता! अशा वेळीं त्या जंगली व जुलमी मुसलमानांमागून न्यायाच्या [लॉ ऍंड ऑर्डर] दांडीतराजूनें गोडीचे पेढे वाटणारे सुधारलेले ख्रिस्ती आले व त्यांतील शिस्तवारांतील अत्यंत शिस्तवार इंग्रजांनीं मद्रास मुंबई व कलकत्ता येथें प्रथम व्यापाराच्या वखारी घातल्या व ढग जसे आकाश चोहोंकडून नेटानें व्यास कारितात त्याप्रमाणें त्यांनीं त्या तिहीं ठिकाणांहून दृढ प्रयत्नानें चोहोंकडे राजकारणाच्या जाळ्यांत जनतेस गुरफटवून हिंदुस्थान व्यापिलें. तेव्हां मराठ्यांच्या शेवटच्या बाजीरावानें तैनाती फौज घरांत घेऊन आपलें बादशाहीचें वेत्र आयतेंच त्यांच्या स्वाधीन केलें व आपण पितृतर्पण करीत बैठुरास (ब्रह्मवर्त) बसला. पण हे आमच्या हिताचेंच झालें आहे, ( ब्रिटिश रियासत पहा. ) कारण जशी येथें तैनाती फौज घरांत घेऊन मुसलमान लोकांच्या काय-

---

* ह्या लोकांचीच परंपरा ह्या पळापर्यंत खंडरहित चालू आहे. हल्लीं १९२५ त स्वराज्यास संमत्ती देण्याकरितां अल्पसंख्याक मुसलमान, बहुसंख्याक हिंदूंपासून 'स्पेशल हक्क' मिळविण्यास मि. जीनामार्फत झगडून राहिले आहेत! हें नवल आहे.

मच्या वसाहतीनीं आमच्या समाजांत लष्करी लढवय्ये लोकांची भर पडली आहे तशी इंग्रज लोकांच्या योगानें ह्या देशांत दर्यावर्दी लढवय्ये लोकांची भर पडली आहे ! व ह्या अपूर्व त्रिवेणी संगमापासून इंग्रजांच्या खुद्द इंग्लंड देशांतल्या त्रिगुणात्मक राज्यव्यवस्थेप्रमाणें येथें संघटणात्मक स्वराज्य व सुराज्य उत्पन्न होण्याचा थोडासा रंग दिसत आहे ! तर त्यास आपण पात्र झालें पाहिजे ! नाहींतर तें टिकाऊ होणार नाहीं !

त्यास काय करावें ?:—वरील विवेचनावरून हें कोणाच्याही लक्षांत येईल कीं आपल्या राज्यव्यवस्थेच्या प्रकारांत आपल्यास स्वराज्य दिसलें व सुराज्यही दिसलें व तें अंशतः किंवा पूर्ण लोक नियंत्रितही दिसलें, व त्यांत ऐहिक व पारलौकिक युक्तिसुखही अपरंपार दिसलें, पण तें स्वभावसिद्ध असल्यामुळें तें क्षयधर्मी व दीर्घसूत्री होतें. कारण त्यांस अनेक साधक व बाधक प्रकार दिसले. उत्पत्ती व लय, उत्कर्ष व अपकर्ष, उन्नती व अवनती, अद्वैत व द्वैत, आरोह व अवरोह, हिंसा व अहिंसा, प्रवृत्ती व निवृत्ती, उत्क्रांती व अवक्रान्ती ह्यांत रोज होणाऱ्या समुद्रावरील भरती व ओहोटी यांच्यांमध्यें जशी एक समा म्हणून स्थिति असते, त्याप्रमाणें वरील द्वंद्वामध्यें साम्यावस्था म्हणून स्थिती असते. ती स्थिती दोन उपायांनीं साध्य होते. १ स्वभावसिद्धियोगानें व २ प्रयत्नसिद्धि योगानें. आपण पाहिलेंच आहे कीं ती स्थिती उत्पन्न करण्यास आपण स्वभावसिद्धीचें सहाय्य घेतलें तर ती अल्पायुषी निवडते, पण ती उत्पन्न करण्यास आपण प्रयत्नसिद्धीचें सहाय्य घेतलें तर ती दीर्घायुषी निवडते, असें इंग्रजांच्या कृपेनें झालेल्या विश्वरूपाच्या अपूर्व शिक्षणावरून सिद्ध झालें आहे. ( पाश्चात्य देशांचे इतिहास व भूगोल वर्णनें पहा ). तर त्या प्रयत्नसिद्धीचा उपयोग यापुढें स्वभावसिद्धीच्या जागीं करणें आम्हांस वाजवी दिसतें. पण ह्यासही आम्ही पूर्वोक्त भारतांतील मर्यादा घालून ठेवितोः—

" यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः ।
नालमेकस्य तत्सर्वमिति मत्वा शमं व्रजेत् ॥

ह्याप्रमाणें झाडून सर्व उपभोगजात एकाला मिळाले तरी त्याचें बिलकुल समाधान होत नाहीं अशी अवस्था त्याला प्राप्त होते, त्यावेळीं विवेकानें त्यानें आपलें मन पुरें आवरून धरावें. मागें भारती युद्धांत ' अती त्यांत माती ' झाली व हल्लीं ऍंग्लोजर्मन युद्धांत होत आहे ! तर ती मर्यादा कशी व कोठें धरावी ? ज्यास आपण स्वतःचें खुद्द असें म्हणतों त्यांच्या संरक्षणाचा ज्या ठिकाणीं प्रश्न उत्पन्न होत नाहीं, त्या ठिकाणीं कुरापती काढीत फिरण्याच्या मोहांत न पडण्याबद्दल मनोनिग्रह ठेवावा; कारण श्रीकृष्णानें श्रीमद्भगवद्गीतेंत ह्या बाबतींत आत्मोपम्येन सर्वत्र यः पश्यति स पश्यति—अशी इशारत देऊन ठेविली आहे. ही मर्यादा आह्मी अक्षरशः व तत्वशः पाळणार, तर त्या प्रयत्नसिद्धीचें सहाय्य कसें घ्यावयाचें ? गीतोक्त कर्मयोग स्वीकारून ( आमची गीता—मोहविध्वंसिनी टीका व

लोकमान्य टिळक यांचें गीतारहस्य पहा. ( रामदासांच्या पुढें लोकांस जागें करून त्यांस कर्मनिष्ठ करणारा हा अपूर्व ग्रंथ आहे. )

प्रयत्नसिद्धियोगः—धर्म, अर्थ, काम व मोक्ष—मिळण्याकरितां ज्या ज्या पंचभूतांची आराधना आपण आजतागाईत ज्या स्वभावसिद्धियोगानें करीत असूं, त्या त्या पंचभूतांची आराधना त्यांच्या ठिकाणीं त्या प्रयत्नसिद्धियोगानें साधावयाची, तर त्या आराधनेंतील मूलभूत तत्वें जीं भक्ती, ज्ञान, वैराग्य, योग व कर्म हीं सांगोपांग व साद्यंत समजावीं, ह्मणून हिंदुस्थानांतील ब्राह्मणापासून चांडालापर्यंत झाडून सर्व लोकांस, प्रथम, प्राथमिक शिक्षण प्रत्येक गांवच्या विशेष गरजांप्रमाणें निरपवाद मोफत दिलें पाहिजे, मग तुम्ही त्यावरील मध्यम व उच्च शिक्षण तुमच्या ऐपतीप्रमाणें द्या किंवा देऊं नका.(आमचा 'प्रायमरी एज्युकेशन ॲज इट ईज ॲंड ॲस इट शुड बी ' हा लेख वैदिक मॅगेझिन सपटबंर १९२२ पा. १६४ यांत पहा;) कारण असल्या प्राथमिक शिक्षणानें प्रत्येक इसमास अक्कल फुटते व ती अक्कल व शिवशक्ति अथवा विश्वशक्ति ह्यांत बिलकुल भेद नाहीं. पुढें ह्या अपूर्व शक्तीचा उपयोग विश्वरूप किंवा शिवरूप जाणण्यास करावयाचा. त्या विश्वाचें किंवा शिवाचें रूप पंचमहाभूतें हें होय. हीं पंचमहाभूतें अथवा पृथ्वी आप, तेज, वायू व आकाश हीं स्वभावसिद्धियोगानें भक्ति, ज्ञान, वैराग्य, योग व कर्मपूर्वक आराधून प्रसन्न करितां येतात व त्यांपासून धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ जसे आपण साधिले तसे ते पुरुषार्थ पंचमहाभूतें प्रयत्नसिद्धियोगानें भक्ति, ज्ञान, वैराग्य, योग व कर्मपूर्वक आराधून साधितां येतात. पण स्वभावसिद्ध धर्म, अर्थ, काम, व मोक्ष हे चार पुरुषार्थ व प्रयत्नसिद्ध धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ ह्यांत जमीन अस्मानाचें अंतर असतें; कारण स्वभाव व प्रयत्न ह्यांत जमीन अस्मानाचें अंतर मुळांतच आहे. आपण हें पाहिलें आहेच कीं, स्वभाव हा बिलकुल शिस्तवार नसतो. त्याप्रमाणें स्थिती प्रयत्नाची नसते. तो अत्यंत शिस्तवार असतो. त्या शिस्तीसच शास्त्र म्हणतात. तेव्हां हें न सांगतां कोणासही कळण्यासारखें आहे कीं, अव्यस्थित चित्तांनां प्रसादोपि भयंकरः—असें जें म्हणतात, तें कांहीं वेळां खरें ठरतें, म्हणजे तें नेहमीं खरें ठरतें असें नाहीं—ह्याचा अनुभव आपण अनादी वेदकाळापासून आजतागाईत रोकडा घेत आलों आहों, तर नेहमीं भरंवसा ठेवण्यास लहरी स्वभावापेक्षां शिस्तवार अथवा शास्त्रप्रयुक्त प्रयत्न जास्त योग्य होय; कारण लहरी स्वभावजन्य झाडावरून पडलेल्या आम्रफळांपेक्षां ( शाका ) विहितप्रयत्नजन्य आडीतील आम्र फळें जास्त अमोघ मधुर व विपुल असतात हें आपणास पाश्चात्य लोक प्रत्यक्ष अनुभवास आणून देत आहेत. तें असें कीं आमच्या पौर्वात्यांच्या लहरी स्वभावजन्य धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांच्या सुखापेक्षां त्या पाश्चात्यांचें विहित प्रयत्नजन्य धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचें सुख अत्यंत लोभनीय असतें. तर हा शास्त्रविहित अथवा शास्त्रप्रयुक्त प्रयत्नसिद्धियोग कसा साधावयाचा ह्याचा आतां विचार

केला पाहिजे. आपणास हें ठाऊक झालेंच आहे कीं, स्वभावसिद्धियोगाप्रमाणेंच प्रयत्नसिद्धियोगांतही शिवाच्या अथवा विश्वाच्या पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंच तनूंची भक्तिपूर्वक, ज्ञानपूर्वक, वैराग्यपूर्वक, योगपूर्वक व कर्मपूर्वक आराधना करावयाची आहे. प्रत्येक आराध्य तनूच्या प्रकाराप्रमाणें तिच्या आराधनेचे प्रकार अथवा शास्त्रें भिन्न भिन्न आहेत. त्या तनूच्या प्रकाराप्रमाणें तिच्या आराधनेचे प्रकार अथवा शास्त्रें येणेंप्रमाणें:—

१ पृथ्वी.—पृथ्वीचे भागः जंगल, शेती, खाणीः शास्त्रें—जंगल—जंगलाची जोपासना; शेती.—कृषिकर्मविद्या; खाणी.—खनिविद्या, धातुविद्या.

२ आप.—आपाचे भागः पाणी, वाफः शास्त्रें—पाणी.—पाट पाणी—विहिरी—तलाव—बंधारे पाणचक्क्या, जलोत्सर्जक यंत्रें ( बंब वगैरे ); वाफ.—वाफेचीं यंत्रें आगगाड्या, आगबोटी, तैल—बाष्प यंत्रें—(आकाशयानें, आकाशनौका—पुढें पहा), मोटर बायसिकल्स, मोटर ट्रामस.

३ तेज.—तेजाचे भागः उष्णता, प्रकाश, विद्युत व चुंबन. उष्णता.—उष्णता माफक यंत्र—( वाफेचीं यंत्रें व तैलयंत्रें—हवालावर ); प्रकाश —प्रकाशालेख्यविद्या फोटोग्राफी ), प्रकाशालेख्यशिलामुद्रणविद्या ( फोटोलिथाग्रफी ), प्रकाशालेख्य जसदमुद्रणविद्या, विद्युत व चुंबन—विजेचे दिवे, विजेच्या गाड्या, विजेच्या पेट्या, मत्स्य यंत्रें ( होके ).

४ वायू—गतीः गती—अवजारी होड्या व गलबतें, पवनचक्क्या, पवन—बंब, वायुदिग्दर्शक यंत्र, पवनशास्त्र. वायुभारमापक यंत्र.

५ आकाशः पर्जन्य, तारे, तारकता पर्जन्य—पर्जन्यशास्त्र, पर्जन्यपातमापक यंत्र; तारे.—ज्योतिषशास्त्र, तारकता ( बायॉन्सी ).—आकाशयानें, आकाशनौका.

१ मनुष्य—मनुष्याचें शरीर मन व आत्मा यांचा विकासकरणारीं शास्त्रें.

अनन्य आराधना.—आपले पूर्वज आर्य ह्या तनूंची अनन्य आराधना म्हणजे परमेश्वर महादेव समजून अविहित स्वभावसिद्धियोगानें—या सृष्टिः सृष्टराद्या अशी करीत असत, त्याप्रमाणें ह्या तनूंची अनन्य आराधना म्हणजे परमेश्वर महादेव परब्रम्ह समजून वरील विहित प्रयत्नयोगानें करा म्हणजे धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यांच्या ऋद्धी व सिद्धी हात जोडून तुम्हां भक्तांपुढें उभ्या राहतील यांत चूक होणार नाहीं. धारयते=इति धर्मः। अफलाकांक्षीकर्मेच्छा=इति कामः। इहपरस्वातंत्र्यसुखम्=इति मोक्षः। आत्मनिरपेक्ष संपादितं ज्ञानं धनं वा=इति अर्थः। अशा तोलानें वागणाऱ्या इसमास विहित प्रयत्न सिद्धियोगानें अमोघ ब्रम्हप्राप्ती किंवा कैवल्यलाभ झालाच पाहिजे, झालाच पाहिजे, झालाच पाहिजे असें त्रिवार छातीस हात लावून आम्ही सांगतों, मात्र तो आत्मनिरपेक्ष करून पाहिला पाहिजे ही त्याची शर्त आहे हें ध्यानांत ठेवा. कारण पिंडीं तेंच ब्रम्हांडीं आहे व जीव तोच शिव आहे. त्याचा साक्षात्कार उमेच्या विद्युत्सदृश चमकेप्रमाणें होईल. ह्यास केनोपनिषदाची साक्ष आहे आहे ! ( आमचें उपनिषत्परमामृतम् पहा ).

इशारा.—श्रीकृष्णानें अर्जुनाप्रमाणें कर्मनष्ट होऊं पहाणारांस विश्वरूपानें कर्मयोगी व्हा म्हणून सांगितलें असतां तसें जे करणार नाहींत त्यांस तो त्याप्रमाणें ते करूं लागेपर्यंत परचक्राच्या जात्यांत भरडण्यास घालील हें ध्यानांत धरा.

शेवट.—मुख्यमेकं पुरस्कृत्य शून्या स्मानोऽपिसाधकाः ॥ भवन्ति तं विनानैव यथा संख्यांक बिंदवः ॥ प्रत्येक समाजामध्यें तीन प्रकारचे लोक असतात. १ सिद्ध २ साधक व ३ उदासीन. त्याप्रमाणें प्रयत्नसिद्धीच्या मार्गास लागलेल्या लोकांमध्येंही हे तीन प्रकारचे लोक महाप्रलयापर्यंत आढळणारच ! जन्मजन्मांतरीं टोले खाऊन खाऊन ते जसे सुध्या मार्गास लागतात व त्यांच्या चिज्जडाचा विकास होतो तशीं त्यांस मोठमोठीं सृष्टीचीं रहस्यें समजूं लागतात. उदाहरणार्थ, त्यास कालियामर्दनाच्या वर्णनांत नुसत्या गोपगोपी, धेनू, यमुनेचा डोह, कालियासर्प, व त्याव. बन्सी वाजवून नाचणारा श्रीकृष्ण दिसत नाहीं ! तर त्यांत त्यास अपूर्वदृष्ट तत्वज्ञान गोचर होतें. तो आपल्या चिज्जडाचा विकास श्रीकृष्णाप्रमाणें करील तर त्याच्या आंगास श्रीकृष्णाप्रमाणें विपत्तीरूप कालियाचे पडलेले वेढे तटतटां तुटतात व तो मुक्त होऊन भयभीत आप्तांमध्यें त्या सर्पाच्या फणेवर बन्सी वाजवीत थयथयां नाचतो व तो कालिया त्यास शरण येतो तेव्हां तो त्यास श्रीकृष्णाप्रमाणें निर्विष करून सोडून देतो त्याबरोबर श्रीकृष्णाप्रमाणें त्याचे शत्रू, मित्र व उदासीन एका अपूर्व सच्चिदानंदरसानें एकसारखे एक भरून जातात. अशा प्रकारें त्या सच्चिदानंदरसाचा वेळोवळीं आस्वाद घेतां घेतां तो सच्चिदानन्दकन्द परब्रह्मरूप स्वतः मूर्तिमंत होतो ! हें तर काय पण त्यांत जे कर्मनष्टांतील अत्यंत कर्मनिष्ट असतील त्यांस महाप्रलयाचे कालीं असे एकावर एक टोल्यांवर टोले बसतात कीं, ते चीची करीत कर्मनिष्टपणाचें व्रत धरतात ! त्याबरोबर ते उच्चावचभाव सोडून यथामूल यच्चयावत सर्व अभिजात बनून ब्रह्मीं लीन होतात ! व ते उत्पत्ती व लय यांच्या मध्यंतरीं महाजनपणा व सोवळेपणा ( अस्पृश्यता ) यांच्या मायेच्या फुशारक्या साफ सोडून देतात ! जोंपर्यंत त्या परमात्म्याचें दर्शन झालें नसतें तोंपर्यंत त्या मायेचें प्रेक्षकांपुढें असें थाटाचें नर्तन चालू असतें ! पण साक्षात्कारसमयीं तिची व त्या परत्म्याची दृष्टी एक झाल्याबरोबर ती त्या नर्तनापासून निवृत्त होते व ती त्यांस सोडिते व ती, ते, व सच्चिदानंदकंद' हीं सर्व एक ब्रह्मरूप'–होतात ! मग त्यांत स्वार्थ व परमार्थ यांस जागा कोठें राहते बरें !

रूपरेषाः—असा आमच्या संहितेचा आराखडा आहे. तो एवढा अगडव्याळ आहे कीं, त्यांत सध्याच्या पौर्वात्य व पाश्चात्य ज्ञानाचें संकलन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे, तेव्हां या अक्षुण्ण मार्गांत ह्या असर्वज्ञ संहिताकाराची पदोपदीं दिशाभूल व्हावयाचा संभव फार आहे. कारण हें काम करण्यास आम्हांस आमचें जुनेंपानें देशी मत्स्ययंत्र व फुटकेंतुटकें होडकें घेऊन कोलंबसापेक्षांही मोठ्या चिकाटीनें अनेक तपें सप्त समुद्रांवरून त्रैलोक्यभर हुतुतू घालावी लागली आहे. ती अशा ठिकाणीं कीं जेथील लोहचुंबकविशिष्ट

विशेष स्थळांच्या आकर्षणानें आमचें मत्स्ययंत्र आपला उत्तर, दिशा दाखविण्याचा धर्म सर्वस्वी सोडीत असे व जेथील हिमविशिष्ट स्थलांच्या पकडीनें आमचें होडकें आपला मार्ग पुढें जाण्याचा धर्म टाकीत असे. ह्मणून चुकीस पात्र अशा मज-सारख्या नावाड्यास भलत्याच ठिकाणीं दिशापालट व खुटवा [ मुक्काम ] करावा लागला आहे. उदाहरणार्थ, आमच्या निवृत्तिनाथाच्या गरगरां फिरणाऱ्या सातरंगी-चक्राच्या अनुभवाप्रमाणें पंचजनांपैकीं पांढरे लोक हेच सात रंगांच्या मूळ लोकांच्या मिश्रणाचे आहेत व काळे, पिवळे व तांबडे लोक हे मूळ शुद्ध रक्ताचे आहेत. म्हणून ह्या संहितेंत पंचजनांपैकीं कोणाची तरफदारी करून त्याची चढती बढती दाखविण्याची इच्छा आम्हीं बिलकुल धरलेली नाहीं. मि. व्हिन्सेन्ट स्मिथनें आपल्या इतिहासांत इशारा दिल्याप्रमाणें आम्ही ह्या संहितेचें साहित्य मोठ्या खबरदारीनें गोळा केलें आहे, तरी हुशार सूक्ष्मदृष्टी वाचकास एकच काय पण अनेक वाक्यें मागील पुढील संबंध तोडून तरफदारीचे गोळे हल्लींच्या जर्मनांच्या सत्तर मैल पल्ल्या-च्या तोफेच्या गोळ्यापेक्षांही जास्त घातक म्हणून जगाच्या स्वास्थ्यरक्षक दरबारांत अनपेक्षित रीतीनें टाकितां येतील ! ह्यांत संशय नाहीं. पण तशाच ह्या बाहेरच्या— गैरसमजुतीच्या, विसंगतीच्या, पुनरुच्चारणाच्या ऱ्हस्वदीर्घतेच्या व अनिष्टप्रसंगाच्या चुका—शतशः आढळतील; कारण तें ह्या संहितेच्या मोठेपणास, माझ्या वृद्धपणां-तील विस्मृतीस व माझ्या ( मोतिबिंदू होऊं घातलेल्या १८-१-२५ ) लघुदृष्टीस अपरिहार्य आहे. पण असले दोष सुज्ञ व मर्मज्ञ वाचकांस दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं सुचवितां यावे व ह्या संहितेचें काम पुरें होण्यापूर्वीं ह्या संहिताकारास *दिवं-गत व्हावें लागलें तर त्याचे हातून अपुरें राहिलेलें काम त्याचे आप्त, विद्यार्थी व इतर विद्वान गृहस्थ यांस बाणाच्या कादंबरीप्रमाणें पुरे करितां यावें म्हणून तिचा साद्यंत आराखडा वर दाखवून ठेविला आहे. शिवाय ह्या संहितेंत काय आहे? हें ज्यांस विहंगमदृष्टीनें पाहावयाचें असेल त्यांची हींत मुद्दाम सोय केली आहे व ही व्याप्तीच्या बाबतींत, प्रामुख्येंकरून, महाभारतासारखी आहे:—

धर्मे चार्थे च कामेच मोक्षे च पुरुषर्षभ ।
यदि हास्ति तदन्यत्र यन्नहास्ति न तत्क्वचित् ॥

ह्या संहितेंत नाहीं असें धर्म, अर्थ, काम व मोक्ष साधणारें तत्व पौर्वात्य व पाश्चात्य ग्रंथांत क्वचित सांपडेल ! व तिचा गाभा पुढील प्रकारचा आहे:—

धर्मे वो धीयतां बुद्धिर्मनो वो महदस्तु च ।

तिचा गाभा वाचकांची बुद्धी अद्वैत धर्माचरणावर स्थिर करणारा व त्यांचें मन मोठें करणारा आहे. हींतील इतिहास, राजधर्म, व्यवहार, नीती, व तत्वज्ञान हे विषय तिची रुची वाढविणारे आहेत. सारांश, ही संहिता पौर्वात्य व पाश्चात्य सारस्वताचा संग्रह करणारी आहे.

---

* ही कल्पना मनांत येण्यास आज २-१०-१८ रोजीं हें लिहीत असतां माझी एकुलती एक मुलगी सौ. कृष्णाबाई बाळकृष्ण रानडे ही पुणें येथें तीन मुलें मागें ठेऊन इन्फ्लुएंझानें दिवंगत झाल्याचें कार्ड आलें !

पूर्वेकडल्या चिच्छास्त्रांतील (अध्यात्म) जडशास्त्राची (भौतिक) उणीव पश्चिमेकडील(भौतिक) जडशास्त्रांतील तत्वार्थानें भरून काढण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. हा चिजडाचा संयोग आपल्या गंगायमुनेच्या संगमावरील प्रयागराजाप्रमाणें सर्वपावक व मोक्षद आहे. म्हणून श्रीव्यासाप्रमाणें आम्ही ओरडून म्हणतों:-

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष नहि कश्चिच्छृणोति मे ।
धर्मार्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥

महाभारत.

हा चिज्जडविशिष्ट धर्म आचरा म्हणजे पाहिजे तो तुमचा इहपर इष्ट कार्यभाग बरोबर तडीस जाईल.

उपदेश.—यावरून पुढील गोष्टी निर्विवाद कळतील.—

उन्नती विरुद्ध अवनती.

( १ ) आम्ही पूर्वी कुलीन होतों, हल्लीं आहों व पुढें राहूं.

( २ ) प्रजेची नियंत्रणा पूर्वी राजसत्तेवर चालत असे.

( ३ ) प्रजा येथील कायदे जसे धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांस विघातक होऊं देत नसत, तसे तिनें ते हल्लीं व पुढें होऊं देतां कामाचे नाहींत.

( ४ ) येथील व्यक्ती, कुटुंबें, समाज, प्रांत व राष्ट्र पूर्वी जसें प्रेमरज्जूनें बद्ध असे, तसेंच तें हल्लीं व पुढें ठेविलें पाहिजे.

( ५ ) येथील व्यक्तिस्वातंत्र्य जसें पूर्वी माफक मर्यादित होतें, तसेंच तें पुढें ठेविलें पाहिजे.

( ६ ) येथील धनी व नोकर जसे राष्ट्राचें निमक (मीठ) खातों असें मानणारे असत, तसेच ते पुढें राहिले पाहिजेत.

( ७ ) येथील प्रत्येक गांव जसा पूर्वी स्वयंशासित प्रजासत्ताक संस्थेप्रमाणें वागे तसाच जो पुढें वागला पाहिजे.

( ८ ) आईबाप व मुलें, नवरा व बायको यांमध्यें पूर्वी द्वैत नसे, तसेंच तें पुढें नसलें पाहिजे.

( ९ ) येथील प्रत्येक व्यक्तीला जसा पूर्वी आत्मा, शरीर व मन यांचा विकास करण्याचा शोक असे, तसाच तो तीस पुढें राहिला पाहिजे.

( १० ) आमची भवितव्यता जशी आम्ही पूर्वी आपल्या हातीं ठेविली होती तशीच ती आम्ही पुढें आपल्या हातीं राखिली पाहिजे.

( ११ ) आमची नीती जशी पूर्वी आत्मौपम्य, होती तशीच आपण ती पुढें ठेविली पाहिजे.

( १२ ) आमचें भारत राष्ट्र पूर्वी दुनियेंत अग्रगण्य होतें, तसेंच तें पुढें राखिलें पाहिजे.

( १३ ) आम्ही जसे पूर्वी स्वकर्मनिष्ठ होतों, तसेच आम्हीं पुढें स्वकर्मनिष्ठ राहिलें पाहिजे.

( १४ ) आम्ही जसे पूर्वीं [ राजपुतान्यांत व महाराष्ट्रांत ] स्वदेशाभिमानी व स्वराज्यनिष्ठ होतों तसेच आम्ही पुढें स्वदेशाभिमानी व स्वराज्यनिष्ठ राहिलें पाहिजे.

( १५ ) आम्ही आमचीं कामें जशीं पूर्वीं स्वतः करीत असूं तशीं आम्ही आमचीं कामें पुढें स्वतः केलीं पाहिजेत.

( १६ ) मी जीं कामें करितों तीं आपल्या राष्ट्राकरितां करितों अशी भावना आपले महाराष्ट्रांत एके वेळीं असे, तशीच ती पुढें आपल्या प्रत्येक इसमांत वसली पाहिजे.

( १७ ) एखादा नवीन मार्ग सांपडला म्हणजे आम्ही तो लगेच चोखाळूं लागत असूं, तसाच तो आम्ही पुढें–प्रयत्नानें सिद्धी मिळेतों–चोखाळला पाहिजे.

( १८ ) स्वराज्य व सुराज्य म्हणजे इहपरैक धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचीं सुखें आमचे लोक पूर्वीं अप्राप्य मानीत नसत, तशीच तीं आम्ही पुढें अप्राप्य मानूं नये.

( १९ ) आमचे लोक व विशेषेंकरून कुटुंबें व गावें द्वैतपरायण नसत त्याप्रमाणेंच त्यांनीं पुढें असलें पाहिजे.

( २० ) आम्ही जसे पूर्वीं नास्तिक नसूं, तसेच आम्ही पुढें नास्तिक नसलें पाहिजे. कारण ह्याच्या उलट आचरणानें आम्ही वारंवार धुळीस मिळाले आहों.

पुरे कामः—आमच्या संहितेचे पुढील भाग आतांपर्यंत सगळे किंवा अंशतः पुरे झाले आहेत व ते प्रसिद्धी करितां सगळे किंवा अंशतः आश्रयाची अपेक्षा करीत आहेत.

१ अद्वैतासिद्धी.

( १ ) वैदिक काळाचा इतिहास ( सर्व तयार )
( २ ) बौद्ध काळाचा इतिहास ( सर्व तयार )
( ३ ) हिंदू काळाचा इतिहास ( सर्व तयार )

द्वैतसिद्धी

( १ ) पृथ्वीः–जंगलाची जोपसना सर्व तयार; शेती ( सर्व तयार–अद्भुत वृक्षोत्पादन–श्रीयुत म. कृ. पाध्ये, उद्यमकर्ते यांजकडे ); भूगर्भदर्पण ( सर्व तयार )

( २ ) आपः–विहिरी ( उद्यमांत प्रसिद्ध ); वाफेचीं यंत्रें ( व्हावयाचीं आहेत ); तैल यंत्रें ( कांहीं तयार ); गलबतें (ग्रन्थोत्तेजकमण्डळ, इंदूर, कडे).

( ३ ) तेजः–प्रकाशालेख्यशिलामुद्रण ( उद्यमकर्ते यांजकडे ); विद्युद्विज्ञान ( उद्यमकर्ते यांजकडे )

( ४ ) वायूः–पवनचक्क्या ( सर्व तयार )

( ५ ) आकाशः–आकाशयानें ( मासिक मनोरंजनकर्ते यांजकडे ); भारतीय विमानें ( उद्यमांत प्रसिद्ध ); भक्तोंचीं प्रत्यक्ष मूर्ती, भाग २ [ सर्व तयार–पहिला भाग रा. घोलप यांजकडे ]; अंगुलिमुद्रण ( सर्व तयार ).

( १ ) मनुष्यः—शरीर–बालामृत [ आयुर्वेदांत प्रसिद्ध ]; अबलामृत [ आयुर्वेदांत प्रसिद्ध ]; पुरुषामृत [अर्धे तयार]; सुप्रजाप्रजननप्रकाश [साहित्य-

मण्डळ, इंदूर, कडे ] गृहपरिचर्या व आरोग्यशास्त्र; एखाद्यास एकाएकीं इजा झाली असतां त्यावर करण्याचे उपाय; सूतिकाशास्त्र; परिचारिका ही कै. डा. का. ना. गोखले यांचेकरितां मजुरीनें केलीलीं छापिलीं आहेत );

मन व आत्मा.—१ उपनिषत्परमामृतम्; २ गीता-मोहविध्वंसिनी टीका ( हीं छापिलीं आहेत. पण शिल्लक नाहींत.

तत्वः—फट झाल्याबरोबर चों चों करीत उडत जाणारे पोपट अभ्यास केला असतां स्थिर बुद्धीनें बंदुका उडवूं शकतात.

शुद्धलेखनः—ह्या संहितेंतील 'इ' व 'उ'ची ऱ्हस्वदीर्घता कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या व्याकरणांवरील निबंधांप्रमाणें आहे हें ध्यानीं असूं द्या.

आभारः—ज्या ज्या लेखकाचे ग्रंथाचें ह्या संहितेस अंशतः किंवा पूर्ण सहाय्य घेतलें आहे, त्या त्या जागोजाग नोंदलेल्या किंवा नोंदल्यावांचून राहिलेल्या लेखकांचे व ( श्रीमंत म रा. तुकोजीराव होळकर, रा. ब. सरदार मा. वि. किबेसाहेब, श्रीयुत शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी, श्रीयुत शेट कल्याणदास व चि. विष्णु परशुराम रावेरकर, प्रमुख) हस्तेंपरहस्तें मदत करणारांचे आभार मानून ही लेखणी पुढील पद्यें लिहिल्यावर खालीं ठेवितों.

विनंतीः—पुरुषाचा धर्म श्रम म्हणोनि कांहीं पडेल येथ उणें ॥
पूर्ण करावें शोधुनि भगवत्प्रीत्यर्थ सज्जनें निपुणें ॥
भ. गी. मोरोपंत.

ऱ्हावाचि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गाबाळ काला ॥
रम्यरामायण. ४

नासिक, १०६४ राजेबहादूर गल्ली
( ता. २-१०-१८ ) } **परशुराम हरी थत्ते.**

---

**Mother-Land** ( *Sarojini Naidu*).

How can I serve thee, I am so weak ?
Beloved land !
Make thou my loving heart a deathless lute
Within thy hand.
What can I give thee, I who am so poor ?
O thou most sweet :
Let my life blossom like a lotus-flower
Under thy feet.

( Modern Review XII-2 )

# अनुक्रमणिका.

| विषय.— | सदरें.— | पानें. |
|---|---|---|



श्रीमंत तुकोजीराव होलकर

A 5060—Lakshmi Art, Bombay, 8

ॐ

# वेदांच्या काळाचा इतिहास.

## पुस्तक पहिलें—पूर्वार्ध.

### प्रकरण पहिलें

### भाग पहिला.

#### विषय-प्रवेश.

( मुख्यलक्षण—स्वपराक्रम; प्राथमिक प्रेरकप्रभाव; निसर्गाची आराधना; भौगोलिक फेरफार. )

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥—कालिदास-रघुवंश.

अर्थः—जगाचे भाषा व अर्थ यांप्रमाणें संयुक्त आईबाप जे प्रकृती व पुरुष यांस मी वंदन करितों; अशाकरितां कीं त्यांच्या कृपाप्रसादानें माझ्या लेखणींतून अर्थपूर्ण शब्द निघावे.

वन्दे मातरम् ॥ टेक ॥
सुजलाम् सुफलाम् मलयज शीतलाम् ।
शस्यशामलां मातरम् ॥
वन्दे मातरम् ॥ अन्तरा ॥
शुभ्रज्योत्स्नापुलकितयामिनीम् ।
फुल्लकुसुमितद्रुमदल शोभिनीम् ।
सुवासिनीम् सुमधुरभाषिणीम् ।
सुखदाम् वरदाम् मातरम् ।
वन्दे मातरम् ॥

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः ॥ आकाशाद्वायुः ॥ वायोरग्निः ॥ अग्नेरापः ॥ अद्भ्यः पृथिवी ॥ पृथिव्या ओषधयः ॥ ओषधिभ्योऽन्नं ॥ अन्नात् पुरुषः ॥ तै० उ० ॥ ३-१ ॥

अर्थः—त्या ह्या–पुढें असलेल्या प्रत्यक्ष–ब्रह्मापासून आकाश उत्पन्न झालें, त्या आकाशापासून वायू उद्भवला, त्या वायूपासून अग्नी निघाला, त्या अग्नीपासून पाणी उत्पन्न झालें. त्या पाण्यापासून पृथ्वी झाली, त्या पृथ्वीपासून ओषधी उगवल्या, त्या ओषधींपासून अन्न पैदा झालें व त्या अन्नापासून पुरुष प्रादुर्भूत झाला.

Among a people possessing many varieties of climate and frmilior with some of the grandest aspects of Nature mountainsc the highest on earth, noble rivers, a vegetation incomparably luxuriant, periodical rains, tempestuous monsoons, it is not surprising that there should have been an admiration for the material and a tendency to the worship of Nature. These spectacles have an indeliable inpression on the thoughts of man and the more cultivated the mind, the more profoundly are they appreciated- **Dr. J. W. Draper.** The Int. Dev. of Europe-P. 58

अर्थः—ज्या लोकांमध्यें नाना प्रकारची हवा आहे व ज्यास पृथ्वीवरील अती उंच पर्वत, अती मोठ्या नद्या, बिनतोड उफाड्याच्या वनस्पती, नियतकालिक पाऊस, वादळयुक्त मोसमांचे वारे, या सृष्टींतील अत्यंत महान् देखाव्यांपैकीं कांहींची माहिती आहे, त्यांस जड सृष्टीचें कौतुक वाटलें व त्यांत सृष्टीच्या आराधनेची प्रवृत्ती आढळली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. ह्या देखाव्यांचे मनुष्याचे मनावर ( विचारांवर ) न उडण्यासारिखे पक्के ठसे उमटतात व त्याचें मन जितकें जास्त सुसंस्कृत असेल तितकें जास्त त्याचें त्याजकडून कौतुक करण्यांत येतें.

आर्य वीराचें उत्तम उदाहरण म्हटलें म्हणजे श्रीराम हें होय. तो आदर्शभूत राजा होता. त्याच्या ठायीं आर्यपणाचे शौर्यादी पुरे गुण होते. तर त्याचें ध्येय पुढें ठेवा. त्याचें धैर्य, त्याची दयालुता, त्याचा सत्यवक्तेपणा, त्याची राजनिष्ठा, त्याचा पुत्रधर्म, पतिधर्म, व मातृधर्म यांचें अनुकरण करा, म्हणजे तुम्ही शीलानें व जन्मानें खरे आर्य व्हाल, हिंदुस्थानांत ह्या आर्य शब्दांत असला पराक्रम व पुरुषार्थ यांचें ध्येय अंतर्भूत झालेलें आहे. त्याप्रमाणें खोटें बोलावयाचें नाहीं, मित्रें राहावयाचें नाहीं, मित्रघात करावयाचा नाहीं, पडलेल्या शत्रूस आघात करावयाचा नाहीं, व विपद्ग्रस्ताचें आत्मनिरपेक्ष रक्षण करावयाचें—हें व्रत त्यानें चालवावयाचें असतें.

जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।
जो स्वयेंचि कष्टत गेला । तोचि भला ॥ श्रीरामदास.

मन हेंच मनुष्याच्या कारण इहपरैक बंधमोक्षास ।
तद्वृत्तहि जाणुनि तदुन्नतीचा असो तुला ध्यास । स्वकृत–परशुराम.

सहसा विदधीत न क्रियाम् । अविवेकः परमापदां पदम् ॥
वृणते हि विमृश्यकारिणम् । गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥भारविकविः

अर्थः–कोणतेंही काम अविचारानें करूं नये. अविचार हा मोठ्या दुःखास कारण होतो. कारण लक्ष्मी ही गुणाला भुलणारी असल्यामुळें ती स्वतः विचार करून काम करणाराला माळ घालिते.

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रिया करावी ॥
मना चंदनाचे परी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें॥–श्रीरामदास.

परशुरामसंहिताः–हें या सगळ्या ग्रंथाचें मधाच्या मोहोळासारखें संग्रहदर्शक नांव आहे. कारण यांत परशुरामानें जागोजागचे ज्ञानकण मधमाशीप्रमाणें आणून भरले आहेत. ह्यांत आर्यांनीं सृष्टींतील प्राथमिक प्रेरकांच्या सहाय्यानें प्रथम प्रवाहपतितत्वानें केलेल्या प्राचीन हिंदुस्थानच्या अद्वैतपर सुधारणेचें व पुढें होऊं घातलेल्या दृढप्रयत्नप्रयुक्त अर्वाचीन हिंदुस्थानच्या द्वैताद्वैतपर सुधारणेचें विवरण आहे. त्यांतील प्राचीन हिंदुस्थानच्या सुधारणेचे तीन भाग पाडिले आहेतः १ वैदिक काळाचा इतिहास; २ बौद्धकाळाचा इतिहास; व ३ हिंदुकाळाचा इतिहास. तर तदंतर्गत सामान्य असलेल्या प्राथमिक प्रेरकांचें प्रथम विवरण करूं; कारण त्यांतील हीं अनुस्यूत तत्वें पुढें होऊं घातलेल्या दृढप्रयत्नप्रयुक्त अर्वाचीन द्वैताद्वैतपर सुधारणेच्या, प्रामुख्येंकरून, पायाला, पाश्चात्यांप्रमाणें आम्हांस घालणें फार अगत्याचें आहे.

स्वपराक्रम—स्वपराक्रम म्हणजे माझा–स्वतःचा–आत्म्याचा–दुसऱ्यावर–प्रकृतीवर–निसर्गावर ताबा–अंमल–सत्ता, मग ती जुलमाची असो किंवा खुशीची असो. आम्हांस जुलमापेक्षां खुशीची सत्ता जास्त इष्ट आहे; कारण ती पहिल्या प्रकारापेक्षां जास्त शिस्तवार असते. यावरून अर्थात्, स्व म्हणजे पुरुष याचा पराक्रम म्हणजे अर्थ म्हणजे पुरुषार्थ असा स्थूल अर्थ होतो. तेव्हां या पुरुषार्थांत धर्म, अर्थ, काम, मोक्ष या पोटविभागांचा अंतर्भाव होतो. हे विभाग प्रत्येक पुरुषास साध्य म्हणजे प्राप्त करून घेण्यास योग्य असतात. हे पुरुषार्थ साधावयाचे तर त्यांस साधनें कोठून आणावयाचीं ? साधक पुरुषानें तीं निसर्ग–देवतेपासून प्राप्त करून घ्यावयाचीं असतात. साधक त्या देवतेची जितकी जितकी जास्त आराधना करितो, तितकीं तितकीं जास्त साधनें ती देवता प्रसन्न होऊन त्यास देते. ही तिची आराधना किंवा भक्ती एकविधा–नवविधा नव्हे तर–नाना विधा करावी लागते. त्या त्या प्रकाराचें विधान पुढें होऊं घातलेल्या दृढप्रयत्नप्रयुक्त अर्वाचीन द्वैताद्वैतपर सुधारणेंमध्यें यथाकालीं व यथास्थलीं स्वतंत्र सविस्तर तपशीलवार देण्यांत येईल. पण त्याचें स्थूल स्वरूप पहिल्या प्रवाहपतित्वानें केलेल्या प्राचीन हिंदुस्थानच्या अद्वैतपर सुधारणेकरितां सांगावयाचें तर तें तींत अत्यंत प्रच्छन्न म्हणजे गुप्त आहे. तें इतकें कीं तें न सांगितलें तर तें कोणास आपोआप उमगणारही नाहीं व त्यांत, ही संहिता लिहिण्याचा मूळ उद्देश सर्वस्वी विफळ होईल ! कारण त्या निसर्गदेवतेच्या निरनिराळ्या अंगांच्या शक्तींचें प्रसादन ऊर्फ खुलावट करण्याची विद्या संपादन करून आचरणांत त्याच्या प्रयत्नाच्या

दृढतेप्रमाणें अखिल विश्वांतील साधनसंपत्ती त्या भक्तापुढें हात जोडून ' काय आज्ञा ' म्हणून बंद्या गुलामाप्रमाणें पुढें येऊन उभी राहते, हें त्यांस एरवीं समजण्यास मार्ग नाहीं. ह्या साधनसंपत्तीस दुसरें नांव प्राथमिक प्रेरक असें आहे. हें प्राथमिक प्रेरक अथवा पहिले जोर यांचे प्रभाव अथवा परिणाम या सृष्टींभर सर्वत्र अधिक उणे नजरेस पडतात. त्या जोरांचे दोन प्रकार आढळतातः (१) प्राणिज अथवा प्राण्यापासून उत्पन्न झालेले. प्राणी दोन प्रकारचे असतातः १ अक्कलवान् प्राणी अथवा मनुष्यें; व २ बेअक्कल प्राणी अथवा बैल, घोडे, हत्ती वगैरे जनावरें. हीं जनावरें अगदीं बेवकूब असतात असें कोणी समजोत; पण वस्तुस्थिती अशी नाहीं. ह्या शब्दाची अशी योजना केवळ सापेक्ष रूढ आहे. (२) भूतज अथवा भूतांपासून उद्भवलेले. शारीरभाष्य पान ८८ प्रमाणें पूर्वींपासून सिद्ध असलेलीं भूतें पांच प्रकारचीं आहेत. १ पृथ्वी अथवा जमीन; २ आप अथवा पाणी; ३ तेज अथवा अग्नी; उष्णता व वीज; ४ वायू अथवा वारा; ५ आकाश अथवा आभाळ. शा. भा. पा. ९० प्रमाणें ह्या सिद्धवस्तूंचें ज्ञान ह्या सिद्धवस्तूंच्या अधीन असतें.

प्राचीनः—प्राण्यांची उत्पत्ती, स्थिती व लय होतो, तो ह्या पांच भूतांचा संयोग व वियोग यांपासून होतो. म्हणून सदरहू प्राण्यांपासून उत्पन्न झालेल्या जोरांस अथवा प्रेरकांस देखील भूतज प्रकारांत गणतां येईल. पण ते जोर प्रत्यक्ष त्या भूतांपासून उद्भवत नसल्यामुळें त्यांस केवळ भूतजच म्हणतां येणार नाहीं. पण हें कबूल केल्यावांचून चालणार नाहीं कीं त्यांची वधघट ( अधिकउणेपणा ) होणें किंवा ती करणें हें कार्य त्या भूतांची स्वाभाविक ( आपोआप ) मदत झाल्याशिवाय किंवा त्या भूतांचें सहाय्य स्वप्रयत्नानें ( मुद्दाम ) करून घेतल्याशिवाय साधणें शक्य नसतें. म्हणून ह्या भूतांचा सहकार आपोआप होऊन एखादी श्रीपरशुरामासारखी व्यक्ती; पांडवांसारिखें कुटुंब, अयोध्येसारखा गांव व भरतखंडासारिखा देश यांची उन्नती कशी होते व याच्या उलट प्रकार झाल्यास त्यांची अवनती कशी होते व त्या भूतांचा विकास व सहकार मुद्दाम करून घेतल्यास कृष्णासारख्या व्यक्त्यादिकांची तर काय पण अखिल विश्वाची उन्नती चिरकाल किंबहुना सदैव टिकणारी करणें कसें शक्य असतें व त्याची अवनती झाली तर ती कशी होते हें आपल्या हिंदी लोकांस समजणें अत्यंत उपयोगाचें व जरूरीचें आहे. या दोन्ही गोष्टींची व विशेषतः दुसऱ्या गोष्टीची गुरुकिल्ली म्हटली म्हणजे प्रथम पुरुषाचें मन व दुसऱ्यानें त्याचें शरीर यांचा विकास व त्यांचा सहकार ही होय. म्हणून त्यांचा विकास व सहकार ह्यांचा ध्यास प्रत्येक पुरुषास सदोदित असला पाहिजे. कारण प्रत्येक इसमाच्या इह व पर सौख्याच्या इमारतीचा पाया त्याचें मन व शरीर यांचा विकास व सहकार हाच आहे. म्हणून ह्या पुरुषार्थांच्या ह्या अग्रगण्य साधनांचा विचार जितका होईल तितका थोडाच होणार आहे; कारण या आमच्या मायभूमींत इतरांपेक्षां कशाची कमतरता असेल तर ती, प्रामुख्यानें, ह्याच गोष्टीची झाली आहे. म्हणून आमची जी काय सुधारणा, असु-

धारणा, अथवा कुसुधारणा होऊन गेलेली आहे, ती आम्ही सदरील भूतांच्या कांहीं विशेष अनुकूळ वा प्रतिकूळ परिस्थितींत कालवशात् पडलों असतां होऊन गेलेली आहे. बाकी आमची सुधारणा जेथें जेथें होण्याची थांबली किंवा गैर झाली तेथें तेथें तो दोष निवारण्यास आम्हांस इलाज सुचला नाहीं. कारण त्यास या कामीं स्वयत्नचिंतामणी चांगला उपयोगी पडतो ही गोष्ट त्यांस कधीं कधीं ठाऊक झाली असेल तर ती त्या वेळापासून परवां इंग्रज सरकारचें साहचर्य होईपर्यंत अगदीं विसरून गेलेली होती. याप्रमाणें आम्हांस प्राचीनतम काळीं पुढील स्वभावसिद्ध प्रेरकांचा उपयोग येथें कांहीं विशेष अनुकूळ परिस्थितीच्या योगानें झाला असें आढळतें:–

( १ ) पृथ्वीचा प्रेरक जोर; जसें, सुपीक जमीन व विपूल पाणी.
( २ ) पुरुषाचा प्रेरक जोर; जसें, श्रीकृष्णासारखे मुत्सद्दी पुरुष.
( ३ ) जनावरांचा प्रेरक जोर; जसें, एखादा उत्तम गोऱ्हा.
( ४ ) वायूचा प्रेरक जोर; जसें, अवजाराचें उत्तम चालीचें गलबत, पवनचक्की.
( ५ ) जलाचा प्रेरक जोर; जसें, नाव, पाणचक्की.

हे पांच जोर–प्रथम आमच्यांत कांहीं स्वयत्नमूलक शोधकबुद्धी स्वभावतः वसत असल्यामुळें प्रगट झाले असले पाहिजेत. पण ते जोर आमच्यांत पुढें सहज राहण्याजोगे असतांही ते अगदीं अकार्यक्षम होऊन पडले ! ह्याचें कारण काय ? म्हणून शोधूं गेल्यास असें आढळतें कीं आमच्या शोधक बुद्धीचें पाऊल इतक्या मजलेपर्यंत पडल्यावर निवृत्तिमूलक यदृच्छालाभसंतोषाची सुरी त्या स्वयत्नमूलक शोधक बुद्धीच्या व तज्जन्य पराक्रमाच्या पावलांवर तर काय पण त्यांच्या गळ्यावरही अशी निःशेष फिरलेली दिसते कीं आम्हां भारतवासियांच्या ठायीं ती कधीं काळीं वसत होती असें अनुमान करण्यास एकही प्रमाण राहिलें नाहीं. तर अशा प्रतिकूल स्थितींत काय उपाय करावा बरें ?

अर्वाचीन.–हल्लींच्या युरोपियन लोकांप्रमाणें वरील पंचमहाभूतांच्या आराधनेचें व्रत दृढप्रयत्नानें आपल्यामध्यें अखंड नवीन काढिलेल्या शास्त्रांच्या मार्गांनीं चालू केलें पाहिजे. म्हणजे त्यांच्याप्रमाणें आपल्या डॉ. बोस वगैरेसारख्या लोकांत शोधकबुद्धी पुन्हां वास करूं लागून–स्थल व काल–यांनीं कुंठित न होणारे पुढील जोर (पॉवरशक्ती) आपल्यास प्राप्त होतील:–

( १ ) तेलाच्या वाफेच्या स्फोटाचा जोर; जसें, तैलयंत्रें.
( २ ) पाण्याच्या वाफेचा जोर; जसें, वाफेचीं यंत्रें.
( ३ ) विजेच्या आकर्षणाचा व प्रतिसारणाचा जोर; जसें, तारायंत्र, बिनतारी दूरध्वनियंत्र ( टेलिफोन ).
( ४ ) हवेचा तारक जोर; जसें, विमानें, वगैरे वगैरे.

हे प्रेरक जोर काय पण दुसरे अपूर्व, अद्भुत व अतर्क्य प्रेरक जोरही आमचेच नव्हेत तर आमच्या दासांचे दास बनतील ! अशी स्थिती झाल्यास आमच्याशीं चढाओढ करण्यास उभे राहण्याची कोणाचीही छाती होणार

नाहीं ! मग आमच्याशीं कुस्तीची गोष्ट कशास हवी ? पण सदरहू शोधक बुद्धीची आमच्यांत पुन्हां जागृती होण्यास काय करावें ?

प्रवृत्ती.–दृढ इच्छा–आम्ही अलीकडे धरिलेला निवृत्तिमार्ग प्रथम तरी निःशेष टाकिला पाहिजे. कारण त्याच्या राहूनें आमच्या मनश्चंद्रास ग्रासिल्यापासून आमचे झाडून सर्व लोक अज्ञानाच्या अंधःकारांत कर्मनष्ट होऊन पडले आहेत. त्यांच्या हृदयमंदिरांतून सारासार विचाराचा दिवा मालवला आहे ! त्यास कशाचीही इच्छा दृढ अशी म्हणून राहिली नाहीं ! ज्याच्या दृढ इच्छा छाती फोडफोडून रोसडून बाहेर पडण्यासारिख्या प्रबळ असतील, ज्याचें मन चंचल, चपळ व अस्थिर असेल, जो कांहीं पारखून पाहून त्याचें वर्गीकरण करणारा, व त्यावरून तर्कवितर्क बसविणारा असेल, ज्याचें शरीर अगदीं तरळ असेल, तें इतकें कीं त्यास कोठें जावयाचें असल्यास तो चालण्याऐवजीं धांवेल–एवढा त्याचे आंगीं–हिंदुस्थानी भाषेंत सांगावयाचें तर–‘जोस’ असेल त्या पुरुषाचा ह्या लोकांत तर काय पण परलोकांतही कांहीं तरी उपयोग असतो. असला मनुष्य फक्त बाहेरील गुण पाहाणाऱ्या मनुष्याच्या मनांत न भरो, पण असलाच मनुष्य दुनियेंत होतकरू असतो–असल्याच मनुष्यांत कांहीं उत्तम बीज होण्यासारिखे गुण असतात. आपल्यास घर बांधावयाचें असेल तर त्यास चुना किंवा चिखल व विटा लागतात व त्या ज्या बैलगाड्यांसून आणितात त्या सुंदर व मोहक नसतात तरी त्यांची शिल्पकारास अत्यंत जरुरी असते. त्या विटा तसाच चुना किंवा चिखल असल्याशिवाय त्यास मनोहर व व्यवहारोपयोगी इमारत बांधितां येत नाहीं. जो मनुष्य क्षणोक्षणीं झोपीं जातो, तो आंग मोडून व जीव तोडून करावयाच्या उच्च भूमिकेंतील कामास काय उपयोगाचा ? विश्वाच्या व्यवस्थेस प्रेम व धूर्तता लागते. ते गुण संपादण्यास ह्या सर्व खटपटीची आवश्यकता नसती तर त्या प्रभूनें त्या मार्गाचें फाटकच उघडून ठेविलें नसतें. ज्या मनुष्यांनीं प्रवृत्तिमार्ग अशा आतुरतेनें आक्रमिला असेल, त्यांतूनच निवृत्तिमार्गांत प्रथम पाय टाकण्यास कांहीं लायक लोक निपजतात. म्हणून एखादी गोष्ट धरून तिचा उपयोग करणें व तिजवर वारसा राखणें ह्यांत कांहीं गैरवाजवी नाहीं. ह्या झाडून सर्व प्रवृत्तिमार्गांतील जाणूनबुजून केलेल्या मौल्यवान् बौद्धिक खटपटी आहेत. ह्या खटपटींच्या योगानेंच व्यवस्थेला रूपरंग व आकार येतो, ह्याच्या योगानेंच जीवात्म्याच्या पुढील जीवनयात्रेस लागणारीं साधनें निर्माण होतात. अर्वाचीन सुधारणेंतील अत्यंत किळसवाणें उदाहरण घेतलें म्हणजे नेपोलियनकेसरप्रमाणें अगणित घरादारांची राखरांगोळी करून, अगणित कुटुंबांस भिकेस लावून क्रोडो गणती पैसा जमविणाऱ्या एखाद्या लक्ष्मीदासाचें उदाहरण घेतलें असतां असें आढळेल कीं त्याची इच्छाशक्ती एवढी प्रगल्भ झालेली असेल व त्याची उद्योगप्रियता एवढी वृद्धिंगत झालेली असेल कीं त्यास कधीं थकवा आला किंवा एखाद्या कामाचा कंटाळा आला असें होत नाहीं; व तें काम करण्यांत त्याचा हेतू जरी उदात्त नसला तरी तें करतांना त्याचे कांहीं गुण असे

विकास पावतात कीं त्याच्या अनुदात्त ध्येयाचें उदात्त ध्येयांत रूपान्तर झालें कीं पुरे-तो एक दुनियेंत किता घेण्यासारखा महाविभूती होऊन बसतो !

ह्या किंवा असल्याच कांहीं कारणाकरितां भगवान् परशुराम, राम, कृष्ण वगैरे अवतारी पुरुषांस निवृत्तिमार्ग असंमत होता हें त्यांनीं आपल्या चरित्रांनीं प्रत्यक्ष दाखविलें आहे. ते प्रवृत्तिमार्गांचे पुरस्कर्ते होऊन गेले आहेत. युद्धप्रवण श्रीमद्-भगवद्गीतेचा अर्थ आम्ही आमच्या इ. स. १९०४ त छापिलेल्या तिच्या मोह-* विध्वंसिनी टीकेंत-पहिली मदत ( फर्स्ट एड ), गृहपरिचर्या व आरोग्यशास्त्र वगैरे कर्मांकडे, निवृत्तिप्रवण वारकऱ्यांस वळविणाऱ्या प्रवृत्तिपर लाविला आहे, तो बरोबर असेल तर श्रीकृष्ण, ज्ञानदेव वगैरे अवतारी पुरुष निवृत्तिमार्गाचेच उपदेशक होते असें मानणें अगदीं अयुक्तिक आहे असें ठरतें; कारण त्यांनीं आपल्या ह्यातींत केलेलीं गीता व ज्ञानेश्वरी हीं कामें वगैरे प्रवृत्तिमार्गाचींच नाहींत काय ? म्हणून हें पुन्हः पुन्हां आग्रहपूर्वक सांगणें नकोच कीं वरल्या व वरल्यासारख्या दृढ इच्छा नव्हे तर आणखी अखंड इच्छा करणें सुतराम वावगें नाहीं व असल्या एखाद्या प्रेरकाबद्दल आम्हांस इच्छा झाली व ती तीव्र झाली कीं ती पूर्ण केल्यावांचून तो अंतर्यामी राहत नाहीं, मग त्यांत निवृत्तिमार्गाप्रमाणें एक आमची फलासक्ती नसेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होतें. कारण या युक्तीनें साधक कर्त्या पुरुषास एरवीं फलासक्ती रात्रंदिवस जाळिते तशी ती त्यास जाळीत नाहीं व त्याची तळमळ चुकल्ये खास. तेणेंकरून आमचें शरीर, मन, आत्मा, कुटुंब, गांव व देश हे तर काय पण अखिल विश्वही विकास पावतें व स्वार्थ साधितां साधितां पायरीनें अधिकारसंपन्न होऊन परमार्थ म्हणजे धर्म, अर्थ, काम व मोक्ष हीं जीं प्रत्येक पुरुषाच्या औदार्याचीं अंतिम ध्येयें, तीं आमच्या पदरीं पडतात व आपण शेवटीं भ्रमरकीटक-न्यायाप्रमाणें स्वपराक्रमानें स्वानंद-साम्राज्याचे धनी ऊर्फ परमेश्वर होतों. कारण-चिदानन्दरूपः शिवोऽहम् शिवोऽहम्-असा उच्च भूमिकेंतील ध्यास आम्हांस लागो किंवा नीच भूमिकेंतील एखादा प्राथमिक प्रेरक मिळविण्याचा ध्यास आम्हांस लागो, तो पूर्ण करावयास तो दीन-दयाळ प्रभू-तीव्रसंवेगानामासन्नः-म्हणजे इच्छा तीव्रतम झाली कीं-मग ती इच्छा कोणतीही असो-तो आपल्या अगदीं जवळ आपल्या प्रत्यक्ष हृदयांत अहर्निश व आमरण राहतो-असें वरील पातंजल योगसूत्रावरून सुस्पष्ट कळतें. असें असूनही जर आम्ही निजूनच राहिलों, कोणा अवतारी पुरुषाच्या येण्याची वाट पहात बसलों व स्वयत्न आपल्या आचरणांत उतरण्याची कधींही इच्छा धरिली नाहीं तर ती-उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत-( अवेक अराइस ऑर बी फॉर एव्हर फॉलन )-या कठोपनिषदांतील व्यवहारशास्त्रोक्त उपदेशांस कशी पटेल व ती इच्छाशून्यता आमचें अधःपतनापासून कधीं रक्षण करील काय? कधींही नाहीं, कधींही नाहीं, कधींही नाहीं हें निर्विवाद आहे.

---

* ही टीका स्वतंत्र पुस्तकांत छापिलेली आहेच. पण ती वाचकांच्या सोईकरितां ह्या खंडाच्या उत्तरार्धांत सवड झाल्यास तेवढीच निराळी देण्याचा विचार आहे.

भाग:—आतां हा विश्वव्यापी विषय वाचकांस सुगम व्हावा म्हणून अखिल विश्वाच्या ऐवजीं आपली मायभूमी जी हिंदुस्थान ती कल्पूं व तिच्यांतील प्राथमिक प्रेरकांचा विचार करितांना त्यांचे पुढील दोन विभाग कल्पूं—

( १ ) स्वभावसिद्ध प्राथमिक प्रेरक.
( २ ) प्रयत्नसिद्ध प्राथमिक प्रेरक.

या दोन भागांपैकीं–स्वभावसिद्ध प्राथमिक प्रेरक–यांचीं कार्यें अनादी काळीं कांहीं विशेष अनुकूळ परिस्थितीप्रमाणें इकडे आपोआप चालू झालीं असल्यामुळें ते प्रेरक फारसे एकमेकांपासून भिन्न व विकसित आढळत नाहींत–इतकी त्यांच्या कार्यकारणांची संकीर्णता व सूक्ष्मता आढळते. पण पुढें ते दिवसानुदिवस भिन्न व विकसित, असंकीर्ण व असूक्ष्म होत गेले कीं त्यांचें वर्गीकरण करूं गेल्यास करितां येतें, व त्यांचा विकास स्वयत्नानें करूं लागलें तर तो उघड करितां येतो. याप्रमाणें आम्ही पुढें प्रथम–स्वभावसिद्ध प्राथमिक प्रेरकांचा विचार–निसर्गाची आराधना–या एका सदराखालीं–( १ ) उन्नती व ( २ ) अवनती ह्या दोन पोटभागांत–अद्वैतप्रवण इतिहासाच्या दृष्टीनें–करूं व नंतर प्रयत्नसिद्ध प्राथमिक प्रेरकांचा विचार–पृथक् पृथक्–पुढील पुस्तकांत–त्या त्या निसर्गजात प्रेरकांच्या–पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश व ब्रह्म–या अधिष्ठात्या देवतांच्या अमलांतील प्रांतानिहाय–भूतशास्त्राच्या दृष्टीनें–करूं. ह्यांतील अर्वाचीन प्रयत्नसिद्ध प्रेरकांचा विचार–पाश्चात्य अद्वैतप्रवण भूतशास्त्रनिधीवरून–करणें ज्याप्रमाणें सुकर आहे, त्याचप्रमाणें प्राचीन स्वभावसिद्ध प्रेरकांचा विचार–संस्कृत सारस्वत सागरावरून–करणें बिलकूल सुकर नाहीं; कारण त्याचें आलोडण भूतशास्त्रनिधीप्रमाणें सुगम नाहीं; कारण पाश्चात्य भूतशास्त्रनिधी जसा असंकीर्ण म्हणजे बिनगुंतागुंतीचा हल्लीं तयार आहे तसा आमचा संस्कृत सारस्वत सागर असंकीर्ण म्हणजे बिन गुंतागुंतीचा हल्लीं बिलकुल तयार नाहीं. संन्याशाच्या लग्नाला जशी शेंडीपासून तयारी करावी लागते, तशी त्याची तयारी पहिल्यापासून करून घेतली पाहिजे आहे. अशा विपन्न स्थितीमध्यें तें सारस्वत पडलें आहे; कारण, त्यास इकडे कोणी चहाता आश्रयदाता–आमचा असा–राहिला नाहीं. ज्याप्रमाणें लता व वनिता आश्रयावांचून नांवारूपास येत नाहींत, त्याप्रमाणेंच स्थिती ह्या विद्येची आहे. तेणेंकरून ह्या विद्येच्या केशकलापाच्या अशा गुंतागुंतीच्या जटा होऊन बसल्या आहेत. त्या जटांस तेल व शिकेकाई माखून प्रत्येक जटेंतील एकही केस न तुटूं देतां तो एक एक फणीनें कसा मोकळा करावा ? हा आमचेपुढें मोठा प्रश्न येऊन उभा राहिला आहे; कारण—

अनंतपारं किल शब्दशास्त्रम् । स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः ॥

'If to do were as easy as to know what where good to do chapels had been churches and poor men's cottages princes' palaces.'

*Shakspeare.*

बोलणें बोलतां वाटे सोपें । करणी करीतां टीर कांपे ॥

# भाग दुसरा.

## संस्कृत-सारस्वत-सागर.

यस्य निश्वासितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् ।
निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थं महेश्वरम् ॥

अर्थ—सकल विद्यांचें आदिस्थान जो परमेश्वर, कीं ज्यानें आपल्या निश्वासापासून वेद उत्पन्न करून तदनुसार जग उत्पन्न केलें, त्यास मी नमन करितों.

"The Veda has a two-fold intest it belongs to the history of the world and to the history of India. In the history of the world the Veda fills a gap which no literarry work in any other language could fill. It carries us back to times of which we have no records anywhere and gives us the very words of a generation of men, of whom otherwise we could form but the vaguest estimate by means of conjectures and inferences. As long as man continues to take an interest in the history of his race, and as long as we collect in libraries and museums the relics of former ages, the first place in that long row of books which contains the records of the Aryan branch of mankind, will belong for every to the Rig-Veda."

*Ancient Sanscrit Literature.*

कवणाला न प्रिय तें गुणगणमयकेलि मंदिर श्रुतिचें

अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद् यदृग् वेदो यजुर्वेदः सामवेदो
ऽथर्वाङ्गिरसः इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः
सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि निःश्वसितानि ॥

मागील भागांत विषय प्रवेशाचें विवरण आटोपलें. आतां या भागांत संस्कृत सारस्वताच्या सागराच्या अंगांच्या व उपांगांच्या नुसत्या नामावलीचें विवरण कर्तव्य आहे; कारण या ग्रंथांवरच पुढील सगळ्या ग्रंथांच्या रचनेची, प्रमुखत्वेंकरून, सर्व मदार आहे. त्या मानानें इतर ग्रंथांचें तितकें महत्व नाहीं. त्यांच्या नामावल्या प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं अलाहिदा दिल्या आहेत; कारण त्या इतक्या लांबलचक आहेत कीं त्यांचा निर्देश येथेंच करण्याचा विचार केला असता, तर हा भाग अपरिमित फुगला असता.

आपल्या हिंदू धर्मशास्त्रांचे चार भाग आहेत;—

१ वेद अथवा ईश्वराचें ज्ञान.

२ उपवेद अथवा वेदांच्या पुरवण्या.

३ वेदांगें अथवा वेदांचे अवयव.

४ उपांगें अथवा पूरक अंगें.

ह्या चार सदरांमध्यें हरएक प्रकारचें ज्ञान अंतर्भूत होतें.

वेद चार आहेतः—

१ ऋग्वेद; हा शब्द ऋक् म्हणजे ऋचा ह्या शब्दापासून निघाला आहे.

२ यजुर्वेद, हा शब्द यज् म्हणजे पूजा, यज्ञ करणें ह्या धातूपासून निघाला आहे.

३ सामवेद; हा शब्द सामन् म्हणजे गायन या शब्दापासून निघाला आहे.

४ अथर्ववेद; हा मंत्रतंत्रासंबंधीं वेद आहे.

प्रत्येक वेदाचे चार भाग आहेतः—

१ संहिता; यांत सूक्तें व प्रार्थना यांचा समावेश होतो.

२ ब्राह्मणें; यांत ब्राह्मणांच्या सोईकरितां प्रत्येक वैदिक संस्काराचे रूपरेखन केलेलें आहे.

३ उपनिषदें; यांत तत्त्वज्ञान भरलेलें आहे.

४ आरण्यकें; यांचा संबंध विशेषेंकरून पूर्वोक्त उपनिषदाशीं आहे. त्यांचा उपयोग अरण्यवासी द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) करीत असत.

ऋग्वेदाचें एक आरण्यक आहे. त्यास ऐतरेय अशी संज्ञा आहे. त्यांत ब्राह्मण व उपनिषद अशा दोन भागांचा समावेश होतो. ह्या ग्रंथाचे दोन भाग आहेत: १ श्रुति व २ स्मृति. श्रुतीमध्यें पुढील शास्त्रें मोडतातः-१ संहिता, २ ब्राह्मणें, ३ उपनिषदें, व ४ आरण्यकें. बाकीचीं शास्त्रें स्मृतींत मोडतात. श्रुती म्हणजे प्रत्यक्ष ऐकलेलीं शास्त्रें व स्मृती म्हणजे आठवलेलीं शास्त्रें. हिंदु तत्वज्ञानाचे अथवा दर्शनांचे मुख्य तीन विभाग आहेत व त्यांचे उपभाग—न्याय, वैशेषिक, सांख्य, व योग व पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा—या सर्वांस वेदांचें प्रामाण्य मान्य आहे, पण त्या प्रत्येकांत त्यांचा अर्थ निरनिराळ्या तऱ्हेनें लाविलेला आहे. वैदिक व बौद्ध यांमध्यें मतभेद जो पडला तो पडण्यास काय कारण झालें ? वैदिक लोक म्हणत कीं पूर्वोक्त ब्राह्मणें हीं श्रुतींत मोडतात व बौद्ध म्हणत कीं तीं मोडत नाहींत. न्याय व सांख्य हीं गौतमबुद्धाच्या पूर्वींचीं दिसतात. पण वेदान्तमात्र बौद्धमताच्या उलट उत्पन्न झाला असावा, कारण वेदान्त सेश्वरवादी आहे, पण बौद्धधर्म निरीश्वरवादी आहे. वेदान्त अद्वैतवादी आहे, पण बौद्धदर्शन शून्यवादी आहे व सर्व हिंदू तत्वज्ञानाच्या मुळाशीं जें सांख्यदर्शन आहे तें अज्ञेयवादी आहे.

सूत्रें व परिशिष्टें यांचा वेदाशीं निकट संबंध आहे. सूत्र याचा अर्थ दोरा असा आहे. त्याप्रमाणें सूत्रें हीं लहान वाक्यांच्या दोऱ्यांचीं छोटेखानी पुस्तकें आहेत. तीं विद्यार्थ्यांस शिकविण्याकरितां तयार केलेलीं आहेत. परिशिष्टें हीं त्या सूत्रांच्या पुढें तयार झालेलीं आहेत. तीं सूत्रांच्या पुरवण्या होत असें त्यांच्या प्रत्यक्ष नावांवरून दिसतें. ती लहान मुलांस शिकविण्यास तयार केलेलीं नाहींत तर तीं अजाण जनांच्या समुदायास धर्माचें सामान्य ज्ञान करून देण्यास रचलेलीं दिसतात. त्यापासून वैदिक सारस्वताचें पौराणिक सारस्वतामध्यें परिवर्तन कसें झालें ? हें नजरेस पडतें.

वैदिक काळाचे चार भाग पडतातः ( १ ) छंदांचा काळ हा आमच्या स्वतः च्या—आर्यललितविस्तार व प्राचीन हिंदुस्थानांतील सुधारणा—या ग्रंथांप्रमाणें व लोकमान्य बा. गं. टिळक यांचें ओरायन व आर्टिकहोम व गीतारहस्य—या ग्रंथांप्रमाणें इ. स. पू. १२००० पासून इ. स. पू. १००० ते इ. स. ८०० वर्षें ठरविण्यांत आला आहे. ( २ ) मंत्र काळ हा इ. स. पू. १००० ते इ. स. ८०० वर्षें ठरविण्यांत आला आहे ( ३ ) ब्राह्मण काळ हा इ. स. पू. ८०० ते इ. स पू. ६०० वर्षें ठरविण्यांत आला आहे व सूत्रकाळ हा इ. स. पू. २०० वर्षांस येऊन भिडतो. वस्तुतः पाहतां ऋग्वेद हाच काय तो खरा वेद आहे. कारण त्यापासून यजुर्वेद व सामवेद निघालेला आहे, अथर्ववेदास कधीं स्वतंत्र वेद मानितात किंवा इतर वेदांची पुरवणी असें मानितात.

---

१ हा ग्रंथ आम्ही अहंमदाबादेस असतां ठाण्याच्या अरुणोदयांत इ. स. १८९० च्या सुमारास प्रसिद्ध केला. त्यांत आम्ही वेदांच्या कालाच्या निर्णयाचा प्रयत्न **भूगर्भशास्त्रदृष्ट्या** सर्वांच्या आधीं केला. त्यांत असें ठरविलें कीं जंबुद्वीप व त्रिविष्टप ( तिबेट ) यांमध्यें पूर्वी एक भूमध्य समुद्र होता. त्यांतून इओसीन काळीं हिमालय पर्वताचा उत्पात झाला. तेव्हां चोहोंकडे जलप्रलय होऊन उत्तरेकडे गेलेले आमचे लोक परत आर्यावर्तांत आले व त्यांनीं व मळचे त्या भूमध्य-समुद्रकाठचे लोक मिळून हल्लींच्या ऋग्वेदाची पुनर्घटना केली. हा काळ दहाबारा हजार वर्षांचा ठरविला. पण त्याच्या आधींचा काळ अज्ञेय ठरविला. हा ग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हां लोकमान्य टिळकांचा ज्योतिषशास्त्रावर कालनिर्णयाची उभारणी करणारा ओरायन ग्रंथ बाहेर आला नव्हता; एवढेंच नव्हे तर त्यांत वेदाच्या कालाचा निर्णय भूगर्भशास्त्रदृष्ट्या करण्याची कल्पना त्या बाहेर आलेल्या ग्रंथांत उद्भूत किंवा अनुद्भूतही नव्हती. २ आम्ही कै० रमेशचंद्र दत्त यांच्या इच्छेप्रमाणें प्राचीन हिंदुस्थानांतील सुधारणा हा ग्रंथ अहंमदाबादेस असतां सदरहू अरुणोदय पत्रांत प्रसिद्ध करून त्याची प्रस्तावना आम्ही मुंबईस बदलून आल्यावर तेथील खरा प्रकार नामक मासिक पुस्तकांत प्रसिद्ध केली. तींत आमच्यापूर्वी ज्या ज्या देशी व विदेशी ग्रंथकारांनीं शास्त्रास धरून व त्यास सोडून प्रयत्न केले होते, त्यांचा एकत्र विचार करून आम्हीं आपलीं तत्संबंधीं मतें पुन्हां भूगर्भशास्त्राच्या प्रमाणांनीं व प्रमाणगणितानें सिद्ध करून दाखविलीं, व २२ सप्टेंबर १८९६ रोजीं आम्ही पुण्यास भरावयाच्या पहिल्या एज्युकेशनल कान्फरन्समध्यें—प्रायमरी एज्युकेशन ॲज इट इस ॲंड ॲज इट शुड बी हा निबंध वाचावयास तेथें गेलों तेव्हां आमची नवीन ओळख डॉ. भांडारकर, लोकमान्य टिळक, नाम. वाडिया वगैरे सभासदांशीं झाली. यांपैकीं लोकमान्यांनीं आमच्याजवळ येऊन आमच्या निबंधाची प्रत वाचावयास नेली. पण ती डॉ. भांडारकर यांस वाचावयास लागूं लागली. तेव्हां आम्हीं त्यांचें घर शोधीत श्रीयुत लक्ष्मण गणेशशास्त्री लेले, सांप्रत टीचर, नूतन मराठी विद्यालय, पुणें, यांच्या बरोबर गेलों व ती प्रत घेऊन आम्ही उपरिनिर्दिष्ट भूगर्भशास्त्रसिद्ध वगैरे वैदिक कालनिर्णयाचा निबंध सदरहू लोकमान्य नामदारांस सादर केला व आम्ही त्यांस गिकीच्या जिऑलजींतील डा. क्रोलच्या थिअरीचा उपयोग आम्ही ह्या कालनिणयाच्या कामीं कसा केला आहे हें सांगितलें. नंतर बऱ्याच वर्षांनीं त्यांचा उत्तरध्रुवाभोंवतीं आर्यांचें मूलस्थान दाखविणारा आर्टिक होम हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यांत विशेष काय कीं तो आमच्या निबंधापेक्षां विस्तृत व इंग्रजी आहे. व त्यांत आमचा वेद व पारशांचा अवेस्ता यांचें सादृश्य

उपवेद चार आहेतः--

१ आयुर्वेदः--हा ऋग्वेदापासून उत्पन्न झाला आहे. ह्यांत वैद्यशास्त्राचें विवरण आहे.

२ गंधर्ववेदः--हा सामवेदापासून उत्पन्न झाला आहे. ह्यांत गायनाच्या शास्त्राचें विवरण आहे.

३ धनुर्वेदः--हा यजुर्वेदापासून उत्पन्न झाला आहे. ह्यांत युद्धाच्या विद्येचें विवरण आहे.

४ स्थापत्यवेदः--हा अथर्ववेदापासून उत्पन्न झाला आहे. ह्यांत यंत्र व शिल्प शास्त्राचें विवरण आहे.

ह्यांपैकीं कांहीं वेद ब्राह्मण कळांत व कांहीं सूत्रकाळांत प्रादुर्भूत झाले आहेत.

वेदांगें सहा आहेत—

१ शिक्षा.—ह्यांत उच्चारांचा विचार आहे.
२ छंद.—ह्यांत वृत्तांचा विचार आहे.
३ व्याकरण.—ह्यांत शब्दसिद्धि व वाक्यरचना यांचा विचार आहे.
४ निरुक्त.—ह्यांत वेदांतील गूढ शब्द व गूढ वाक्यांश यांचें स्पष्टीकरण आहे.
५ कल्प.—ह्यांत धर्मसंस्कारांचा विचार आहे.
६ ज्योतिष.—ह्यांत राशी, तारकापुंज व ग्रह यांचा विचार आहे.

हे ग्रंथ सूत्रकाळांत रचण्यांत आले असें तज्ञ म्हणतात,

वेदाचीं उपांगेंही सहा आहेत.

१ इतिहास.--ही वीररसप्रधान काव्यें आहेत.
२ पुराणें.--ह्यांत दंतकथांचा विचार आहे.
३ न्याय.--ह्यांत तर्कशास्त्राचा विचार आहे.
४ मीमांसा.--ह्यांत तत्वज्ञानाचा विचार आहे.
५ धर्मशास्त्र.--ह्यांत व्यवहाराचा विचार आहे.
६ तंत्र.--ह्यांत प्रयोगांचा विचार आहे.

---

कै० म. मो. कुंठे यांचे पुढें पुष्कळ निकट दाखविलें आहे व त्यांत एका उषा देवतेच्या सूक्तांतील तिच्या अमलाची अवधी ३० दिवसांची आमच्या उत्तरेकडील वस्तीस पोषक म्हणून दाखविली आहे. तें मूलस्थान आमच्या निर्णयाच्या उलट आहे. कारण आम्ही गोंडवन–गौडदेश अथवा दक्षिण आर्यावर्त हा आमचा पितृदेश मानणारें आहों; त्यांत पूर्वकालनिर्णयकार म्हणून लोकमान्यांनीं ज्या विद्वान गहस्थांचा नामनिर्देश केला आहे, त्यांत आमचा हिमालयसंभवानुसार शोध लोकोत्तर असतांनाही काय कारण विस्मृतीचें वगैरे झालें असेल तें असो, आमचें नांव आर्टिकहोमांत चुकूनही कोठें दिलें नाहीं !

आमचे इतिहास म्हटले म्हणजे रामायण व महाभारत हे होत. रामायणांत रामाच्या साहसांचें विवरण आहे. त्याचप्रमाणें महाभारतांत भारती युद्धाचें विवरण आहे. ह्यांतील सारांश अवतार या सदराखालीं आला आहे. पुराणें हा शब्द पुराणें म्हणजे जुनें ह्यापासून निघाला आहे. ह्यांतही इतिहास दिलेला आहे. त्यांत पुढील प्रकार मोडतातः–( १ ) विश्वाची उत्पत्ती, ( २ ) विश्वाचा लय व पुनरुज्जीवन, ( ३ ) देवपितर ह्यांची वंशावळी, ( ४ ) मन्वंतरें व ( ५ ) सूर्य व चंद्र वंशांतील राजांच्या घराण्यांचा इतिहास. हीं पुराणें अठरा आहेत. त्यांचे सत्व, रज व तम या गुणभेदांप्रमाणें प्रत्येकांत सहा धरून तीन वर्ग पाडितां येतात.

१ सत्त्वगुणप्रधान पुराणें:—

( १ ) विष्णू. ( २ ) नारदीय. ( ३ ) भागवत.
( ४ ) गरुड. ( ५ ) पद्म. ( ६ ) वराह.

ह्यांत आराध्य देवता विष्णू आहे.

२ रजोगुणप्रधान पुराणें:—

( १ ) ब्रह्म. ( २ ) ब्रम्हाण्ड. ( ३ ) ब्रम्हवैवर्त.
( ४ ) मार्कंडेय. ( ५ ) भविष्य. ( ६ ) वामन.

ह्यांत आराध्य देवता ब्रम्हा ही आहे.

३ तमोगुणप्रधान पुराणें:—

( १ ) मत्स्य. ( २ ) कूर्म. ( ३ ) लिंग.
( ४ ) शिव. ( ५ ) स्कंद. ( ६ ) अग्नी.

ह्यांत आराध्य देवता अग्नी किंवा शिव ही आहे.

धर्मशास्त्रांत मुख्य धर्मशास्त्र म्हटलें म्हणजे मानव धर्मशास्त्र हें होय. ह्याच्या पहिल्या भागांत सृष्टीची उत्पत्ती सांगितली आहे. त्याच्या दुसऱ्या भागांत ब्राह्मण आदीकरून वर्णांच्या शिक्षणाचें वर्णन आहे. त्याच्या तिसऱ्या भागांत लोकांच्या लग्नसंस्काराचें विवरण आहे. त्याच्या चौथ्या भागांत निर्वाहाच्या साधनांचें वर्णन आहे. त्यांत द्विजांना श्ववृत्ती अथवा चाकरी सर्वथैव निषिद्ध ठरविली आहे. त्याच्या पांचव्या भागांत अन्न, शुद्धि, व स्त्रिया यांचें विवरण आहे. त्याच्या सहाव्या भागांत भक्त, वानप्रस्थ व संन्यासी यांच्या नियमनासंबंधी विवेचन आहे. त्याच्या सातव्या भागांत सरकार व कायदा यांचें वर्णन आहे. त्याच्या आठव्या भागांत दिवाणी व फौजदारी कायद्यांचा खुलासा आहे. त्याच्या नवव्या भागांत वैश्य व शूद्र यांविषयीं निर्बंध दिले आहेत. त्याच्या दहाव्या भागांत मिश्रजाती व आपत्काल यांचें विवरण आहे. त्याच्या अकराव्या भागांत प्रायश्चित्तांचें विवरण आहे. त्याच्या बाराव्या भागांत जन्मान्तर व मोक्ष यांचें वर्णन आहे. तंत्रामध्यें शक्तीची आराधना आहे. ती शक्ती कोठें शंकराची धरिली आहे व कोठें विष्णूची धरिली आहे. शक्ती दोन आहेत. ( १ ) गौरी ( सौम्य व पांढरी ), काली ( काळी व उग्र ). तिच्या भक्तीचे दोन प्रकार आढळतातः—( १ )

दक्षिणमार्गी ( २ ) वाममार्गी. ह्या पूजेस पुढील साहित्य लागतें:–मद्य, मांस, लाह्या, मच्छ, स्त्रिया व पुरुष यांचा समागम. शाक्तिपूजेचें प्राबल्य खालच्या जातींत फार आहे.

पुरवणी–संस्कृत सारस्वताची योग्यता–श्रीयुत ना. म. पावगी–से. ग. इ. इंडिया–(इ. स. १८१८) वरून (१८–७–१८)–ज्या मनुष्यांचीं मनें पूर्वींच्या दुष्ट ग्रहांनें दूषित झालीं नाहींत, त्यांस पाश्चिमात्य पंडितांची संस्कृत सारस्वतासंबंधी पुढें दिलेलीं मतें विलक्षण वाटणार नाहींतः–

( १ ) ही भाषा निर्दोष व अव्यंग ( पर्फेक्ट ) आहे.
( २ ) ही सुंदर व कर्णमधुर आहे
( ३ ) ही फारच फार मोठी आहे.
( ४ ) हिची घटना अप्रतिम प्रसादयुक्त आहे.
( ५ ) ही हिंदू युरोपियन भाषांत निर्विवाद न्यायानें अग्रेसर आहे.
( ६ ) हिची रचना लोकोत्तर आहे.
( ७ ) ही ग्रीक (यवन) अथवा लाटिन भाषांपेक्षां फारच संस्कारशुद्ध आहे.
( ८ ) हींतील सारस्वत इतकें जगडव्याळ आहे कीं तें नुसतें पाहूनच मनुष्य गोंधळून जातो.

पण ज्यांची मनें पूर्वींच्या दुष्ट ग्रहांनीं दूषित आहेत, त्यांच्या डोळ्यांत हें संस्कृत सारस्वत कसें खुपतें तें पहाः–

१ लार्ड मेकॉले.—हे भले मोठे इंग्रजी सारस्वत भक्त हिंदुस्थानच्या कायदे कौन्सिलांत कायदे पंडित होते. त्यांस संस्कृत भाषा बिलकुल येत नव्हती. असें असूनही त्यांनीं स्वभाषेच्या प्रौढीनें वेडावून जाऊन एज्युकेशन मिनिटमध्यें संस्कृत भाषेची पायमल्ली करून टाकिली. ती इतकी कीं त्यांनीं तीस नादान ठरवून येथील संस्कृत पाठशाळांचें रूपान्तर इंग्रजी पाठशाळांत करून टाकिलें ! व दरएक विषयाचे देशी भाषेच्या द्वारा मिळणारें शिक्षण द्राविडी प्राणायामाप्रमाणें इंग्रजी भाषेच्या द्वारेंच मिळेसें केलें ! व ह्या चमत्कारांतील महाचमत्कार हा कीं अंकगणीत व बीजगणित ह्यांतील उदाहरणें देशी आंकड्यांनीं केलेलीं अग्राह्य केलीं ! ! ! जणू काय त्या इंग्रजी आंकड्यांतही समजुतदारपणाची अद्भुत जादू आहे !

२ मि. डुगाल स्टुअर्ट.–(प्रो. मेक्स म्यूलर-व्हॉट इंडिया कॅन टीच अस ? पान २८) हे एक स्काच तत्वज्ञ होऊन गेले. ह्यांचे तत्वज्ञानाचे तारे कसे तुटले आहेत ? हें मोठें समजून घेण्यासारखें आहे. "ह्यांनीं हिंदू व स्काच यांतील आप्तपणा मान्य करण्यापेक्षां ग्रीस व रोम ह्यांच्या प्राचीन सारस्वतांहून मोठी व तीन हजार वर्षांवर पसरलेली संस्कृत भाषा व संस्कृत सारस्वत हें त्या शठ, भिक्षुक ब्राह्मणांनीं कपटानें निर्माण केलें आहे असें त्यांनीं मानिलें आहे."

पण ह्या अर्वाचीन अहंमन्य पण्डितांच्या पाण्डित्यानें दिशाभूल होऊं नये व संस्कृत भाषेची व संस्कृत सारस्वताची खरी किंमत वाचकांच्या लक्षांत यावी

म्हणून कांहीं संस्कृत भाषाभिज्ञ व प्राचीन व अर्वाचीन भाषाकोविद विद्वच्छिरोमणींचे अभिप्राय त्यांस सादर करितोंः—

१ सर विल्यम जोन्स (एशियाटिक रिसार्चेस, व्हा. १)–" संस्कृताची रचना मोठी चमत्कारिक आहे. ती ग्रीक भाषेपेक्षां निर्दोष व अव्यंग आहे; ती लाटीन भाषेपेक्षां जास्त प्रगल्भ आहे, व ती दोन्ही भाषांपेक्षां वळणशुद्ध आहे."

२ प्रो. मेक्स म्यूल्लर—(इंडिया, व्हॉट इट कॅन टीच अस ?)—(१) ही फार लोकोत्तर भाषा आहे. (२) ही निर्दोष व अव्यंग भाषा आहे; (३) सगळी संस्कृत भाषा व सगळें संस्कृत सारस्वत ग्रीसच्या अथवा रोमच्या प्राचीन सारस्वतापेक्षां मोठें व तीन हजार वर्षांवर पसरलें आहे; (४) ग्रीस व इटली यांचें अभियुक्त सारस्वत एकत्र केलें तरी त्यापेक्षां तें मोठें आहे असें मला वाटतें; (५) इतिहासकाराच्या दृष्टीनें संस्कृत भाषेचें महत्व काय व आमच्या दृष्टीनें तरी तिचें महत्व काय ? पहिली विचार करण्यासारखी गोष्ट ही कीं ती भाषा अत्यंत प्राचीन आहे–ती ग्रीक (यवन) भाषेपेक्षां पूर्वींची आहे. पण तिच्या कालानुक्रमाच्या जुनेपणापेक्षां तिची कोणती अवस्था जास्त महत्वाची म्हणून पुसाल तर सांगणें कीं तिच्या रक्षणाचें पुराणत्व होय; (६) एवढेंच नव्हे; कारण ही अनादी आर्यभाषा दीर्घकालिक विचार परंपरेचें फळ आहे. (७) मी हिला–जाणण्यास योग्य असा–इतिहास–हें नांव देतों.

वैदिक सारस्वताची किंमत. (१) " वैदिक सारस्वत हें दोन प्रकारें मनोहर आहे. त्यांतील एक मनोहरत्व हें कीं त्यांत जगाचा इतिहास भरला आहे व दुसरें हें कीं त्यांत हिंदुस्थानचा इतिहास भरला आहे. जगाच्या इतिहासासंबंधें विचार करितां वैदिक सारस्वतानें दुसऱ्या कोणत्याही भाषेंतील कोणत्याही सारस्वतानें कधींही भरून न येण्यासारखें एक खिंडार भरून काढिलें आहे. ज्या काळाच्या इतिहासाचे ग्रंथ कोठेंही सांपडत नाहींत. त्या काळाकडे तें सारस्वत आम्हांस घेऊन जातें व ज्या पिढींच्या लोकांचें अगदीं अस्पष्ट ज्ञान एरवीं आम्हांस अनुमानानें व अंदाजानें करितां येईल त्यांचे मूर्तिमंत शब्द तें सारस्वत आम्हांस ऐकवितें. ज्यावत् कालपर्यंत मनुष्याला आपल्या जातीच्या इतिहासांत मजा वाटत राहील व ज्यावत् कालपर्यंत तो पुस्तकालयांत व पदार्थ संग्रहालयांत प्राचीन काळचे अवशेष जमवीत राहील, तावत् कालपर्यंत मनुष्याला आर्य शाखेच्या इतिहासच्या नोंदीच्या ग्रंथांत आदिम स्थान म्हटलें म्हणजे निरंतर ऋग्वेदाला मिळेल." (मेक्स म्यूलर-एन्शन्ट हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, पा. ६३)

(२) " संस्कृत सारस्वताच्या यथायोग्य अभ्यास केला तर तो मनुष्याला उद्बोधक आहे. जो बोध ग्रीक (यवन) भाषेंतून आपल्याला कधींही प्राप्त होणें शक्य नाहीं, तो त्या संस्कृत सारस्वतापासून प्राप्त होतो." (इंडिया व्हॉट इट कॅन टीच अस ? पा. ६)

( ३ ) "संस्कृत ही सर्व भाषांत अत्यंत रमणीय भाषा आहे." " ही भाषा पूर्वींच अत्यंत परिपूर्णावस्थेला नेऊन पोहोचविलेली आहे. " [ ए. पिक्टेट आरिजिन्स–युरोपियन्स, पान १–२ ]

( ४ ) " कालिदास व भवभूती यांच्या पुष्कळ कविता असलेल्या भाषेसारिखी एखादी अत्यंत कर्णमधुर व अत्यंत विशाळ भाषा कल्पिणें अगदीं असंभाव्य आहे." (प्रो. एच. एच विल्सन धी थिएटर ऑफ धी हिंदूज, पान ६३)

( ५ ) "संस्कृत सारस्वताचें अत्यंत पुराणत्त्व, त्याचीं मूळ द्रव्यें व स्वरूपें यांचें संरक्षण त्याच्या घटनेंतील अप्रतिम प्रसाद ह्यांच्या योगानें हिंदू–युरोपियन कुटुंबाच्या भाषांतील अग्रस्थानाचा निर्विवाद मान त्यास मिळाला आहे. "--( व्हिटनेलँगवेज ऍंड स्टडी ऑफ लँगवेज–पा. ४ )

संस्कृत सारस्वताचा विस्तार–( १ ) " संस्कृत सारस्वताचा विस्तार व विविधता यांची कल्पना आणून देणें अत्यंत दुष्कर आहे. "–( इंडिया, व्हॉट इट कॅन टीच अस ?–पा. ८३ ).

( २ ) " हिंदू सारस्वताकडे जिकडे जिकडे आपलें लक्ष द्यावें तिकडे तिकडे अनंताची कल्पना उभी राहते; व त्यांतील ग्रंथाच्या वाचनास मनुष्याच्या अत्यंत दीर्घ आयुष्यांतील काळ खात्रीनें पुरणार नाहीं; कारण ते हिंदुस्थानच्या मर्यादे बाहेरील कोणत्याही दोन देशांच्या अत्यंत विशाळ ग्रंथसंग्रहांवर हिमालयासारखे उन्नत वाढले आहेत." ( सर विल्यम जोन्स )

( ३ ) " संस्कृत सारस्वताचें बुद्धिबाहुल्याची परिपूर्ण कल्पना पाश्चात्य विद्वानांस आणून देणें कठीण आहे. "

" हिंदुस्थानांतील सारस्वत सृष्टीच्या मुखारविंदाप्रमाणें मोठें विस्तृत आहे. "

" संस्कृत सारस्वतांतील कविता असो किंवा त्याची दुसरी कोणतीही शाखा असो, ती दुर्मेय आहे. ती इतकी कीं मर्यादित सारस्वताच्या क्षितिजाची संवय झालेल्या युरोपियनांच्या मनास ती किंकर्तव्य मूढ करून टाकितें. "–( सर मॉनियर वुल्यमस्–इंडियन वुइस्डम ).

वास्तविक प्रकार असा असतां कोणालाही हें कबूल करावें लागेल कीं संस्कृत भाषा–भूत, भविष्य व वर्तमान कालीं–सम्यक् ज्ञानाचा उगम व ती आत्मज्ञानाचें साधन होऊन राहील; म्हणजे आम्ही प्राचीन काळीं कसे होतों, आमच्या सुधारणेची मजल कोठपर्यंत जाऊन पोहोंचली होती व आमचें महत्व व वैभव कोणत्या कोटीपर्यंत वाढलें होतें हें त्यावरून समजून येईल. पण असें असतांही लार्ड मेकॅलेनें आपले लेखणीच्या टाकाच्या एका भराट्यानें हें अमोलिक संस्कृत सारस्वत अगदीं कवडीमोल करून टाकिलें व याप्रमाणें त्यानें आपली जादूची कांडी फिरवून आमची गीर्वाणवाणी व आमचें पवित्र सारस्वत निरुपयोगी दिसेल असें केलें व ज्या खऱ्या उगमाच्या द्वारें आमचीं शास्त्रें व कला, भाषा व वाङ्मय, धर्म व तत्त्वज्ञान, राजशासन व दिग्विजय, प्राकृतिक व नैतिक प्रगती ह्यांतील आमच्या भूतकालीन पराक्रमाचें निश्चित ज्ञान आम्हांस करून घेतां आलें असतें,

त्या उगमाचें प्रत्यक्ष दरवाजेच-निदान कांहीं वेळ तरी त्यांनें कुलूप लावून बंद करून टाकिले, मग ती गोष्ट त्यानें दिशाभूल पाडण्याकरितां न करितां संस्कृत सारस्वताच्या महत्वाच्या केवळ कितीही अज्ञानानें केली असो !

आम्ही या ग्रंथांत जागोजाग आमच्या कर्तबगारीचीं प्रमाणें दिलीं आहेत. तें अशा करितां कीं आमच्या भूतकालीन पराक्रमांविषयीं कोणास तिळमात्र संशय राहूं नये, व त्यावरून त्यांना स्वतःला तसे तर काय पण त्यापेक्षांही फार मोठे पराक्रम करण्यास उत्तेजन मिळावें. (आमची-हिंदूंची शुद्ध शास्त्रांतील कर्तबगारी-हें पुस्तक पहा. )

वैदिक सारस्वताचा अनादिपणा-आमच्या आर्यांची सुधारणा दुनियेंतील सर्व सुधारणेपेक्षां अत्यंत पुरातन आहे. ती विनापेक्षां जुनी आहे--ती इजित, बाबिलन व खाळिया, सिरिया व असिरिया, पर्शिया ( इराण-परशू ) व कार्थेज, ग्रीस व रोम व पृथ्वीवरील दुसऱ्या जुन्या राष्ट्रांपेक्षां जुनी आहेः—

( १ ) दुनियेंतील लोकांत आर्यावर्त-हिंदुस्थान-मोठें कां? कारण त्याचा धर्म सगळ्या धर्मांत मोठा आहे. रोम मेलें गेलें व त्याची पडझड राहिली आहे. ग्रीस मेला गेला व त्याचें सारस्वत राहिलें आहे. हिंदुस्थान देश, ग्रीस अथवा रोमपेक्षां पुराणा आहे. इजित जन्मास येण्यापूर्वीं हिंदुस्थानदेश म्हातारा होऊन बसला होता. खाल्डियाचें स्वप्न दिसूं लागण्यापूर्वीं हिंदुस्थान देश वृद्ध झाला होता. इराण पुढें येण्यापूर्वीं हिंदुस्थान देश अनेक शतकें अस्तित्वांत होता. प्राचीन राष्ट्रें मेलीं असतां व त्यांची माती पृथ्वी-तलावरून अंतर्धान पावली असतां हिंदुस्थान देश जिवंत होता. प्राचीन सुधारलेल्या राष्ट्रांत हिंदुस्थानची सुधारणा विद्यमान काळीं जिवंत कां आहे ? इतक्या राष्ट्राच्या पडझडीमध्यें हिंदुस्थान देशाला भूत काळच्या स्मृतींप्रमाणेंच अजून भविष्यत्काळ कसा यावयाचा आहे ? दुनियेच्या इतिहासांत हिंदुस्थान राहिलें आहे, कारण हिंदुस्थानचा जीवात्मा म्हणजे सगळ्या मानवी प्राण्यांचा कलिजा होय व तो कलिजा अमर आहे, तो मरणार नाहीं. हिंदू लोक हे आर्य लोकांपैकीं अत्यंत प्राचीन व जबरदस्त जातींपैकीं अनादी आहेत (हिंदुस्थान व त्याचें दैत्य-व्याख्यान मुंबई-जानेवारी-१८९४.)

( २ ) हें हिंदुस्थान जसें अमर आहे तसे त्यांतील लोक व त्यांचें सारस्वतही अमर आहे, मग त्या लोकांच्या व त्यांच्या सारस्वताच्या सागरावर खालवर लाटा कशाही लहान मोठ्या येवोत; कारण हें राष्ट्र सृष्टिदेवतेचें असेंच लाडकें आहे-हें पक्कें ध्यानांत ठेवण्यासारिखें आहे. म्हणूनच हें अनेक राष्ट्रांचें बारसें व बारावा हे दिवस पाहून जशाचें तसेंच कायम राहतें.

---

हल्लीं जय्यत तयार नाहीं व ह्या ग्रंथास जें वळण दिलें आहे, त्या वळणाचा ग्रंथ आपल्या मायभाषांत तर काय पण इतर भाषांतही हा पहिलाच आहे, व त्याची व्यापकता जी आहे ती अखिल विश्वास समाविष्ट करणारी आहे. म्हणून तो त्यांतील मूलतत्वांस धरून थोडक्यांत लिहिण्याचा इरादा धरिला तरी तो एका व्यक्तीस आपल्या हयातींत पुरा करणें म्हणजे टिटवीनें महासागर उपसून टाकण्यासारखें दुरापास्त आहे. यास्तव सगळ्या भाताची परीक्षा करण्यास रांधप्या ( सैपाकी ) एक शीत दुसऱ्यास दाखवूं शकतो, त्याप्रमाणें अखिल विश्वांतील स्वपराक्रमाची परीक्षा करण्यास आमचा हा पराक्रम—केवळ आपल्या हिंदुस्थानांतील—आमच्या वाचकांस प्रामुख्येंकरून सादर करण्यांत येणार आहे. त्या स्वपराक्रमाच्या उपपत्तीच्या ह्या भागांचें विवरण पुढील तत्वाप्रमाणें करण्याचा इरादा आहे.

तत्त्वें:—( १ ) "ज्या ठिकाणीं कांहीं सुव्यवस्थित सामग्री नसेल, त्या ठिकाणीं आम्ही कांहीं गोष्टी गृहीत घेऊं. त्या अशा कीं, त्या जरूर त्या कसोट्यांत पुऱ्या पडून उपपत्तींत विकास पावतील. ज्या ठिकाणीं ज्या परिस्थितीच्या योगानें कांहीं विशेष गोष्टी उर्फ चमत्कार घडतात, त्या ठिकाणीं त्या परिस्थितीचें प्रत्यक्ष ज्ञान करून घेण्याचें साधन नसलें तरी त्या विशेष गोष्टींच्या किंवा चमत्कारांच्या स्पष्टीकरणार्थ गृहीत गोष्टी किंवा सांकेतिक उपन्यास करण्याची प्रवृत्ति अत्यंत गूढ प्रमेयांचा खुलासा करण्याच्या इच्छेनें प्रत्येक मनुष्याच्या ठायीं उपजत असते. ह्या गृहीत गोष्टींचा किंवा सांकेतिक उपन्यासांचा एक उपयोग असतो. तो हा कीं, तो ज्या विशेष गोष्टींचें किंवा चमत्कारांचें कारण व कार्य शोधीत असतो, त्या विशेष गोष्टींचें किंवा त्या चमत्कारांचें कारण व कार्य ह्या गृहीत गोष्टींनीं किंवा सांकेतिक उपन्यासांनीं त्यास अनेक वेळां शोधून काढितां येतें. मनुष्याच्या हल्लींच्या ज्ञानभांडारापैकीं पुष्कळ ज्ञानकण अशा गृहीत गोष्टींच्या किंवा सांकेतिक उपन्यासांच्या द्वारें प्राप्त झाले आहेत. पण ह्या गृहीत गोष्टी किंवा सांकेतिक उपन्यास सर्वमान्य उपपत्तीच्या योग्यतेस जाऊन पोहोचण्यापूर्वीं त्यांना आवश्यक असणाऱ्या कसोट्यांचें घर्षण सोसावें लागलें आहे. आमच्या दररोजच्या व्यवहारांत आपण काय करितों ? आपण असतील नसतील तेवढ्या गोष्टी गृहीत धरितों, तेव्हां त्या गोष्टी ज्या हेतूनें गृहीत धरितों, तो हेतू त्या गोष्टींनीं अधिक उणा तडीस जातो असें आपण नेहमीं पाहतों. पण सुव्यस्थित विचारांत ज्या गोष्टी गृहीत धरिलेल्या असतात, त्यांना शक्य तितक्या रेखलेपणानें कसोट्यांवर घासून त्यांचा बरेवाईटपणा सोन्यारुप्याप्रमाणें ठरवावा लागतो. असें करितां करितां शेवटीं त्या गृहीत धरिलेल्या गोष्टी किंवा सांकेतिक उपन्यास ज्या विशेष गोष्टींचा किंवा चमत्कारांच्या स्पष्टीकरणार्थ घेतलेले असतात त्या विशेष गोष्टींच्या किंवा चमत्कारांचा शहानिशांच्या सिध्यर्थ इतक्या पुऱ्या पडतात कीं त्या गृहीत गोष्टी किंवा सांकेतिक उपन्यास यांस खऱ्या उपपत्तीच्या योग्यतेस नेऊन बसविण्यास त्यांत कांहीं संशयास्पद भाग शिल्लक राहत नाहीं !"—(नरेन्द्रनाथ लॉ. एम्.ए.

मॉडर्न रिव्ह्यू जून १९१७ पा. ६३९ )—उदाहरण, पुढें येणारें राशिचक्र हें भौगोलिक धरून चालणें व त्यावरून पृथ्वीवरील देशांचा पत्ता बरोबर लावणें.

( २ ) पुढील विवेचन ऋषीजात पंचजनांचा एकजीव व्हावा म्हणून केलें आहे, तें कोणा धार्मिकाचें मन दुखवावें किंवा उपहास करावा अगर अवहेलना करावी अशा हेतूनें केलेलें नाहीं असें धरून चालावें.

उत्पत्तीः—अक्षरात्खं ततो वायुः ततो ज्योतिस्ततोजलम् । जलात्प्रसूता जगती जगत्यां जायते जगत् ( शांन्तिपर्व २०१-१ ). पूर्वोक्त अक्षर ब्रह्मापासून अनादी काळीं दिक व काल ही जोडी उत्पन्न झाली. त्या दिक्कालाच्या जोडीपासून प्रथम आकाश उद्भवलें. त्या आकाशांत चिज्जडाच्या चक्रांची मालिका ( मि. लोकियरचें ज्योतिषशास्त्र पान ४४ प्रमाणें ) उल्काश्मापासून उत्पन्न झाली. त्या चिज्जड--चक्रांपैकीं एका चिज्जडाच्या चक्राची आपली सूर्यमालिका बनली आहे. ह्या मालिकेच्या केन्द्रस्थानीं तो तेजोराशी सूर्यनारायण आहे व त्याच्या भोंवती अनुक्रमें बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरू, शनी, हर्षल व नेपच्यून हे ग्रह आप-आपल्या उपग्रहांसह अधिक उण्या दीर्घवर्तुलाकार कक्षेंत अधिक उण्या दिवसांच्या अवधींत भ्रमण करितात व ते आपआपल्या आंसाभोंवतीं दैनिक व वार्षिक भ्रमणानें वर्षानुवर्ष अधिक उण्या अवधीच्या दिवसरात्री व ऋतू अनुभवितात. ( आमचें ज्योतिषशास्त्रविषयक आकाशांतील अनंतत्वाची आराधना हें पुस्तक पहा) या सूर्याच्या अनुयायी ग्रहांपैकीं तिसरा ग्रह ही आपली भूमिमाता पृथ्वी होय. ही भूमिमाता केव्हां उत्पन्न झाली ? ह्याची गणती आजतागाईत कोणताही ज्योतिर्विद किंवा भूगर्भविद बरोबर करूं शकला नाहीं ( आमची आकाशाच्या अनंतत्वाची आराधना व भूगर्भदर्पण पहा. ) त्यांच्या नानाविध व विचित्र मतांप्रमाणें ती इतक्या कोटी वर्षांपूर्वी होऊन गेली आहे कीं ते कालावधी मानवी बुद्धीस अतर्क्य आहेत ! ह्या पृथ्वीवरील निरनिराळ्या शीत, समशीतोष्ण व उष्णकटिबंधांतील अनेक लहान मोठ्या देशांपैकीं हिंदुस्थानची वसाहत पूर्वी तृतीय युगांत ( टर्शियरी पिरियड ) नर्मदा व गोदा या नद्यांमध्यें कधीं व कशी झाली तें कोण जाणें पण त्यांत मनुष्याची पुन्हां भरती त्रिविष्टप ( तिबेट ) व जंबुद्वीप (हिंदुस्थान) यांच्या मधील हिमालयाच्या उत्पत्तिकालीं अथवा भूगर्भाच्या इओसीन कालीं होऊं लागली असें आमचें मत आम्ही अहंमदाबादेस असतां झालें व तें आम्ही आमच्या पूर्वोक्त आर्यललितविस्तारांत व हिंदुस्थानांतील प्राचीन सुधारणेंत प्रसिद्ध केलें आहे. कारण या वेळीं एशिया व युरोप या दोन खंडास भोवण्यासारिखा व त्या वेळच्या त्यांतील लोकवस्तीस पळून जाण्यास लावण्यासारिखा एक महा उत्पात होऊन गेला आहे. पण विद्वद्वर्य टिळक यांच्या मताप्रमाणें ती गोष्ट भूगर्भशास्त्र प्रसिद्ध हिमपाताच्या प्रळयाच्यावेळीं घडली असें मानिलें तरीही त्या गोष्टींची कालमर्यादा दहावीस हजार वर्षांपलीकडे न्यावयास नको असें त्यांचें म्हणणें आहे, व तें मत आम्हांस अमान्य करण्याचें कारण नाहीं; कारण हा हिमपात आमच्या हिमालयाच्या उत्पाताचें फळ आहे असें आमचें

मत पूर्वीं होतें व हल्लीं आहे व तें त्यांसही अमान्य आहे असें दिसत नाहीं. पण त्यांच्या मतांत व आमच्या मतांत एक फरक आहे. तो हा कीं त्यांच्या मतें ही हिंदुस्थानांतील मनुष्यांची भरती पाहिलीच झालेली आहे व आमच्या मतें ती अनेक अस्मानी उपद्रवांच्या प्रसंगीं वेळोवेळीं आजतागाईत अनेकदां होत आली आहे व निघून गेली आहे. तर त्यांपैकीं एक वसाहत सदरहू अस्मानी उपद्रवांच्या वेळीं दहा बारा हजारवर्षांच्या सुमारास झाली असेल. पण ह्या उत्पाताच्या वेळच्या वसाहती मागून दुसऱ्या वसाहती तुर्क, हुण, तार्तर, ग्रीक व मुसलमान लोकांच्या कांहीं झाल्या आहेत. त्याप्रमाणें तसल्या वसाहती त्या प्रसंगापूर्वीं त्या नवीन उत्पन्न झालेल्या हिमालयाखालच्या भूमध्यसमुद्रकांठच्या भूगर्भशास्त्रोक्त गोंडवन ( पुढें धर्म शास्त्रांत गौड म्हटलेल्या ) देशांत गोदा व नर्मदा प्रदेशांतून आर्यांच्या झाल्या नव्हत्या असें मानणें केवळ अनुदारतेचें नव्हे तर अयुक्तिक ही होय. याशिवाय सदरहू विद्वद्वर्यांच्या मताशीं आमचा एक मोठा विरोध आर्यावर्ताच्या मर्यादेसंबंधीं व त्यांतील आर्यांच्या वसाहतींच्या होत जाण्याच्या दिशांसंबंधीं आहे. ( वरील ग्रंथ पहा )

**आर्यावर्त.**—ह्या मताची शहानिशा करण्यास आपणांस हल्लींच्या चतुर्थयुगापूर्वीं (कलियुगापूर्वीं द्वापर नव्हे, त्रेता नव्हे, तर थेट कृतयुगापर्यंत पृथ्वीच्या अनादी काळाच्या संस्थितीचें शोधन केलें पाहिजे, म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता कांहीं पटेल. ज्या गोलावर आम्हीं राहतों व ज्यास आम्ही पृथ्वी असें म्हणतों, ती एकदां परमावधीची उष्ण होती. त्या वेळीं तिची उष्णता इतकी तीव्र होती कीं आमच्या भोंवती आम्हांस जे खडक दिसत आहेत, त्यांचीं घटकद्रव्यें वितळलेल्या धातूंच्या रसाप्रमाणें द्रवरूप व जळजळीत होतीं. ज्याप्रमाणें हल्लीं सूर्य आहे, त्याप्रमाणें एका वेळीं पृथ्वीही विस्तवाच्या गोळ्यासारिखी होती पण ती दिवसानुदिवस अधिकाधिक थंड होत आहे. एखादा जळजळीत निखारा चुलींतून बाहेर पडला तर तो बाहेरून थंडावून काळा पडतो. पण तो फोडला तर तो मध्यें लाल असून चमकत असतो. आपली पृथ्वीही कांहींशी त्या निखाऱ्यासारिखी होती. तिचा बाहेरचा भाग अथवा कवची आतां थंड झाली आहे, पण तिचा आंतील भाग अजून उष्ण व चमकणारा आहे, मग तो विद्युत्प्रयुक्त असो किंवा तद्विरहित असो. आपण एखादा करंदा किंवा बटाटा भाजून पाहिला तर तो जसा बाहेरून थंड होत जातो तशी त्यावरील कातडी संकोचून (आवटरून) सुरकुतते. त्याप्रमाणें पृथ्वीची कवची आवटरून सुरकुतली आहे, म्हणजे अर्थात तीवर अधिकउण्या जाडीचा व उंचीचा पापुद्रा बनला आहे. याबरहुकूम पाहतां दिवसगत्या नव्हे, वर्षगत्या नव्हे तर युगगत्या त्या पृथ्वीची पुष्कळ उष्णता आकाशाच्या पुष्कळ अवकाशांत निघून चालली. असें होतां होतां शेवटीं पृथ्वी इतकी थंड झाली कीं तिचा कांहीं भाग घन झाला. अशा प्रकारें पृथ्वीच्या पाठीवर प्रथम कडक खडक उत्पन्न झाले. थंड होण्याची क्रिया आणखीं पुढें चालली असतां पृथ्वीभोंवतालच्या वातावरणांतील वाफ घन होऊन तिचें पाणी बनलें, व तें तिच्या पृष्ठभागावर बहुतेक

ठिकाणीं पसरलें. नंतर त्या पाण्याचें उष्णतेनें अरीभवन-(केन्द्रोद्गमन-रेडिएशन) सुरू झालें. तेव्हां पृथ्वीच्या पाठीवर भूमध्यवृत्ताच्या आसपास हलक्या दर्जाचे प्राणी राहूं लागले पण ते तेथें प्रथम कोठून आले ? हें सांगतां येणें अशक्य आहे. त्या हलक्या दर्जाच्या जीवाणूंची ( अमीवा—जीवरस ) उत्क्रान्ती होत गेली. इकडे त्या दूरच्या युगांतील सूर्याच्या तीव्र उष्णतेनें त्या पाण्याची वेळोवेळीं व जागोजागीं वाफ बनून तिचे आकाशांत ढग जमूं लागले व त्यांपासून हंगामशीर पर्जन्यपात होऊं लागला. त्याचें पाणी जमीनीवर वाहूं लागलें. त्या पाण्यापैकीं कांहीं पाणी खडकांच्या कपारींत शिरून बसलें व त्यांतून झिरपणाऱ्या पाण्यापासून ओहोळ बनले-ते ओहोळ एकत्र होऊन त्यांचे नाले झाले. ते नाले एकत्र होऊन त्यांच्या नद्या बनल्या. त्या ज्या जमिनींतून वाहत गेल्या, तींतील क्षार वगैरे घेऊन त्या जलाशयांस जाऊन मिळाल्या. त्यांस त्याचा गोडेपणा व खारेपणा या गुणाप्रमाणें सरोवरें व समुद्र हीं नांवें मिळलीं.

या विधानास प्रमाणें येणेंप्रमाणें:—

इतिहासांत असा एक काळ होता कीं तेव्हां या पृथ्वीवर एकही प्राणी नव्हता; कारण तिची स्थिती तेव्हां अशी होती कीं तीवर प्राणी सजीव राहणेंच शक्य नव्हतें. कारण तेव्हां पृथ्वी इतकी उष्ण होती व तींतील पुढें बनावयाचे खडक इतके वितळलेल्यां स्थितींत होते कीं त्यांवर जीवजंतू जगणें संभवनीय नव्हतें. पृथ्वी वसाहतीस योग्य झाल्याबरोबर म्हणजे आकाशांतील पाणी व त्याखालील पाणी विभक्त होऊन सूर्याच्या लंबरूप किरणांनीं क्रान्ति—प्रदेशांत भूमध्यवृत्ताच्या दोन्ही बाजूच्या पाण्यांतून सुकी जमीन उघडी पडल्याबरोबर ह्या पृथ्वीच्या पाठीवर प्राकृतिक ( अगदीं साधी ) जसें, जीवाणू ( अमीवा ) जीवसृष्टी उत्क्रान्त होऊन त्या सुक्या जमिनीचा विस्तार वाढत चालला तशी ती जीवसृष्टी प्रसृत होत चालली. ही गोष्ट पृथ्वीभोवतालच्या खडकांच्या कागदांवर मोठ्या स्थूल अक्षरांनीं लिहून ठेविलेली आहे. ती इतकी अचूक आहे कीं ती तर्कवितर्कांनीं खोटी ठरवितां येण्यासारखी नाहीं. पृथ्वी जळजळीत व लवलवित अवस्थेंतून थंड व घन अवस्थेंत गेल्याबरोबर त्या जीवसृष्टीस प्रारंभ झाला. तो प्रारंभ कसा झाला ह्याबद्दल आह्मांस येथें विचार करण्याचें कारण नाहीं; आह्मांला हें पक्कें ठाऊक आहे कीं आपल्या भूगोलाच्या इतिहासांत भूगोलावर जी जीवसृष्टी उत्पन्न झाली, ती प्रथम साधी, अवयवरहित, पण सजीव होती. ह्या दोन युगांमध्यें पृथ्वीच्या इतिहासांत मोठ मोठीं स्थित्यंतरें झाली. पण ह्या युगांची किंवा ह्यापुढील युगांची इकमिती प्राणिशास्त्राधारें नक्की अनुमित करितां येत नाहीं. पण फक्त एवढेंच ठोकळ मानानें ठरवितां येतें कीं त्यांतील प्रत्येक युग कोट्यवधी वर्षांचें होतें व त्यांत साध्या अवयवरहित जीवाणूंपासून संयुक्त सावयव प्राणी व त्या प्राण्यांत शेवटीं मनुष्यकोटी उत्पन्न झाली":-डॉ० अलेक्झांडर डब्ल्यू. राबर्टस.

पूर्वोक्त खडकांवर प्रथम बुरशी, शेवाळी व त्या बुरशीशेवाळीपासून महान् तृणें व बीजपर्णें ( फर्नस ) व शेवटीं ताड, भूर्ज व ओक यांचीं जंगलें व

फळझाडांच्या राया उत्क्रान्त झाल्या. या प्रमाणेंच त्या निरवयव व गोंदयुक्त जीवाणूंपासून स्पंज, शंख, कवचयुक्त मच्छ, सर्प, अर्धसर्प, अर्धपक्षी, व शेवटीं पूर्णपक्षी उत्क्रांत झाले. पुढें स्तनपान करणाऱ्या हलक्या प्राण्यांपासून उच्च मनुष्य उत्क्रान्त झाला, व तो आपल्यास मासे, सर्प, पक्षी, व पशू यांच्या सगळ्या परंपरेचा राजा म्हणवूं लागला, व तें त्याचें राजत्व अप्रतिहत चालू शकलें, त्या अर्थी तो त्यापासून उत्क्रान्त झालेला दिसत नाहीं, फक्त तो काल व स्थल यांच्या जवळपणानें त्यांचा संबंधी आहे. म्हणजे तो त्यांच्याशीं काळ व स्थळ यांच्या जवळपणाच्या साखळीनें बांधलेला आहे.--सदर.

यावरून एक दोन गोष्टी पुन्या सिद्ध होतातः—

(१) वनस्पती काय, किंवा प्राणी काय, किंवा मनुष्य काय, त्यांच्या उत्क्रान्तीस व संस्थितीस पंचमहाभूतांपैकीं भूमी, आप व उष्णता (तेज) हीं कारणीभूत होतातः--

(२) ह्या भूतांचा अतिरेक त्यांच्या संस्थितीस बाधक होतो. म्हणून पृथ्वीवर जल व उष्णता ह्यांच्या तडाक्यापुढें प्राणी व त्यांत मनुष्यें यांची वस्ती जणू हाकल्याप्रमाणें चोहोंकडे फाकली जाते.

याप्रमाणें अलम दुनियेच्या उन्नतीचें अध्ययन केलें तर असें उघड दिसतें कीं तींतील हरयेक देशाच्या उन्नतीस भूमी, आप, तेज, वायू व आकाश हीं पांच निसर्गांतील भूतें व त्यांतही विशेषत: जमीन, ऊष्णता व पाणी हीं तीन भूतें कारणीभूत होतात. हीं तीन भूतें भूमध्यवृत्ताजवळच्या नवीन पाण्यांतून बाहेर पडलेल्या प्रदेशांत प्रथम पाहिजे तशीं माफक मिलाफ पावलीं. म्हणून तेथें पूर्वोक्त हलक्या दर्जाच्या जीवाणूंपासून मनुष्य हा उच्च दर्जाचा प्राणी उत्क्रान्त झाला असें डार्विनच्या अनुयायांचें एक मत आहे. रसायनशास्त्राप्रमाणें प्राणवायू (आक्सीजन) व उदानवायू (हायड्रोजन) यांचा मिलाफ करून त्यांचें जल बनविण्यास मुख्य गोष्ट जी-विशिष्ट उष्णता-ती त्यांत यावी लागते, त्याप्रमाणें वरील मूलतत्वांचा मिलाफ करून त्यांपासून भरभराट उत्पन्न करण्यास मुख्य गोष्ट जी मागील भागांत सांगितलेली--विशिष्ट इच्छा.--ती त्यांत यावी लागते. ती विशिष्ट इच्छा धारण करणारे स्त्रीपुरुष या हिमालयाच्या उत्पत्तीच्या. पूर्वींच्या व मागच्या काळीं त्या विशिष्ट पंचमहाभूतांत सदरहू क्रान्तिप्रदेशांतील हिंदुस्थान, मिसर, मेक्सिको, पेरू वगैरे देशांत उत्पन्न झाले व ते समशीतोष्ण हवेच्या प्रदेशभर पसरत गेले, मग ते पूर्वोक्त जीवाणूंपासून उत्पन्न झाले असोत किंवा स्वतंत्र उत्पन्न झाले असोत. हें नक्की समजण्यास अजून कोणास कांहीं नक्की साधन सांपडलें नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानांतील लोक, कीं जे आपणांस आर्य म्हणवीत असत, ते प्रथम अन्नपाण्याच्या व हवाजमिनीच्या सोईप्रमाणें प्रथम क्रान्तिप्रदेशांत पूर्वपश्चिम व नंतर त्या क्रान्तिप्रदेशाबाहेर दक्षिणोत्तर पसरत गेलेले दिसतात. हा नियम वनस्पतींसही लागतो. वनस्पतींस चालण्यास पाय नसतात तरी त्याही अशाच भूमध्यवृत्ताकडून प्रथम क्रान्तिप्रदेशांत पूर्वपश्चिम व पुढें क्रान्तिप्रदेशाबाहेर

दक्षिणोत्तर अन्नपाणी व हवाजमीन यांच्या सोईप्रमाणें पसरत गेलेल्या दिसतात. जेथें अन्नपाणी व हवाजमीन यांच्या उत्तम सोई असतात, तेथें त्या पुष्कळ व उत्कृष्ट होतात. म्हणजे वनस्पतींच्या भरभराटीस ऊन, पाऊस व जमीन यांची सोय जरूर लागते. याप्रमाणें स्थिती सदरहू आर्यांच्या वसाहतीची होती. म्हणून त्यांची सर्वोत्कृष्ट भरभराट झाली.

हे आर्य तेथें अनादी काळापासून राहत असत. ह्मणून ऋग्वेद नामक दुनियेंतील अनादी वेदग्रंथाचें अथपासून इतीपर्यंत अध्ययन केलें तरी सदरहू स्त्रीपुरुष ह्या हिंदुस्थानांत इतर ठिकाणाहून प्रथम आले असें दाखविणारी एकही ऋचा आढळत नाहीं. कोणाला आढळली असेल तर त्यानें दाखवावी. त्या ग्रंथाच्या ऋचांवरून जें काय दिसतें तें एवढेंच कीं ते स्त्रीपुरुष स्वतःस आर्य म्हणवीत, ते जेथें रहात असत तेथें दीर्घ उषःकाल व शरदृतू यांचें साम्राज्य जसें त्याच्या कांहीं भागांत होतें तशा सिंधू, शरयू, सरस्वती, गंगा, यमुना, कुभा, क्रतू, गोमती, रसा वगैरे पंधरा ते पंचवीस नद्या त्याच्या कांहीं भागांत होत्या, व शिडांचीं गलबतें चालणारे समुद्र त्याच्या कांहीं भागांत होते. त्यांत जसा सोमोत्पादक मुंजावत पर्वत होता असें वर्णन आहे तसा देवाधिष्ठित मेरू पर्वत होता असें वर्णन वेदांत नाहीं. यावरून ह्या वसाहती त्या वसाहतीनंतर उत्तरेस मेरू व उत्तरकुरूपर्यंत झालेल्या दिसतात. पण हा काळमात्र अर्वाचीन पुराणांपैकीं खास नव्हे ( महाभारत पहा ). ऋक्संहितेंत शरद हा शब्द सुमारें २० वेळां आलेला आहे व हिम शब्द दहा वेळां आला आहे, व वसंत अगणित वेळां आला आहे. शतंजीव शरदो वर्धमानः शतं हेमतां छतमुवसंतान् ( १०।१६१।४ ) ह्या ऋचेंत शरद, हेमंत व वसंत हे शब्द वर्षे ह्या अर्थी आले आहेत. असा त्या आर्यांचा देश अथवा आर्यावर्त किंवा जंबुद्वीप व सुमेरुखंड सैबिरियांतील उत्तरकुरूपासून विंध्य पर्वतापर्यंत पसरलें असून त्यांस तांबडे, काळे, पिवळे वगैरे दस्यू शत्रू होते. (इंडियनआर्य,भिल्ल,द्रविड,नैऋत,नाग.)

ह्या उत्क्रान्तीबद्दल प्रमाणें प्राणिशास्त्र व भूगर्भशास्त्र यांतून पुढें दिलीं आहेतः—

" प्राणिशास्त्राचा अभ्यास केला तर त्यावरून आपणांस जरी पृथ्वीच्या प्राचीन इतिहासाची पुरी माहिती मिळत नाहीं तरी एक गोष्ट सुस्पष्ट कळते. ती ही कीं युगांना धरून आपण जितकें जितकें मागें जावें तितकें तितकें आपण कशाच्या तरी प्रारंभाकडे जात आहों याबद्दल आपली खातरजमा होत जाते. सांप्रत काळीं जे अत्यंत विकास पावलेले प्राणी आहेत, त्यांची पूर्वपरंपरा आपण तपासीत चाललों, तर आपल्याला जुन्या युगांतील प्राणी नव्या युगांतील प्राण्यांपेक्षां कमी विकास पावलेले आढळतात व त्या जुन्यायुगांतील प्राण्यांतलें चैतन्य ( जाणीव ) नव्या युगांतील प्राण्यांच्या चैतन्यापेक्षां कमी असतें व अशा तपासाच्या अन्तीं आपण भूगर्भशास्त्रोक्त कृत [ पालियाझोईक ] युगांतील साध्या जीवाणूंशीं जाऊन भिडतों. शिवाय, आपण सृष्टीचा इतिहास मागें मागें

वाचीत जावें, तों तों एक मुख्य गोष्ट आपणापुढें उभी राहते. ती ही कीं युग जितकें जुनें तितके त्यांतील प्राण्यांचे आकार अधिकाधिक साधे असतात, या प्रमाणेंच खडकांच्या शास्त्रावरून असें कळतें कीं स्फुरण पावणाऱ्या लहानशा एकाकी अपूर्व ताण्यापासून अथवा अणूपासून पृथ्वीभर सर्वत्र पसरलेल्या सुंदर व मनोरंजक वनस्पती व प्राणी यांच्या सर्व परंपरांचा पसारा विकास पावला आहे.

" प्राणिशास्त्र व भूगर्भशास्त्र यांचे उपनेत्र लाविले, तर विशाळ व व्यवस्थित प्राणिजात व त्याचा इतिहास मोठा गमतीचा पण गूढ ( लपविलेला ) आढळतो. तो कोठें? तो त्या पृथ्वीमातेच्या खडकी शालूच्या घड्यांत ( समुद्रवसनांत ) होय. जो खरा उद्योगी व खरा जिज्ञासू असतो, त्यासच तो जेथें अथपासून इतीपर्यंत वाचावयास सांपडतो. त्या इतिहासाचा सारांश असा आहे:—

" आपल्या भूमिमातेच्या चरित्राचा असा एक काळ होता कीं, त्या वेळीं तिच्या अफाट पसाऱ्याभर जिकडे तिकडे सर्वत्र स्वस्थता व शांतता नांदत होती. ती इतकी कीं पक्षांचीं गाणीं, प्राण्यांचीं ओरडणीं अथवा मनुष्यांचीं बोलणीं ह्यांनीं त्याचा विघात बिलकुल होत नव्हता. पण तिच्या ओसाड मैदानावर समुद्राच्या कल्लोलमालिका रात्रंदिवस येरझारा करीत होत्या व त्यांच्या चराभेगांतून निघणारे वाफेचे ढग धुक्यानें व्यापलेल्या आकाशास झाकीत होते व तिच्या आकुंचित होणाऱ्या कवचांतून कडक खडक बाहेर पडत होते, व त्यांचे पर्वत बनत होते, तेव्हां समुद्राच्या निर्जन व भयाण किनाऱ्यांभर मोठमोठ्या उत्पातांचे कडकडाट व गडगडाट प्रतिध्वनित होत होते. सर्व वस्तुजात करडा व भयंकर दिसत होता. आकाशांतून पावसाचा वर्षाव अखंड चालला होता. खडकांची छाती जणूं दमानें सारखी खालवर होत होती. भूमिमातेला प्रसववेदना होत होत्या. तिची अशी अवस्था असतां तीवर जीवाणू उत्पन्न झाले. ते कसे उत्पन्न झाले हें त्या परमेश्वराचें कृत्य त्याचें त्यासच ठाऊक. सारीं भौतिक शास्त्रें व तत्वज्ञानाचीं शास्त्रें धुंडाळिलीं तरी ह्या अपूर्व व चमत्कारिक गोष्टीबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. पूर्वोक्त जीवाणू हालणारे व डोलणारे होते. त्या जीवाणूंपासून, कालगत्या फुलझाडें, फळझाडें, मासे, पक्षी व चार पायांचे प्राणी यांची परंपरा उत्क्रान्त झाली व कशिदा काढलेल्या चंद्रकळेसारिखी ती सुंदर परंपरा भूमिमातेच्या शरिराभोंवती पसरली ! व त्यांवरील विकट पादर्थापासून एक अंगरक्षक कवच बनलें व त्यांत प्रथम ( १ )स्वसंरक्षण व ( २ ) प्रगती हे दोन अपूर्वगुण उद्भवले.

पूर्वीच्या काळापेक्षां आतां समुद्रांच्या किनाऱ्यांवर तुफानांचे तडाके व लाटांच्या लाथा कमी बसूं लागल्या, तशा त्या समुद्रांत वनस्पती वाढूं लागल्या व नितान्त शान्त दऱ्यांतील खडकांवर शेवाळी व बुरशी पाळें धरूं लागल्या. पुढें उथळ समुद्रामध्यें कवचबद्ध मच्छ व सच्छाय पल्वलांत मोठमोठे कर्क ( खेकडे ) फिरूं लागले व दऱ्याखोऱ्यांतील खडकांवरील शेवाळ्या

व ब्रुरशा यांच्या ठिकाणीं झाडांसारख्या वनस्पती, मोठमोठ्या पर्णबीजी ( फर्नस ) व राक्षसी गवतें उत्पन्न होऊं लागलीं व ह्या झाडांच्या दमट व उबदार सावटांत दोन फूट लांबीचे किडे रांगूं व सर्पटूं लागले. ह्या पृथ्वीच्या इतिहासाच्या उषःकालांत अथवा कृतयुगांत ( पेलियाझोईक ) वनस्पती व प्राणी ह्यांच्या इंद्रियांची रचना अगदींच साधी होती. त्या प्राचीन काळीं ह्या पृथ्वीवर मोठमोठे राक्षसी प्राणी उत्पन्न झाले. पण आकाराच्या मोठेपणा‑प्रमाणें त्यांतील चैतन्य ( जाणीव ) नेहमीं मोठें असतें असें आढळत नाहीं. म्हणून हिमालय, विंध्य, निलगिरी प्रांतांतील उथळ तलावांतील रानटोणगे व रान‑डुकरें आडमुठ्यासारखे चिखलांत लडबडत राहतात त्यापेक्षां आपल्या सेपाघराच्या कोठींतील हरयेक वस्तू कुरतडून कुरतडून खाणारे चुव्वे ( उंदीर ) मोठे तल्लख व हुषार असतात.

" ह्या उषःकालाच्या अथवा कृतयुगाच्या ( पालियाझोईक ) पुढें दुसरें अथवा त्रेतायुग लागलें. त्यांत आपल्या भूगोलाच्या बहुतेक उष्णकटिबंधाच्या भागावर उथळ सरोवरें व खाड्या, दाट जंगलें व राया झाल्या. त्यांत मोठमोठे सर्पटणारे सर्पनाग व राक्षसी पालीसर्डे थव्यांनीं राहून सरसरूं लागले. या युगांत विशाळ प्राथमिक प्राणी बहुसंख्याक उद्भवले. अर्धे पक्षांसारखे व अर्धे सर्पासारखे प्राणी त्या जंगलांतील वृक्षांत राहूं लागले. मोठमोठाले विशाळ प्राणी उंच विषारी गवतांत जोरानें फिरूं लागले. भयंकर मगरसरडे व सर्पपाणदिवडें यांनीं समुद्रावर गहजब मांडिला. समुद्रांतील शंखशिंपांचीं तीन फूट घेरांचीं कवचें हीं उलथ्या पडलेल्या खडकांप्रमाणें त्यांच्या किनाऱ्याभर पडून राहूं लागलीं. जिकडे तिकडे प्राणी बहुसंख्याक, विक्राळ व वैभवशाली आढळूं लागले, पण ते सर्वस्वी साधे, मतिमंद व मूर्ख होते.

" ह्या दुसऱ्या अथवा त्रेता युगाच्या अखेरीस आपल्या हल्लींच्या युगांतील प्राण्यासारखे प्राणी अवतीर्ण झाले. अर्धपक्षी व अर्धसर्प यांसारखे प्राणी नाहींसे होऊन त्यांच्याजागीं कमी संकर ( मिश्रण ) झालेले प्राणी उत्पन्न झाले. या भागांत खरेखुरे पक्षी अगणित उद्भवले.

" ह्या त्रेतायुगांत स्तनयुक्त प्राणी पडद्यांतून कालाच्या रंगभूमीवर बाहेर आले. मोठमोठे सरडे, घोरपडी व राक्षसी सर्पनाग, कीं ज्यांचे आकार मोठे व मेंदू लहान होते, ते ह्या वेळीं नष्टप्राय झाले. प्राण्यांच्या विकासाच्या जिन्यावर प्राणी आणखीं एक पायरी वर चढून बसले. शंख व निकामी वनस्पती, कीटक व तृणें यांतील पुष्कळ जुने प्रकार हे युगानुयुग वस्तुतः जसे होते, तसेच राहिले; पण ते मागें टिकून राहिल्याच्या योगानें ते जुने प्रकार व त्यापुढें उत्क्रांत झालेल्या वनस्पती व प्राणी ह्यांच्या आकारांतील ठळक फरक उघड समजूं लागला.— डा. अले. ड. राबर्टस.

" त्रेतायुग सरल्याबरोबर आपण आपल्या पृथ्वीच्या जुन्या बखरीच्या शेवटच्या भागावर येऊन पोहोंचतों. आपल्या भूगोलाचा कांहीं भाग त्यावरील पुढील

रहिवाशांकरितां जणू तयार करावा म्हणून स्पेनपोर्तुगाल पासून कामश्चाटका तर काय पण आस्ट्रेलियापर्यंत उत्पात होऊन आपल्या एशिया खंडाच्या मध्यभागाचा मेरूपर्वत हा ठेंगणा झाला व आपल्या हिंदुस्थानच्या उत्तरेच्या हल्लीं नष्ट झालेल्या भूमध्य समुद्रांतून अपूर्व हिमालय पर्वत एकाएकीं वर आला ! तेव्हां मेरू व हिमालय, हिमालय व विंध्य यांमध्यें आपले पूर्वज सात ऋषी व मनू यांचें गलबत हिमालयावर वहात आणून सोडण्यासारखा इतिहासप्रसिद्ध जलप्रलय झाला !" "या जलप्रलयाच्या पाण्यानें समुद्राचे किनारे, डोंगर व दऱ्या उत्तम प्रकारें धुवून काढिल्या ! पण त्या वेळीं भूगोलाच्या उत्तरेच्या बाजूस प्रालेयप्रलयानें म्हणजे बर्फाच्या पुरानें चोहोंकडे मोठा गहजब केला ! तो बर्फाचा पूर युरोपखंडाच्या पश्चिम व मध्य भागांतल्या तावत्कालपर्यंत उष्ण व सुपीक प्रदेशांतील खोलगट जागेकडे हळूहळू पसरत गेला ! अमेरिका खंडाचीही हीच स्थिती झाली ! तीन हजार फूट उंच बर्फ वाढल्यामुळें त्याच्या मैदानभर जिकडे तिकडे मोठी नासधूस झाली ! तें बर्फ त्याच्या पाण्याबरोबर वहात जात असतां त्यानें सगळ्या दऱ्या कोरकोरून व त्यानें डोंगराच्या बाजू खोदखोदून व घसारे देऊन देऊन सुंदर केल्या ! पुढें होणाऱ्या मुलांस जणूं आनंदविण्याकरितां त्यानें डोंगरांच्या कड्यांवर लहान किल्ल्यांसारखे मोठमोठाले धोंडे एकावर एक रचून ठेविले ! त्यानें दऱ्याखोऱ्यांत चिकणमाती भरून त्या सुपीक करून ठेविल्या ! त्या वेळीं दक्षिणेस भूमध्यवृत्तापर्यंत पाचेसारखें हिरवें बर्फ गलबताच्या डोलकाठ्यांइतकें उंच वाहूं लागलें ! तर त्या उत्तरेकडील भूभागामध्यें त्या बर्फाच्या थरांचा कसला सुंदर देखावा दिसला असेल ह्याची कल्पना केलेली बरी ! हल्लीं ज्यांस ब्रिटिश बेटें म्हणतात त्यांवर तेव्हां बर्फ कोसळून त्यांचें पांढरें शुभ्र पण ओसाड मैदान झालें व त्यांतील उंचवटे हिमाच्छादित द्वीपांप्रमाणें दिसूं लागले !

"ह्या हिमयुगाच्या अखेरीस जुने पशुपक्षी अंतर्धान पावले व नवीन पशुपक्षी अवतीर्ण झाले व युरोपअमेरिका खंडभर मोठमोठीं ताडांचीं अरण्यें पसरलीं. त्यांतील डोंगर श्यामसुंदर झाले व त्यांतील दऱ्या काळ्याकभिन्न झाल्या. हल्लीं जेथें इंग्लंडचीं हिरवीं गार शेतें उन्हाळ्यांतील आकाशसौंदर्य पाहून जणूं हांसतात तेथें सरोवरें व लव्हाळे यांतील लोकरयुक्त हत्ती (मेमॉथ) व जाड कातड्यांचे गेंडे फिरूं लागले व हल्लीं जेथें उत्तर समुद्राच्या लाटा गडबडां लोळतात तेथें जंगलामध्यें हरणें व बैल यांचे कळप निर्धास्तपणें फिरूं लागले.

नंतर हें हिमयुग हळूहळू निघून गेलें ! सरते शेवटीं, हजारों वर्षांनीं बर्फाचीं मैदानें आपल्या उत्तरेच्या निरंतर लपून बसण्याच्या जागीं निसरत जाऊन बसलीं !

मेरू व हिमालय यांतील सगळें पाणी नवीन झालेल्या नद्यांनीं हळूहळू उत्तर महासागरांत साफ ओसरून आमच्या जंबुद्वीपाचें—

त्रिकोण आकृति गगन चुंबित । गिरि आंत बहु मैदानें ॥
कोठें डोंगर, कोठें खिंडी । अफाट आंतुनि रानें ॥

कडे भयंकर नद्या वाहती । जेथिल खाणी शेती ॥
कामधेनुसम इच्छा पूर्ती । करिते ज्याची त्याची ॥

असें लोकोत्तर, विशाळ, मनोहर हिंदुरत्नाकर–परिवेष्टित जंबुद्वीपकल्प अथवा आमचा त्रैलोक्यचिंतामणी, भूमध्यवर्ती, पितृदेश जें हिंदुस्थान हें बनलें! कारण सर्व सृष्टीचें चक्र दिक्कालाच्या चक्राप्रमाणें सदा फिरणारें आहे!!!

( ३ ) हिंदुस्थान.—हिंदुस्थान हें पूर्वी बेट होतें. आर्य लोक त्या बेटास जंबुद्वीप असें म्हणत असत. अर्थ पुरा न समजतां वंशपरंपरया तोंडपाठ म्हटले जाणारे नासिक ( जनस्थान ) वगैरे महाराष्ट्रांतील ब्राह्मण भिक्षुकांचे संस्कृत भाषेंतील संकल्प ऐका. कारण ह्या बेटाची आकृती पूर्वी जंबुफळासारखी होती. ह्या बेटांतील गत भूमध्यसमुद्राच्या दक्षिणकाठच्या कांहीं भागांत वस्ती वैदिक व अवैस्तिक पांढऱ्या आर्य लोकांची होती. म्हणून ॥ आर्यावर्तः पूण्यभूमिर्मध्य-विंध्य हिमालयोः ॥ म्हणजे आर्यावर्त ही पुण्यभूमी विंध्य व हिमालय ह्या पर्वतामध्यें होती असें ह्या प्रदेशाचें वर्णन अर्वाचीन अमरकोशकारानें केलें आहे व त्यानेंच त्रिविष्टप हा शब्द स्वर्ग या अर्थी दिला आहे. तर या विधानांची संगती दीर्घ उषःकाल व शरदृतुप्रधान प्रदेश याशीं कशी लावावयाची? कारण हल्लींचा अनुभव पाहतां उत्तरेकडील सैबिरिया वगैरे थंड व ओसाड व भूमध्यसमुद्राच्या जवळील आरबस्तान सहारा, वगैरे उष्ण वाळवंटाचे जे प्रदेश आहेत, त्यांतील लोक उनाड उडाणटप्पू आहेत. कारण येथील हवा अती तीव्र आहे व कित्यक हंगामांत उत्तरेकडील भागीं उजेड कमी व दक्षिणेकडील भागीं उजेड फाजाल आहे. म्हणून त्यांस त्या वेळीं घराबाहेरचें काम करितां येत नाहीं. तेणेंकरून असें होतें, कीं तेथील काम करणारे लोक बेताल, लहरी, व उडाणटप्पू असतात. म्हणून तेथील मोगल, तार्तर, आरब वगैरे लोक तो प्रदेश सोडून इराण, हिंदुस्थान, चीन वगैरे सुपीक देशीं येईपर्यंत त्यांचे हातून नांव घेण्यासारिखें कांहीं काम झालेंसें नाहीं असें अर्वाचीन इतिहासावरून कळतें.

पण अशी स्थिती त्या पंचमहाभूतभक्त त्या वैदिक आर्य लोकांची त्या प्राचीनतम हिमालयाच्या उत्पत्तीच्या पूर्वींच्या व पुढच्या काळीं होती असें दिसत नाहीं. कारण त्या दीर्घ उषःकाल व शरदृतुप्रधान सैबिरियांतील तुंद्रादी प्रदेशाची हवा हल्लींप्रमाणें पूर्वी तीव्र नव्हती. कारण तेथें मेमाथ ( भिसाळ हत्ती ), गेंडे, नीलगाई, व घोडे आदीकरून समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत राहणाऱ्या कोट्यवधी प्राण्यांचे अवशेष ( गीकी प्रमाणें ) गाळांत गाडलेले सांपडतात. ते तेथील हवा हल्लीं आहे त्यापेक्षां उष्ण असेल म्हणूनच तेथें राहत होते. पण ते मेले. कारण पृथ्वीच्या दीर्घवर्तुलाकार कक्षेचें केन्द्र व अक्ष हीं चलन पावल्यामुळें तेथें कांहीं उत्पात व प्रलय झाले. तेव्हां त्यांपैकीं एका उत्पातानें मध्य एशियेमध्यें कास्पियन ते बैकालपर्यंत व हिमालयाखालीं व चीनपर्यंत असलेला भूमध्यसमुद्र नाहींसा होऊन त्याची डोंगराळ जमीन व गोबीचें वाळवंट झालें व त्या डोंगराळ प्रदेशांत पूर्वोक्त स्वर्गवाचक तीन कोळ्यांसारखा ( विष्टप=कोळें,

वर्शींड ) त्रिविष्टप अथवा तिबेट नामक द्वीपकल्पाचा दुनियेंतील अत्यंत उंच देश व चीन व जंबुद्वीप नामक समुद्रवलयांकित समशीतोष्ण हवेचें व सुपीक जमिनीचें हिंदुस्थान नांवाचें द्वीपकल्प बनविणारा दुनियेंतील अत्यंत उंच हिमालय पर्वत जमिनीचे गाभ्याचे शास्त्राप्रमाणें इओसीन काळीं उत्पन्न झाला ( आमचें आर्य-ललितविस्तार व हिंदुस्थानांतील प्राचीन सुधारणा ( प्रस्तावनेसह ) पहा ) व एशियामायनरपासून चीनपर्यंत घनत्तर मळईच्या जमिनीचा व समशीतोष्ण हवेचा नवीन पट्टा त्या वेळीं झालेल्या जलप्रलयांतून बाहेर निघाला, व तेथील प्राण्यांस तेथील हवा सोसेना इतकी थंड झाली, कारण त्या प्रलयांतील पाण्याचें युरोप, अमेरिका खंडांत बर्फही झालें. ( ऋग्वेद, अवेस्ता, आमचें मराठी भूगर्भदर्पण वगैरे ग्रंथ पहा. ) पण ते हिंदुस्थानापासून त्या सुमेरुखंडांतील उत्तर-कुरूपर्यंत पसरलेले विचारशील आर्यमात्र मोठे पराक्रमी व ज्ञानसंपन्न होते. म्हणून ते त्या बेछुट व बेबंद करून सोडणाऱ्या प्रलयकालीं पारशांसारख्या ( परशू ) अग्निहोत्र्यांस अंशतः तरी इराणाकडे व इतर लोकांस युरोपांतील रशिया ( ऋषिया ) जर्मनी ( शार्मण्य ), आयर्लंड ( आर्यलॅंड ) वगैरे देशांकडे बाड-विच्छातीसुद्धां जाण्यास लावून समोर हिंदुस्थानांत आले, कारण ती त्यांची माय-भूमी होती व तेथील लोक त्यांचे जातीचे, संस्कृतीचे व धर्माचे होते व कांहीं अस्मानी सुलतानी झाल्यास अशा प्रकारें मायभूमीकडे धांव घेण्याची प्रवृत्ती अर्वा-चीन काळच्या सुसंस्कृत लोकांमध्यें हल्लींही आढळते. ( संस्कृत पुराणांत आर्यांच्या मनूची नौका हिमवंताच्या नौबंधन शिखरावर लागल्याचें वर्णन आहे. बायबलांतही नोव्हाच्या जलप्रलयांत गलबताचें एका पर्वतावर लागल्याचें वर्णन आहे ). आर्यांच्या उत्तरेकडील पूर्वोक्त भरतीच्या क्रियेची लाट ही त्यांच्या दक्षिणे-कडील पुनरागमनाची प्रतिक्रिया पाहिली होय. ही उलट लाटेची धडक हिंदुस्थानांतील आर्यावर्तामध्यें लागली तेव्हां तेथील आर्यलोक विंध्याद्रीवरून अगस्त्य ऋषीबरोबर आणखी दक्षिणेकड गेलेले दिसतात. कारण वरील लोकांच्या चेपाशिवाय हिमालया-वील हिमनद्यांच्या धसाऱ्यांचा उपद्रव विंध्याद्रीपर्यंत पोहोचला होता असें गिकीच्या वगैरे भूगर्भ शास्त्रावरून दिसतें. म्हणूनच ह्यांतील गाळानें पूर्वीं दुर्लंघ्य असलेला विंध्याद्री जणू त्या *अगस्त्य ऋषीच्या पलीकडे जाण्यास मुद्दाम ठेंगणा झाला! तेव्हां त्या आर्यांच्या वसाहती उत्तरेच्या अगस्त्य तीर्थापासून दण्डकारण्यांत जनस्थान

---

* अगस्त्य ऋषी हे मोठे शिल्पज्ञ होते. यांनीं आर्यावर्तातील नव्या वसाहतींवर त्यांतील कांहीं बेटांतील कालेय रात्रीचे छापे घालूं लागले तेव्हां त्यांनीं त्या-बेटाभोंवतालच्या पूर्वीच्या अवशिष्ट भूमध्य समुद्राचे पाट काढून त्या आर्यां-करितां त्यांवर उलट हल्ला चढवून त्यांचा नायनाट करण्यास खुष्कीचे मार्ग करून दिले! यावरून त्यांची कीर्ती समुद्राचें पाणी पिऊन ते कोरडे करणारे म्हणून पुराणांत झालेली आहे. हे खळगे पुढें भगीरथानें गंगेचेंपाणी दृढ प्रयत्नानें आणून भरले आहेत ( भारत पहा ). हे अगस्त्य ऋषी अब्धियान व आकाशयान ह्या विद्यांत निष्णात होते. हें त्यांच्या अगस्त्य संहितेवरून उघड दिसतें. ह्याबद्दल खात्री आमच्या सप्रमाण छापलेल्या उद्यमांतील भारतीय विमानें ह्या लेखावरून उघड होईल.

वगैरे वरून कृष्णाथडीवरील अगस्त्याश्रमापर्यंत धमधोकार व ढळढळीत झालेल्या दिसतात. त्या ऋषींच्या अश्रमांस श्रीरामचंद्रांच्या लंकेवरील स्वारीनें व विजयानें रावणादी राक्षसांच्या पीडेपासून निर्भयता आली. म्हणूनच ह्या आर्यांच्या दक्षिणेकडील वसाहतींच्या पहिल्या पुरस्कर्त्या अगस्त्य ऋषीची बडेजाव विंध्याद्रीचा दमनकर्ता म्हणून खुद्द रामचंद्रांनीं केली आहे. ( वाल्मीकी-कृत रामायण पहा ). इकडे पूर्वीं आर्यांची नवीन भरती दक्षिण आर्यावर्तांत अगर उत्तर हिंदुस्थानांत झाली असें सांगितलें आहे. ते तेथील पाणी ओसरल्यावर तेथें पाण्याच्या लाटांप्रमाणें एकावर एक लोटत आले असले पाहिजेत, व त्यापूर्वीं तेथील बरेच आर्य दक्षिणेंत अगस्त्य ऋषीबरोबर जागोजाग वसाहत करीत उत्तरहिंदुस्थानांत जणूं लढाईचा पाया ( बेस ऑफ वॉर ) ठेवून गेले असले पाहिजेत. म्हणून ह्या नवीन भरलेल्या आर्यांस विंध्य व हिमालय या पर्वतांमधील प्रदेशांचें परंपरागत आर्यावर्त हें नांव अन्वर्थक राखण्यास अडचण पडलेली नाहीं. यास्तव जुन्या व नव्या आर्यांच्या झटापटींचीं वर्णनें अनार्यांशीं (मागधादी) झालेल्या झगड्यांच्या वर्णनाप्रमाणें फारशीं कोठें आढळत नाहींत. याप्रमाणें या आर्यावर्तांतील लोकांची भरती फारसा गाजावाजा न होतां उत्तरेकडून दक्षिणेंत झाली. पण या वर्णनांत एक दोष राहिला. तो हा कीं हें दक्षिणेकडील आर्यावर्त व उत्तरेकडील आर्यावर्त याशीं पूर्वोक्त त्रिविष्टप व सुमेरू यांचा संबंध कसा होता हें दाखवावयाचें राहिलें आहे. हें त्रिविष्टप अथवा तिबेट हिमालयाच्या जागच्या भूमध्यसमुद्रांत युरोपखंडांतील भूमध्यसमुद्रांतल्या इताली-प्रमाणें एक द्वीपकल्प होतें. ज्याप्रमाणें इताली हें रोमन साम्राज्याचें केन्द्र होऊन गेलें, त्याप्रमाणें हें तिबेट आर्यसाम्राज्याचें केन्द्र होऊन गेलें. ज्याप्रमाणें इताली अर्वाचीन पाश्चात्य देशांच्या यच्चयावत संस्कृतीचें केन्द्र होऊन गेलें, त्याप्रमाणें तिबेटही प्राचीन पौर्वात्य देशांच्या यच्चयावत संस्कृतीचें तर काय पण त्या जुन्या पाश्चात्य संस्कृतीचें परंपरया तरी केंन्द्र होऊन गेलें आहे. इताली मोडल्यावर ज्याप्रमाणें फ्रान्स, स्पेन, पोर्तुगाल, इंग्लंड, जर्मनी वगैरे युरोपियन राष्ट्रें उदयास आलीं, त्याप्रमाणें तिबेट व सुमेरुखंड मोडल्यावर हिंदुस्थान, इराण, ग्रीस, व रोम पौर्वात्य व पाश्चात्य राष्ट्रें उदयास आलीं. इताली ज्याप्रमाणें उत्तम सृष्टिशोभा, उत्तम बागा, उत्तम स्त्रिया, उत्तम गायक वगैरे बद्दल प्रसिद्ध होऊन गेलें, त्याप्रमाणें तिबेट व सुमेरू हें सृष्टिशोभा, नंदन-बनासारख्या बागा, अप्सरांसारख्या स्त्रिया, गंधर्वांसारखे गायक वगैरेबद्दल प्रसिद्ध होऊन गेलें. (विद्याधरोऽप्सरो यक्ष रक्षो गंधर्व किन्नराः । पिशाचो गुह्यकः सिद्धो भूतोऽमी देवयोनयः ॥ अमर; व प्रोफेसर हिरन म्हणतो कीं एशिया खंडाचेच नव्हे तर युरोप खंडाच्या झाडून सर्व ज्ञानाचा व धर्माचा उगम हिंदुस्थानांत आहे.) इताली जसें सर्व सुखाचें आगर रोमन साम्राज्यांत होऊन गेलें तसें त्रिविष्टप व सुमेरुखंड हें सर्व सुखाचें आगर आर्य साम्राज्यांत होऊन गेलें. म्हणून आर्यांच्या संस्कृत सारस्वतांत तिबेट ऊर्फ त्रिविष्टप व समरकंद ऊर्फ सुमेरुखंड स्वर्गाचा

पर्याय होऊन बसला आहे. तो इतका कीं तें तिबेट जलप्रलयानें मोडून नामशेष झाल्याला आज किती तरी वर्षें झालीं आहेत. तरी त्या स्वर्गाची आठवण आमच्या आबालवृद्ध व आचांडाल ब्राम्हणापर्यंत जशाच्या तशी कायम आहे. ती अशी कीं इतर लोकांप्रमाणें आम्हा हिंदू लोकांचें स्वर्ग वर आकाशांत नाहीं तर तें पूर्वोक्त तिबेटांत आहे. व त्यांत जाण्याचा मार्ग वरील नव्या उतन्न झालेल्या हिमालय पर्वतावरून आहे ! व प्राचीन काळीं ज्याप्रमाणें धर्मप्रभृती पांडव स्वर्गारोहणार्थ हिमालयावर चढून गेले (महाभारत पहा), त्याप्रमाणें अर्वाचीन काळीं चांडाळापासून ब्राम्हणापर्यंत उत्तरेस यात्रा करणारा हिंदु स्वर्गारोहणार्थ बद्रिकेदारावरून हिमालयापलीकडे जातो ! अखिल आर्यसाम्राज्यावर पूर्वोक्त अस्मानी म्हणजे आकाशची कुऱ्हाड पडली असतां उत्तरेकडील किंवा दक्षिणेकडील प्रत्येक आर्य असल्या सौख्याच्या निधानभूत पितृदेश किंवा मातृदेश जो जंबुद्वीप ऊर्फ दक्षिण आर्यावर्त ह्याकडे धावला आहे ! अशीच गोष्ट पुढील रोमन लोकांचा हूण व गॉल यांच्या अवचित धाडीमुळें झाली आहे. कारण त्यांस दुसरें गत्यंतर नव्हतें ! म्हणून तें जंबुद्वीपवासी आपल्या हाडामांसाच्या आर्य लोकांत राहण्यास आले ! व तेथील पहिले आर्य नाशकावरून दक्षिणेत कृष्णा-थडीकडे पसरत गेले, तसे तेथील द्रविड अधिक दक्षिण दिशेकडे हटत व भरत चालले !!! व पांढऱ्या आर्य व काळ्या तांबड्या आदी द्रविड व द्रवीड स्वतंत्र व मिश्र जमातींच्या वसाहतींच्या योगानें हिंदू राष्ट्र किंवा हिंदुस्थान केवळ आत्मौपम्य दृष्टीनें बनलें ! ! ! याप्रमाणें आर्य लोकांच्या उच्चतर संस्कृतीचें केंद्रस्थान जसें सुमेरू ( मर्व्ह ) भोंवतीं समरकंदांत व तिबेटांत (सुमेरूखंड व त्रिविष्टप ) होतें तसें ह्या द्रविडांचें उच्चतर संस्कृतीचें केंद्रस्थान कोठें तरी उत्तरकुरूखालीं सुमेरु खंडांत उष्णकटिबंधांतच होतें व तें दक्षिण किंवा उत्तर ध्रुवावर नव्हतें. मग तें अमेरिकेंत मेक्सिको येथें असो, किंवा आफ्रिकेंत इजिप्त येथें असो किंवा एशियेंत लंकेंत अगर बाबिलोनियांत असो; कारण तिन्ही खंडांत येण्याजाण्यास प्राचीन काळीं खुष्कीचे मार्ग अगदीं खुले होते. आर्यांची संस्कृती ज्याप्रमाणें उष्णता व थंडी यांच्या भौतिक आपत्तींनी विस्कळीत झाली, त्याप्रमाणें ह्या तांबड्या, काळ्या आर्येतरांची संस्कृती ही त्याच एका दैविक आपत्तीनें विस्कळीत होऊन त्या सुमेरियन नांवानें इतरत्र त्यांच्या चेपापुढें पसरत गेली आहे. उदाहरणार्थ, ते सुमेर आम्हांस पोरबंदर येथे असलेले आढळले आहेत व ते पंट अथवा मलबार यांतून आफ्रिकेंत गेले आहेत—(स्वामी विवेकानन्द). रावण इंद्रजित ह्या आर्येतरांची संस्कृती राम लक्ष्मण या आर्यांच्या संस्कृतीपेक्षां काकणभर सरसच होऊन गेली आहे (रामायण पहा.) तिचें वर्णन यथावकाश पुढें येईल. पण त्या वर्णनापैकीं मुख्य मुद्याची गोष्ट एवढीच सांगिली असतां बस्स होईल कीं रामानें रावणास मारिलें यांत त्यानें त्या सुधारणेचा कलिजाच ( आत्मा ) काढून घेतला आहे । ! म्हणून त्यानें तें राज्य मोठ्या औदार्यानें बिभीषणास चिरंजीव करून परत दिलें तरी तें जें एकदां जमिनदोस्त झालें तें कायमचेंच झालें ! तें पुनः आजतागाईत उभें राहिलें नाहीं ! ! ! पण

तेणेंकरून आर्यांचा फार फायदा झाला, तो असा कीं त्यांचें वर्चस्व सर्व हिंदुस्थानावर काय पण त्याच्या लगतची लंका, सुमात्रा, जावा, मालदिव, लखदिव वगैरे अनेक बेटांत—धर्म, वसाहती, व्यापार वगैरे अनेक मार्गांनीं—कायमचें लागण्याची सोय झाली ! त्यांतील सामान्य इष्टार्थानें पांढरे, तांबडे, काळे, पिवळे, व फिके हे पंचजन एकाकार होऊन एक राष्ट्र बनण्याच्या पंथास लागले, मग त्या वेळची राष्ट्रियत्वाची कल्पना हल्लींचे कृत्रिम तट, बंद्या, आरमारें, आकाशयानें ह्यांच्या कोंडीपेक्षां अगदींच ढिली असो—तें राजसूयशांत करभार घेऊन व वर्चस्व कबूल करून कांहीं मर्यादा घालून ठेवण्यापलीकडे गेलेलें वस्तुतः न आढळो ! व ह्यांतील त्यांच्या आत्मौपम्यनीतीचा पाया उपयोगमूलक नीतीच्या आमच्या अभिमान्यांस कितीही हास्यास्पद वाटो ! ! कारण त्यांस ह्यांतील राष्ट्र-रहस्य समजण्यासारखे त्यांचे ज्ञाननेत्रच राहिलेले नाहींत; कारण त्यांच्या त्या आंधळ्यां डोळ्यांवर उपयोगवादाचे चष्मे पाश्चात्य गुरूंनीं चढविले आहेत ! ! ते असले चष्मे आमचे डोळ्यांवर चढवीत असतां ती गोष्ट आमचे लोकांस गोड लागली आहे; कारण त्यांचीं डोकीं कित्येक पिढ्या इतकीं पोकळ होऊन बसलीं आहेत कीं त्यांस आम्हीं भूगर्भशास्त्राधारें दाखविलेलें हिंदुस्थानांत एकत्र येऊन पडलेल्या पांढऱ्या, तांबड्या, काळ्या, पिवळ्या व फिक्या पंचजनांचे राष्ट्राचें आत्मौपम्य स्वरूप तर काय पण पंचजन म्हणजे काय हेंही यास्काचार्यापासून समजेनासें झालें आहे. तें इतकें कीं बृहद्देवतेंत पंचजनांच्या अनेक व्याख्या दिल्या आहेत. त्या कशा अज्ञानजात आहेत हें पुढील अवतरणांत पहाः—

शाला मुख्यः प्रणीतश्च पुत्रो गृहपतेश्च यः ।
उत्तरो दक्षिणश्चाग्निरेते पञ्चजनाः स्मृताः ॥ ६७ ॥
मनुष्या पितरो देवा गंधर्वोरग राक्षसाः ।
गंधर्वाः पितरो देवा असुरा यक्ष राक्षसाः ॥ ६८ ॥
यास्कौपमन्यवावेतान् आहतनुः पञ्च वै जनान् ।
<u>निषादपंचमान् वर्णान् मन्यते शाकटायनः</u> ॥ ६९ ॥
ऋत्विजो यजमानं च शाकपूणिस्तु मन्यते ।
होताध्वर्युतस्तथोद्गाता ब्रह्माचेति वदन्ति तान् ॥ ७० ॥
चक्षुः श्रोत्रं मनोवाक् च प्राणश्चेत्यात्मवादिनः ।
गन्धर्वाप्सरसो देवा मनुष्यः पितरस्तथा ॥ ७१ ॥

नाहींतच म्हणावयास ह्यांत निषादासह चार वर्ण हें शाकटायनाचें विधान मात्र धरच्या आमच्या विचारांशीं कांहीं तरी मिळतें दिसतें, बाकी विधानें सयुक्तिक व वस्तुस्थितीस धरून आहेत कीं नाहींत ह्याचा निवाडा वाचकांनींच करणें बरें ।

---

टीप—आमच्या मतें उपयोगमुलक एकाजनांच्या राष्ट्रघटनेपेक्षां आत्ममूलक पंचजनांची राष्ट्रघटना जास्त टिकाऊ व विश्वबंधुत्वास पोषक असते; कारण त्यांत वैरास जागा कमी असते.

यावरून पुढील सिद्धान्त ठरले:—

( १ ) कुंभाराच्या चाकावरून मातीचे गोळे त्याच्या केंद्रोत्सारी गतीनें बाहेर फेकले जातात, त्याप्रमाणें सूर्याच्या चक्रावरून आपल्या पृथ्वीचा गोळा त्याच्या केंद्रोत्सारी गतीनें बाहेर फेंकला गेलेला आहे.

( २ ) निखाऱ्याप्रमाणें हा पृथ्वीचा गोळा लाल जळजळित होता व निवणाऱ्या निखाऱ्याप्रमाणें तो निवत चालला आहे व भाजलेला बटाटा सुरकुतती त्याप्रमाणें तो सुरकुतत आहे.

( ३ ) त्या गोळयाच्या अक्षांच्या व संपाताच्या ( बिंदू ) चलनांनीं त्यावर प्रथम सर्वत्र पाणी पसरलें ( ऐतरेय उपनिषद पहा ) व सूर्याच्या लबरूप किरणांनीं तें पाणी क्रान्तिप्रदेशांत अरीभवनानें ( केंद्रोद्गमनानें ) उडून गेलें व तो प्रदेश जागोजाग प्रथम वनस्पती व नंतर जलचर व स्थलचर प्राणी त्यांच्या जीवाणूंच्या संस्थितीस पात्र झाला व त्या जीवाणूंपासून सर्वचर सृष्टी उत्पन्न झाली व तीवर त्या प्राण्यांतील मनुष्य अधिष्ठाता होऊन बसला. क्रान्तिप्रदेशांत कोठें तरी त्या मनुष्याची उत्पत्ती व प्रसार प्रथम स्थल व नंतर जलमार्गानें पूर्वपश्चिम झाला व त्याचा रंग तेथील हवेप्रमाणें पालटला (१) हिंदुस्थानाच्या उत्तर भागांत लोक पांढरे आर्य, (२) चिनांत पिवळे (मोंगल), (३) मेक्सिकोंत तांबडे ( रेड इंडियन ) ( ४ ) इजिप्तांत काळे ( सिद्दी ) व (५) मलयांत फिके ( मले ) झाले.

( ४ ) आपल्या भूमिमातेस चार हात आहेत; त्यांचीं नांवें ( १ ) उष्णता व (२) तीपासून होणारें अन्नाचें वैपुल्य; (३) शीत व (४) त्यासून होणारें अन्नाचें दुर्भिक्ष. यापैकीं ती भूमिमाता उष्णता व अन्नाचें वैपुल्य या दोन हातांनीं वनस्पती व ( मनुष्यांसुद्धां ) प्राणी यांना प्रथम पूर्वपश्चिम व नंतर उत्तरदक्षिण लोटीत व पसरीत नेते व शीत व अन्नाचें दुर्भिक्ष या दोन हातांनीं त्यांना गचांड्या देऊन भूमध्यवृत्ताकडे नेऊन कोंबते. ह्या प्रकारें उष्णता व शीत ह्या दोन परस्परविरुद्ध शक्तींच्या क्रियांनीं सृष्टींतील वृद्धी व क्षय ह्यांचें रहाटगाडगें तालबद्धतेनें अखंड चालत राहतें.

( ५ ) ही उष्णता व शीत ह्यांचे तालबद्ध न्यूनाधिक्य पृथ्वीच्या अक्षाच्या व संपातबिंदूच्या तालबद्ध चलनांनीं होतें व त्यामुळें पृथ्वीवरील घडामोडी तदनुसार तालबद्धतेनें होतात.

( ६ ) वनस्पती व प्राणी ह्यांचे बाह्यस्वरूप फार भिन्न दिसलें तरी त्यांचें मूळस्वरूप एकच असलें पाहिजे. तें इतकें कीं वनस्पती व प्राणी हे मुळारंभीं एकाच प्रकारच्या जीवाणूंपासून उत्पन्न झालेले असले पाहिजेत, मग त्याचें रूपान्तर भिन्न परिस्थितीनें कितीही भिन्न झालें असो. म्हणूनच प्राण्यांस जशीं पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें आहेत, त्याप्रमाणें वनस्पतींसही पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें आढळतात, म्हणजे प्राण्यांत ज्याप्रमाणें

हातें, पाय, उपस्थ वगैरे अवयव असतात त्याप्रमाणें ते वनस्पतींसही असतात; प्राण्यांस ज्याप्रमाणें नाक, डोळे, कान वगैरे अवयव असतात तसेच ते वनस्पतींसही असतात. प्राण्यांत जसा नर व मादी असा भेद असतो, तसा तो वनस्पतींतही असतो. बोट लावलें तर प्राण्यांस कळतें तसें तें लाजाळू वनस्पतींसही कळतें. याचा खरेपणा पाहण्यास आमचे वंगवासी बंधू डॉ. जे. बोस यांचे प्रयोग व पुढील भारतांतील उतारा पहाः—

घनानामपि वृक्षाणामाकाशो, स्ति न संशयः ।
तेषां पुष्पफलव्यक्तिर्नित्यं समुपपद्यते ॥
उष्मतो म्लायते पर्णं त्वक् फलं पुष्पमेवच ।
म्लायते शीर्यते चापि स्पर्शस्तेनात्र विद्यते ॥
वायव्यग्न्य शनि निर्घोषैः फलं पुष्पं विशीर्यते ।
श्रोत्रेण गृह्यते शब्दस्तस्मात् शृण्वान्ति पादपाः ॥
पुण्यापुण्यैस्तथा गंधैर्धूपैश्च विविधैरपि ।
आरोगाः पुष्पिताः सन्ति तस्मा ज्जिघ्रन्ति पादपाः ॥
पादैः सलिलपानाच्च व्याधीनां चापि दर्शनात् ।
व्याधि प्रतिक्रियत्वाच्च विद्यते रसनं द्रुमे ॥
वस्त्रेणोत्पलनालेन यथा जलमाददेत् ।
तथा पवनसंयुक्तः पादैः पिबति पादपः ॥
सुखदुःखयोश्च ग्रहणात् च्छिन्नस्यच विरोहणात् ।
जीवं पश्यामि वृक्षाणामचैतन्यं न विद्यते ॥

भगवानदास—महाभारत—शां. प. अ. १८४ सं. हिं. का.

अर्थः—वृक्ष जरी घन आहेत तरी ह्यांमध्यें आकाश आहे यांत संशय नाहीं. म्हणूनच त्यांची पुष्पें व फलें जीं प्रत्यहीं दृष्टिगोचर होतात, त्यांची उपपत्ती लागते. अर्थात् आकाशच नसल्यास पुष्पें व फळें येणें शक्य नाहीं. वृक्षामध्यें स्पर्शशक्ती आहे. म्हणूनच उष्णतेच्या योगानें वृक्षाचा वर्ण म्लान होतो व त्वचा, फुलें व पुष्पें म्लान होऊन गळूनही पडतात. अग्नी व वज्र ह्यांच्या शब्दांच्या योगानें वृक्षांची फळें गळून पडतात, अर्थात्च वृक्षांना शब्दज्ञान असलें पाहिजे. शब्दज्ञान हें श्रवणेंद्रियाच्याच योगानें होतें, म्हणूनच वृक्षांना श्रवणेंद्रिय आहे. एखादी वल्ली वृक्षाला वेढून सर्वत्र गमन करीत असते. गमन करणें म्हणजे मार्गानें जाणें होय, पण दृष्टी नसेल तर मार्गानें जातां येणें शक्य नाहीं. म्हणूनच वृक्षांना दृष्टी आहे असें मानिलें पाहिजे. चांगल्या अथवा वाईट गंधाच्या योगानें व नाना प्रकारच्या धूपांच्या योगानें वृक्ष निरोगी होतात व त्यांना पुष्पें येऊं लागतात; ह्यावरून त्यांना घ्राणेंद्रिय आहे असें मानलें पाहिजे. वृक्ष आपल्या मुळांनीं जलपान करीत असतात. त्यांना व्याधी झाल्याचेंही दिसून

येतें, व त्या व्याधींचा प्रतिकारही केला जातो; ह्यावरून वृक्षांना रसनेंद्रिय आहे असें मानिलें पाहिजे. ज्याप्रमाणें कमळाचा देट तोंडांत धरून त्यानें जल वर खेचून घ्यावें, त्याप्रमाणेंच वायूनें युक्त असलेला वृक्ष आपल्या मुळांनीं जलपान करीत असतो. वृक्षांना सुखदु:खाचें ज्ञान आहे व त्याचा छेद केला तरीही ते पुन्हां भरून येतात. यावरून वृक्षांना जीव असल्याचें दिसून येतें; अर्थात ते अचेतन नाहींत.

महाभारताचें भाषांतर–चिपळूणकर मंडळी.

यावरून असें ठरतें कीं वनस्पती व ( मनुष्यांसुद्धां ) प्राणी एकाच प्रकारच्या जीवाणूंपासून उत्क्रान्त झालेले असले पाहिजेत ! मग त्यांतील सुख व दुःख जाणण्याची शक्ती व जाणिवेची शक्ती कितीही भिन्न व अधिक उणी असो.

सृष्टींत प्रत्येक गोष्टीचें पुनर्जन्म अथवा पुनर्दर्शन तालबद्धतेनें होतें, व त्याच्या मुळाशीं दिक्कालाचें रहाटगाडगें असतें. त्या रहाट गाडग्याचे गतीस जें कारण त्यास नांव ईश्वर द्या किंवा दुसरें कांहीं तरी द्या. पण असें कांहीं कारण ह्या चराचर सृष्टीच्या आधारास आहे ह्यांत तिळमात्र संदेह नाहीं. एरवीं हें सृष्टियंत्र सुरळीत चालणें बिलकुल संभाव्य नाहीं.

ह्या भागाचा शेवट पुढील टिपणानें करूं:—

“ पृथ्वी प्रथम ताऱ्याप्रमाणें होती. तिचा चंद्र हा तिच्या जवळ फार होता. तीवर भरती व ओहोटीचा जोर फार होता. तो जोर हल्लीं कमी झाला आहे. पूर्वीं येथें दिवस पांच तासांचा होता, तो हल्लीं चोवीस तासांचा झाला आहे, व थोड्या लक्ष वर्षांनीं तो पंचवीस तासांचा होईल. पृथ्वी ३८०० से. उष्णतेची झाल्यावर तीवर पाणी जमूं लागलें. केन्द्रोद्गमनानें क्रान्तिप्रदेशांतील पाणी उडून गेलें तेव्हां त्या पाण्यांतून जमीन बाहेर निघाली. पृथ्वी आवटरून तडकूं लागली तेव्हां तीवर पर्वत उत्पन्न झाले. त्यांत युरोप व एशिया खंडांतील जमिनीस स्पेनपासून कामश्चाटकापर्यंत असा आडवा तडा व हिमालय प्रमुख पर्वत उत्पन्न झाले व आफ्रिका व अमेरिका खंडांत ए असे दोन उभे तडे व आंडिसादी पर्वत उत्पन्न झाले. ”

सूर्य मालेंतील प्रत्येक गोलांतली उष्णता कायम राहण्यास अंशतः त्यांतील रेडियम धातू कारण आहे.

भौमिक युगें व त्यांतील विशेष येणेंप्रमाणें:—

( १ ) कार्बन ( अंगार ) युक्त काळ–विशेष–मोठ्या वनस्पती;

( २ ) सौरियन काळ–विशेष–मोठे प्राणी;

( ३ ) बर्फाचा काळ–विशेष–मेमॉथ ( केसाळ हत्ती ) व मनुष्यें;

( ४ ) अनैतिहासिक काळ–विशेष–गुहांतील आस्वलांची शिकार करणारीं मनुष्यें.

पृथ्वी प्रथम वायूरूप किंवा उल्कागुच्छरूप (पडणाऱ्या ताऱ्यांच्या समुदायाच्या रूपाची ) होती. केंद्रोद्गमनानें तींतील उष्णता कमी झाली तसा तिचा गुरुत्वा-

कर्षणानें गोळा बनला, व तींत पहिले खडक ग्रानाईट जंबूर व नीस या नांवाचे उत्पन्न झाले. ( आमचे ग्रंथ—आकाशाच्या अनंतत्वाची आराधना व भूगर्भदर्पण पहा ) पुढें तीवर वातावरण व त्यांत प्राणी निर्माण झाले. नद्यानाल्यांच्या प्रवाहांनीं प्रस्तर ( थरांचे खडक ) उद्भवल्यावर तीवर पुढील चार काळ झाले:—

(१) पहिला काळ—पोटभाग-सिंब्रियन—यांत स्लेटी, ग्रिटस, कार्टझ ( काचमणी ) शेल, चिस्ट, चुन्याचे दगड यांच्या बनलेल्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर पसरून त्यांत जलचरें उत्पन्न झालीं.

(२) सिल्युरियन काळ—वाळूचे खडक, शेल, व स्लेट यांचे खडक समुद्रांत उद्भवले व मासे पाण्यांत पोहूं लागले व किडे हवेत तडतडां उडूं लागले.

(३) डेव्होनियन काळ—यांत तांबडे वाळूचे खडक उत्पन्न झाले पाण्यांत मासे फार वाढले व जमिनीवर बीजपर्णी ( फर्नस ) उत्पन्न झाल्या.

(४) कार्बन ( अंगार ) युक्त काळ—यांत दगडी कोळसे व भूचर प्राणी निर्माण झाले.

(५) पर्मियन काळ—यांत नवीन तांबडा वाळूचा खडक उत्पन्न झाला व जल व स्थल यांवर राहणारे अनेक प्राणी उद्भवले.

(२) दुसरा काळ—यांत समुद्रांतून पुष्कळ जमीन उघडी पडली—पोटभाग.

(१) त्रिआसिक काळ—यांत वाळूचे दगड उथळ समुद्रांत कडक चिखलाचे थर व जमिनीवर सर्प उत्पन्न झाले.

( २ ) जुरासिक काळ—यांत चुन्याचे दगड व मेलेल्या समुद्रवासी प्राण्यांचे अवशेष उत्पन्न झाले, व मोठ राक्षसी प्राणी उष्ण कटिबंधांतील वनस्पती खाऊं लागले व ह्या सरपटणाऱ्या प्राण्यांपासून पक्षी व श्वापदें उत्पन्न होऊन झाडामाडांत वावरूं लागलीं.

( ३ ) क्रिटेशियस काळ—यांत खडूचे साके बसले व सरपटणाऱ्या प्राण्यांचे पुरे पक्षी बनले. (आपल्या पुराणांतील कश्यप व दिती व अदिती यांपासून सर्प व गरुड यांच्या संभवाचें कथानक पहा). व पूर्वी नव्हते असे वृक्ष व वनस्पती उत्पन्न झाल्या.

तिसरा काळ—यांत पृथ्वीवरील जमिनीच्या सीमा कायम झाल्या व नवीन वनस्पती व प्राणी उद्भवले—पोटभाग—

( १ ) इओसीन काळ:—यांत चुन्याचे दगड, वाळूचे दगड, कठीण चिकणमातीचे दगड उत्पन्न झाले. हे मुख्यतः समुद्रनिवासी प्राण्यांपासून उद्भवले. यांत स्तनवत प्राणी व घोडे यांचे पूर्वज निर्माण झाले-

( २ ) मायओसीन काळ—यांत आल्पसपासून मध्य एशियेंतील पर्वतांची परंपरा उत्पन्न झाली. त्यांवर ( भूर्ज ) वृक्ष उद्भवले. त्यांत मोठ्या दाढांचे सिंहव्याघ्रादिकांसारिखे हिंस्र पशू जंगलांत फिरूं लागले व मनुष्यांचे पूर्वज म्हणून डार्विननें ठरविलेलीं एप माकडें झाडांच्या खांद्यावर नाचूं बागडूं लागलीं.

( ३ ) प्लिओसिन काळः-यांत पृथ्वीवरील भूभागास कायमचें रूप प्राप्त झालें, व वनस्पती खाणाऱ्या प्राण्याचे कळप नजरेस पडूं लागले.

( ४ ) चौथा काळः ह्या काळांत मनुष्य उत्पन्न झाला असें म्हणणें कांहींचें आहे. पण आमचे म्हणणें तो तिसऱ्या काळांतच उत्पन्न झाला असें आहे:—पोटभागः—

( १ ) बर्फाचा काळः—उत्तर गोलार्धांत बर्फ पडलें व त्याच्या नद्यांनीं जमिनीस हल्लींचें रूप प्राप्त झालें. त्यांत उत्तर भागीं रेनडियर व केसाळ चार दांताचे मेमॉथ हत्ती ( ऐरावत ) राहूं शकले.

( २ ) अर्वाचीन काळः--मनुष्याच्या उत्पत्तीचा काळ अजून अनिश्चित आहे. पण तो ह्या हिमयुगानंतर युरोपांत गेला व तो मेमॉथ, आस्वलें व गेंडे यांच्या बरोबर कसा तरी जेमतेम जीव धरून होता व तो दगडाच्या व ब्रॉंझ ( कासें ) धातूच्या व लोखंडाच्या काळांत अनुक्रमानें रहात आला आहे व त्याचे वंशज पाश्चात्य आहेत:—

भौगर्भिक काळ व त्याच्या अवधीः—

| | | |
|---|---|---|
| १ | टर्शिअरी—अवधी | २६, ००, ००० |
| २ | प्लेइस्टोसीन—अवधी— | ३, ००, ००० |
| ३ | मानवी अवधी— | १, ००, ००० |
| | एकूण— | ३०, ००, ००० |

मनुष्याचा इतिहास—अवधी—

कार्यक्रम:—

(१) इजितची सुधारणा इ. पू. ८,०००

(२) इजितवर स्वारी व मैनाचा ( मनूचा ) त्यावर अंमल इ. पू. ६,०००

(३) युरोपांत आर्यांची वसाहत इ. पू. २,०००

हॅमस्वर्थ हिस्टरी ऑफ धि वर्ल्ड,

६ ह्या टिपणींत वर्णिलेल्या कालचक्राच्या कार्यानें आपल्या भूमिमातेपासून आर्यावर्त उत्क्रान्त झालें. त्याचे दोन भाग होते. १ दक्षिण आर्यावर्त अथवा पितृदेश; व उत्तर आर्यावर्त अथवा वसाहत देश. दक्षिण आर्यावर्ताचें दुसरें नांव जंबुद्वीप—कल्प किंवा हिंदुस्थान व उत्तर आर्यावर्ताचें दुसरें नांव सुमेरुखंड अथवा उत्तर एशिया असें स्थूल दृष्टीनें धरिलें आहे. हिमालयप्रसवाच्या वेळीं ह्या दोन्ही विभागांमध्यें त्यांच्या नेहरपट्टींत फार लोकोत्तर व चमत्कारिक उलथापालथी झाल्या आहेत. त्या इतक्या कीं त्यांची रेखली माहिती त्यांच्या वरच्या कोणत्याही नामाभिधानांत व्यक्त करितां येत नाहीं.

# भाग चवथा.

## हिंदुस्थानच्या चेहेरेपट्टींतील फेरफार.

" The corrugation of the earth's crust that produced the great upheaval of mountain ridges in Middle Carboniferous times also accentuated a deep furrow almost encircling the world, and constituting an ocean, of which the present Mediterranean is the last remnant. This extinct ocean, known in geological nomenclature as the Tethys, completely separated the continents of the Northern and Southern hemispheres, when thus became deepened in Upper Carboniferous, the separation was not so complete, and the lands of both hemispheres supported similar plants and animals. But during the Upper Carboniferous and Permian, all connection was severed, and the southern continent including the Indian Peninsula, parts of South Africa, and Australia, joined together by lands that have now subsided beneath the Atlantic and Indian Oceans was inhabited by a flora and fauna quite different from that of the Northern lands. Something of the same sort is observed at the present day in Australia and New Zealand which being separated from the rest of the World by a broad expanse of Ocean, are tenanted by different plants and animals."–*The Geology of India P. 44–Mr. L. W. Vredenburg.*

"The two most pronounced glacial episodes so far known in the earth's history, in Permian and in Pleistocine times, followed the final phase of a giant orogenic upheaval. " —*The Same–P. 48.*

Not until the Upper Cretaceous and Tertiary do we observe indieations of pronounced seasonal variations and of climatic zones.'

—*The same P. 50.*

" We have now to speak of those non-glacial deposites which afford unequivocal evidences of the existence of Man, and majority of which appear to have been laid down since the close of the Glacial epoch." —*Prof. Lapworth's Geology–P. 388.*

" Some of the valleys that separate the ranges of trap hills are of considerable width, others are narrow. The former are in many instanses too wide to have been formed by the rivers now flowing through them. Such, for instance is the valley at the head of the that pass. The anamoly of the wide valleys is attributed to the fact that the rivers that flow down their midst formarly rose much further west than it now is. It is, in fact, surmised that the whole range was once a sea-cliff. —*Nisik Gazetteer–P. 13.*

एकाचेतत्सरस्वति नदीनां शुचिर्यति । गिरिभ्य आसमुद्रात् ॥ ऋ. ७. ९५. २.

अर्थ—सर्व नद्यांत पवित्र असलेली सरस्वती नदी ( हिमालय पर्वतांतून निघून ) ( राजपुतानाच्या समुद्राला मिळते. हिच्या काठीं नहुषानें शतक्रतू केले ) राजपुतान्याचा समुद्र हिमयुगाच्या सुमारास वाळला—इंपेरियल ग्याझिटीअर आफ इंडिया. व्हा, १ पा. १५२ व एन. ब्रिटानिका—२२—८६६.

मागील भागांत आर्यावर्ताच्या स्वभावसिद्ध उत्क्रान्तीचें विवरण आटोपलें. आता या भागांत हिंदुस्थानच्या चेहेरेपट्टींतील फरफारांविषयीं—विवेचन कर्तव्य आहे. हें विवेचन हिमालयाच्या उत्पत्तीपूर्वीचें असल्यामुळें तें अलबत तुटक, अपुरें व अनुमानिक आहे खरें. पण खऱ्या जिज्ञासूस ह्यांत जी भरीव मौज आढळेल तशी ती त्यास पोकळ कांदबऱ्यांत आढळणार नाहीं. सहा साम्राज्यांस गाडणाऱ्या इंद्रप्रस्थाच्या पडझडीच्या वर्णनापेक्षां एखाद्या ढगांतील गंधर्वनगरीच्या पडझडीचें वर्णन जास्त उद्बोधक होईल असें कोण म्हणेल ?

**भूगर्भशास्त्रोक्त युगें व काळ** हीं युगें व काळ यांचा अनुक्रम अर्वाचीन प्रचलित युग व काल यांपासून अगदीं प्राचीन युग व काल यांजकडे नेऊन पोहोचविला आहे:—

| क्रम | युगें | क्रम | काळ |
|---|---|---|---|
| १ | चतुर्थ ( क्वाटर्नरी—कली ) पर्यायः—मनुष्य युग; उदाहरण, पांढरे, तांबडे, काळे, पिवळे व फिके—पंचजन. | १ | प्रचलित ( हिमयुगापुढील ) |
| | | २ | हिमयुग ( प्लेइस्टोसीन ) |
| २ | तृतीय ( टर्शिअरी ) अथवा काइनोझोइक ( द्वापर ) पर्यायः—हिमालययुग, प्रस्तरयुग, उदाहरण, शहाबादची फरशी. | १ | प्लिओसीन. |
| | | २ | मिओसीन. |
| | | ३ | ओलिगोसीन. |
| | | ४ | इओसीन. |
| ३ | द्वितीय ( सेकंडरी ) अथवा मेसोझोईक ( त्रेता ) पर्यायः—गोंडवनयुग, पाषाणयुग, उदाहरण, रामशेज, आंबाड ( नाशिक ) | १ | क्रेटिसिओन |
| | | २ | जुरासिक |
| | | ३ | ट्रिआसिक. |
| | प्राथमिक ( प्रायमरी ) अथवा पेलिओझोईक ( कृत ) पर्यायः—विंध्ययुग, रत्नयुग, उदाहरण, म्हैसूरच्या सोन्याच्या खाणी, गोवळकोंड्याच्या हिऱ्याच्या खाणी. | १ | पर्मियन. |
| | | २ | कार्बोनिफेरस. |
| | | ३ | डेव्होनियन ( जुने तांबडे-रेतीचे दगडाचें ) |
| ४ | प्राकृतिक ( आराकियन ) अथवा एओझोईक. पर्यायः—अजीवयुग, विंध्यपूर्वयुग, अनादी युग. | ४ | सिल्यूरियन. |
| | | ५ | क्यांब्रियन. |
| | | १ | फंडामेन्टल नीस. |



हिमालय ( गौरीशंकर )

A 5060—Lakshmi Art, Bombay, 8

ह्याचा तपशील आणण्याची इच्छा असेल त्यानें आमचें लेखी भूगर्भ-दर्पण पहावें.—अशी आमची शिफारस आहे; कारण त्यांत आमच्याप्रमाणें त्यांस आपल्या पृथ्वीमातेच्या आराधनेचें पुण्य लाभेल व आमचे पूर्वज असल्याच पृथिव्यादी पंचमहाभूतांची सक्रिय अराधना करीत असत, म्हणून त्यांची लोकोत्तर भरभराट झाली होती हें ध्यानांत धरण्यासारिखें आहे.

ह्या ग्रंथांत इंग्रजी ग्रंथांतील बरीच परिभाषा कायम ठेविली आहे; कारण इंग्रजी ग्रंथाशीं जो मुळांत मेळ आहे, तो सध्या सर्वस्वी तोडणें आम्हांस अयुक्तिक दिसलें. पण तो संबंध पुढें फारसा नडणारा नसल्यामुळें तो आमच्या भूगर्भदर्पणांत नवीन संस्कृत संज्ञा वरच्या मासल्याप्रमाणें योजून तोडून टाकण्याचा प्रयत्न आम्ही आमच्याकडून जारीनें केला आहे.

पृथ्वी:—आपली भूमिमाता ही आपल्या सूर्यबापाची सहधर्मचारिणी आहे. म्हणून ती आपल्या सूर्यबापाप्रमाणें अग्निस्वरूप होती. पण ती कांहीं काळानें निवाली, तसें तिच्या अंगावरलें हें मृत्तिकेचें कवच निर्माण झालें. पण ह्या कवचाखालचें तिचें अंग अजून विस्तवासारखें जळजळीत आहे. हें कसें कळलें ? ज्या वेळीं ज्वालामुखीच्या तोंडांतून कढत रस ( लाव्हा—आदिरस ) बाहेर पडतो त्यावेळीं तिचें हें स्वरूप आपल्या अनुभवास येतें. अशाप्रकारें ज्वालामुखीच्या तोंडांतून जो लाव्हा रस बाहेर पडतो, त्यापासून बिनथरांचे खडक तयार होतात. त्यांस संस्कृत भाषेंत पाषाण असें म्हणतात. याशिवाय पृथ्वीच्या पोटांतील उष्णता व पाण्याची वाफ भयंकर भूकंप व व भूस्फोट करिते. तेव्हां अर्थात ही पृथ्वीच्या पोटांतील शक्ती जमिनीवरील कांहीं जागा खालीं असतील त्या उंच करण्याचें व कांहीं जागा उंच असतील त्या खालीं नेण्याचें काम करिते.

टीप:—यावरून आपल्या पृथ्वीवर ज्या घडामोडी चालल्या असतात त्यांतील घडकाम ही उष्णतेची शक्ती करिते.

उष्णतेचा प्रभाव फार चंचल असतो. म्हणून तिच्या घडकामांत भलताच उंचवटा उत्पन्न होतो. तो मोडून पाणी त्याचा चूर—जे भलतेच खळगे झाले असतील—त्यांत तो ( चूर ) भरण्याचें काम करितें. वरील उंचवट्यावर पाऊस पडतो. त्यांचें पाणी त्या उंचवट्यांतील खडक विरवतें व तें त्यांतील रेतीमाती वाहून नाल्यांत नेतें, नाल्यांतून नद्यांत नेतें, व नद्यांतून समुद्रांत नेतें व तें समुद्रामध्यें दरवर्षी व्यवस्थेनें ती रेतीमाती पसरून ठेवितें. एवढेंच नव्हे तर

---

टीप—हा विषय आमच्या लिहून पडलेल्या भूगर्भदर्पणांत सविस्तर आला आहे. हा लेख त्यांतील तत्वांचें संक्षिप्त रूप आहे. म्हणून त्यांत कांहीं मजा राहणार नाहीं. हें जाणून ह्यास अंमळ चटकदारपणा आणण्याकरितां चित्रमय जगत–मार्च १९२२ तील श्रीयुत द. वि. आपटे यांच्या खडकांतील चित्रपट—ह्या मनोहर–लेखाचें सहाय्य घेतलें आहे. त्यांतील चित्रें पाहिल्यास ह्या लेखास पुष्कळ सुगमता येणार आहे.

ह्या पाण्याच्या पुराच्या तडाक्यांत जमिनी वरचे किंवा नद्यांतील किंवा समुद्रांतील कांहीं प्राणी मेले तर तें त्यांचें सांगाडे त्या रेतीमातीच्या थरांमध्यें मोठ्या तजवि-जीनें पुरून ठेवितें. अशा प्रकारें हें पाणी मुडदेफराशीचें काम [ जमीन व पाणी यांत ] रात्रंदिवस करितें. त्या मिळून त्या दोन्ही ठिकाणीं गाळाचे थर दरवर्षी एकावर एक चढत जातात. असले थरांवरील थर आपआपले भारानें घट्ट होतात, व त्यांचे थरांचें खडक बनतात. त्यांस संस्कृत भाषेंत प्रस्तर म्हणतात.

टीप–यावरून सृष्टींतील घडामोडी पैकीं मोडकाम ही पाण्याची शक्ती प्रामुख्यें-करून करितें.

पाषाण व प्रस्तरः–दरसाल पाऊस पडतो तेव्हां उष्णतेनें वर आलेल्या पाषाणाचे पर्वत, डोंगर, टेकड्या, व उंचवटे यांतील दगड, धोंडे, गोटे, गोट्या, चिखल, गाळ, वगैरेंचे थर त्या पावसाच्या पाण्याच्या प्रवाहाबरोबर दरींखोरीं, नदीनाले, सरोवरेंतलाव, व समुद्रसागर यांच्या तळाशीं व बाजूस मैलोगणती वसत जातात. हे थर कोणी पाहिले नाहींत ? हे थर जसे एकावर एक चढत जातात तसा त्यांतील खालच्या खालच्या थरांवरील भार गणितश्रेढीने वाढत जातो. असें होतां होतां हजारों वर्षांनीं ते थर घट्ट व टणक होतात.

टीपः—अशा प्रकारें अग्निजात पाषाणांचे आपले हिमालय, सह्य ह्यांसारखे प्रचंड पर्वत पाण्याच्या प्रवाहानें झिजून व झरून गोड्या व खाऱ्या पाण्याच्या जलाशयांच्या तळाशीं खाचा खळगे भरतांना जलजात प्रस्तर तयार होतात, व कालवशात् होणाऱ्या भूकंपांच्या व भूस्फोटांच्या वेळीं ते प्रस्तर विस्तवाचे आचीनें लोण्यासारिखे विरघळून झालेला रस वर चढतो व त्याचे अग्निजात पाषाणांचे पुन्हां पर्वत, डोंगर, व टेकड्या बनतात. पाण्याची वाफ व वाफेचें पाणी हें जसें सृष्टींत रहाटगाडगें आहे, त्याप्रमाणें पाषाणांचें प्रस्तर व प्रस्तरांचे पाषाण हें सृष्टी-मध्यें दुसरें रहाटगाडगें आहे. अथवा अगदीं साध्या भाषेनें हें सांगावयाचें तर खडकांची माती व मातीचे खडक दुनियेंत सदोदित होत राहतात. ह्या घडामो-डींच्या क्रियेस उत्क्रान्ती व अपक्रान्ती असें भूतशास्त्रांत म्हणतात.

खडक व मातीः—सृष्टीमध्यें खडक व माती यांची किंमत निरनिराळी गण-ण्यांत येते. खडकांवर कोणतीही वनस्पती जीव धरीत नाहीं. पण ती त्यांचे मातींत जीव धरिते. या तत्वावरच शेतजमीन व माळजमीन व खडकी जमीन यांत पायरी-पायरीनें फरक आढळतो. कारण त्यांत खडक व माती यांचें मिश्रण त्याच-प्रमाणें झालें असतें. म्हणून खडकी जमीन कमी होऊन शेतजमीन वाढत जाते, त्या मानानें सृष्टीमध्यें वनस्पती उत्क्रान्त होतात व ह्या वनस्पती ज्या मानानें सृष्टींमध्यें वाढत जातात, त्या मानानें सृष्टींत प्राणी व त्यांतील अग्रगण्य मनुष्यें वाढत जातात.

टीपः—आपल्या सह्याद्रीच्या रांगेंत मैलोगणती खडक आहेत. त्यावर निवडुं-गेंही होत नाहींत. त्या ठिकाणीं दूर मैलीं एखादें मनुष्य असतें. तें तरी तेथील

नाचणी, वरी, सावे, कारवी, टोकर, साग वगैरेच्या जुजबी उत्पन्नावर कसेंबसें पोट भरितात; पण गंगेच्या गाळाच्या मातीच्या जमिनींत दरमैलीं पांचशांवर माणसें राहतात. त्यांस जेथें सवड खडकांत सांपडत नाहीं, व जेथें वनस्पती बरोबर होत नाहींत, तेथें मनुष्यांसुद्धां प्राणी बरोबर वाढत नाहींत. ह्याचें सूक्ष्म अवलोकन करूनच भगवंतांनीं जणू पुढील उद्गार काढिले आहेतः ॥ अन्नाद्भवन्ति भूतानि । पर्जन्यादन्नसंभवः ॥

गर्ता व पर्वतः—आपल्या पृथ्वीच्या पहिल्या अथवा कृतयुगाच्या पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या चरणांमध्यें जमीन व पाणी असे भाग नव्हते; कारण सर्व जमिनीस भांड्यांत शिजणाऱ्या भाताप्रमाणें कढ येत होता; म्हणूनच बह्वृच ब्राह्मण ३३. ३ यांत कृतं संपद्यते चरन् । म्हणजे जिकडे तिकडे त्या कढांची धांवाधाव चाललेली होती व त्या वेळच्या पृथ्वीच्या पोटांतील क्षणोक्षणीं रटरटत खालवर होणारा प्रदेश जीवसृष्टिशून्य होता. पण त्या पहिल्या व दुसऱ्या अथवा कृत व त्रेता युगांच्या संधिकालांत म्हणजे अंत्य व प्रथम चरणांत ह्या पृथ्वीस दार्ढ्य येऊं लागलें व तिच्या चढलेल्या कढांच्या लाटांची जमीन व खालीं गेलेल्या कढांच्या लाटांच्या खळग्यांत पाणी असे भाग झाले, पण त्या जमिनीवरील कढांचे फोड आपल्या पुराणांत दिल्याप्रमाणें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं प्रथम खतखतून उडणारे होते. ते कढांचे उंचवटे प्रथम स्थिर झाले किंवा त्यांस इंद्रानें स्थिर केलें * ( यः पृथिवीं व्यथमानामदृंहयः पर्वतान् प्रकुपितानरम्णात् । ( ऋ. २. १२. २ ) म्हणजे त्यानें ( इंद्रानें ) लाटांप्रमाणें हालत असलेली जमीन व तीवरील हलणारे आपल्या विंध्यासारखे डोंगर व पर्वत ह्यांस अचल केलें व प्राचीनान् * पर्वतानदृंह्यत् ( ऋ. २. १७. ५ ) म्हणजे त्या इन्द्रानें ते प्राचीनतम डोंगर व पर्वत यांस दृढ केलें व पूर्वोक्त खळग्यांतील पाणी कढत होतें अथवा अग्नी त्या उदकांत पसरलेला होता. । अपामुपस्थे विभृतो यदा वसत् ( अग्निः ) ( ऋ. १-१४४. २ ) म्हणजे त्या वेळीं पाण्यांत उष्णता भरलेली होती. तें पाणी थंडावत चाललें तसे त्यांत प्रथम बिनहाडांचे व नंतर हाडांचे प्राणी पाण्यांतील माशांसारखे उत्पन्न झाले. म्हणूनच ह्या संधिकाळास आपल्या धर्मग्रंथांत मच्छावताराची कारकीर्द असें यथार्थ म्हटलें आहे; कारण त्या वेळच्या आपल्या पृथ्वीचा सदाचर स्थितीप्रमाणें तीवर सदाचर प्राणी राहणें शक्य होतें. पण दुसऱ्या अथवा त्रेतायुगांत आपली पृथ्वी चांगली दृढ झाली किंवा तीस इंद्रानें उत्तम घन केलें. ( येन× पृथ्वीचदृढा ) ( ऋ. १०, १२१, ५ ) म्हणजे इंद्रानें पृथ्वीस घनावस्थेप्रत आणून पोहोंचविलें. ह्या वेळीं जमिनीवर पृथ्वीचे तीन पट्टे होते. ह्या युगाचें लक्षण, उत्तिष्ठंस्त्रेता भवति—बह्वृच ब्राह्मण—३३·३—यांत दिल्याप्रमाणें यांतील समुद्र भरत येऊन पर्वत उभे राहिले व कासवासारखे जलचर व सर्पासारखे

* हीं अवतरणें आम्ही नानासाहेब पावगी ह्यांच्या आर्यावर्तांतील जन्मभूमी या ग्रंथांतून घेतलीं आहेत.

स्थलचर हाडांचे प्राणी वर डोकीं करूं लागले. म्हणून ह्या काळास कच्छावताराची कारकीर्द असें म्हणतात. तिसऱ्या अथवा द्वापरयुगांत आपली भूमिमाता आणखी घन झाली व तींतील जमीन गोंडवनासारिखी कडक व तींतील प्राणी देवमासे, डुकर व हत्ती ह्यांसारखे सस्तन, प्रचंड व राकट झाले. व बह्वृच ब्राह्मणाप्रमाणें संजिहानस्तु द्वापरः। या वचनानुसार सदरहू प्राणी टोळ्या करून चोहोंकडे भटकत फिरूं लागले, कारण त्यांस हवा व पाणी वसंत ऋतूंतील मिळालें. तें इतकें कीं आपल्या दक्षिण गोलार्धांतील विंध्याद्री भोंवतालच्या गोंडवनांत गोदा व नर्मदा सकल चैतन्याचें आश्रयस्थान सरस्वती व लवणाद्री व शिवालिक व विंध्य यांतील सप्तसिंधूंत मनुष्य प्राणी प्रथम उत्पन्न होऊन ते तेथें वैदिक व अवैस्तिक ह्या नांवानें अत्यंत वृद्धी पावले. त्वे विश्वा सरस्वती श्रितायुषि देव्याम् ( ऋ. २-४१-१७ ) व ते पूर्वपश्चिम फिरतां फिरतां त्यांच्या उत्तरेस वसंतऋतू त्रिविष्टपापासून ( तिबेट ) सुमेरुखंडांत उत्तर कुरूपर्यंत पावलें टाकीत गेला, तसे ते आपल्या यज्ञांतील सिद्धाग्नी घेऊन तिकडे वसाहती करीत गेले. ह्या काळास वराह अवताराची कारकीर्द असे म्हणतात. तृतीय व चतुर्थ युगांच्या संधिकालांत आपल्या भूमिमातेच्या पोटीं आपल्या भूमध्यसमुद्रांतून उत्तरगिरी अथवा हिमालय याचा एकाएकीं उद्भव होऊन उत्तर व दक्षिण गोलार्धांचा जोड झाला व उत्तर गोलार्धामध्यें प्रालेयप्रलय ( बर्फाचा प्रलय ) व हिंदुस्थानभर व विशेषतः उत्तर हिंदुस्थानभर जलप्रलय माजला ! व मन्वादिक आपले पूर्वज गलबतांत बसून हिमालयावर चढले व त्यांचें पाणी उतरलें तसे ते खालीं सरस्वती आदिक सप्तसिंधूंच्या प्रदेशांत उतरले व उत्तर कुरूकडून आपले आणखी वैदिक व अवैस्तिक आले व त्यांनीं मिळून पुनः आर्यावर्त वसविण्यास प्रारंभ आमच्या मताप्रमाणें इ. पू. १०००० ते १२००० वर्षांच्या सुमारास (लोकमान्य टिळकांप्रमाणें) इ. पू. ८००० वर्षांच्या सुमारास केला ! चतुर्थ अथवा कलियुगांत ह्या प्रलयानें उत्तर व दक्षिण गोलार्ध सांधले गेल्यामुळें सगळ्या पृथ्वींत व विशेषेंकरून आपल्या हिंदुस्थानांत गत प्रलयांतून जगले वाचलेले पांढरे, तांबडे, पिवळे, काळे व फिके पंचजन एकवटण्यास सवड झाली. त्यांनीं चोहोंकडची जंगलें तोडून मानवेतर प्राण्यांस कोठेंही सुखानें व यदृच्छेनें खाऊनपिऊन राहण्यास सवड ठेवली नाहीं; म्हणून मनुष्यास निरुपयोगी असलेल्या प्राण्यांचा एकसहा सप्पा उडाला ! कारण, । कलिः शयानो भवति। ह्या बह्वृच ब्राह्मणांतील (३३. ३) वचनाप्रमाणें सगळ्या स्थिरस्थावर पण अनेक ऋतू व अनेक कटिबंध यांनीं अलीकडे ग्रस्त झालेल्या दुनियेंत प्रत्येक इसमाचा कल इतरांस फुकट मरेमरेतों राबवूनच नव्हे तर प्रत्यक्ष जिवें मारून स्वतः अंगाई करण्याकडे फार आहे. मग तो इतर प्राणी जनावर असो किंवा मनुष्य असो. तर त्याची झोंप किंवा विश्रांति मोडून पुरी खोडकी जिरवणारा नवीन कलीसारखा कोणता प्राणी ह्या सृष्टींत आमच्या पौर्वात्यांच्या मताप्रमाणें अवतीर्ण व पाश्चात्यांच्या मताप्रमाणें उत्क्रांत

होतो हें आतां पहावयाचें आहे! कारण जशास तसें हा सृष्टीचा निरपवाद नियम हल्लीं चोहोंकडे अंमलात आहे. म्हणूनच ह्या कालास कलीची कारकीर्द असें म्हणतात. ह्या प्रत्येक युगास दुसरीं नांवें त्यांच्या त्यांच्या कांहीं विशेषांवरून सुचवितां येण्यासारखीं पूर्वींच ध्वनित करून ठेवण्यांत आलीं आहेत. तीं अशीं—पहिल्या कृतयुगाचा पहिल्या तीन चरणांस दुसरें नांव अजीवयुग किंवा विंध्यपूर्वयुग असें देतां येईल; दुसऱ्या त्रेतायुगास विंध्ययुग असें दुसरें नांव देतां येईल; तिसऱ्या द्वापरयुगास गोंडवनयुग असें दुसरें नांव देतां येईल; चतुर्थ कलियुगास हिमालययुग असें दुसरें नांव देतां येईल; कारण त्यांची अजीव, विंध्य, गोंडवन व हिमालय हीं अनुक्रमें विशेष लक्षणें आहेत. द्वापर व कली युगामध्येंच उत्तरेकडील नृ म्हणजे पांढरे नर व दक्षिणेकडील सिंह म्हणजे शूर तांबडे लोक ह्यांच्या संयोगाचा नृसिंह अवतार; नर्मदेच्या दक्षिणेकडील दानशूर बलीकडून वसाहतीस आपल्या शिवाजी महाराजांना चौथाई सरदेशमुखी अथवा इंग्रजांची तैनाती फौज यांसारिखी चोहों॰कडे सत्ता स्थापणारा उत्तरेकडील कश्यपपुत्र वामन अवतार; उर्मट क्षत्रियांची खोडकी मोडणारा अवैस्तिक ( परशू—पारशी यांतील राम ) परशुराम अवतार; सीतेच्या निमित्तें उत्तरेच्या शेतकीच्या वगैरे सुधारणेचें लोण लंकेत नेऊन पोहोचविणारा दाशरथी राम; राजनीतिनिपुण द्वारकाधीश कृष्णाचा अवतार; उपनिषत्सिद्ध असार संसाराचा बौद्ध अवतार होऊन गेला आहे व जातींतील भांडणांचा नायनाट करणारा व्यवहारचतुर कलंकी अवतार पुढें व्हावयाचा आहे.

टीपः—( १ ) विंध्य, सह्य, व हिमालय हीं आपल्या मायभूमीचीं मुलें आहेत. यांतील विंध्य आकृतीनें सगळ्यांत लहान आहे. म्हणून तो ह्या सगळ्यांत वयानें लहान नाहीं. सह्याद्री हा लांबीनें विंध्यापेक्षां मोठा आहे, म्हणून सह्याद्री कांहीं विंध्याद्रीपेक्षां वयानें मोठा नाहीं. हिमालय हा सह्याद्री व विंध्याद्री यांपेक्षां तर काय पण सगळ्या दुनियेंतील सगळ्या पर्वतांमध्यें उंचीनें अग्रगण्य आहे म्हणून तो कांहीं त्या पर्वतांपेक्षां जुना नाहीं.

( २ ) पहिल्या युगांतील म्हणजे त्याच्या अजीव युगापुढल्या भागांतील प्राण्यांस पाठीच्या कण्याचीं वगैरे हाडें नव्हतीं. नंतर त्यांत पाठीचा कणा असलेले प्राणी उत्पन्न झाले. हे माशासारखे जलचर होते. ही गोष्ट आपल्या मच्छअवताराच्या नांवामध्यें ध्वनित होते. दुसऱ्या युगामध्यें सर्पासारखे व कासवासारखे घसरणारे प्राणी उत्पन्न झाले. ही गोष्ट आपल्या कच्छ अवतारांत ध्वनित होते. तिसऱ्या युगांत डुकरें, हत्ती, वानर, मनुष्यें यांसारखे आईच्या आंगावर दूध पिणारे प्राणी उत्पन्न झाले. ही गोष्ट आपल्या वराह अवतारांत ध्वनित होते.

( ३ ) आपण हल्लीं रोज प्रत्येक जातीच्या वनस्पती व प्राणी नवे जन्मतांना व जुने मरतांना पाहतों, त्याप्रमाणेंच प्रत्येक युगामध्यें वनस्पती व प्राणी उत्क्रान्त व जुनी जात अपक्रान्त होतांना पाहतों.

( ४ ) वनस्पती व प्राणी ह्यांचीं शवें पडतात. त्यांतील सांगाड्याचे कठीण भाग पाण्याबरोबर वहात जाऊन गाळांत पुरले जातात. त्या गाळाचे थर होतात.

ते थर दरवर्षी एकावर एक सानुक्रम बसतात. त्यांतील वरच्या थरांचें ओझें खालच्या थरांवर चढत्या श्रेढीनें वर्षानुवर्ष वाढत जातें व सृष्टीच्या त्या सांगाड्यांच्या ठेवण्यासह त्याचे दगड बनतात. त्यांस प्रस्तर म्हणतात हें पुन्हां सांगावयास नकोच.

( ५ ) ज्याप्रमाणें प्रस्तर बनण्यास पाण्याचा जोर लागतो व पाषाण बनण्यास उष्णता लागते, त्याप्रमाणें वनस्पती व प्राणी बनण्यास कांहीं विशेष प्रमाणांत हवा, पाणी व उष्णता यांचा पुरवठा लागतो तेव्हां ह्या पुरवठ्यांत अधिकउणेपणाप्रमाणें ह्या वनस्पती व प्राणी यांची उत्क्रान्ती व अपक्रान्ती होते, मग त्यास तुम्ही रोग म्हणा किंवा प्रळय म्हणा.

**प्रस्तर व पाषाणः**—परीक्षा–कालनिर्णय–वगैरे–पूर्वोक्त प्रस्तरांतील वनस्पती व प्राणी यांचें थरांत गढून बसलेले सांगाडे हे प्रस्तरांच्या कोणत्या थरांत आहेत ? हें समजलें असतां तो थर कोणत्या युगांतला आहे ? हें ठरवितां येतें व ते सांगाडे तपासून पाहिलें असतां, ते सांगाडे ज्या थरांतील असतील ते थर गोड्या पाण्यांतील किंवा जमिनीवरील किंवा खाऱ्या पाण्यांतील किंवा समुद्रांतील आहेत हें ठरवितां येतें. वनस्पतीशास्त्रवेत्त्यांनीं कोणत्या वनस्पती गोड्या पाण्यांत जमिनीवर उगवणाऱ्या आहेत व कोणत्या वनस्पती खाऱ्या पाण्यांत समुद्राच्या तळीं उगवणाऱ्या आहेत ह्यांचें जातवार वर्गीकरण केलें आहे. याप्रमाणेंच कोणत्याही प्राण्याचा सांगाडा पाहिला कीं वरच्या वनस्पती प्रमाणेंच जलचर किंवा स्थलचर प्राण्याचा आहे हें एकदम समजतें. ह्यानंतर ते प्राणी गोडया पाण्यांत राहणारे किंवा खाऱ्या पाण्यांत राहणारे आहेत हें प्राणिशास्त्रवेत्त्यांच्या प्राण्यांच्या जातवार वर्गीकरणापासून शोधून काढितां येतें. हें तर काय पण त्यावरून ते स्थलचर व जलचर प्राण्यांचे सांगाडे ज्या थरांत सांपडतात, ते थर हल्लीं पूर्वस्थानीं नसले तरी तें पूर्वीं सरोवरें व नद्या यांच्या गोडया पाण्यांत होते किंवा खाडया व समुद्र यांच्या खाऱ्या पाण्यांत होते ह्याचे अचूक भाकित करितां येतें. पण या प्रस्तरांच्या जागीं पाषाण असले तर ते अग्निजात असल्यामुळें त्यांत वनस्पती व प्राणी यांचे अवशेष नसतातच. तेव्हां त्यांची तपासणी करून वरच्याप्रमाणें कांहीं अनुमानें करितां येत नाहींत. हें तर काय पण अग्नीचा तडाका असा विलक्षण असतो कीं त्यांची आंच वसून जे रूपान्तर—विशिष्ट—खडक होतात त्यांतील पूर्वोक्त अवशेष असे निःशेष जळून खाक होतात कीं त्यावरून तें प्रस्तर गोड्या पाण्यांत झालेले आहेत किंवा खाऱ्यापाण्यांत झालेले आहेत हें भाकित बिलकूल करितां येत नाहीं, मग ती अग्नीची आंच त्यांस भूकंपांत लागो किंवा भूस्फोटांत लागो.

टीपः–( १ ) प्रस्तरांच्या परीक्षेवरून अमुक ठिकाणीं हल्लीं जमीन आहे तर त्या ठिकाणीं पूर्वीं तलाव, नदी, खाडी, किंवा समुद्र होता हें सांगतां येतें व असेंच ह्याच्या उलट स्थितींत उलट प्रकार स्पष्ट सांगतां येतो.

( २ ) ह्या परीक्षेपुरती रूपान्तर–विशिष्ट–खडक यांची गणना अग्निजात पाषाणांत करावी.

( ३ ) विंध्याद्री हा सर्वांत जुना डोंगर असल्यामुळें त्यावरून पहिल्या युगास विंध्याद्री काल हें नांव वर सुचविलें आहे. दुसऱ्या युगांतले थर गोंडनवांत सांपडतात. यावरून आम्ही दुसऱ्या युगास गोंडवनकाल हें नांव वर सुचविलें आहे. तिसऱ्या युगांत हिमालयाची उत्पत्ती व वाढ झाली म्हणून या तिसऱ्या युगास हिमालयकाळ असें नांव वर सुचविलें आहे. या प्रमाणेंच चौथ्या युगांत मनुष्याची उत्पत्ती झाली आहे म्हणून या युगास मानव-युग असें नांव वर सुचविलें आहे.

( ४ ) पहिल्या युगांत विंध्याद्रीची उत्पत्ती झाली व या वेळीं माशासारखें प्राणी पाण्यांत वावरत होते. दुसऱ्या युगांतील गोंडवनांत कासवें आढळतात व त्यावेळीं सापासारखे सरपटणारे प्राणी चोहोंकडे वावरत होते. तिसऱ्या युगांत हिमालयाची उत्पत्ति झाली व मनुष्यासारखे सस्तन प्राणी प्रथम उत्पन्न झाले. चौथ्या युगांत प्रालेयप्रलय उत्पन्न झाला व माणसें चोहोंकडे निरर्गल फिरूं लागलीं.

( ५ ) प्रत्येक युगाचे चार चरण मानितात. त्यांतील पहिला चरण जुन्या व नव्या युगास सांधितो. म्हणून त्यास संधिकाल असें म्हणतात. त्यानंतरच्या काळास प्रारंभ, मध्य व अंत अशा संज्ञा देतात. पण पहिल्या युगाचे पांच चरण ( अजीव व विंध्य ) व दुसऱ्याचे तीन चरण मानण्याची वहिवाट आहे. सध्या चौथ्या युगाचा दुसरा चरण चालू आहे. याप्रमाणें एका चरणांत एक थर तयार होतो असें मानिलें तर पहिल्या युगास पांच थर, दुसऱ्या युगांत तीन थर व तिसऱ्या युगांत चार व चौथ्या युगांत दोन थर मिळून आजतागाईत चौदा थर तयार झाले आहेत. ( भि. आपटे ).

**फायदे:**—ह्या शास्त्राच्या अभ्यासापासून फार फायदे होतात. म्हणून व्यवहार-चतुर लोक ह्या शास्त्राचा फार बारकाईनें अभ्यास करितात; कारण बारकाईनें कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करूं लागल्यावांचून कोणत्याही शास्त्राच्या शाखेंत व्यावहारिक लाभ मिळविण्याची आशा बिलकुल नसते. ह्या भूगर्भशास्त्राचे अभ्या-सानें आपल्यास पृथ्वीच्या पोटांतील खनिज संपत्ति शोधून काढितां येते. म्हणूनच याचा अभ्यास युरोपियन झटून करितात. या शास्त्राचा स्थूल दृष्टीनें विचार करितां ह्यांतील अजीवयुगामधल्या पृथ्वीच्या पोटांतील थरांत सोनें, रुपें, तांबें, निकल व लोखंड ह्या धातू सांपडतात. पहिल्या विंध्ययुगांतील पृथ्वीच्या पोटांतील मधल्या थरामध्यें शिसें, जस्त व राकेल ( घासलेट–पेट्रोलियम) सांपडतें; व त्याच्या अंत्य थरामध्यें दगडी कोळसे सांपडतात. दुसऱ्या अथवा गोंडवन युगांत सैंधवाच्या खाणी पृथ्वीच्या पोटांत लागतात. तिसऱ्या अथवा हिमालय युगापासून मनुष्यादिक सस्तन प्राण्याचे सांगाडे पृथ्वीच्या पोटांत सांपडत असल्यामुळें इतिहासकार या युगांतील थरांस ज्ञानमंजूषा असें म्हणतात.

टिपाः-( १ ) ही सर्व शिफारस पूर्वोक्त जलजात प्रस्तरांची आहे-हिचा संबंध तदितर खडकांकडे बिलकुल लागत नाहीं.

( २ ) पूर्वी सांगितलेलें पाषाण मूर्तिमंत अग्निजात म्हणजे अग्नीनें भाजून निघालेले असतात व स्वरूपान्तर विशिष्ट प्रस्तर खडक हे मूळचे जलजात असून भूकंपांत किंवा भूस्फोटांत पाठीमागून अग्नीनें भाजून निघालेले असतात. म्हणून त्यांत वनस्पती अथवा प्राणी ह्यांचे अवशेष सांपडत नाहींत.

अवशेषः-अवशेष म्हणजे पहिला अर्थ वनस्पती अथवा प्राणी यांच्या सांपळ्या-सारखा शिल्लक भाग व दुसरा अर्थ वनस्पतींचे खुंट किंवा प्राण्यांचे सापळे जमि-नींतील चिखलांत सडून त्यांची मूलतत्वें वियुक्त होतात व जवळच्या मातीशीं सरूप होतात, पण त्याचे मूळचे रेषानरेषा उठलेले जे उठाव त्या चिखलांत अस-तात ते होत. ह्याचाही अंतर्भाव भूगर्भशास्त्रामध्यें अवशेष ह्या संज्ञेत होतो. या-प्रमाणें, कोंकणांतील खाजणांत म्हणजे खाऱ्या मातीच्या दलदलींत खुरबेट्या, शिंपले, शंख, वळये वगैरे प्राण्यांची व भोपे, हुरे वगैरे टणक झाडांची टणक चित्रें जमीन खोदतांना आढळतात व देशावर वर्धा; मोहपाणी वगैरे नागपूर प्रांतांतील कोळशांचा खाणीमध्यें मूळ झाड पृथक्करणानें नाहींसें झालें असलें तरी त्याचे हुबेहुब कठीण चित्र त्या कोळशांत नजरेस पडतें; शिवाय समुद्र कांठी किंवा नदी कांठी किंवा इतर ठिकाणीं बॅकबेसारख्या ठिंकाणी ओल्या जमिनींवरून चालत गेल्यास प्राण्यांच्या पायांचे ठसे त्या ओल्या मातींत सुस्पष्ट उठतात. हे ठसे वाळून दगडासारखे कठीण होतात. ह्या ठशांवरून त्या पावलांच्या ठशांच्या प्राण्याची राहणी हें होऊन गेल्यावर हजारों वर्षांनीं अनुमित करितां येते.

टीपः—( १ ) याप्रमाणें आपले सह्याद्रीचे खडकांस ज्या ठिकाणापर्यंत कालवें चिकटलेलीं आढळतात, त्या ठिकाणापर्यंत त्या पर्वताचा प्रदेश समुद्रांत बुडालेला होता असें अनुमान करितां येतें. रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण गांवचे तळांतल्या विहिरींच्या खोदकामांत भोपे वगैरे झाडांचे अवशेष सांपडतात. त्या ठिकाणीं खाडीच्या दुतर्फापैकीं एका बाजूनें खाजण होतें हें सिद्ध होतें. आपल्या हिमालयाच्या शिखरांवर कवडया, शिंपा वगैरे खाऱ्या पाण्यांतील प्राण्यांचे अवशेष सांपडतात त्यावरून पूर्वी हिमालय तृतीय युगांत भूमध्यसमुद्रांतून अपूर्व उद्भवला असें जें सांगितलें आहे, त्याचा पूर्णपणें परिपोष होतो.

( २ ) या जलचर व स्थलचर प्राण्यांच्या अवशेषांचा अभ्यास करून कांहीं अट-कळी बसवितां येतात. त्या अटकळींच्या सहाय्यानें पृथ्वीच्या पाठीवर जमीन व पाणी यांची वांटणी कशी झालेली होती ह्यांचे दर्शक त्या काळचे नकाशे तयार करितां येतात.

( ३ ) या अवशेषांच्या इतिहासावरून उलट कांहीं उंचउंच पर्वतांवर शिंपले कां असतात व एकाच खडकांतील निरनिराळ्या युगांतील प्राण्याचे अवशेष कां असतात वगैरे भौगर्भिक चमत्कारांच्या कूट प्रश्नांचा उलगडा सहज करितां येतो.

आजचा भूगोलः-आजच्या भूगोलाच्या नकाशाकडे पाहिलें असतां काय आढळतें ! आपल्या एशिया खंडाच्या उत्तरेस आर्क्टिक महासागर; पश्चिमेस आरबी

समुद्र व त्या आरबी समुद्रापलीकडे आफ्रिका खंड व त्यावर युरोपखंड आहे. त्या दोन खंडाच्या पलीकडे अटलांटिक महासागर व त्या अटलांटिक महासागरापलीकडे अमेरिका खंड आहे. हें अमेरिका खंड व पूर्वोक्त एशियाखंड यांमध्यें पासिफिक महासागर आहे. ह्या एशिया खंडाच्या दक्षिणेस अंटार्टिक महासागर आहे.

टीपः-(१)या भूगोलावर $\frac{1}{3}$ जमिनीचा भाग व $\frac{2}{3}$ पाण्याचा भाग आहे.

( २ ) या भूगोलावर सध्या खंडे चार आहेत व महासागर पांच आहेत..

**जमीन व पाणी यांचा झगडाः**-आजची स्थिती कशीही असो. पण प्राचीन काळीं भूपृष्ठाची स्थिती हल्लींच्या प्रमाणेंच होती असें मानण्याचें कारण नाहीं; कारण भूपृष्ठावर कधीं पाण्याचा वरपगडा असतो, तर कधीं जमिनीचा वरपगडा असतो. ऐतरेय उपनिषदाप्रमाणें येथें पूर्वीं काय स्थिती असेल ती सांगतां येत नाहीं. पण त्याच्या वेळीं भूपृष्ठावर चोहोंकडे पाणी होतें असें आहे. नंतर त्याच्या क्रान्तिप्रदेशामध्यें आपल्या सूर्यबाबाचे उन्हाचे किरण लंबरूप पडल्यामुळें ह्या ठिकाणीं पर्वत, डोंगर, टेकड्या व मैदानें पाण्यांतून बाहेर पडलीं. पुढें कांहीं काळानें जमिनीचा कांहीं भाग खालीं गेला व पाण्याखालचा कांहीं भाग वर आला. याप्रमाणें आपले पृथ्वीवर खंडें व महासागर यांची संख्या अधिक उणी झाली.

टीपः—( १ ) अशा प्रकारें भूपृष्ठावरील खंडे व महासागर यांची संख्या मधून मधून अधिक उणी होते व म्हणून प्रत्येक युगांतील खंडें व महासागर यांची संख्या निरनिराळी असते व त्या संख्येप्रमाणें पृथ्वीवरील ऋतूंचीं मानें बदलत जातात.

( २ ) तृतीय युगांत आपल्या जंबुद्वीपामध्यें सूर्याच्या लंबरूप किरणांनीं पाण्यांतून नव्या उघड्या पडलेल्या क्रान्तिप्रदेशांत प्रथम सर्वत्र वसंत ऋतू चालू झाला व तो पुढें हळू हळू उत्तरेकडे व दक्षिणेकडे चालत गेला व म्हणून तृतीय युगांत गोंडवनांत प्रथम उत्पन्न झालेला मनुष्य आरंभीं ( पुढील राशिचक्रोद्भूत सिद्धांत पहा ). पूर्वपश्चिम फिरत होता तो दक्षिणेस मसाल्याची बेटें व उत्तरेस उत्तर कुरूकडे गोंडवन अथवा अर्यावर्त अथवा आर्यन वैजोपासून वसाहती करीत दक्षिणोत्तर गेला.

( ३ ) तृतीय व चतुर्थ युगाच्या संधिकाळांत जो प्रालेयाचा ( बर्फाचा ) प्रलय झाला, तेणेंकरून त्या वसाहती मोडून ते वसाहत करणारे परत त्या ऐर्यनवैजोंत तेथील मूळच्या लोकसंख्येस भर घालण्यास वायव्येकडून नवीन उत्पन्न झालेल्या उत्तरगिरी अथवा हिमालय यास वळसा घालून आले, व ते पूर्वीच्या लोकांत मिसळले.

**पहिल्या युगांतील त्या ऐर्यन वैजोचा नकाशाः**-पहिल्या युगाच्या प्रारंभाला इंग्रजींत क्यांब्रियन युग असें म्हणतात. या अवधीमध्यें भूपृष्ठावर चारच खंडें होतीं. पण त्याचें क्षेत्र आजच्या खंडांपेक्षां पुष्कळच मोठें होतें. तें कसें ते पहा. जंबुद्वीप ( दक्षिणावर्त-भूमध्यसमुद्राच्या खालचें हिंदुस्थान), आस्ट्रेलियाचा पश्चिम-

भाग, आरबस्तान, आफ्रिका, दक्षिण अमेरिकेचा अर्धाभाग—एवढा प्रदेश व्यापून राहणारें एक सलग खंड या युगाच्या मध्यभागीं विद्यमान होतें. यापैकीं हिंदुस्थान व त्याच्या आसपासचा प्रदेश ह्यांतील जमीन व पाणी ह्यांची मांडणी कशी होती? ह्यासंबंधानें विचार करावयाचा तर पंजाबपासून हिमालय व चीन यांपर्यंत सर्व प्रदेश ह्यावेळीं समुद्राखालीं होता. याच्या उलट प्रकार असा कीं, भूपृष्ठाचा जो भाग हल्लीं हिंदीमहासागरानें व्यापिला आहे, त्यांतील बऱ्याच भागावर ह्यावेळीं जमीन होती. पहिल्या युगाच्या मध्यकाळांत एक डेव्होनियन पिरियड भूगर्भशास्त्रांत आहे. ह्यावेळीं हिंदुस्थान, आरबस्तान व आस्ट्रेलिया मिळून एक प्रचंड खंड अस्तित्वांत होतें व ह्या खंडाच्या उत्तरेकडील भागीं अफाट समुद्र जशाच्या तसाच कायम होता, पण ह्या खंडाच्या दक्षिणेकडील महासागराची व्याप्ती वाढत चालली होती.

**द्वितीय युगांतील आर्यावर्ताचा नकाशाः**—वरील नकाशांत ज्याप्रमाणें हिंदुस्थान व आस्ट्रेलिया यांमध्यें जमीन होती, त्याप्रमाणेंच हिंदुस्थान व आफ्रिका यांमध्यें जमीन होती. पुढें हें प्रचंड खंड मोडत जाऊन त्यापैकीं आस्ट्रेलिया हें स्वतंत्र खंड बनलें व हिंदुस्थान हें आफ्रिकेपासून फुटून बेगळें होऊं लागलें. ही गोष्ट भूगर्भ शास्त्राच्या त्रिआसिक पिरियडमध्यें सुरू झाली. तें कार्य क्रिटेशस पिरियडमध्यें पुरें झालें. म्हणजे तें चित्रमय जगत एप्रिल १९२२ त रा. आपटे यानीं आपल्या मनोहर चित्रपटांत दाखविल्याप्रमाणें कविकुलगुरू कालिदासाच्या उक्त्यनुरूप खरोखरी चतुः समुद्रपरिवेष्टित जंबुद्वीप झालें. असें हें समुद्रवलयांकित बेट पैदा झाल्यावर त्रिविष्टप ( तिबेट—स्वर्ग ) व चीन हे देश अस्तित्वांत आले. पुढें तृतीय व चतुर्थ युगाच्या संधिकालांत सदरहू जंबुद्वीपाचा पूर्व व पश्चिम किनारा बंगालचा उपसागर व आरबी समुद्र यांनीं व्याप्त झाला, व जंबुद्वीपाचें द्वीपकल्प होऊं लागलें, व जंबुद्वीपाच्या व त्रिविष्टपाच्या मध्यें असलेल्या भूमध्यसमुद्रांतून आपल्या शतपथब्राह्मणांत उल्लेखिलेला उत्तरगिरी अथवा हिमालय याचा प्रसव आपल्या मायभूमीपासून होऊं लागला. व त्यावेळीं आपली मायभूमी असह्य प्रसुतिवेदनांनीं कासावीस होऊन एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर लोळत असतां तीस दरदरां घाम सुटून आपलेकडे जलप्रलय व युरोप व अमेरिका खंडांत प्रालेयप्रलय झाला! प्रो. लॅप्वर्थच्या भूगर्भशास्त्राप्रमाणें (पा. ३७५) इओसिन काळच्या शेवटीं ह्या प्रदेशाच्या जागेस मोठा कंप सुटला व ह्या जमीनीच्या भागास घड्या पडूं लागल्या, व त्यांच्या बेटांची साखळी बनली व तिच्यानंतर हल्लींच्या पर्वताच्या ओळी बनल्या. त्या ओळी कोणत्या? आल्पस, ॲटलस, कार्पेथियन, हिमालय, वगैरे. ह्या घड्यांमध्यें स्थानिक खळगे उत्पन्न झाले ×× व हिमालयाच्या प्रदेशांत शिवालिक पहाडाजवळील गोड्या पाण्यांतील गोटे व वाळूचे थर बनले. येथें रेतीचे दगड गोट्यांचे दगड (कॉंग्लोमोरेटस) व चिकण मातीचे दगड आहेत. ह्यामध्यें शिवमृग (शिवथेरियम) केसाळ हत्ती (एलिफस) व पाणघोडे ( हिपोपोटेमस) वगैरे प्राण्यांचे अवशेष आहेत. हे प्लिओसीन काळांतील आहेत (पा. ३७३). ब्रेडेनबर्गच्या भूगर्भ-

शास्त्रावरून असें कळतें कीं प्लिओसीन काळांतील शेवटच्या उत्पातामध्यें आपल्या भूगोलावरील हिमालयादिक अत्यंत महत्वाच्या पर्वतांच्या उंचीची परमावधी झाली तेव्हां उत्तर एशियाखंड वाळत गेलें व हिमालयावरून हिमनद्या विषुववृत्तांकडे वहात चालल्या याबद्दल लवणाद्री ( सॉल्टरेंज ) पासून तालचेरपर्यंत त्यांच्या घसाऱ्याच्या जागोजाग खुणा आहेत. अशा प्रकारें आपल्या मायभूमीपासून प्रचंड हिमालयाच्या प्रसवास हजारों वर्षें लागलीं ! ( आमचें भूगर्भदर्पण पहा. ) आपल्या स्त्रियांच्या बालकाच्या प्रसवास फारफार तर एक दिवस लागतो तर त्याचें गर्भारपण नऊ दहा महिन्यांचें असतें तर ह्या एक हजार वर्षांच्या आपल्या मायभूमीच्या प्रसूतिकाळास तिच्या गर्भारपणाचा काळ केवढा मोठा असला पाहिजे हें विचार करण्यासारिखें आहे !! यांत चमत्कार हा कीं आपले जंबुद्वीपाचें जंबुद्वीपकल्प अथवा हल्लींचें हिंदुस्थान होऊन बसलें !!! मात्र ह्या द्वीपकल्पाचें दक्षिण टोंक फार दूरवर विषुववृत्तापलीकडे अथवा निरक्षप्रदेशापलीकडे पसरलेलें होतें !!!! यांत रावणाची लंका कोठें होती ? (१) ती सरदार माधवराव किबेसाहेब यांच्या मताप्रमाणें विंध्याद्रीपर्वतावरून मारुतीस उडी मारून जातां येण्यासारख्या एका बेटांत होती असें आहे व रा. वि. ह. वडेर यांच्या चित्रमय जगत जानेवारी १९२३ तील लेखाप्रमाणें ती गोकर्ण नामक ज्योतिर्लिंगाच्या पश्चिमेकडील महासागरांत १०० योजनें अंतरावर मलयद्वीपांत ( मालदीव ) ६ अक्षांशापासून ० अक्षांशापर्यंत व ७३½ पू रेखांशापासून ७६पू रेखांशापर्यंत पसरली होती मग ती रावबहादुर वैद्य व ज्योतिर्कोविद दीक्षित यांच्या मतांप्रमाणें सिंहल ही आहे असें असो; कारण महाभारत, मार्कंडेय पुराण, वायुपुराण, भागवत वगैरेंतील वर्णनाशीं तिचें स्थळ जमत नाहीं. जसें,

लंका कालाजिनाश्चैव शैलिका निकटास्तथा ॥ २० ॥
दक्षिणाः कौरुषा यश्च ऋषिकास्तोपसाश्रमाः ॥
ऋषभाः सिंहलाश्चैव तथा काञ्ची निवासिनः ॥२७॥ मा.पु.५५,२०,२९
तद्यथा स्वर्णप्रस्थश्चंद्रशुक्ल आवर्तनो रमणको ।
मंदरहारिणः पांचजन्यः सिंहलो लंकेति ॥ भागवत, स्कं.५अ.१९.२९-३०

हीं स्थळें एक असतीं तर यांत लंका व सिंहल अशी भिन्न नांवें योजण्याचें प्रयोजन पडलें नसतें.

असेंच ज्योतिषशास्त्रांतील पुढील भास्कराचार्यांचें वचन ह्या बाबतींत विचार करण्यासारिखें नाहीं असें कोणासही वाटणार नाहीं:—

लंका कुम ये यमकोटिरस्याः प्राक् पश्चिमे रोमकपत्तनं च। भास्कराचार्य भु. १७ याशिवाय आणखीं एक प्रमाण आम्ही अन्यत्र दिलें आहे.

टीपः—( १ ) आपल्या हिंदुस्थानच्या दोन्ही बाजूस बंगालचा उपसागर व अरबी समुद्र नवीन उत्पन्न होऊन त्याचा पूर्वपश्चिम भाग पाण्याखालीं बुडाला ! व ह्याप्रमाणेंच ह्याचा दक्षिणभाग हिंदी महासागरांत गडप झाला ! !

( २ ) पण हिंदुस्थानच्या उत्तरेचा उत्तरगिरी उर्फ हिमालय याजकडील प्रदेश क्रमानें हजारों वर्षें वाढत गेला !

( ३ ) एकंदरींत पाहतां हिंदुस्थानचें पूर्वीचें क्षेत्र पुष्कळ कमी झालें !!

( ४ ) प्राचीन सप्तसिंधुमातृक गोंडवनांत नवीन वर आलेल्या उत्तरगिरीवरून वाहणाऱ्या नवीन सिंधू, सरस्वती, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा वगैरे नद्यांच्या जननी ज्या हिमनद्या त्यांतून लोटत येणारे दगड, धोंडे, व गाळ बसून गोंडवनाचें किंवा ऐर्यन वैजोचें प्रथम नाशक झालें ! व त्यांत ८००० वर्षांपासून अग्निहोत्री वैदिक व अवैस्तिक वगैरे जे त्या वेळच्या जलप्रलयांतून व प्रालेयप्रलयांतून जगले वांचले ते वरील उत्तरगिरीवर गलबतांतून वर चढलेल नौबंधन शिखरावरून खालीं उतरले व हिमालय उत्पन्न होण्यापूर्वीं भूगर्भाच्या तृतीय युगामध्यें उत्तरेकडे उत्तरकुरूपर्यंत चढलेले लोक वायव्येकडून ह्या गोंडवनांत शिरले व त्यांनीं त्यांत पश्चिमेकडून पूर्वेकडे आत्मनिरपेक्ष वसाहतीचें काम चालविलें !! ( शतपथ ब्राह्मण पहा )

( ५ ) प्राचीन सप्तसिंधू ह्या या प्रलयापूर्वीं अत्यंत उंच व वृद्धतम विंध्याद्रीवरून उत्तरेकडे वहात जात होत्या. त्यांचे मार्ग वरच्या गाळानें रुंद झाले व तळाशीं चिखल बसूं लागल्यामुळें तो विंध्याद्री ठेंगणा होऊं लागला व त्या उत्तरगिरीवरून नवीन उत्पन्न झालेले हिमनद व नवीन सरस्वत्यादिक सप्तसिंधू उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहूं लागल्या व विंध्याद्री व तो हिमाच्छादित उत्तरगिरी ह्यांमध्यें नवीन गोडा समुद्र सांचला व त्यांत ब्रह्मावर्तभाटणांची ( शोल्स ) जमीन पूर्व पश्चिम वाढत चालली ! ( शतपथ ब्राह्मण पहा )

( ६ ) ह्या युगांत सर्व पृथ्वीवर—शीत, समशीतोष्ण व उष्णकटिबंध उत्पन्न झाले. तेणेंकरून मनुष्याच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे होणाऱ्या स्थलांतरास बराच मोठा पायबंद बसला आहे ! तो असा कीं ह्या नियमाच्या उलट अविचारानें एकदम वागल्यास निसर्गदेवता त्यास ऱ्हासाची अचूक शिक्षा करिते; जसें, एस्कीमो हिंदुस्थानांत व हिंदू उत्तरध्रुव प्रदेशांत एकदम जाऊन कायमचा राहूं म्हणेल तर एक उष्णतेनें व दुसरा थंडीनें ऱ्हास पावेल. म्हणून इतिहासप्रसिद्ध मनुष्यांचीं स्थलांतरें नेहमीं पूर्वपश्चिम त्या अक्षांशांत किंवा त्या उष्णतामानाच्या प्रदेशांत आढळतात ! व युरोपियन येथें कायमचे राहूं शकत नाहींत. पण प्राचीन काळीं सर्व पृथ्वीवर वसंताचें साम्राज्य असतां असा प्रकार नव्हता.

( ७ ) त्या वेळीं लोकांच्या स्थलांतरास पायबंद जमिनीच्या व पाण्याच्या पट्ट्यांचा होता. पण तो कोणास ? जे आडाणी होते त्यांस. ज्यांस दर्यावर्द्यांचें काम येत नव्हतें, ते आपल्या आर्यांप्रमाणें दक्षिणोत्तर स्थलांतर करण्याच्या साहसांत पडलेले दिसत नाहींत. ते कावळे वगैरे पक्षांप्रमाणें पूर्वेकडून पश्चिमेकडे स्थलान्तर करतांना आढळले आहेत. ह्याचें प्रमाण आपल्यांतील शकूनशास्त्र हें होय.

( ८ ) हीच स्थिती निःशस्त्र लोकांची होऊन गेली आहे; कारण इतर प्राणी व मनुष्यें यांत भेद मनुष्यांच्या धोंड्या दगडांच्या शस्त्रांच्या युक्त्या निघाल्यापासून उघड दिसूं लागला व तीं रानटी जनावरांवर तर काय पण रानटी

माणसांवरही सरशी करीत, पाहिजे तिकडे वावरण्यास समर्थ झालीं आहेत ! व हें पराक्रमाचें कार्य आमचे आर्यलोकांस तदितरांपेक्षां पहिल्या प्रतीचें येत होतें !

( ८ ) म्हणून आर्य लोक असे पराक्रमी असतां त्यांच्या हिमालयाच्या उत्पत्तीपूर्वींच्या वसाहती विंध्याद्रीपासून उत्तरेस उत्तरकुरूपर्यंत पसरल्या होत्या व त्यांच्या हिमालयाच्या उत्पत्तीनंतरच्या वसाहती हिमालयापासून विंध्यापर्यंत जारीनें व विंध्यापासून लंकेपर्यंत त्याच्या खालोखाल जोरानें झाल्या आहेत ! कारण ज्याप्रमाणें मराठ्यांच्या स्वराज्याच्या बावट्याबरोबर जाण्यास इतर हिंदू लोकांनीं पुरी समजूत न घेतल्यामुळें सर्व हिंदू लोक परवशतेस बळी पडले आहेत त्याप्रमाणें आर्यपणाच्या बावट्याबरोबर जाण्यास इतर येथील तांबडे, पिवळे, काळे व फिके लोकानीं पुरी समजुत न घेतल्यामुळें झाडून सर्व हिंदुस्थानांतील पंचजन अनार्यजुष्टमस्वर्ग्य–भिणें व भिक्षा मागणें–शिकविणाऱ्या बौद्धजैन धर्मास बळी पडले आहेत; एवढेंच नाहीं तर ते यच्चयावत लोक निःशस्त्र व आत्मसंरक्षणा-समर्थ गांडमेंडुळरूप होऊन पडले आहेत ! कारण, निसर्गानें उत्तरगोलार्ध व दक्षिण गोलार्ध जुडल्यानें ते जन हिंदुस्थानांत एकवटले असोत, पण त्यांची उत्क्रान्ती असमान आहे, ती आत्मबोधांतील समत्व ओळखल्यावांचून व आंगीं आणल्यावाचून सम होणें संभाव्य नाहीं. समत्वं योग उच्यते–ह्या भगवताच्या वचनाप्रमाणें होऊन त्याचें वर्तन निःशंक होऊं लागल्याशिवाय त्याचा पराक्रम कार्यकारी होणार नाहीं–कारण पुढें सरसावलेल्याचे हितशत्रूंच्या सांगीनें त्याचे पाय मागें ओढण्यास तयार न होण्याइतके ते स्वतंत्र बुद्धीचे व आत्मनिष्ठ झाले पाहिजेत. अशा समाजांतच–सिद्ध, साधक व उदासीन ह्यांत कार्यक्षम समतोल-पणा अखंड टिकतो.

टीपः–( १ ) मूळ एका जोडप्यापासून पूर्वपश्चिम किंवा उत्तरदक्षिण फिरतां फिरतां ( बहुस्याम ) ह्या इच्छेने पंचजन झाले असतील तर त्या पंचजनाचें एकीकरण कसें साधावें हा दुनियेमध्यें आपल्या राष्ट्रापुढें परमेश्वरानें मोठा बिकट प्रश्न आणून ठेविला आहे व त्या प्रश्नाच्या कुलपास एक समत्वद र्शक आत्म्याची किल्ली अडकवून ठेवली आहे. त्या किल्लीनें तें कुलूप प्रथम उघडतें कोण ? हें पाहूं.

( २ ) पंचजनांतील अनेक जमातींचें नव्हे तर संघवार मिश्रण होऊन आर्यांचें राष्ट्र बनलेलें आहे.

चौथ्या युगांतील हिंदुस्थानचा नकाशा–वरील हिमाच्छादित उत्तरगिरी अथवा हिमालय प्राचीन भूमध्यसमुद्रांतून डोकें वर काढूं लागला तेव्हां तो अर्थात फारसा उंच नव्हता, व त्याचा विस्तारही फारसा नव्हता पण त्याची उंची क्रमानें वाढत जाऊन त्या युगाच्या प्लिओसीन काळांत ती अत्यंत वाढली. ती इतकी कीं त्याच्या इतका उंच पर्वत आज पृथ्वीवर नाहीं ! मग त्या उंचींत स्पर्धा करणाऱ्या विंध्याची गोष्ट त्यापुढें काय सांगावयाची ? असें आमचें हिंदुस्थान वर त्रिविष्टप अथवा तिबेटपर्यंत वाढलें पण तें दक्षिणेस निरक्ष प्रदेशापर्यंत पसरलेलें होतें तें आठ अक्षांशापर्यंत मागें हटलें ! त्यास कारण भूकं-

पाचे धक्के झाले ! असें म्हणतात कीं त्यांच्या योगानें आपल्या दक्षिणावर्तांत फारच अतर्क्य क्रान्ती होऊन गेली आहे ! ती अशी कीं पूर्वी आपली दक्षिणेंतील वृद्धगंगा अथवा गोदावरी, कृष्णा व कावेरी ह्या नद्या आपल्या तापीनर्मदेप्रमाणें आरबी समुद्रास मिळत असत. पण सह्याद्रीची नवीन उत्पत्ती आपल्या दक्षिणेंतील मलबार किनाऱ्यावर झाली, त्याबरोबर रा. आपटे यांच्या म्हणण्याप्रमाणें १५ ते २१ अक्षांशांतील ज्या नद्या पूर्वी तापी व नर्मदा याप्रमाणें पश्चिमवाहिनी होत्या, त्या पूर्ववाहिनी झाल्या ! तेव्हां काय झालें ? ज्याप्रमाणें हल्लींच्या आर्यावर्तांतील अथवा उत्तरहिंदुस्थानांतील दक्षिणवाहिनी सप्तसिंधू त्यांच्या पूर्वींच्या गोंडवनांतील अथवा जुन्या आर्यावर्तांतील उत्तरवाहिनी सप्तसिंधूपेक्षां नव्या आहेत, त्याप्रमाणें हल्लींच्या दक्षिणेंतील अथवा दक्षिण हिंदुस्थानांतील पूर्ववाहिनी गोदावर्यादी नदीत्रय पूर्वींच्या जंबुद्वीपांतील अथवा दक्षिणावर्तांतील पश्चिम वाहिनी नर्मदा, तापी, गोदावरी, कृष्णा व कावेरी या पंचनदांपेक्षां नव्या आहेत. पहिल्या सप्तसिंधूच्या क्रान्तीस जसा हिमालयसंभव कारण झाला आहे तसा ह्या नदीत्रयाच्या क्रान्तीस सह्यसंभव कारण झाला आहे. यांत हिमालयाचा जन्म सह्याच्या जन्मानंतरचा आहे व पूर्वींच्या सप्तसिंधू उत्तरेकडील नामशेष भूमध्य समुद्रास मिळत असत पण हल्लींच्या गंगादिक नद्या पूर्वेस बंगालच्या उपसागरास जाऊन मिळतात; कारण त्यांच्या दक्षिणेकडील ओघास विंध्याद्री आड आला आहे ! अशा आणखीं उलथापालथी ह्या चवथ्या युगांत चालू आहेत. जपान व [illegible] या दिशेनें धरणीकंप होत आहेत. तर त्यांचे परिणाम काय होतात हें पहावें; कारण तें आगाऊ जाणण्याची शक्ती पृथ्वीवर कोणास देखील साध्य झाली आहे असें आम्हांस अजून आढळलें नाहीं.

टीपः--( १ ) जमीन व पाणी यांच्या वाटणींत कांहीं अघटित फेरबदल होतात तेव्हां त्या काळास युग असें म्हणतात. प्रत्येक युगाचें असें कांहीं तरी वैशिष्ट्य म्हणजे विशेष लक्षण असतें. या वैशिष्ट्याशिवाय कोणत्याही युगायुगामध्यें भेद कसा शोधून काढणार ? अर्थात, या वैशिष्ट्यानेंच युगान्तर होतें.

( २ ) उत्तर गोलार्ध व दक्षिणगोलार्ध यांमध्यें जी भूमध्यसमुद्राची खाच होती ती हिमालयाच्या उत्पत्तीनंतर शिल्लक राहिली नाहीं; कारण ह्या वेळीं पूर्वपश्चिम ब्रह्मदेशापासून बलुचिस्थानापर्यंत व उत्तरेस मध्यएशियामध्यें गोबी ह्यांमध्यें गोट्यांच्या दगडांचे थर, वाळूच्या दगडांचे थर, व चिखलाच्या दगडांचे थर वर आले. शिवालिक, मच्छर, इरावती यांचे जवळील प्रदेश पहा ( त्रेडेनबर्ग, पा. १०६. )

( ३ ) नाहीं नच म्हणावयास त्या समुद्राचे कांहीं भाग भूम्यंतर्गत राहिले, त्यांचा खारटपणा इतका निरनिराळा होता कीं तो जलजात जीवांच्या विकासास मोठा घातक होता. म्हणून या भागांत असल्या जीवांचे अवशेष सांपडत नाहींत सदर. पण ( भारत, वन. अ. १००–१०९ ) वरून असें कळतें कीं ह्या भूम्यंतर्गत खाऱ्या समुद्रांत कांहीं बेटें होतीं. त्यांत कालेय राक्षस असत. ते आर्यावर्तांतील देवमानवांवर रात्रीचे छापे घालीत असत. म्हणून देवमानवांनीं ह्या

पीडेचा परिहार करण्यास अगस्त्य ऋषीस विनविलें असतां त्या शिल्पज्ञ ऋषींनीं त्या बेटाभोवतालचें पाणी बहुधा कालव्यांनीं काढून दिलें. म्हणून ऋग्वेदांत ह्या शिल्पज्ञऋषींच्या प्रशंसेपर पुढील ऋचा आढळते:—अगस्त्यः खनमानः खनित्रैः प्रजापत्यं बलमिच्छमानम् उभौ वर्णौ ऋषिरुग्रपुपोष सत्यादेवेषु आशिष आजगाम ॥

अर्थः—त्या भयंकर खटपटी अगस्त्य ऋषींनीं प्रजा, अपत्य व बल यांची इच्छा धरून कुदळीनें खणण्यास प्रारंभ केला व दोन्ही ब्राह्मणक्षत्रिय किंवा देवमानव वर्णांचें पोषण करून देवांत अक्षय्य कीर्ति मिळविली. तेव्हां त्या देवमानवांनीं खुष्कीच्या रस्त्यांनीं त्या बेटांत चोहोंकडून लगट करून त्या कालेयांचा समूळ उच्छेद केला. पुढें त्या खाचा भगीरथानें तोफेच्या रोखाप्रमाणें हिमालयांतील थोड्या फिरवलेल्या गंगेचे पाणी कालव्यानें आणून भरल्या.

( ४ ) तिसऱ्या युगांत पृथ्वीच्या त्या युगाच्या द्वापर नांवाप्रमाणें दोन पट्टे होते. त्याच्या चौथ्या युगांत त्या दोन पट्ट्यांचा संयोग केला. नंतर विंध्य व हिमालय यांमध्यें हिमालयावरील हिमनद्याजात नव्या सप्तसिंधूंच्या पाण्याचा विंध्य व हिमालय यांमध्यें ऐर्यन वैजोंत प्रथम गोड समुद्र झाला होता. त्याच्या दमटपणामुळें व त्या खालील चिखलानें त्यांतील ब्रह्मावर्त नामक पूर्वपश्चिम प्रदेशाचा नाशक प्रदेश तेथील हिमज्वरानें झाला होता. त्यांत ऋग्वेदोक्त आहिताग्नी वैदिक, अवैदिक वगैरे पंचजनांनीं पश्चिमेकडून पूर्वेकडे सदानीरा नदी पार (गंडकी) कोसल मिथिल वगैरे दलदलींतील प्रदेशांत जिवापाड वसाहती करून सदरहू नाशक भूमीचें अनाशक आर्यावर्त अथवा पाहिलें स्वर्ग अथवा त्या जुन्या सप्तसिंधूच्या गोड देशाचें रूपान्तर गौड गूळ उत्पन्न करणाऱ्या गौड देशांत केलें ( शतपथ ब्राह्मण पहा ) या कामांत त्या पंचजनांस शिल्पशास्त्राचा केवढा उपयोग करावा लागला असेल ह्याची अटकळ कल्पनेनेंच करून घेण्यावांचून दुसरा ग्रंथाधार देणें शक्य नाहीं !

( ५ ) त्या प्रदेशाच्या उत्तरेचा हिमालय व दक्षिणचा विंध्य यावरील गाळानें त्यांमधील खांच तीन हजार फूट भरली; एवढेंच नाहीं तर त्यानें राजपुतान्याच्या जुन्या खाऱ्या समुद्राला भर अंशतः तरी कच्छच्या रणापर्यंत घातली ! असें वाटतें. कारण ह्या गाळाच्या भरीस मदत मरुप्रदेशांतील उत्तंकऋषीच्या आश्रमाजवळील धंधू राक्षस म्हटलेली ज्वालामुखी आणखीं करीत असावी असा संशय महाभारत वनपर्व अ. २००–२०३ वरून येतो !

( ६ ) वर हिमालयाखालील भूमध्यसमुद्राच्या अवशेषांचा उल्लेख केला आहे, त्याप्रमाणेंच ह्या गोड्या समुद्राचा एक अवशेष आमचे पाहण्यांत आला आहे. बऱ्या खाऱ्या समुद्राची विल्हेवाट ज्याप्रमाणें शिल्पविशारद अगस्त्य ऋषींनीं लाविली, त्याप्रमाणें ह्या भोपाळपासून वरखेडीपर्यंत पसरलेल्या २५० मैलांच्या विस्ताराच्या जुन्या अवशिष्ट पल्वलाची व्यवस्था शिल्पविशारद भोजराजानें लाविली. आमच्या स्वतःच्या अवलोकनाप्रमाणें व चौकशीप्रमाणें ह्या तलावाचें कर्तृत्व दंतकथेनें व त्यांत भोजपूर गांवानें आपल्या त्या धारच्या परमारवंशीय विद्यासागर भोजराजाकडे ( इ. स. १०१०–९५ ) पक्कें नेऊन ठेविलें आहे, त्याप्रमाणें त्या

सर्वोत्कृष्ट तलावाच्या तोंडाजवळील १०० यार्डांच्या व ५२० यार्डांच्या दोन खिंडारांतील राक्षसी बंधाऱ्यासंबंधें व त्याच्या एकंदर २५० मैल पात्राच्या निवडीसंबंधें विचार करितां तें त्यांच्याकडे अक्षरशः व तत्वशः राहणें अगदीं रास्त आहे. पण त्या अफाट तलावाचें पात्र मनुष्यकृत दिसत नाहीं; कारण त्याची खाच, त्यांतील द्वीप अथवा दीप स्टेशन व त्याचा सध्याचा भोपाळच्या तलावाचा अवशेष आम्हांस अगदीं स्वाभाविक वाटला. माळव्यांतील एका होशंगशहा (इ. स.१४०५-३४) मुसलमान सरदारानें आपलें सगळें सैन्य लावून त्या तलावाचा धाकटा बंधारा फोडण्याचें काम तीन महिने रात्रंदिवस केलें तेव्हां तो तलाव त्या तोंडानें निचरूं लागला ! त्या निचऱ्यानें त्यांतून पाणी ३० वर्षें सारखें वहात होतें ! तरी तो सगळा कोर्डा झाला नाहीं ! त्याचें सध्या प्रचलित वर्णन पहा.

ताल तो भोपाळ ताल और सब तलैया ।
राणी तो कमलापती और सब रणैया ॥
गड तो चितोरगड और सब गढैया ।
राजा तो रामचंद्र और सब राजैया ॥

हा प्रशंसापर दोहा त्याच्या अवशिष्ट भागासही यथार्थ लागू पडणारा आहे. ह्या तलावाच्या उध्वस्त भागांत गहूहरभरा पिकविणाऱ्या सदतीस पाचेसारख्या हिरव्या गार खेड्यांतील लोक वाईटांतून बरा प्रकार झालेला आठवतात तेव्हां ते निर्भेळ भक्तिरसानें थबथबून जातात ! निराशेच्या डोहांत असे आशापूर्ण अंकूर अनपेक्षित कोण बाहेर दाखवितो !! त्या मुसलमानाच्या मनाची धाव भलतीच असतां, देवाची मर्जी कशी लागली ती पहा ! मारानिळा ह्या २५० मैल गोड्या पाण्याच्या तलावाच्या निचऱ्यास ३० वर्षें लागलीं तर पूर्वोक्त त्याच्या मूळच्या १८०० मैल लांबीच्या गोड्या पाण्याच्या मध्याविंध्य हिमालयोः सरोवराच्या लोकमान्य टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें ८००० वर्षांपूर्वींच्या झालेल्या जलप्रलयानंतर ३००० वर्षें तरी पुरतील कीं नाहीं ? ह्या प्रश्नाच्या उत्तराचें कोड जिज्ञासूंनीं पुरवून घेण्यावांचून गत्यंतर नाहीं; कारण ह्या गोड्या समुद्रांतील ब्रह्मावर्तापासून आर्यांच्या वसाहतीचा उल्लेख इ. स. पू. २५००वर्षांच्या शतपथ ब्राह्मणामध्यें सुस्पष्ट आहे. त्या निचऱ्यास अडीच तीन हजार वर्षें पुरणार नाहींत असें कोणास वाटेल तर लोकमान्य टिळकांनीं काढलेला ८००० वर्षांचा काळ आमच्या ह्या मागील आर्यललित विस्तारादी ग्रंथाप्रमाणें तो दहाबारा हजार वर्षांपर्यंत मागें लोटण्यास कांहीं युक्तीची हरकत दिसत नाहीं; कारण असले क्रान्तीचें सगळें चक्र २५००० वर्षांचें असतें व चतुर्थयुगाचे सरासरी दोन चरण हल्लीं पुरे झाले आहेत ।

( ६ ) आपल्या सह्याद्रीच्या, पायऱ्यासारख्या डोंगराच्या ओळींस विभक्त करणाऱ्या कांहीं दऱ्या आहेत. त्या अशा अनियमित रुंद आहेत कीं त्यांतून हल्लीं ज्या नद्या वाहतात, त्यांनीं त्या दऱ्या रुंद केलेल्या नाहींत. तर त्या अशा अनियमित रुंद कशा झाल्या ? ( १ ) ह्या दऱ्यांतून हल्लीं ज्या पूर्ववाहिनी नद्या वाह-

तात त्या एक हल्लीं ज्या ठिकाणीं उगम पावतात, त्या ठिकाणच्या पलीकडे त्या पुष्कळ अंतरावर उगम पावत असल्या पाहिजेत व ती सगळी पर्वताची रांग समुद्रामध्यें असली पाहिजे किंवा ( २ ) वर सांगितल्याप्रमाणें सह्याद्रीच्या उत्पत्तीपूर्वीं ह्या नद्या दुसऱ्या पूर्वेकडून येऊन ह्या रुंद दऱ्यांतून त्या ठिकाणच्या आरबी समुद्रास मिळत असल्या पाहिजेत ! असलें उदाहरण थळ घाटच्या माथ्यावरील दरींचें होय. ( आमचे बंधू रा. ब. का. म. थत्ते सहकारी लेखक नासिक ग्याझीटिअर पा. १३ पहा). रा. आपटे यांनीं आपले दक्षिणेंतील गोदा, कृष्णा व कावेरी ह्या नद्या तापी व नर्मदा यांप्रमाणें सह्याद्रीच्या उत्पातापूर्वीं पश्चिम वाहिनी होत्या असें विधान केलें आहे, त्यास पोषक प्रमाण आम्ही हें वरील शोधून काढिलें आहे !

मखलाशीः—ह्या तुटक शोधांची शहानिशा आणखी एका योजनेनें करितात. त्या योजनेस आयुधशास्त्र असें म्हणतात. त्यांतील मुख्य तत्व हें कीं मनुष्य प्रथम रानटी स्थितींत होता. तो पोटाला मिळविण्यास किंवा स्वतःच्या संरक्षणास प्रथम हत्यारें वापरूं लागला. त्याचीं तीं हत्यारें स्थलपरत्वें व कालपरत्वें निरनिराळ्या द्रव्यांचीं आढळतात. त्याचीं पहिली हत्यारें दगडाचीं असतात. म्हणून मनुष्याच्या त्या अवस्थेस दृषद्युग असें म्हणतात. मग तो अमळ जास्त सज्ञान होऊन काशाच्या ( ब्रॉंझ ) हत्याराचा उपयोग करूं लागतो. म्हणून त्याच्या ह्या अवस्थेस कांस्ययुग असें म्हणतात. त्यानंतर तो आणखीं सज्ञान होऊन लोखंडाच्या हत्यारांचा उपयोग करूं लागतो. म्हणून त्याच्या ह्या अवस्थेस लोहयुग असें म्हणतात. ही आयुधाची कसोटी आम्हांस कधींही संशयविच्छेदी वाटली नाहीं; कारण निरनिराळ्या ह्या अवस्था निरनिराळ्या वेळीं प्राप्त होतात; एवढेंच नाहीं तर त्या वेळा निरनिराळ्या राष्ट्रांस निरनिराळ्या वेळीं येतात; हें तर काय पण हे लोक व हीं राष्ट्रें त्या त्या अवस्थांतून गेल्यावर ते लोक व तीं राष्ट्रें त्या त्या अवस्थांतील हत्यारांचा सर्वस्वी त्याग करीत नाहींत तर ते लोक व तीं राष्ट्रें त्यास पुढें दीर्घकाल चिकटून राहतात. उदाहरणार्थ, आमचे ऋषी सोमाचा रस सोमयागाकरितां काढण्यास पाटावरवंटा व उखळमुसळी यांचा उपयोग करीत असत व आम्ही त्यांचा उपयोग सध्या चटणी वाटण्यास व पोहे कुटण्यास करितों. म्हणून आम्ही ह्या एकाच सुधारणेच्या पायरी वरील काय ? सोमयाग हीच सुधारणेची केवढी पुढील पायरी आहे बरें ! म्हणून त्यांचे अवशेष जमिनींत सांपडले तर त्यांची तुलना करण्यास कांहीं सर्वसामान्य सादृश्य आढळत नाहीं. उदाहरणार्थ, आपले दक्षिणावर्तांतील गोंडवनांत गोदा व नर्मदा ह्या नद्यांमध्यें गारेचीं हत्यारें सांपडतात. ह्या तृतीय युगांतील आमच्या अवस्थेची तुलना दुनियेंतील कोणत्या लोकांशीं करणें शक्य आहे ! आमच्या वेदांतील सुरासुरांच्या लोखंडी हत्यारांची तुलना दुनियेंतील कोणत्या लोकांशीं करणार ? कारण त्या वेळीं चोहोंकडे शुक्क होतें ! त्याचा उपयोग त्या त्या राष्ट्रापुरता झाला तर होण्यासारिखा आहे. पण ही कसोटी दुनियेस लावण्याच्या कांहीं उपयोगाची नाहीं असें आमचें पक्कें मत

किती दिवसांपासून झालें आहे ! म्हणून आम्ही या योजनेचा उपयोग ओघानें केला असेल तर तो क्वचित असेल ! असें असूनही आमच्या एका विद्वान् मित्रांनीं उखळमुसळ वापरून सोमयाग करणाऱ्या आपल्या किती तरी सज्ञान ऋषींस त्या रानटी लोकांच्या पंक्तीस नेऊन एका लोकमान्य ग्रथांत बसविल्या-बद्दल आम्हांस दोनचार दिवसांपूर्वीं अत्यंत सखेदाश्चर्य वाटलें ! आज सोमयाग करावयाचा झाला तर ते उखळमुसळाची कांहीं नवीन प्रणाली त्यास स्वीकारूं शकतील काय ? व ती त्यानीं स्वीकारिली तर त्या यागास कोणी सोमयाग तरी म्हणेल काय ? ह्याचा सुज्ञांनीं व मर्मज्ञांनीं विचार करावा.

शेवटः-इ० स० १६०० च्या शेवटच्या भागांत श्रीकुमार नांवाचा शिल्प-विशारद होऊन गेला. त्यानें त्याच्यापूर्वीं होऊन गेलेले अनेक संस्कृत ग्रंथ पाहून शिल्परत्न नांवाचा एक संग्राहक ग्रंथ केला आहे. तो अलीकडे केरल देशांत त्रावणकोर येथें छापिला आहे. त्यांत आपल्या ह्या पितृदेशाच्या निरनिराळ्या प्रकारांसबंधें असा उल्लेख आहेः—

त्रियुगं तत् त्रिवर्णंच त्रिचक्रं च क्रमात् स्मृतम् ॥ ४२ ॥
हिमाद्रिकन्ययोरन्तर्गतदेशस्तु भारतः ।
सोऽपि देशस्त्रिधा भिन्नस्तत्तद्देशभवैर्गुणैः ॥ ४५ ॥
यथैव देहिनां देहं वातापित्तकफात्मकम् ।
तथैवेदं जगत्सर्वं विज्ञेयं त्रिगुणात्मकम् ॥ ४६ ॥
हिमविंध्ययोर्मध्यं सात्विकं भूतलं स्मृतम् ।
विंध्यशैलादिकृष्णान्तं राजसं परिकीर्तितम् ॥ ४७ ॥
पुन्हःकृष्णादि कन्यांतं तामसं भूतलं भवेत् ।

यांतील पहिल्या रेघ मारिलेल्या बेचाळिसाव्या कवितेच्या पंक्तींतील त्रियुग, त्रिवर्ग, व त्रिचक्र ह्या संज्ञांमध्यें आपल्या प्रकृतविषयास उद्बोधक किती अर्थ खचून भरला आहे तो पहाः—

| | | |
|---|---|---|
| १ कृत | २ त्रेता | ३ द्वापर |
| युगः—रत्नयुग | पाषाणयुग | प्रस्तरयुग |
| वर्णः—लाल | पिवळा | पांढरा |
| चक्रः—हत्ती | अश्व | रथ |

टिपा—(१) चक्र ह्या संज्ञेचा उपयोग युगाच्या चरणाकडे करितां येण्यासारखा आहे.

(२) रत्नयुग वगैरे नावेंही पूर्वोक्त युगत्रयास अत्यंत समर्पक आहेत.

(३) विंध्य व हिमालय यांतील प्रदेश सात्त्विक, विंध्यापासून कृष्णेपर्यंत प्रदेश राजस व कृष्णेपासून कन्यान्तापर्यंत तामस आहे. सात्विक म्हणजे प्राण्यांचा अवशेष सांपडतात असे खडक, राजस म्हणजे रक्षायुक्त खडक, व तामस म्हणजे अंधेर उत्पन्न करणारे खडक. सात्विक लोक—पांढरे व रथी; जसें, उत्तर हिंदु-स्थानांतील वैदिक व अवैदिक; राजस लोक—पिवळट घोडेस्वार; जसें, मराठे शिलेदार, व तामस लोक—तांबडे गजारूढ; जसें, म्हैसुरी गजारूढ,

# भाग पांचवा.

## उत्तर एशियेच्या (सुमेरुखंडाच्या) चेहेरेपट्टींतील फेरफार.

उद्देश—स्थानशुद्धी.

जगतीं जीं जीं कार्यें घडती ।
आम्ही करितोंसें जीव म्हणती ॥
परि तयांची वास्तव स्थिती ।
कोणास ही कळेना ॥

" जगच्चालक परमेश्वरानें जें हें विश्व निर्माण केलें आहे त्यांत घडणारी प्रत्येक गोष्ट त्याच्या इच्छेनेंच होत असते. झाडाचें पान देखील त्याच्या आज्ञेवांचून हालत नाहीं. त्याच्या कर्तृत्वाची कल्पना देवादिकांससुद्धां होत नाहीं, मग तेथें मनुष्याचा काय पाड ! कर्तृत्वाचा अभिमान बाळगणें हा केवळ भ्रम होय. वास्तविक तें सामर्थ्य एका परमेश्वरासच आहे. जेव्हां एखादी गोष्ट करण्याची त्यास इच्छा होते, तेव्हां तो प्रथम प्राण्यांच्या अंतःकरणांत ती करण्याविषयींच्या वासनेचें बीजारोपण करितो आणि नंतर त्यास सहाय्यजीवन घालून त्यांची वाढ करितो. पुढें त्याच्याच जोपासनेनें वाढलेल्या त्या वृक्षास मधुर फळें येऊं लागतात व त्याचें सेवन करण्याच्या इच्छेनें अनन्यभावानें त्या झाडाखालीं येऊन बसणाऱ्यांसच त्यांची प्राप्ती होते "—श्रीमद्भागवत—भाषांतर—प्रस्तावना.

" असुर्या नाम ते लोकाः । अन्धेन तमसा वृत्ताः ॥ तां ५ स्ते प्रेत्याभिगच्छन्ति । येकेचात्महनो जनाः ॥ "

इशोपनिषत्—मंत्र ३—उप०परमामृतम्—आमचें.

अर्थः—अविद्यारूप दोषामुळें जे जन आत्म्याचा घात म्हणजे तिरस्कार करितात, ते देहाचा त्याग केल्यावर सूर्य न उगवणाऱ्या व म्हणून अंधकारानें व्याप्त असलेल्या असूर्य म्हणजे सूर्य उगवत नाहीं त्या लोकीं जातात.

" The backbone of our present system of determining the series of historic epochs is the geological theory of an ice age comprising a succession of periods of extreme glaciation punctuated by milder intervals."—

*Anthoppology–R. R. Marett–P. 34.*

" उत्तरध्रुव प्रदेशाकडील—वसंत—ह्या ध्रुवप्रदेशांत वसंत सुरू झाला कीं, बर्फ हळूहळू वितळूं लागतें; व मधून मधून तांबडी माती दिसूं लागते. पक्ष्यांच्या झुंडीच्या झुंडी दक्षिणेकडून लोटतात व ध्रुवप्रदेश ५–६ महिनेपर्यंत गजबजून जातो. पक्ष्यांना, ह्या ओसाड प्रदेशांतही दलदलीच्या जागा, सरोवरें व नद्या वगैरे ठिकाणीं लागेल तेवढें भक्ष्य मिळतें. येथें ते घरटीं बांधून त्यांत अंडीं घालितात. अंड्यांतून बाहेर निघालेलीं त्यांचीं पिल्लें हिंवाळा सुरू होण्यापूर्वींच मोठीं

होऊन उडावयास शिकतात; व हिंवाळा सुरू झाला कीं, आपल्या आईबापांबरोबर दक्षिणेकडे उडून जातात. ध्रुवप्रदेशांत सरोवरें नद्या यांच्या कांठीं वास करणारे, पाण्यांत पोहणारे व पक्ष्यांचा माग काढणारे बहिरीससाणा, गरुडपक्ष्यांसारखेही पक्षी तिकडे जातात. ज्या वेळीं ऊन पडलेलें असतें त्यावेळीं फिंच व वार्बल पक्ष्यांचें आनंदगान ऐकूं येतें. लहान लहान झुडपांतून शर्मिगन पक्षी फिरतांना आढळून येतात. ह्या पक्ष्यांचा रंग पांढरा असून ह्यांच्या पायांवर पिसें असतात.

ह्याचवेळीं संमन व स्टर्जन जातीच्या माशांचे थवेच्या थवे समुद्रांतून निघून या प्रदेशांतील नद्यांत शिरतात. ते येथें थोड्या पाण्यांत अंडीं घालितात.

रेनडियर नांवाचीं हरिणें याच सुमारास लिंचेन वगैरे वनस्पतींच्या शोधार्थ इकडे येतात. कारण दलदलीच्या प्रदेशांत उत्पन्न झालेल्या माशा त्यांस फार त्रास देऊं लागतात.

पुष्कळ माणसेंही *शिकारीसाठीं इकडे येतात.

शरद–सपटेंबर महिन्यापासून थंडीस सुरवात होते. थंडी सुरू झाल्याबरोबर हंस वगैरे पक्षी दक्षिणेकडील मार्ग सुधारतात. रेनडियर व मासे आपल्या मूलस्थानीं जातात. मनुष्यसुद्धां ५–६ महिन्यांत जमविलेलीं कातडीं, मांस, पिसें, मासे वगैरे जिन्नस घेऊन परततात. आकाशांतून बर्फ पडूं लागतें व सर्व जमिन नद्या व समुद्र हिमाच्छादित होतो. ह्या बर्फामुळें जमिनीवर उगवलेल्या वनस्पतींचें रक्षण होतें.

येथील अरण्यांत, उष्णकटिबंधांतील अरण्याप्रमाणें विषारी वृक्ष, मोठाले सर्प, निरनिराळ्या जातीचे भयंकर हिंस्र पशु नाहींत. येथील हिंस्रपशु म्हटले म्हणजे अस्वलें, लांडगे, व एक प्रकारचीं रानमांजरें हेत. यामुळें येथील अरण्यांतून प्रवास करणें जवळ जवळ धोक्याचे नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

येथें आकाशांत निरनिराळ्या प्रकारचे मनोहर देखावे दृष्टीस पडतात. हवा सर्द असेल तेव्हां सूर्याभोवतीं चकचकित तेजोवलय दृष्टीस पडतें. याचे रंग इंद्रधनुष्यासारखे असतात. सूर्यास्ताच्या वेळीं बर्फाच्छादित पर्वतांवर सूर्यकिरण पडतात व ते पर्वत नाना रंगांनीं खुलून गेलेले दिसतात. सूर्याभोवतीं कधीं एक किंवा दोन तेजोवलयें असतात. सूर्यापासून एक उभा व एक आडवा असे दोन

*हिंदुस्थानच्या उत्तरेस हिमाच्छादित उत्तरगिरी उत्पन्न होऊन उत्तरकुरूंतील श्रौतभूमी मोडल्यापासून इकडे हिंदुस्थानाचें दळणवळण अजीबात बंद पडलें ! तें इतकें कीं ह्या पारध्यांत हिंदुस्थाचे पारधी येईनासे झाले, त्यांतील कांहींनीं आत्मसंतोषाचा धर्म स्वीकारिला व कांहींनीं अहिंसा धर्म स्वीकारिला, मग शरीरसंबंध जोडून पक्षांप्रमाणें शिशुसंवर्धनाकरितां इकडून तिकडे दर वर्षीं वसंताच्या हंगामामध्यें जाण्याची गोष्ट त्यांच्यांत कशास हवी ! म्हणून परिणाम काय झाला ? वसंतांत उत्तरेस जाण्याची पुरातन वहिवाट कायम ठेवणाऱ्या पक्षांप्रमाणें त्यांचें आरोग्य व काटकपणा यथापूर्व राहिला नाहीं !

पट्टे निघून तेजोवलयांना स्पर्श करून ते पलीकडे जातात असें वाटतें व ज्या ठिकाणीं हीं एकमेकांस लागलेलींशीं दिसतात त्या ठिकाणीं एक एक नवीन सूर्य दिसूं लागतो. रात्रीच्या वेळीं बहुतकरून आकाश प्रकाशपटलानें भरून जातें. ह्या पटलाचे दोन प्रकार आहेत. कधीं कधीं हा उंच कमानी सारखा तर कधीं कधीं हालत्या झालरीसारखा दिसतो. या पटलांत लाल हिरव्या पिवळ्या रंगाचे पट्टे असतात.

समुद्रकिनाऱ्यावरची मजा तर कांहीं निराळीच आहे. कांही ठिकाणीं स्कूआ पक्षी माशांच्या तुकड्यांकरितां आपसांत भांडतांना आढळतात; कोठें पेनग्विन पक्षी समुद्रांत उड्या मारतांना आढळतात. समुद्रांत आलबेट्रास पक्षी पाण्यांत पोहतांना आढळतात. युयुत्सु सीलमाशांची झोंबी लागलेली दृष्टीस पडते. कांहीं ठिकाणीं देवमासे हवेंत उंच पाण्याचे फवारे उडवितांना दृष्टीस पडतात.

पेनग्विन पक्षांस मनुष्याचा सहवास आवडलेला दिसतो. कारण मनुष्य पाहतांच हे त्यांच्या भोंवतीं जमा होऊं लागतात. पण त्यांच्या माद्या अंडीं उबवीत असतांना मनुष्य जवळ गेला तर त्यांना फार राग येतो,

ततस्ते नियतात्मान उदीचीं दिशमास्थिताः ।
ददृशुर्योग युक्ताश्च हिमवंतं महागिरीम् १६ ॥
तं चाप्यतिक्रमंतस्ते ददृशुर्वालुकार्णवम् ।
अवैक्षंत महाशैलं मेरुं शिखरिणां वरम् १७ ॥ महाप्र. १

अर्थः—नंतर ते इंद्रियनिग्रही पांडव उत्तरेस जाऊं लागले असतां त्यांनीं प्रथम हिमालय महागिरी पाहिला. तो उलटून गेल्यावर त्यांला वाळूचा महासागर ( गोबीचें वाळवंट ) लागला. व त्यांनीं पर्वतश्रेष्ठ जो महामेरू तो पाहिला. अर्थात्, याप्रमाणें त्यांना प्रथम उत्तरेस हिमालय प्रर्वत, नंतर गोबीचें वाळवंट व पुढें लगेच मेरुपर्वत लागला. असें स्वर्गाच्या रस्त्याचें वर्णन आहे तर ह्यांत उत्तरध्रुव किंवा कुमेरू मोडतो असें दिसत नाहीं व त्या दोन मेरूमध्येंच इंद्रस्थान होतें असें दिसतें.

ह्याच्या पुष्टीस वनपर्वांतील अर्जुनाच्या इंद्रस्थानाकडल्या उत्तरेकडील प्रवासांतील पुढील श्लोक वाचा:—

सोऽगच्छत्पर्वतं पुण्य एकान्हैव महामनाः ॥ ४८४ ॥
हिमवंतमतिक्रम्य गंधमादनमेवच ।
अत्यक्रामत्स दुर्गाणि दिवारात्रमतांद्रितः ॥ ४८५ ॥

---

चोहोंकडून बंद डबक्यांतील पाणी सडतें, तसा चोहोंकडून बंद हिंदुस्थानांत ते कित्येक शतकें सारखें सडत राहिले आहेत ? ही स्थिती त्या हिंसक लोकांची ? मग इतरांची स्थिती काय पुसता ? इकडे जैन धर्म बोकाळल्यापासून त्यांस परदेशचे पाहिजे ते हिंसक लोक मारून त्यांच्या धनधान्य संपत्तीचे मालक बनत आहेत ! कारण येथील मूळच्या लोकांत स्वसंरक्षणाची कर्तबगारी राहिली नाहीं ह्याचा दांडोरा

ह्या प्रवासांत अर्जुनाला हिमालय, गंधमादन वगैरे पर्वत इंद्राकडे जातांना रस्त्यांत लागले आहेत.

मागील भागांत पितृदेशाचें ( हिंदुस्थानच्या ) चेहेरेपट्टींतील फेरफारांचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत वसाहत देशाच्या ( उत्तर एशिया ) चेरेपट्टींतील फेरफारांचें वर्णन कर्तव्य आहे. पण तें अदृष्टपूर्व व अश्रुतपूर्व असल्यामुळें तें कितीही चमत्कारिक व हृदयस्पर्शी असो, पण तें वाचकांनीं अमळ दमानेंच ग्रहण केलें पाहिजे. कारण तें शास्त्रीय पद्धतीचें असल्यामुळें तें कादंबऱ्यांतील द्राक्षापाकाच्या खाद्याप्रमाणें भराभर घशाखालीं उतरण्यासारिखें नाहीं. पण ह्या मेहनतीच्या मानानें तें त्यांच्या मनास शक्तिवर्धक होईल, तें त्यांस कधींही ग्लानी येऊं देणार नाहीं. कारण त्याचा स्वपराक्रमाशीं संबंध आहे. एरवीं आपले पूर्वज कठीण जमिनींत कसे कठीण होत होते, हें तर काय पण त्यांचे आचार विचार व शरीरसंबंध कसे रोजच्या खटाखटीचे होते—ते हिंसाप्रधान यज्ञयाग कसे करीत व ते वीरसू स्त्रिया, लढाया मारून कशा मिळवीत व ते पितृदेशापासून वसाहत देशापर्यंत कशी आत्मनिरपेक्ष हुतूतू वरील पशुपक्षांप्रमाणें घालीत हें पंजाब मेलच्या वेगानें वाचन करणारास समजेल, पण तें त्यांस वर्तनांत उतराविण्यास खरें उमजणार नाहीं. तो या दुनियेंतील प्रवासी जसा मेलेला आला तसा मेलेलाच परत जाईल. त्याच्यांत पराक्रमाची स्फूर्ती कशी ती म्हणून बिलकुल होणार नाहीं, मग तो साहेबी बूट पाटलूण कितीही सुधारणादर्शक आंगावर चढवो !

**सुमेरुखंड**—आकाशांतील उत्तर ध्रुवावरून पृथ्वीवरील उत्तरध्रुवाकडे पाहिलें तर त्याच्या डोक्यावर जणू बर्फ व हिम ह्याचा पांढरा शुभ्र टोप दिसतो. त्या भोवतीं उत्तरमहासागराची मोठी झालर आहे. त्या झालरींत कांहीं बेटांचें गोंडे आहेत व त्या गोंड्यांत एशिया, युरोप व अमेरिका हे मोठे गोंडे आहेत. त्यातील अमेरिका नामक गोंड्यांत ग्रीनलंड म्हणून एक पाचेचा हिरवाचार लोलक आहे.

हा उत्तरध्रुवस्थ प्रदेश अत्यंत थंड आहे. ह्यांत ४½ महिने उन्हाळा व बाकीचे ७½ महिने हिंवाळा असतो. उन्हाळ्यांत येथें सूर्य कधींच मावळत नाहीं. म्हणून येथें साडेचार महिन्यांचा एक दिवस होतो. ह्या साडेचार महिन्यांच्या दिवसभर सूर्य तेथील क्षितिजाजवळ राहतो, म्हणून अर्थात तेथें रात्र कशी ती मुळींच होत नाहीं. याप्रमाणेंच गोष्ट येथील हिंवाळ्याची होते, म्हणजे येथें हिंवा-

---

जगभर वाजून राहिला आहे व हिंसक लोक वरल्या पारध्यांप्रमाणें उत्तरेकडे जावयाचें सोडून ह्या हिंदुस्थानाकडे कित्येक शतकें धावत आहेत ! हा एवढा जमीन अस्मानाचा फेरफार कशानें केला ? एका हवेनें ! दुनियेंतील एका वसंत ऋतूच्या जागीं हिमालयाच्या उत्पत्तीच्या काळापासून शीत, समशीतोष्ण व उष्ण कटिबंध चालू झाल्यामुळें आमचे लोकांनीं सर्व साहस परदेशांस अर्पण केलें व स्वतः आय-

ळ्यांत सूर्य क्षितिजावर कधींच दिसत नसल्यामुळें येथें साडेसात महिन्यांची रात्र असते. ह्या दीर्घकालिक रात्रभर येथें अखंड काळोख असतो अशी गोष्ट घडत नाहीं. येथें एक सुंदर प्रकाश आकाशांत विजेप्रमाणें चमचमत असतो. त्यास वैदिक भाषेंत उषा व पाश्चात्य शास्त्रीय भाषेंत एरोराब्रोरिआलिस म्हणजे विद्युद्वलय असें म्हणतात. सदरहू मोठा दिवस व मोठी रात्र यांच्या दरम्यान दोन लहान ऋतू होतात. त्या दोन ऋतूंत सूर्य हा जणूं सदरहू उषेच्या शोधार्थ क्षितिजावर येतो व ती उषा तत्क्षणीं पळते त्याबरोबर तोही तिच्या मागोमाग जातो.

ग्रंथांतीलप्रमाणें—कै. विद्वद्वर्य बा. गं. टिळक यांनीं आपल्या आर्टिक होममध्यें आठव्या भागांत ऋग्वेद, एतरेय ब्राह्मण, तैतिरीय संहिता इंग्रजी डिसेंबर महिन्याचा इतिहास व अवेस्ता यांप्रमाणें ज्या ठिकाणीं उजेड दहा महिने व काळोख दोन महिने होता, त्या ठिकाणीं आर्य राहत होते असें ठरविलें आहे. यावरून त्यांचे आर्यावर्ताची उत्तरमर्यादा उत्तर ध्रुवापासून पुष्कळ दक्षिणेस होती हें सिद्ध होतें.

प्रयत्नासिद्धप्रमाणें—वरील उत्तर महासागरांतल्या ग्रीनलंड बेटाशिवाय कोणत्याही इतर बेटांत मनुष्याची वस्ती नाहीं. त्या बेटांतील लोकांस एस्कीमो असें म्हणतात. येथें वनस्पती तर काय पण गवतही उगवत नाहीं. म्हणून येथें गुरेंढोरें किंवा बकरीं मेंढरें नाहींत व त्या एस्कीमोस खावयास धान्य व दूध मिळत नाहीं. त्यांस सावजे व मासे खाऊन आपला निर्वाह जेमतेम चालवावा लागतो. ते सील, वालरस वगैरे जलचर प्राण्यांचें मांस खातात व सील व आस्वलें यांचीं कातडीं पांघरतात व सील माशांच्या कातड्यांच्या तंबूत राहतात व लहान होड्यांनीं समुद्रावर फिरतात. त्यांस हिंवाळ्याकरितां अन्नवस्त्रांची तरतूद उन्हाळ्यांत करावी लागते; ते हिंवाळ्यांत आपल्या येथील चुन्याच्या भट्टयांसारख्या बर्फाच्या घरांत राहतात. त्या घरास दार त्या भट्टयांच्या वारा जाण्याच्या छिद्राप्रमाणें भुईजवळ ठेविलेलें असतें. ते बर्फावर स्लेजिस नामक बिनचाकी निसरणाऱ्या गाड्यांस कुत्रे जोडून फिरतात. त्यांस खावयास मिळेनासें झालें तर ते त्या कुत्र्यांस मारून त्याचें मांस खाण्यास कमी करीत नाहींत. लांकडें मिळत नाहींत म्हणून त्यांस अन्न कच्चें खाण्यावांचून गत्यंतर नसतें. घरांत उबारा यावा म्हणून ते मारलेल्या जनावरांची चरबी घालून दिवे तेवत ठेवितात. थंडीनें गारठूं नयेत म्हणून ते डोक्यांत टोप्या,

---

दोजी व एकलकोंडे होऊन बसले ! त्यास त्यांनी हिमालयापलीकडे आगगाड्यांनीं वा विमानांनीं गेलें पाहिजे ! तदर्थ त्यांनीं पाहिजे तेथें हिमालयांत बोगदे पाडण्यास कमी करूं नये; कारण हिंदु राष्ट्रांतील साहसाचा खून प्रथम ह्यानेंच कसा पाडिला हें आपण मागल्या भागांत पाहिलेंच आहे. आपणास आपल्या दोहोंबाजूंच्या समुद्रापलीकडे गेलेंच पाहिजे. मनुस्मृतींतील नवीन घातलेल्या मनाईमें आपणांस दबून बसण्याचें कारण नाहीं. ह्या नियमाने आमचें नौकानयन बुडविलें आहे. रानाच्या मोकळ्या वाऱ्याची बरोबरी घरच्या भाऱ्यांस करितां येत नाहीं आमच्या राष्ट्राच्या आरोग्यास बाहेरील मोकळी हवा हवी आहे.

आंगांत आंगरखे, पायांत बूट, हातांत हातमोजे हे सीलच्या कातड्याचे घालितात. ते पोटम्हातारे होत असल्यामुळें ते जाडीनें व उंचीनें फार कमी वाढतात. झाडून सर्व उंचीनें पांच फुटांपेक्षां कमी असतात. त्यांचे चेहेरे वाटोळे व डोळे व केश काळे असतात. वरील ईशोपनिषदांतील अवतरण पहा. यावरून ह्या मंत्रद्रष्टयास त्यांत वर्णिलेला असुर्य लोक स्वर्गासारखा इष्ट वाटत होता असें दिसत नाहीं.

इ. स. १९१३ सालीं मि. स्टिफेन्सन नामक एक क्यानडांतील संशोधक उत्तरध्रुव व सिबिरिया व कानडा यांच्यामध्यें जो बाफर्ट नांवाचा एक समुद्र आहे त्यामध्यें कांहीं अज्ञात भूमी आहे कीं नाहीं ह्याचा तपास करण्याकरितां निघाला होता. त्यानें ज्या पूर्वापरिचित भूमीचा शोध लाविला त्याच्या प्रवासाचें रूपरेखन व वर्णन पुढीलप्रमाणें आहेः—

" जेथें एस्कीमो नांवाचे लोक राहूं शकतात, तेथें गोऱ्या युरोपियनास राहतां आलेंच पाहिजे. अशा निर्धारानें तो स्टिफेन्सन चार गोरे लोक व दोन एस्कीमो बरोबर घेऊन क्यानडांतून ह्या सफरीस निघाला. तीन महिने गेले असतील नसतील तोंच त्यांजवर एक अस्मानी आफत गुदरली. ती अशी कीं स्टिफेन्सन प्रमुख मंडळी एका भूप्रदेशावर ताज्या मांसाच्या शोधार्थ फिरत असतां त्यांचें कार्लुक नांवाचें गलबत त्यांच्या डोळ्यांदेखत वाऱ्यानें भरारा उडत चाललें. तें असहाय्य स्थितींतून बर्फांतून जातां जातां एके ठिकाणीं बर्फाचा दाब त्याजवर एवढा बेसुमार झाला कीं त्या गलबताच्या हां हां म्हणतां चिंधड्या उडाल्या व तें बर्फांतून समुद्राचा तळ पाहतें झालें. ! त्यावरील बार्टलेट नांवाचा नाखवा व नावाडी कपाळाला हात लावून बर्फावर पडले ! व त्यांतील तीन जण मेले व आठ बेपत्ता झाले ! !

इकडे स्टिफेन्सन प्रभृती जी मंडळी बर्फाच्छादित भूमीवर अडकली होती: तिच्या जवळ पोट भरण्यास—रायफल बंदुका व अक्कलहुशारी—यांशिवाय कांहीं नव्हतें ! ती मण्डळी पूर्वी निर्धार केल्याप्रमाणें न डगमगतां एस्कीमोप्रमाणें प्रत्यक्ष काळ कंठूं लागली ! ती मॅकेन्झी नदीच्या मुखापासून गोठलेल्या समुद्रावरून उत्तरेकडे निघाली. ती नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें वाहवत जाववेल तितकें प्रथम गलबतांतून व नन्तर होड्यांतून गेली नाहीं, तर ती बर्फावरून तडक पार्यी निघाली. त्यांस सुदैवेंकरून दोन लहान गलबतें भेटलीं. तीं त्यांच्या दक्षिणेकडील सफरीपैकीं होतीं. तेथून स्टिफेन्सननें सामुग्री घेतली, व दोन सोबती घेऊन पूर्वोक्त स्लेजिस नामक होड्यांत बसला, व अज्ञात भूमीच्या शोधार्थ इ. स. १९१४ च्या मार्च महिन्यांत निघाला.

त्यांच्याबरोबर सामुग्री पुरविणारे लोक होते. त्यांनीं स्लेजिसमध्यें अन्न घालून तें आपल्याकडील कावळ्यांप्रमाणें अनेक ठिकाणीं नेऊन ठेविलें. तें अशाकरितां कीं तें त्या साहसी शोधकांस परत येतांना ताबडतोब मिळावें. ही सामुग्री पुरविणारी मण्डळी ता. २७ एप्रिल रोजीं आलास्काकडे वळली व

त्या दिवशीं तो स्टिफेन्सन अज्ञात जगाच्या भयाण प्रदेशांत निधड्या छातीचे कांहीं लोक बरोबर घेऊन शिरला. त्या वेळेपासून आर्टिक महासागरांतील बेंकी बेटांत त्याच्या सुखरूपतेची अहवाल इ. स. १९१६ त येऊन पोहोंचेपर्यंत ज्ञातभूमींतील लोकांस त्याजकडील कांहीं गंधवार्ता कळलेली नव्हती. ते तिघे जण होते. त्यांच्या बरोबर सहा कुत्रे, एक स्लेज, अन्नसामुग्री, रायफली व दारुगोळा होता. ज्या भूमीवर मनुष्यें कधींही गेलीं नव्हतीं. त्या भूमीवरील गोठलेल्या समुद्राच्या पाठीवरील बर्फाच्या मैदानांत त्यांनीं प्रवासास सुरवात केली.

त्या मैदानांतील बर्फाचे समुद्र, बर्फाचे वडे [ केक्स ] बर्फाचीं बेटें, बर्फाचे खडक, पाण्याचीं सरोवरें, व गल्ल्या यांमध्य ते थोड्याच वेळांत सांपडले. भयंकर वादळें झालीं. बर्फाचे ढोकळे एवढे मोठाले उसळून बाहेर पडूं लागले कीं तेणेंकरून आपण आतां खचित मरतों असें त्यांस क्षणोक्षणीं वाटत होतें, व एक अखंड वाहणारा प्रवाह त्यांस इष्ट मार्गापासून सतत सारखा दूर वाहून नेत होता. सरते शेवटीं ते तुफानाचे वारे थांबले व तेथील पाणी गोठूं लागलें. पुढें सतत सारखा सूर्यप्रकाशाचा उन्हाळा रात्रंदिवस लागला. त्याबरोबर त्याजला मऊ व अखंड बर्फ व शून्य अंशाखालीं २० अंश उष्णतामान अनुभवावें लागलें. पण तें बर्फ जरी अगदीं घट्ट झालेलें होतें तरी तें एखाद्या मोठ्या हालणाऱ्या तराफ्याप्रमाणें होतें व तें त्यांस बँकबेटापासून दूर दूर नेत होतें व त्या प्रदेशीं पोहोचण्यास त्यांस जिवापाड मेहनत करावी लागत होती. तेथें त्यांचें सर्पण सरलें व त्यांस पाण्याच्या ऐवजीं दहा दिवस बर्फ, हिम व चरबी चोखणें भाग होतें. सरते शेवटीं जेथें त्यांस सील नांवाचे मासे शोधावयाचे होते, तेथें त्यास वरवा करावा लागला. वरवा म्हणजे होड्या, गलबतें थांबविणें. त्यांनीं त्या ठिकाणीं अन्नाकरितां ते मासे व विस्तव पेटविण्याकरितां, त्यांची चरबी व हाडें पाहिजे तितकीं गोळा केलीं.

तेथें तुफानाच्या ज्या वावटळी येत, त्या त्यांचे पाय बँकबेच्या प्रदेशाला लागूं देतना. पण एक गोष्ट मात्र सुखाची झाली होती. ती ही कीं त्यांचेजवळ अन्न-वस्त्राचा पुरवठा भरपूर होता. कारण अन्नाच्या वासानें ओढून आणिलेलीं आस्वलें त्यांच्या मुक्कामावर समूर तडक चालून येत असत व ते त्यांस मारीत असत. पुढें शहाण्णव दिवसांनंतर ती मण्डळी त्या प्रदेशीं सुखरूप पोहोंचली. साठ वर्षांपेक्षां जास्त वर्षांपूर्वीं त्या बँकस बेटाच्या प्रदेशीं गोरे लोक एकदां गेले होते, व त्यावर तेथें पुढें कोणी गेलेलें नव्हतें. म्हणून तेथें रेनडियर नांवाचीं हरणें, आस्वलें व सील या शिकारीच्या प्राण्यांची रेलचेल होती, व त्यांपासून त्यांस अन्न व वस्त्रें या दोहोंचाही भरपूर पुरवठा झाला.

त्याची सुटका करण्यास कांहीं गलबतें नियमित ठिकाणीं येण्याचें ठरलें होतें. पण तीं त्या ठिकाणीं आलेलीं नव्हतीं. म्हणून स्टिफेनसनला दक्षिणेस केलेट भूशिरापर्यंत लांब जावें लागलें. तेथें त्याला मेरी सॅक हें गलबत आढळलें. तें

तेथें हिंवाळ्याकरितां वरवा करून होतें, व त्याच्या नाखव्यास आपला पुढारी मेला आहे असें वाटत होतें. त्यांचे बेतबात पूर्वी ठरलेले होते. पण त्यांत जो कांहीं घोटाळा झाला होता, तो कांहीं गैरसमजुतीनें झाला होता. पण तेणेंकरून स्टिफेन्सन जिवाला मुकला अशी समजूत झाली होती व तो प्रसंग तसाच प्रकार होण्यासारिखा होता. पण त्याचा पुढारी कंटक व शूर असल्यामुळें त्या सगळ्या घोटाळ्याचा शेवट गोड झाला, व इ. स. १९१५ च्या वसंतऋतूंत तो निधड्या छातीचा संशोधक तीन सोबत्यांसह स्लेजिसवरून थेट उत्तरेस जाण्यास पुन्हां निघाला.

यापुढें आणखीं हृदय थरारविणारीं साहसें, बर्फाचे वडे, उघडें पाणी, स्लेजिसचें तराफ्यांत रूपांतर, मृत्यूच्या जबड्यांतून निसटत्या सुटका, धुकीं व बर्फाचीं वादळें दत्त उभीं होतीं. पण ते प्रिन्स पॅट्रिक बेटाजवळील अगदीं उत्तरेकडच्या भूशिराजवळ जाऊन पोहोंचले. तेथें त्यास शूर एम. क्लिन्टॉकनें सुमारें साठवर्षांपूर्वी करून ठेवलेली नोंद सांपडली.

आणखीं उत्तरेस गेल्यावर त्यांनीं एक मोठा शोध केला. तो हा कीं त्याच्या ईशान्यभागीं एक नवीन जमीन आहे. तींत टेंकड्या व डोंगर बर्फाच्या समुद्रापर्यंत जाऊन भिडलेले तिच्या अंतर्भागीं आहेत. तो प्रदेश केवढा मोठा आहे ह्याचा निःशेष शोध लावण्याइतका तो सफरीचा हंगाम पुष्कळ दिवसांचा नव्हता. कारण पुढें पक्का हिंवाळा लागण्याची वेळ झाली होती. पण त्यांना जे शोध करितां आले, त्यावरून येवढें उघड झालें कीं तेथें जाणाऱ्या लोकांच्या अन्नवस्त्रांच्या पुरवठ्याकरितां लागणाऱ्या जंगली जनावरांची तेथें रेलचेल आहे; कारण तो प्रदेश जरी माणसांस ठाऊक नसला तरी रेनडियर नामक हरणांस पुरा परिचित आहे. तो इतका कीं त्याचे कळपच्या कळप येथें राहतात.

फळः—ह्या मोहिमेचें फळ काय ? म्हणून पुसाल तर सांगणें कीं हा प्रदेश व त्याजवळचीं लहान लहान बेटें ह्यांचे शोध होत.

हे शोध केल्यावर त्या मण्डळीची अगदीं उपासमर होण्याची पाळी आली, तेव्हां ती परतून ता. ८ आगस्टला बॅंकस बेटावरील कॉलेट भूशिराला येऊन पोहोंचली. येथें सुदैवानें अशी मौजेची गोष्ट घडली कीं त्यास येथें येऊन तीन दिवस झाले असतील नसतील तोंच लुइलेन नांवाचा एक शूर नाखवा पोलर बेअर नांवाचें देवमच्छीमार गलबत घेऊन त्या उत्तरमहासागरांत तेथें आला.

येथून स्वदेशीं जाण्यास उत्तम सोय होती. पण स्टिफेनसन स्वदेशीं जाण्यास खुशी नव्हता; कारण त्याची कामगिरी पुरी झालेली नव्हती. त्यानें आपले जवळ जें शिल्लक द्रव्य होतें, तें देऊन पोलर बअर नांवाचें गलबत खरेदी केलें, व तो त्या नवीन घेतलेल्या गलबतांत बसून हर्शेल बेटाला गेला; कारण तेथें त्याची अन्नसामुग्री साठविलेली होती. तो जणू घटकाभर करमणुक करण्याकरितां धुक्यांतून बाहेर पडला होता व त्यानें कांहीं गाजावाजा न करितां आपला फराळ झटझट आटोपला व १९१६ त त्या अज्ञात भूमीच्या शोध करण्यास तो आपले उद्दे

हात धुवून तावडतोब त्या धुक्यांत चालता झाला. तिकडे जातांना त्यानें पुढील त्रोटक संदेश स्वदेशीं पाठविला; तो असा कीं तो जणू कोठें एखाद्या अर्ध्या दिवसाच्या सहज सहलीस जात आहे:—

" आम्ही उदईक बँक्स बेटाला जलमार्गानें जाण्यास निघणार आहों. "

ही उत्तरध्रुवाकडील परिस्थितीच्या शोधाची माहिती मुद्दाम सविस्तर व तपशिलवार दिली आहे, ती देण्याचे उद्देश येणेंप्रमाणें—

कडें:—( १ ) ही अगदीं नवी माहिती आमचे लोकांस कळावी. तीवरून त्याच महासागरांतील सिबिरियाच्या वरचें रंगेल बेट, न्यू सिबिरिया बेट, नोव्हा झेंब्लिया बेट व स्पिटस्बर्गेनबेट कीं ज्याविषयीं भूगर्भशास्त्रवेत्त्यांच्या अनुमानांत अशी एकवाक्यता आहे कीं एके वेळीं ह्या बेटाच्या अखंड खंडाच्या भूमीचें एक कडें उत्तर ध्रुवा' भोवतीं होतें व दहा बारा हजार वर्षांपूर्वीं इओसीन काळांत पृथ्वीच्या पोटीं हिमालय जन्मला तेव्हां बर्फाचा जो पूर्वोक्त जलप्रलय झाला त्यांत शिमग्यांत आपल्या पोरांच्या हातांतील साखरेचें कडें जसें पाण्यांत हांहां म्हणतां विरघळतें त्याप्रमाणें हें ध्रुवाभोवतालचें कडें एकदम विरघळलें ! तें कां याचें अनुमान वाचकांनीं बसल्या जागीं करावें.

( २ ) आम्ही वरील कलमांत ' कांहीं अनुमान बसल्या जागीं करावें' हे शब्द मुद्दाम वापरले आहेत; कारण येथें कोंडलेले राहिल्यामुळें आमचे लोक बसल्या जागीं चुटक्यांचे मांडव उभारावयास शिकले आहेत.—त्यांचें कर्तृत्व सगळें इतकें मावळून गेलें आहे कीं जेथें एस्कीमो राहूं शकतात तेथें आम्ही हिंदी लोक राहूं शकूं अशा निर्धारानें वागणारे लोक आमच्या देशांत अवषधालाही सांपडावयाचे नाहींत. पण त्या अलीकडे अज्ञात होऊन पडलेल्या यज्ञभूमीचा शोध त्यांस स्वतः आंगें लावावयाचा असेल तर त्यांस त्या कामाकरितां वरील स्टिव्हेन्सनप्रमाणें मूर्तिमंत एस्कीमो बनणें अत्यंत अगत्याचें आहे. कारण ही भूमी झाडून सर्व मानवजातीचें उत्पत्तिस्थान अथवा स्वर्ग होय असें डा. वॉरेन नामक एक पाश्चात्य पण्डित म्हणतो; एवढेंच नाहीं तर आमचे कै० विद्वद्वर्य टिळकही ती श्वेतभूमी झाडून सर्व मानवजातीचें उत्पत्तिस्थान अथवा स्वर्ग होय असें म्हणतात, मग त्या दोन्ही पण्डितांत कांहीं थोड्या बाबतींत थोडा फरक कां असेना. डा. वॉरेन म्हणतात कीं झाडून सर्व मानवजातीची उत्पत्ती ध्रुवाभोंवतीं झाली व विद्वद्वर्य टिळक म्हणतात कीं सर्व मानवजातीची उत्पत्ती उत्तरध्रुवाभोंवतीं झाली किंवा दुसरे कोठें झाली हें आम्हांस निश्चयानें सांगतां येत नाहीं. पण पंचजन व त्यांचे पूर्वज—हिंदू लोकांच्या पूर्वज आर्यांसुद्धां—एके वेळीं त्या उत्तरध्रुवावर किंवा मेरुपर्वतावर राहत असत ह्यांत संदेह नाहीं, मग ते पंचजन पांढरे, तांबडे, काळे, पिवळे व फिके असोत वा नसोत हा क्षुल्लक भेद सोडून दिला तर इतर बाबतींत विद्वद्वर्य टिळकांचें प्रतिपादन डा. वॉरेनच्या सिद्धान्ताचें पुरे समर्थन करणारें आहे ह्यांत संशय नाहीं. शिवाय डॉ. वॉरेननें ह्या मानवजन्मभूमीस स्वर्ग असें नामाभिधान दिलें आहे, व आपल्या

लोकांत-'मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं'-अशी म्हण रूढ आहे तर ह्या स्वर्गाचा शोध जातीनें मरमरून आपल्यास करणें सयुक्तिक दिसतें. कारण विद्वद्वर्य टिळक हे म्हणतात कीं सदरहू पर्वतावर आर्यांचे देव राहत असत. तर हिंदूंचें स्वर्ग या मेरुपर्वतावरच होतें असें धरून काय अडचणी येतात त्या पाहूं. कारण पूर्वोक्त अज्ञातभूमीपासून स्पिटस्बर्गेनपर्यंत जो उत्तर महासागर ध्रुवाभोंवतीं आहे तो फार उथळ आहे व तेथें उषा देवीचें साम्राज्य आहे. त्या साम्राज्याचें वर्णन डॉ. वॉरेन असें करितातः—

"रात्रीच्या आकाशाच्या क्षितिजावर दिसते न दिसते अशी एक प्रकाशाची लुकलुक प्रथम दिसूं लागते. तेणेंकरून पहिल्यानें कांहीं ताऱ्यांची प्रभा थोडीशी मंद होते, पण थोड्या काळानंतर ती प्रकाशाची लुकलुक वाढत जाते व अजून काळ्या असलेल्या क्षितिजावर ती आजूबाजूनें फिरते. पुढें चोवीस तासांनीं ती द्रष्ट्याभोंवती एक पुरी प्रदक्षिणा करिते व पुष्कळ ताऱ्यांस ती अगदीं मंदप्रभ करून टाकिते. लौकरच तिचा रुंदावणारा प्रकाश मोतिया रंगाचा होतो. तो प्रकाश ऐटीनें पुढें पुढें फेऱ्या घालतां घालतां शेवटीं त्या मोतिया रंगाचा गुलाबी रंग होतो व त्या रंगास जांभळी व सोनेरी झालर फुटते. दिवसापाठीं-मागून दिवस मोजीत असतां हें तेजस्वी मोठें वाटोळें चित्र गरगर फिरतें, व वातावरण व अभ्रें ह्यांची स्थिती परावर्तनास जशी अधिक उणी अनुकूल असेल तसें त्यांचें तें तेजोवलय पेटतें व विझतें, व अंतर्हित सूर्यनारायण जसजसा उदयाचलाजवळ येतो तसतसें तें अधिक तेजानें पेटतें. सरते शेवटीं दोन महिनेपर्यंत हे बिनीचे देखावे आकाशाभर वाढत्या व फिरत्या तेजानें आविर्भूत होतां होतां फार दिवस (लोकमान्य टिळकांप्रमाणें निर्ऋतींत (पाताळांत)-अमेरिकेंत) एकांतीं राहावयास गेलेला सूर्यनारायण बाहेर येऊन लोकांस पुन्हां दर्शन देऊं लागतो. त्याचे एक दोन फेरे झाल्यावर त्याचा वरचा देदिप्यमान भाग पुरा चक्राकार होतो व त्याच्यापासून दूरच्या क्षितिजावर असलेल्या डोंगरांची शिखरें तो साफ करितो व पुरे सहा महिनेपर्यंत पृथ्वीच्या आखाभोंवतीं सर्वांसमक्ष प्रदक्षिणा घालितो, पण ध्रुवाजवळील आपल्या आवडत्या घराच्या जागेवर बिलकूल उजेड पडूं देत नाहीं. शेवटीं तो पुन्हा दृष्टीआड जातो तेव्हां देखील तो पुष्कळ वेळ उगवत असतां तो जसा दाट व पातळ होणाऱ्या तेजानें आपल्या आगमनाचा मार्ग सुप्रकाशित करितो, जणूं काय, तो आपल्या अधिकाधिक दूरच्या प्रकाशाच्या लुकलुकाटानें सोडलेल्या गोलार्धांतील लोकांस लौकरच पुनरागमन करण्याच्या वचनाच्या व भविष्याच्या खुणा ( सिग्नली ) देऊन राहिला आहेः-" पॅरेडाईस फाउंड-पान.-६९-टिळकांचें आर्टिक होम-पान ४९.

प्रमाणेंः-( १ ) उत्तर ध्रुवाजवळ तेथील वर्षाचे ऋतुविभाग पुढील प्रमाणें आहेतः-१९४ दिवसाचा सूर्यप्रकाश; ७६ दिवसांचा काळोख; ४७ दिवसांचा उषःकाल; व ४८ दिवसांचा संधिप्रकाश. असें वॉरेनच्या वरील पुस्तकांत लगेच दिलें आहे.

( २ ) उत्तरध्रुव किंवा मेरुपर्वत व त्याच्या भोवतालचा प्रदेश हिंदूंचा स्वर्ग लोक होय म्हणून ठरविण्यास विद्वद्वर्य टिळकांनीं तैतिरीय संहितेच्या ज्या मंत्रावर मुख्य मदार ठेविली आहे तो मंत्राचा भाग असा आहे:—

त्रिँशत्सार उष यन्ति निष्कृत ँ समान केतुं प्रतिमुञ्चमानाः ॥

तै. सं. खंड ४ प्रकरण ३ अनुवाक ११-६

अर्थः—तीस बहिणी बहिणी ( उषा ) एकच निशाण घेऊन नियमित स्थळाकडे ( निष्कृतम् ) जातात.

सिद्धान्तः—यावरून काय सिद्ध होतें ? हे तैतिरीयशाखोक्त आर्य जेथें रहात असत तेथें ४७ दिवसांचा उषःकाल नव्हता तर तो—केवळ ३० दिवसांचा—होता.

अप्रत्यक्ष परिपोषः—आम्हांस तर काय पण महाशोधक कै. ज्योतिर्विद दीक्षित यांस झाडून सर्व वेदांत मेरुपर्वताचें नांव व त्यावरील त्यांच्या वसाहतीचा उल्लेख दूरान्वयाचाही आढळला नाहीं. तेव्हां आमचें स्वर्ग किंवा उत्तर आर्यावर्त या मेरुपर्वतावर व त्याच्या भोवतालच्या कड्यावर खास नव्हतें. तर तें ३० दिवसाच्या उषःकालाचें साम्राज्य ज्या स्थळीं नांदत होतें त्या स्थळीं आमच्या उत्तर आर्यावर्ताची किंवा सुमेरुखडाची ( समरकंद ) सीमा होती—हें निखालस सिद्ध झालें.

पहाणी.—आतां आपण उत्तर ध्रुवापासून ३० दिवसांच्या उषेच्या सीमेपर्यंत दक्षिणेस हटलेल्या उत्तर श्रौतभूमीच्या किंवा उत्तर आर्यावर्ताच्या किंवा सुमेरुखंडाच्या (समरकंद) मुखारविंदाची किंवा चेहेरेपट्टीची पहाणी करूं:—

सिबिरिया —( १ ) इ. स. १९११ त मि. कोरेव नांवाचा सृष्टिशास्त्रवेत्ता येल विश्वविद्यालयाकरितां उत्तरध्रुवस्थ प्राणी व वनस्पती जमविण्यास अमेरिकेंतून एशियांतील सिबिरियांतील कोलिमा नदींत शिरण्यास्तव निघाला. त्याचे प्रवासाचे वर्णनांत पुढील चमत्कारिक जमिनीच्या निःपाताचा उल्लेख आहेः—

" पूर्वी एशिया व अमेरिका या दोन खंडांमध्यें ( बेहेरिंगच्या सामुद्रधुनीच्या जागीं ) संयोगीभूमी होती. त्या संयोगीभूमींपैकीं सध्या डायओ मिडीस नांवाचीं बेटें अवशिष्ट राहिलीं आहेत. हीं बेहेरिंगच्या सामुद्रधुनींत अव्यवस्थित पसरलेलीं आहेत. त्यांचा समुदाय किंवा साखळी आहे. ती साखळी सिबिरियांतील पूर्व केप व आलास्कांतील प्रिन्स ऑफ वेल्स भूशीर ह्यांमध्यें ऐशीं मैल जागेंत पडलेली आहे:—" मि. प्रिस्टलस—वाईड वर्ल्ड—अकटोबर १९१६ पा. ३२-बर्फ पडल्यावर आतांसुद्धां प्रवाशांस एशियांतून अमेरिकेंत खुषकीच्या मार्गानें जातां येतें व वरील सृष्टिशास्त्रवेत्ता अमेरिकेंतून इकडे एशियांत पायीं आला होता.

टीपः—इकडून पंचजनांच्या दळणवळणास जुना मार्ग होता हें ध्यानांत ठेवा.

( २ ) सुमारें चाळीस वर्षांपूर्वी कांहीं अमेरिकन प्रवासी स्लेजमध्यें बसून उत्तर सिबिरिच्या बर्फाळ मैदानांत भर हिंवाळ्यांत पर्यटण करीत असतां त्यांतील एकानें तेथील निरंतरस्थायी—अक्षय टिकणाऱ्या—हिंवाळ्यांत भयंकर उध्वस्ततेचें शब्दचित्र असें भयाण चितारलें आहे.—

" हा सर्व प्रदेश ओसाड व उजाड आहे; येथें जीं मोठीं सपाट हिरवळीचीं मैदानें आहेत तीं मूर्तिमंत सागरासारखीं अफाट आहेत. तीं इतकीं कीं त्यांजकडे कितीही डोळे ताणताणून पाहिलें तरी त्यांचा अंत समजत नाहीं. तीं दूरच्या क्षितिजापर्यंत प्रत्येक दिशेला पसरलेलीं आहेत. त्यांच्यासारख्यां कंटाळवाण्या हिममय प्रदेशाचा पांढरेपणा सुखावह करण्यास त्यावर एकही झाडझूड नाहीं. तुफानानें वाहवलेल्या बर्फाच्या भयाण व ओसाड मैदानाचा भयंकरपणा व उदासपणा घालविण्यास त्यावर कोठेंही वनस्पती किंवा प्राणी असल्याचें चिन्ह किंवा उन्हाळा अथवा त्यांतील फुलें किंवा सूर्यप्रकाश यांच्या येण्याची खूण दिसली नाहीं. तो प्रदेश पांढरा, थंड व सामसूम होता. तो गोठलेला विस्तीर्ण महासागरासारखा पसरला होता व त्याला पूर्वेस मावळणाऱ्या चंद्रकोरीचा व उत्तरक्षितिजावर मागेंपुढें चमचमत शर्यत खेळणाऱ्या उषा नामक विद्युद्वलयाच्या जादूनें भारलेल्या निळ्या वल्लींचा मंद प्रकाश मिळत होता. दक्षिणेकडील भिजलेल्या सजल ( ओलाव्याच्या ) धुक्यांत सूर्यनारायणाचा विस्तवासारखा लाल मोठा गोळा उगवला तरीही हिंवाळ्यांतील सर्दावलेल्या भूप्रदेशांत उबारा किंवा जीव भरेना. त्यानें त्या उषेच्या कंपायमान होणाऱ्या निळ्या विद्युद्वल्लींस आपल्या मंदलाल तेजांत अगदीं निखालस बुडवून टाकिलें व चंद्र व तारे यांनीं आपल्या सफेद चकाकीनें वादळांत होणाऱ्या सूर्याच्या अस्ताप्रमाणें अंधक रंगानें तेथील हिम रंजित केलें व वायव्यदिग्भागीं दिव्य मृगजलाचा देखावा उत्पन्न केला व आम्हांस नित्य परिचयाच्या व आपल्याला न हांसतां केलेल्या मस्कऱ्याकुस्कऱ्यांनीं अगदीं भयभीत व विस्मयग्रस्त करून सोडिलें. त्या उत्तरेकडील जादुगार सूर्यनारायणाची कांडी ओसाड बर्फाच्या मैदानावर फिरल्याबरोबर त्या मैदानाचें उष्णकटिबंधांतल्या खरखित वाळवंटाप्रमाणें निळें सरोवर बनलें व त्याच्या दूरच्या किनाऱ्यावर पूर्वेकडल्या धरतीच्या विस्तीर्ण शहराच्या भिंती, घुमट, व बारीक मिनारे उभे राहिले व असें दिसलें कीं दाट पानांच्या झाडांचे मुगुट स्वच्छ निळ्या पाण्यावर वरून खालीं लोंबत आहेत व त्या सरोवराच्या खोल पाण्यांत त्यांचीं प्रतिबिंबें पडलीं आहेत व वरील पांढऱ्या भिंतीवर उगवणाऱ्या सूर्याचे पहिला लाल किरणांचा ओझरतां रक्तिमा चढला आहे. असा हिंवाळ्यांत उन्हाळ्याचा व जणूं मेलेल्या शरीरांत जीवाचा भ्रम इतका सुस्पष्ट किंवा निःशेष उत्पन्न झालेला आमच्या कधींही पूर्वीं अनुभवास आला नव्हता. हें स्वप्न नाहीं ह्याबद्दल खात्री करून घेण्याकरितां आम्हांपैकीं प्रत्येकानें नित्य परिचयाच्या वस्तूंच्या देखाव्यांकडे अगदीं सहज दृष्टी वळविली; पण त्याची दृष्टी वायव्य दिग्भागाकडे अंधक निळ्या सरोवरावरून पुन्हां फिरविल्याबरोबर त्यांतील मृगजळाचा कंपायमान होणारा विस्तीर्ण आराखडा आपल्या दिव्य शोभेनें त्यापुढें मूर्तिमंत उभा राहिला, व मेघांचें मंदीर बांधलेले त्याच्या बाजूचे किल्ले व भव्य वाडे ह्यांनीं हें एक स्वप्न असावें असा भ्रम उत्पन्न करणारा संशय आपल्या गंभीर मुद्रेनें पार उडवून दिला. हा चकचकीत भुताटकीचा प्रकार एकदां मंदप्रभ होई व तो पुन्हां

अस्पष्ट होई व असें होतां होतां तो सर्व नाहींसा झाला व त्याच्या पडझडीपासून गुलाबी स्फटिकांचें खोदून केलेलें दोन विशाळ स्तंभ उभे राहिले व त्यांनीं आपले शिरोभाग हळूहळू संयुक्त करीत नेले व स्वर्गाच्या महाद्वाराप्रमाणें भव्य कमान तयार केली. पुन्हां ही कमान वितळली व त्याचा एक मोठा किल्ला बनला. त्या किल्ल्याला अगडबंब बुरुज व टेके, बाजूचे बुरुज व जांग्याच्या भिंती व बहिर्गत व अंतर्गत कोन होते व त्यांची छाया व यथादर्शन त्यांच्या खऱ्या प्रकारांप्रमाणें मूर्तिमंत होतें.—" ( टेन्ट लाईफ इन सिबिरिया )–जॉर्ज कॉनन-पा. २५३–२५५.

टीपः—हें अद्भुत वर्णन खोट्या संविधानकाच्या कादंबरीपेक्षां हृदयंगम नाहीं काय ?

ध्रुवप्रदेशः—( ३ ) ह्या मृगजळांत झाडें, झुडपें व फुलें ही बर्फावर तरंगत आहेत असें दिसतें. हा महा मृगजळाचा देखावा उत्तरध्रुवाच्या गूढ प्रकरणांत अगदीं लोकोत्तर आहे. ह्या उत्तरध्रुवस्थ प्रदेशांत जें बर्फ व हिम सांप्रत नेहमीं असतें, तें तेथें पूर्वीं नेहमीं नसे. तें तेथें अगदीं अलीकडे उत्पन्न झालें आहे. फार प्राचीन काळीं उत्तरध्रुवाभोवती सुंदर उष्ण हवा असे. त्या उत्तर ध्रुवाभोवतालच्या सगळ्या प्रदेशांत तेव्हां मोठमोठी अरण्यें असत व त्यांत महान महान वृक्ष व सुरेख फुलांचे वेल असत. उत्तर ध्रुवाचा जो जो प्रदेश सध्या हिमाच्छादित आहे त्या त्या प्रदेशांत चकचकित सोनरी सूर्याचा प्रकाश पडत असे व त्याची उष्णता उष्णकटिबंधांतील देशांतल्या उन्हाच्या उष्णतेसारिखी तीव्र असे. उत्तरध्रुवासंबंधें जे शास्त्रनियम उपलब्ध आहेत, ते आतां आपण लावून पाहूं:—

कटिबंधांचा सिद्धान्तः—सकाळ व संध्याकाळ ह्यांपेक्षां दोन प्रहरीं ऊन जास्त कडक असतें. असें कां म्हणून पुसाल तर सांगणें कीं आपण त्या वेळीं अगदीं सूर्याबरोबर येतों व आपल्यावर त्याचे किरण सरळ लंबासारखे उभे येतात. पण सकाळीं व संध्याकाळीं असें होत नाहीं म्हणजे सूर्याचे किरण आपल्यावर वांकडे तिर्कस येतात. हे तिर्कस किरण लंबासारख्या किरणापेक्षां जास्त जागेवर पसरतात, म्हणून त्या तिर्कस किरणांचें ऊन लंबकिरणांच्या उन्हापेक्षां कडक नसतें. हा दैनिक अनुभव पृथ्वीच्या कटिबंधांस अगदीं बरोबर लागतो. म्हणजे सूर्याचे किरण पृथ्वीच्या मध्यरेषेवर व दोहों बाजूस सुमारें साडेतेवीस साडेतेवीस अंशांवर लंबरूप पडतात म्हणून तो प्रदेश अत्यंत उष्ण होतो, व त्याच्या उत्तरेच्या व दक्षिणेच्या आणखीं साडेतेवीस साडेतेवीस अंश भागावर त्यापेक्षां सूर्याचे किरण तितके लंबरूप पडत नाहींत म्हणून तो प्रदेश फारसा उष्ण बनत नाहीं व त्याच्या उत्तरेच्या व दक्षिणेच्या आणखीं साडेतेवीस साडेतेवीस अंश भागावर सूर्याचे किरण त्याहून तिर्कस पडतात म्हणून हे उत्तर व दक्षिण ध्रुवाजवळचे पट्टे फारच थंड असतात.

अती शीत स्थळें:—पण ह्या सिद्धान्ताप्रमाणें अत्यंत शीत स्थळ उत्तर गोलार्धांत उत्तरध्रुवाभोवती असलें पाहिजे. पण खरा प्रकार निराळाच आहे. म्हणजे हल्लीं कमालीची थंडी उत्तरध्रुवाजवळ आढळत नाहीं. तर ती उत्तरगोलार्धांत दोन ठिकाणीं आढळते. तीं स्थळें कोणतीं ? त्यांपैकीं एक सिबिरिया प्रांतांत याकुटस्क शहराच्या ईशान्येस सुमारें दोनशें मैलांवर आहे, व दुसरें स्थळ उत्तर अमेरिकेच्या उत्तरेस उत्तरमहासागरांत पिरीबटांमध्यें आहे. या दोन बिंदूपासून आपण उत्तरेस उत्तरध्रुवाकडे प्रवास करावा, त्याप्रमाणें हवेचें उष्णतामान वाढत जातें. म्हणून पीरी साहेबाला दुसऱ्या ठिकाणीं जशी हवा व वनस्पती दक्षिण भागीं आढळल्या त्यापेक्षां ग्रीनलंडच्या उत्तरभागीं समशीतोष्ण हवा व चांगल्या वनस्पती आढळल्या. उत्तरमहासागरांतील उत्तरेकडचें उघडें पाणी पातळ आढळतें व दक्षिणेकडचें पाणी गोठलेलें आढळतें. हें पाहून मोठा चमत्कार वाटतो. इ. स. १८७८-७९ च्या हिंवाळ्यांत सिबिरियाच्या उत्तर किनाऱ्यावर नॉर्डेस्किओल्ड हा बर्फामध्यें अडकून राहिला होता. तेव्हां उत्तरेकडील आकाशाच्या रंगावरून त्यास असें सुस्पष्ट सांगतां येत असे कीं मी ज्या गलबतांत अडकलों आहे, त्याच्या भोंवतीं जें बर्फ आहे, तें माझी नजर जेथपर्यंत पोंचते तेथपर्यंत सारखें थिजलेलें आहे. पण त्यापलीकडील उत्तरेचें पाणी उघडें व पातळ आहे. दर्यासारंग ( एडमिरल ) रँगेलचा अनुभव यापेक्षां विलक्षण आहे. भर हिवाळ्यांत तो सिबिरियाच्या किनाऱ्यावर स्लेजिसमध्यें बसून बर्फाच्या मोठ्या मैदानावर प्रवास करीत गेला. तो जसजसा उत्तरेस जाई तसतसें त्या मैदानांतील बर्फ अधिकाधिक पातळ झालेलें आढळत असे. असें होतां होतां सरते शेवटीं त्याच्या उत्तरेस त्यास अमर्याद, उघडा, व न गोठलेला समुद्र आढळत असे. ही गोष्ट अगदीं भर हिंवाळ्यांत अनुभवास येई. रँगेलनें ह्या विस्मयकारक देखाव्याचें असें वर्णन केलें आहे:—

" आम्ही तेथील बर्फाच्या सर्वांतल्या उंच डोंगरावर चढलों असतां आमचें उत्तरेकडील दृष्टिक्षेत्र फार विस्तीर्ण झालें व तेथून पाहूं लागलों तों आमच्या नजरेसमोर अमर्याद महासागर पसरलेला आहे असें आढळलें. तो भयाण व भव्य देखावा होता, पण तो आम्हाला उदासवाणा वाटला. विशाळ आकाराचे बर्फाचे तुकडे खळाळणाऱ्या समुद्रावर तरंगत होते, व ते आमच्या पुढील खाडीच्या पलीकडच्या बाजूवरील बर्फाच्या मैदानाच्या कडेवर मोठ्या त्वेषानें लाटांच्या योगानें फेकले जात होते. त्याची धडक एवढी मोठी होती कीं बर्फाच्या मोठमोठ्या ढेकळांचा प्रत्येक क्षणीं चक्काचूर होत होता, व ज्या बर्फाच्या भागाच्या योगानें तो प्रवाहाच्या उघड्या महासागरापासून वेगळा पडला होता, त्याचा हां हां म्हणतां पुरा विध्वंस होत चालला होता. वाहवत जाणाऱ्या बर्फाच्या ढेकळ्यावरून आम्ही पलीकडे जाण्याचा प्रयत्न केला असता तर परत आल्यावर आम्हांस पाय टेकण्यास स्थिर ठिय्या ( पाया—गवंड्यांचा शब्द ) मिळाला नसता. आमच्या बाजूस देखील पाण्याच्या गल्ल्या नवीन पडून त्या आमच्या मागील

बर्फाच्या मैदानांत प्रत्येक दिशेनें पसरत होत्या.–( सिबिरिया व उत्तरध्रुवसमुद्र ) पान ३३३

टीप:—( १ ) ह्या शोधांच्या योगानें एन्जू हडेट्रॉम व टर्टारिनाफ यांच्या शोधांचें दृढीकरण झालें.

(२) यावरून हें उघड दिसतें कीं उत्तरमहासागराच्या मध्यभागीं हल्लींही भर हिवाळ्यांत न गोठलेला विस्तीर्ण समुद्र आहे, पण त्यांची लांबी रुंदी केवढी आहे हें कळत नाहीं. ह्या महासागराच्या उघड्या भागाभोंवती दाट बर्फाचा व अत्यंत तीव्र थंडीचा प्रदेश आहे. पण अगदीं उत्तरेस जेथें उघडा सागर पसरला आहे तेथें हवा तितकी थंड नाहीं. ह्याचें कारण काय ? ह्याचा शोध आपल्यास लाविला पाहिजे. कारण हें आपलें स्वर्ग होय अशी आमच्या कै. विद्वद्वर्य टिळकांची समजूत आहे.

**मागील स्थिती:**—आतां उत्तरध्रुवाभोंवतालच्या प्रदेशीं उत्तरगोलार्धांत हल्लीं जी स्थिती आहे, तिच्या मागील वस्तुस्थितीची आपण पहाणी करूं. हल्लींच्या हवापाण्याची रियासत चालू होण्यापूर्वीं जी रियासत होऊन गेली, तीस केसाळ हत्तीचा ( मेमॉथ ) काळ असें म्हणतात. ज्यावेळीं पृथ्वीवर मनुष्यें अवतीर्ण होऊन एशिया व युरोप खंडभर पसरलीं, त्यावेळीं उत्तरध्रुवाभोंवतालच्या प्रदेशांतील हवापाणी फार थंड नव्हतें. सांप्रत उत्तरसमुद्राच्या किनाऱ्याजवळील सिबिरियाच्या झाडून सर्व भागांवर झाडें तर काय पण झुडपेंही नाहींत व सिबिरिआच्या उत्तरेच्या महासागरांत जीं बेटें आहेत, तीं अगदीं ओसाड आहेत व तेथें कांहीं जातीच्या शेवाळ्या व गवतें होतात. पण हल्लीं तेथें जरी कोणतीही झाडेंझुडपें वाढत नाहींत तरी हत्तीच्या काळांत सिबिरियाच्या उत्तरकिनाऱ्यावर मोठमोठे वृक्ष होत असत. जेथें कोणतेही सजीव वृक्ष दक्षिणेस २०० मैल जाईपर्यंत बिलकुल होत नाहींत, तेथें गोठलेल्या कड्यांमध्यें ह्या प्राचीन वृक्षांचे मेलेले, सुकलेले व वाळलेले सापळे उभे राहिलेले आढळतात. सिबिरियाच्या उत्तरेस उत्तरमहासागराच्या अगदीं दूरच्या खबदडींत लियाकॉफ व नवीन सिबिरियाचीं बेटें आहेत. आतां ह्या बर्फाच्या रानांत एकही झाड किंवा झुडूप वाढत नाहीं. पण हीं ओसाड बेटें मेलेल्या वृक्षांनीं भरलेलीं आहेत, व ते वृक्ष जरी निर्जीव झाले आहेत तरी ते अजून उभे आहेत ! ऐरावताच्या काळांत हीं हिमाच्छादित बेटें जंगलांनीं झाकलेलीं होतीं. त्यावेळीं उत्तर सिबिरियाची हवा इतकी नरम होती कीं ज्या मैदानांत हल्लीं कोणतीही वस्तू बिलकुल वाढत नाहीं, तीं मैदानें झाडें, झुडपें व गवत यांनीं आच्छादिलेलीं होतीं. जे प्रदेश हल्लीं रिकामे व जीवजंतूरहित आहेत त्या प्रदेशांत प्राण्यांचे कळपच्या कळप फिरत असत. उत्तर अमेरिकेच्या मैदानावर ऐरावतांसारखे ( केसाळ हत्ती ) जबरदस्त मेमॉथ प्राणी, लोकर असलेले गेंडे, बैलांसारखे चमत्कारिक कस्तुरीमृग, मोठमोठे टोणगे, व जंगली घोडे सुखसंचार करीत

असत. ही वस्तुस्थिती फार प्राचीनकाळची नाहीं. मनुष्य पृथ्वीवर अवतीर्ण झाला तेव्हां हा प्रकार होता.

शीतकटीबंधाच्या प्रदेशांत उत्तर अमेरिकेच्या उत्तरेस ऐरावताच्या युगांत एशियाखंडाप्रमाणेंच उष्ण हवा होती व जेथें सध्या झाडें किंवा झुडपें बिलकुल होत नाहींत तेथें तेव्हां मोठमोठ्या अरण्यांतील मोठमोठे वृक्ष उफाट्यानें होत होते. उत्तर अमेरिकेच्या उत्तरेकडील शीतकटिबंधांतील मुख्य प्रदेशांत सर एड- वर्ड बेलचर यास पुष्कळ वर्षांपूर्वी हत्तीच्या युगांतील ह्या प्राचीन अरण्याचे अव- शेष सांपडले. वेलिंग्टन खाडीच्या ओसाड व भयाण किनाऱ्याची पहाणी करीत असतां (उत्तर अक्षांश ७५–३२) त्यास एका मोठ्या वृक्षाचे अवशेष आढळले. तो वृक्ष मूळ जेथें वाढला होता, तेथेंच तो होता. तो म्हणतो कीं तो पाहिल्यावर मला असें आढळून आलें कीं तो कांहीं एखाद्या डोलकाठीचा वगैरे सोट आहे किंवा तो तेथें कोणी मनुष्यानें नेऊनही ठेविला आहे असें नव्हतें. तें एका मोठ्या झाडाचें खोड व मूळ होतें. तें तेथें उफाट्यानें वाढलें होतें, पण तें तेथें केव्हां वाढलें होतें! हें कोणी सांगावें. हा एक प्रश्न असा आहे कीं तो ही हवा केव्हां बदलली? ह्या प्रश्नांत गुरफटलेला आहे. त्या खोडाच्या मुळाभोंवतीं जी माती चिकटलेली होती, ती त्याच्या लोकांनीं सोडवून काढिल्याबरोबर, त्यांचीं मुळें, पानें व खांद्या कीं ज्या जेथें पडल्या होत्या त्या तेथेंच पुरलेल्या राहिल्या होत्या व त्या तेथून साफ बाहेर पडल्या. त्या जवळ दोन डुंगे होते. ते खणण्यांत आले पण त्यांत सर्पण होतें. तें खोडें व वनस्पतीज द्रव्यें ह्यांपासून बनलेले होतें व तीं खोडें व वनस्पतीज द्रव्यें कांहीं प्राचीन काळांतील एका अरण्याचीं अवशेष होतीं ह्यांत संशय नाहीं:—( धि लास्ट ऑफ धि आर्कटिक व्हॉएजिस, व्हा. १–पा. ३८० ). तें झाड ताडाचें होतें.

यावरून पुढील अनुमानें निघतात:—

( १ ) ऐरावताच्या युगांत हल्लींच्या शीतकटिबंधांतील प्रदेश मोठमोठ्या ताडांच्या अरण्यांनीं व्याप्त होता. पण तेथील तीं अरण्यें हवा बदलून कशीं नाहींशीं झालीं ? ह्याचा पत्ता लावण्यास अजून आधार सांपडला नाहीं. त्याचें अनुमान आम्हांस भौगर्भिक दृष्टीनें करितां येत नाहीं.

( २ ) आमचे संस्कृत सारस्वताच्या सागरांतील वर्णनाच्या स्पष्टीकरणार्थ पोथ्यांतले रॉयल एशियाटिक सोसायटीच्या संग्रहांत कांहीं पृथ्वीचे ऋषिप्रणित अनादी नकाशे आहेत, त्यांतील एक सर्वोत्कृष्ट नकाशा आमचे जवळ आहे. तो आम्हीं पुढील अनादी भूगोलाच्या वर्णनांतील खंडांच्या स्पष्टीकरणार्थ देणार आहों. त्यांतील पुढील स्थळाशीं वरील हकीगतीचा मेळ पडतो:—

१ अमेरिका:—सुवर्णभूमी–अमेरिकेंत खरोखरीच पुष्कळ सुवर्ण सांपडतें.

२ उत्तर महासागर:—उत्तरमहासागर–येथें खरोखरच महासागर आहे.

३ उत्तरध्रुव:—उत्तरध्रुव किंवा सिद्धपुरी–तिचा उल्लेख वेदांत नाहीं पण सुमेरु (मव्ई)–ब्रह्मपुरीचा उल्लेख पुराणांत आहे.

४ सिबिरिया—१ उत्तरकुरू व २ ऐरावत—याचा उल्लेख वेदांत नाहीं पण महाभारत व भागवत वगैरे पुराणांत आहे—३ हत्तींचा देश अथवा इंद्रस्थान—याप्रमाणें ताड, देवदार, भूर्ज वगैरे वृक्षांची वनें व मेमॉथ नांवाच्या केसाळ हत्तींचे अवशेष येथें सांपडतात.

टीपः—( १ ) ह्या अनुमानांचा मेळ चिपळूणकरांच्या भागवतांतील पृथ्वीच्या नकाशाशीं व जैनांच्या पृथ्वीच्या नकाशाशीं फार आहे.

( २ ) प्राचीन काळीं पृथ्वीवरील कमालीच्या थंडीचें स्थळ म्हटलें म्हणजे उत्तरध्रुव हें नव्हतें, व तें हल्लींही नाहीं. तेथें आमचे देव राहत होते असें कै. विद्वद्वर्य टिळक, डा. वारेनप्रमाणें प्रतिपादितात. पण हल्लीं तें ओसाड आहे.

( ३ ) सांप्रत काळीं कमालीच्या थंडीचीं स्थळें सिबिरियांत इरकुटस्ट येथें व अमेरिकेंत पिरीबेटांत आहे. पण तीं प्राचीन काळीं अस्तित्वांत होतीं असें वरच्या वर्णनावरून सिद्ध होत नाहीं, त्याअर्थीं आम्ही मागें सांगितल्याप्रमाणें तिकडे वसंतऋतू हा भूमध्यवृत्ताकडून उत्तरध्रुवाकडे आपले राज्य वाढवीत गेलेला दिसतो. पण आर्यांची तिकडे वस्ती सुमेरुखंडांत ( समरकंद ) त्रिविष्टप (तिबेट) सुमेरु ( मर्व्ह ), ऐरावत ( केसाळ हत्तींचा प्रदेश ) व उत्तरकुरु ( ३० दिवसांच्या उषांच्या साम्राज्याचा प्रदेश ) येथपर्यंतच पसरलेली दिसते. तेव्हां त्या पलीकडे त्यांची श्रौतभूमी पसरलेली होती असें आम्हांस वाटत नाहीं.

( ४ ) सुमेरुखंडांतील हवा उष्ण होती म्हणून मर्व्ह ( सुमेरू ) पलीकडील ऐरावत व उत्तरकुरू वगैरे प्रांतांत पुढील जनावरें होतीं:—ऐरावत ( केसाळ हत्ती-मेमॉथ ) गेंडे, कस्तुरीमृग, टोणगे, घोडे वगैरे पण त्यांचे अवशेष मात्र तेथें सांपतात, तसे ते जिवंत तेथें सांपडत नाहींत.

( ५ ) ह्या अवशेषांत मनुष्यांचे अवशेष सांपडतात असें आजतागाईत कोणीही सिद्ध करून दाखविलें नाहा. तर त्याच्या उत्तरेच्या ओसाड अजीव उत्तरध्रुवावर किंवा कुमेरूवर सुमेरूसारखी देवांची वस्ती मानणें अगदीं अप्रशस्त दिसतें—हें उघडच झालें.

हें लिहीत असतां ह्या सुमेरुखंडांतल्या स्वर्गांतील वैभवाची अस्मानी जलप्रलयानें झालेली अवनती कशी एकाएकीं झाली असेल ? ह्याची इतिहासाच्या अभावीं कांहीं अंधक कल्पना पुढील गोल्डस्मिथच्या डेझरटेड व्हिलेजमधील श्रीमंताच्या सुलतानी जुलमाच्या प्रलयानें झालेली गरिबांची अवनती जणू मूर्तिमंत सुचविते असें आम्हांस वाटतें; कारण अस्मानी व सुलतानी हे सृष्टीच्या विध्वंसाचे सख्या भावांसारखे दोन जाज्वल्य प्रकार सर्वत्र महशूर आहेत:—

" Vain transitory splenders! could not all
Reprieve the tottering mansion from its fall?
Obscure it sinks; nor shall it more impart
An hour's importance to the poor man's heart:

Thither no more the peasant shall repair
To sweet oblivion of his daily care;
No more the farmer's news, the barber's tale,
No more tho woodman's ballad shall prevail;
No more the smith his dusky brow shall clear,
Relax his ponderous strength and lean to hear;
The host himself no longer shall be found
Careful to see the mantling bliss go round;
Nor the coy maid, half willing to be pressed,
Shall kiss the cup to pass it to the rest."–*P. 89.*

ह्या कवितेंतील दुनिया ओसाड पाडणाऱ्या श्रीमंत सुलतानांचे कृतीवरून कर्तुम्-कर्तुम् अप्रतिम शक्तिप्रधान थोरला भाऊ जो अस्मान हा आपल्या जलप्रलयानें त्या सुमेरुखंडांतील त्या स्वर्भूमींतले देवांचे टोलजंग अनंत वाडे, दिव्य शेतकऱ्यांच्या क्षणभर विसाव्यांचीं स्थानें कशीं जमीनदोस्त करूं शकला असेल, दिव्य कृषीवलांच्या बातम्या, दिव्य न्हाव्यांचीं गप्पाष्टकें, दिव्य लाकुडतोड्यांच्या लावण्या कशा बंद पाडूं शकला असेल, दिव्य सोनार व लव्हार यांस आपलें काम क्षणभर टाकून त्या ऐकण्यास लवंडण्यास, दिव्य उदारधी घरभाऱ्यांस अतिथींचा आदर-सत्कार करण्यास व दिव्य लाजाळू अर्धवट वुवुर्षू कुमारिका अपसरांस बाकींच्याकडे जाऊं द्यावयाच्या चहाच्या पेल्यास तोंड लावण्यास जागा कशी ठेऊं शकला असेल ? ह्या कृतींची कांहीं कल्पना वाचकांस करितां येईल !



## भाग साहावा.

## उत्तर एशियेच्या (सुमेरुखंडाच्या) चेहेरेपट्टींतील फेरफार.

उद्देशः—स्थानशुद्धि.

The Mogal Khans of Asia, those in the neighbourhood of Mount Altai worship the Vedic gods to this day-Mr. wheeler.

"On the 16th of March the sun rises, preceded by a long dawn of forty seven days, namely, from 29th January, when the first glimmer of light appears. On the 25th of September the sun sets, and after a twilight of of forty eight days, namely, no the 13th November, darkness reigns supreme, so far as the sun is concerned, for seventy-six days. followed by one long period of light, the sun remaining above the horizon one hundred and ninety four days. The year, therefore, is thus divided at the pole:-194 days sun; 76 days darkness, 47 days dawn, 48 day's twilight."—Captain Pim-in Dr. Warren's Paradise Found–P. 64and in Mr. Tilak's Arctic Home–P. 48.

"Radiating from the great Pamir, as the pivot of several converging systems are the Hindu Kusha, the Mustagh Ata or Kara Koram Mountains from the south-west and south east the Kun Lun from the east and Thianshan from the north east. The Pamir plateau covers some 30000 square miles and in its southern limits connects the Mustaga Ata with the Hindu Kush by a ridge which serves as the water parting between the basins of the Upper Oxus and the Indus. To the north it acts as the water divide between the Zarafshan and the Sypdaria. The Tibetan tableland is no less intimaely identified with the orography of the Middle East, but lying between the Himalayas and the Kun Lun Mountains, it is less accessible portions of this highland region."–

*Hamsworth History of the World.–P. 1123*

हल्लीं आर्टिक प्रदेशांतील बर्फ जलद वितळत आहे. समशीतोष्ण कटिबंधांतील पर्वतांच्या शिखरांवरील बर्फाच्या टोप्या भराभर नाहींशा होत आहेत. क्यानडांतलि बर्फाच्या नद्यांनीं झालेल्या सरोवराच्या पात्रांत दुनियेच्या धान्याचीं कोठारें भरत आहेतः–( न्यू इंडिया–१४-८-१९१८ )

प्रालेय युगाचीं कारणेंः–प्रालेय युगाच्या कारणांचे अनेक प्रकारचे उपन्यास करण्यांत आले आहेत. कांहीं लोकांचा असा अभिप्राय आहे कीं अत्यंत तीव्र उत्तरशीत कटिबंधांतील ( आर्टिक ) परिस्थिती कांहीं भौगोलिक कारणांमुळें उदाहरणार्थ प्रालेय ( ग्लेसियल ) काळांत जमीन व पाणी यांच्या प्रदेशांच्या निराळ्या वांटणमुळें–प्रामुख्येंकरून–उत्पन्न झाली. उत्तर अटलांटिक महासागराच्या उलटबाजूचे देश सामान्यतः अधःपतित ( डिप्रेस्ड ) प्रालेयाचे ( बर्फाचे–ग्लेसियल ) प्रवाह वगैरेचा लोंढा ( ड्रिफ्ट ) आंत येऊन

त्यापासून हिमपर्वत ( आईसबर्गस ), हिमनद्या ( ग्लेसिअर्स ) व स्थानिक हिमाचे फलक ( आईस शीटस ) वगैरे उत्पन्न झाले असावे अथवा उलट पक्षीं, ह्या भूभागांच्या सामान्य उन्नतीनें त्यास अक्षय्य हिमाच्या ( बर्फाच्या ) पातळीवर उचलून धरिलें असावें. अथवा आणखीं प्रालेयाची ( बर्फाची ) परिस्थिती ध्रुवांच्या संस्थितींतील परिवर्तनानें म्हणजे महासागरांच्या निराळ्या वांटणीनें वगैरे उद्भवली असावी. दुसऱ्या कांहीं शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें ही प्रालेयावस्था ( ग्लेसिअल कंडिशन ) कांहीं ज्योतिषांन्तर्गत कारणांनीं प्रादुर्भूत झाली आहे. हीं कारणें डा. क्रोल आदिक शास्त्रज्ञांच्या उपन्यासाच्या पायाच्या ठिकाणीं आहेत.– ( आमचें भूगर्भदर्पण–भाग १९ पहा )

Within this region (a) Central Asia; Afganistan, Baluchistan, Turki stan, and Tibet; (b) Further India: Siam, Annam, Burma, Tonquion, Cochin China, and Cambodia; (c) India; with the little independent states of Nepal, and Bhutan, the Island of Ceylon, the physiography of Asia nowhere shows to such advantage as the elevated uplands, where a central tabland, at once, the loftiest and most extensive in the world is buttressed by stupendous orological develop-ment. covering 3,000,000 square miles, the central tableland is intersected by high ranges which enclose a number of plateaus, while it is also marked in the Gobi desert and in the Lob Nor basin by extensive depressions. Towering above these uplands which reach in the Tibetan plateau height of 14000 feet to 15000 feet, in the Pamir Phateau 9000 feet to 12000 feet and the Iranion plateau 6000 feet above sea-level, are the lofty crests of the Himalayas, Thean Shan, Kun Lun, Altai and Mustaga Ata-Hamsworth History of the World.–*P. 1124.*

मागील भागांत वसाहतींच्या देशांच्या ( सुमेरुखंड–उत्तर एशिया ) चेहेरे-पट्टींतील फेरफारांचा पूर्वार्ध दिला. आतां या भागांत त्यांचाच उत्तरार्ध द्याव-याचा आहे.

प्रालेयप्रलय.–उत्तरकुरू व ऐरावत ऊर्फ सिबिरिया–भूगर्भशास्त्रवेत्ते उत्तर गोलार्धांत बहुतेक ठिकाणीं पसरलेल्या एका बर्फाच्या व हिमाच्या काळाचें वर्णन करितात. ह्या मोठ्या कडक हिवाळ्याच्या काळाला प्रालेयप्रलय अथवा हिमयुग असें म्हणतात. ह्यास आपल्या काश्मिरी भाषेंत लाण्यांचा म्हणजे हिमनद्यांचा काळ असें नांव देतां येईल. हा काळ भूगर्भशास्त्रोक्त प्लेइस्टोसीन काळांत म्हणजे चवथ्या ( कली ) युगांत होऊन गेला. पण ही चमत्काराची गोष्ट आहे कीं ह्या बर्फाच्या युगाचा अंमल युरोप व अमेरिका खंडावर जसा कडक झाला आहे, तसा तो एशिया खंडाच्या इतर ठिकाणीं तर काय पण उत्तरध्रुवाभोवतालच्या प्रदेशांतही ( आमचे श्रोत्रिय लोक रहात होते म्हणून कीं काय कोण जाणें ) कडक झाला नाहीं. सिबिरिआच्या उत्तरेच्या शीतकटिबंधांत विशाळ बर्फाच्या मैदानांच्या ‘ वसाऱ्याच्या ’ बिलकुल खुणा नाहींत, व सिबिरियाच्या उत्तरेस

असणाऱ्या उत्तरसमुद्रांत आजपर्यंत जितकी थंडांत थंड हवा पूर्वी असे तितकीच थंडांत थंड हवा सांप्रत तेथें आहे. हीच स्थिती उत्तर अमेरिकेंतील शीतकटिबंधांतील जागेची आहे. शैसाहेबानें अलीकडे उत्तरध्रुवाकडील प्रदेशांत भूगर्भशास्त्रांतर्गत बारीक तपशिलवार शोध मोठे काबाडकष्ट करून केले आहेत. त्याप्रमाणें पाहतां हल्लीं तेथें जी थंड हवा आहे तीपेक्षां जास्त थंड हवा तेथें पूर्वी कधीं नव्हती व ह्या शीतकटिबंधांतील प्रदेशांत बर्फाच्या नद्या एके वेळीं वहात होत्या असें तेथें एकही चिन्ह नाहीं–( धी लास्ट ऑफ धी आर्कटिक व्हाएजिस, व्हा. १–पान ३८० )–ह्या शैसाहेबाचे भूगर्भसंबंधी शोध फार महत्वाचे आहेत, व ते इ. स. १८९८ ते १९०२ पर्यंत झालेल्या स्वेरड्रुपच्या सफरींत झाले आहेत. त्या वेळीं हें मौजेचें अनुमान निघालें कीं हिमयुगांत स्वीडन, ग्रेट–ब्रिटन व स्कांडेनेव्हिया व क्यानडा हे ( युरोप व अमेरिका खंडाचे उत्तरभाग ) बर्फाच्या मोठ्या नद्या व मैदानें यांनीं आच्छादित होऊन गेले असतां उत्तरध्रुवाभोवतालची हवा फार नरम होती व त्या युगांत शीतकटिबंधांतील प्रदेशांत एकही बर्फाचें मैदान नव्हतें.

पण या कामीं आम्हांस अजून पुरा शोध लागला नाहीं. आम्ही शोधगृहाच्या उमऱ्यांत काय तो पाय टाकून त्या शोधाला सुरवात केली आहे. आतां आपण पृथ्वीच्या इतिहासाच्या एक मागील भाग उघडूं. त्या भागाला टर्शिअरी ( तृतीय–द्वापर ) युगाचा मायओसीन काळ असें म्हणतात.

तृतीय ( मायओसीन ) काळः—या वेळीं युरोपांतील आइसलंडाची हवा इतकी उष्ण होती कीं त्या ओसाड बेटांत तेव्हां द्राक्षी व ट्यूलिपचीं झाडें होत असत व म्हणून ह्या वनस्पतींचे अवशेष ह्या बेटांत सांपडतात. ह्यावरून हें निर्विवाद सिद्ध होतें कीं ह्या शीतकटिबंधांतील बेटांत ज्या उष्णतामानाची हवा आहे, त्यापेक्षां तेथें १५ ते २० फारेनहीट उष्णतामान उंच होतें. पूर्वोक्त स्पिटसबर्गेन नांवाच्या ओसाड बेटांत हल्लीं एकही वनस्पती होत नाहीं. येथून युरोपांतील सर्व दर्यावर्दी शीतकटिबंधांतील मोहिमांस अनेक वेळां निघतात. तेथें पाप्लर, हेझल, बीच ( भूर्ज ), प्लेनवृक्ष, संत्रीं, सायप्रस ह्यांचे अवशेष विपुल आढळतात. यावरून असें ठरतें कीं येथें त्या झाडांचीं मोठमोठीं अरण्यें होतीं. हल्लीं ही भूमी म्हटली म्हणजे वर्षाच्या बहुतेक भागांत बर्फ व हिम यांचें मोठें जंगल असूनही येथें वरील शोध लागला ह्मणून शास्त्रज्ञ लोकांस मोठा चमत्कार वाटला; कारण जेथें हल्लीं एकही वनस्पती उगवत नाहीं तेथें ७६–६६ उत्तर अक्षांशावर म्हणजे उत्तरध्रुवापासून २० अंशाच्या आंत असल्या जबरदस्त वनस्पती जोरानें वाढत होत्या, ही खरोखरच मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. त्या काळीं ग्रीनलंडांत देखील ७० उत्तर अक्षांशांत पाप्लर, ओक व अक्रोड यांचीं जंगलेंच्या जंगलें होत असत. यावरून येथें उन्हाळ्यांत उष्णतामान मोठें उंच असे हें सिद्ध होतें. पॉप्लरच्या वनस्पतीचे अवशेष इतके मौजेचे आहेत कीं त्यावरून प्रो. हिअर असें बरोबर अनुमान करतो कीं उत्तरध्रुवाभोवतीं तेव्हां

पूर्वी सांगितल्याप्रमाणें जमीन असेल तर त्या वेळीं त्या प्रदेशावर आल्डर, पॉप्लर, विलो व पाईन ह्यांचीं जंगलें असलीं पाहिजेत. ग्रीनलंडमध्यें ह्या महावृक्षांचीं मोठीं खोडें अजून उभीं पण मेलेलीं आढळतात. सिबिरियाच्या उत्तरेकडील उत्तरमहासागरांतील बेटांत फक्त दक्षिणभागीं आढळणाऱ्या वृक्षांचे अवशेष सांपडतात. ते तेथें पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहून गेलेले आहेत असें नाहीं तर ते हल्लीं जेथें आढळतात, तेथेंच ते वाढलेले आहेत. ह्या उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत, कीं जेथें हल्लीं बर्फ व हीम आढळतें व जेथें सहामहिन्यांची पुऱ्या काळोखाची रात्र असते, तेथेंही उष्ण हवा कशी होती ? हें आह्मांस भौगर्भिक दृष्टीनें समजत नाहीं.

द्वितीय (त्रेता) युगः—आह्मी आणखी एक पाऊल मागें जाऊन पृथ्वीच्या इतिहासांतील पूर्वीचा एक भाग उघडूं. ह्या भागाला भूगर्भशास्त्रवेत्ते द्वितीय युग असें ह्मणतात. त्यांत शीतकटिबंधांतील प्रदेशाविषयीं जें काय सांगितलें आहे त्यावरून असें दिसतें कीं त्या फार प्राचीन काळांत उत्तरध्रुवाभोंवतालची जमीन फक्त उबदार होती; एवढेंच नव्हे तर चांगली उष्ण होती. हें कशावरून ह्मणाल तर सांगणें कीं उत्तरध्रुवाभोंवतालच्या समुद्रभर पोवळ्याचे मोठमोठे खडक वाढले आहेत. आपल्यास हें ठाऊक आहे कीं खडक बांधणारे पोवळ्याचे किडे आतां महासागराच्या फक्त अत्यंत उष्ण भागांतच आढळतात व ते भूमध्यरेषेच्या थोड्या उत्तर अथवा दक्षिण भागापलीकडे वांचत नाहींत. दुसऱ्या युगांत उत्तरध्रुवाभोंवतालची जमीन इतकी उष्ण होती कीं उत्तरमहासागरांत पोवळ्याचे किडे खडक बांधीत; एवढेंच नाहीं तर शीतकटिबंधांतील प्रदेशांत उष्णकटिबंधांतील वनस्पतीही उफाट्यानें होत असत ! ७७°-१० इतक्या उत्तर आक्षांशावरील उत्तर अमेरिकेच्या उत्तरेकडील प्रिन्स पॅट्रिक बेट व दुसरे प्रदेश यांत अशा वनस्पती, प्राणी व मोठमोठे सर्प यांचे इतके असंख्यात अवशेष सांपडतात कीं ते उष्ण प्रदेशांतच काय ते हल्लीं आढळतात. विशाळ शिरपादविशिष्ट प्राण्यांचे शिंपे (शेफेलो पॉड शेल्स) व नौसदृश मच्छांचे शिंपे ( आमोनाईटस आलाईड टू नॉटिकल्स ) तेथील सिबिरियाच्या उत्तरेकडील समुद्रांतल्या उत्तरध्रुवाकडील बेटांत सांपडतात.

यावरून काय सिद्ध झालें ? उष्णकटिबंधांतील देशांत जसली उष्ण हवा हल्लीं आढळते तसली उष्ण हवा उत्तरध्रुवस्थ प्रदेशांत प्राचीन काळीं होती. हें कसें घडलें ? हें आम्हांस ठाऊक नाहीं.

प्रथम (कृत) युगः—आम्ही आणखी एक पाऊल मागें टाकून पूर्वींच्या काळांत शोध करूं लागल्यास आम्हांस काय आढळतें ? आणखीं प्राचीनतर पालियाझोईक काळीं उत्तरध्रुवाभोंवतालच्या सर्व प्रदेशावर वस्तुव्यवस्था अगदीं निराळी असून त्या व्यवस्थेंत हवा अगदीं उष्ण होती. उत्तरेकडच्या शीतकटिबंधांतील प्रदेशांत दगडी कोळशाचें मोठमोठे थर आढळतात, व ते कॉर्बानिफेरस ( अंगारविशिष्ट ) काळांतील आहेत. ही गोष्ट आबालवृद्धांस माहित आहे कीं दगडी कोळसे हें वनस्पतिज द्रव्यांपासून होतात व ते मोठमोठीं जंगलें जमीनींत दडून सडून उद्भवतात. ह्या जंगलांत वृक्ष, झाडें व झुडपें असतात. त्यांस

घुष्कळ ओलावा व उष्णता लागते. यावरून ह्या कोळशाच्या जंगलाचा जोम मोठा अवर्णनीय असला पाहिजे असें ठरतें. ह्यू मिलर असें म्हणतो कीं असली वनस्पतिकोटी दुसऱ्या कोणत्याही युगांत आढळत नाहीं. यावेळीं पृथ्वीचें तारुण्य असें होतें कीं त्यांत तीवर हिरवेगार छायेचे वृक्ष होत असत, तीवर काळसर, फाटेदार विशाळ पाईन ( ताड ), उत्तुंग आरोक्यारियस वृक्ष, क्यालेमाईट बोरू, उंच फर्नचीं झाडें, खोदकाम केल्यासारखे सिजिलारिया, व केसाळ लॅपिडेन्ड्रॉन यांचीं अरण्यें वाढत असत. हल्लीं जेथें उत्तरध्रुवाच्या ताऱ्याखालीं बर्फाचीं ओसाड मैदानें पसरलीं आहेत, तेथून जेथें दक्षिण ध्रुवाच्या चकचकित ताऱ्याखालीं आस्ट्रेलियाचीं रखरखित निर्जन मैदानें आहेत, तेथपर्यंत जेथें जेथें सुकी जमीन, अथवा उथळ सरोवर अथवा वाहती नदी होती, तेथें तेथें ओलसर, व वाफयुक्त जमीन, मग ती एक फूटभर का असेना, तींत उफाट्याच्या वनस्पती गच्च भरून जात असत; व दूरच्या ग्रहांवरील लोकांनीं आमच्या पृथ्वीकडे ढगांतून पाहिलें असल्यास, ती त्यांस हिरवीगार दिसली असेल.–( टेस्टिमनी आफ रॉक्स–पा. १३५–१३६ ).

ज्यापासून दगडी कोळसे उत्पन्न झाले आहेत अशा ह्या चमत्कारिक अरण्याचे अवशेष शीतकटिबंधांत पुढील प्रदेशीं आढळतातः–

( १ ) उत्तर सिबिरियांत लेना नदीवर;

( २ ) सिबिरियाच्या अगदीं उत्तर भागीं–७५° वर मेलव्हिल बेटांत;

( ३ ) ७४–३६ उत्तर अक्षांशावरील बेअर ( आस्वल ) बेटांत; व

( ४ ) विशेषेंकरून जेथें दर्यासारंग (कप्तान) स्वर्ड्रूप यानें इ. स. १९००–१९०२ मध्यें दगडी कोळसे उत्पन्न होणाऱ्या अरण्यांचे अवशेष शोधून काढिले तेथें शीतकटिबंधांतील प्रदेशाच्या अगदीं केन्द्रस्थानीं असलेल्या ७८° उत्तर अक्षांशावरील दगडी कोळशाच्या जलशलाकेंत ( फिओर्ड ).

टीपः–सिबिरियांत हल्लीं ओबी, येनसी, व लेना ह्या मंद वाहणाऱ्या ३००० मैल लांबिच्या नद्या उत्तरमहासागरास मिळतात. ह्या नद्या हिंवाळ्यांत थिजतात व त्यांच्या वरचा ( दक्षणचा ) भाग वितळतो व खालचा तसाच राहतो. म्हणून त्यांचें पाणीं मुखाजवळच्या बर्फानें तुंबून पात्राबाहेर पडतें, व त्यापासून भरलेला तुंद्र नांवाचा रुंद दलदलीचा व तिच्या दक्षिणेच्या अरण्याचा पट्टा सर्व एशिया खंडाभर पूर्वपश्चिम आहे. येथें उत्तरेस थंडी इतकी असते कीं येथें पाणी तर काय पण पाराही थिजतो. ह्याची दक्षिण बाजू हजार मैल चढती आहे व तींत मधून मधून स्टेपस नामक गवतांचीं मैदानें व अरण्यें आहेत. अरण्यांत मुख्यत्वें देवदार व भूर्जवृक्ष होतात व सर्व प्रदेश वैराण आहे.

आम्ही जे काय शोध दिले आहेत, त्यांवरून एवढें निखालस सिद्ध झालें आहे कीं अगदीं अलीकडेपर्यंत आमच्या शीतकटिबंधांतील प्रदेशांत बर्फ व हिम यांनीं युक्त हवा बिलकुल नव्हती. तर ही उष्ण हवा शीत हवेंत कशी रूपान्तर

पावली ? उत्तर ध्रुवाच्या प्रदेशांत बर्फ व हिम यांच्या हल्लींच्या परिस्थितीचें साम्राज्य चालू होणास सृष्टींत कोणती अपूर्व क्रान्ती झाली ? याबद्दल भूगर्भशास्त्र मूग गिळून बसलें आहे. ती पर्वतजात आहे असें आपण अनुमान करूं शकूं. पण तीबद्दल समर्पक माहिती आमचेजवळ नाहीं–हें आम्हांस, प्रांजलपणें, कबूल केलेंच पाहिजे; कारण ती, पर्वतजात समजावी तर ते पर्वत कोठें हल्लीं नाहींसे झाले आहेत. ते हिमालयादी पर्वत प्रलयास कारण झाले असतील तर ते तसेच हल्लीं विद्यमान आहेत. तेव्हां ह्या कार्याचें कारण अन्यत्र आणखीं शोधिलें पाहिजे.

दर्यासारंग ( क्यापटन ) स्वरड्रूप यानें शोधून काढिलेले दगडी कोळशांचे थर शीतकटिबंधाच्या मध्यभागीं होते, व तेथें एकेवेळीं वाढलेल्या वृक्षांच्या अवशेषभूत मोठमोठ्या खोडांनीं आच्छादित होते.–न्यू लँड; अथवा फोर इयर्स इन धी आर्कटिक रीजन्स–लेखक–आटोस्वेरड्रूप–व्हा०२–पा–२७२, ४०२, ४६० ). हे वृक्ष क्यालिफोर्नियांतील प्रसिद्ध मोठ्या वृक्षांप्रमाणें ( बिग ट्रीज ) होते. सिबिरियाच्या उत्तरेस असलेल्या उत्तरमहासागरांतील व मेमॉथ (केसाळ हत्ती ) असलेल्या न्यू सिबिरिआच्याही फार उत्तरेकडील बेनेट बेटांत अमेरिकेंतील संशोधकांना पूर्वीच्या उफाळ्यानें वाढलेल्या वनस्पतींचे अवशेष सांपडले–(धी व्हॉएजिस ऑफ धी जेनेट–लेखक एमा डे लॉंग–व्हा. २ पा. ६८०,६८२. हा अवशेष बिटयूमिनस दगडी कोळशाच्या रूपाचा होता. तो अवशेष मुबलक असून भराभर जळत असे. एक इंग्लिश मोहिम इ. स. १८७६ त झाली. तींतील मि. हार्ट नामक गृहस्थाचा, मोठीं झाडें वियुक्त होऊन झालेल्या खऱ्या दगडी कोळशाचा, शोध ह्यापेक्षांही जास्त मौजेचा आहे. हा दगडी कोळसा शीतकटिबंधाच्या प्रदेशांच्या अगदीं उत्तरेस ८१°-५० उत्तर अक्षांश व ६४° पश्चिम रेखांश यांत सांपडला–( धी ग्रेट फ्रोजन सी–लेखक दर्यासारंग मार्खम–पा. ३९४, ३९५–)हीं जंगलें वाढत असतां शीत कटिबंधांतील प्रदेशांत उष्ण हवेचा अंमल असला पाहिजे. ती हवा कां नाहींशी झाली ? हें भौगर्भिक दृष्टीनें आम्हांस सांगतां येत नाहीं.

वर निरनिराळ्या युगांतील निरनिराळ्या मनुष्येतर प्राण्यांचे अस्तित्वाविषयीं उल्लेख असलेलें उतारे ज्याप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथांतील दिले आहेत, त्याप्रमाणें त्यांच्या संगतीनें मनुष्याच्या अस्तित्वाचा फक्त उल्लेख असलेला उतारा आम्हांस सांपडला आहे. तो असा " मनुष्य हा गुहेंतील अस्वलाचा, गुहेंतील सिंहाचा, जलस्थलवासी घोड्याचा व हत्तीसारख्या मेमाथचा समकालीन होता—" असें ड्रेपरसाहेब म्हणतो. त्याप्रमाणें मनुष्य हा तृतीय ( टर्शिअरी ) युगांत गोदा व नर्मदा या नद्यांच्या मधील प्रदेशांत उत्पन्न होऊन तो त्या तृतीय युगांत पूर्वपश्चिम व उत्तर दक्षिण पसरल्याचा शोध आम्ही आमच्या भूगर्भदर्पणांत सिद्ध केला आहे. पण मनुष्याचे वसाहती संबंधें उल्लेख ३० दिवसांच्या उषेच्या साम्राज्यापलीकडे उत्तरेस आहेत अशीं प्रमाणें वेदांत किंवा ड्रेपरादिकांच्या दुसऱ्या ग्रंथांत जोंपर्यंत आम्हांस आढळत नाहींत, तोंपर्यंत त्या सुमेरूखंडांतील ऐरावत व उत्तरकुरूपलीकडे उत्तरेस ध्रुवाकडे मानणें हें अत्यंत अयुक्तिक आहे, असें आमचें निःसंदेह मत

आहे; कारण तिकडे मनुष्याचे अवशेष सांपडतात असें आजतागाईत कोणीही दाखविलें नाही. हें ३० दिवसाच्या उषेचें साम्राज्य कोठें होतें? ह्याचें उत्तर गणितानें ८६.°६ येतें. तें उत्तर काढण्याची रीती अन्यत्र आमच्या पुढील श्रौतभूमी या भागांत सविस्तर दाखविली आहे.

या प्रतिपादनावरून पुढील गोष्टी सिद्ध होतात:—

(१) गेल्या प्रालेयाच्या प्रलयांत युरोप व अमेरिका खंडांमध्यें हिमाचा पात उत्तर ध्रुवापासून शीत व समशीतोष्ण कटिबंधांतील प्रदेशांमध्यें बेसुमार झाला. तो इतका कीं त्यांत बर्फाचीं मैदानें कित्येक फूट उंच वाढलीं व हिमाच्या नद्या कित्येक वर्षें अखंड वहात राहिल्या.

(२) त्या बर्फाचा भार त्या जमिनीवर कोठें कोठें इतका अपरिमित असह्य झाला कीं तेणेंकरून कांहीं ठिकाणची जमीन खालीं दबली व बाकी वर राहिली किंवा ती सापेक्षतः वर चढली. व त्यांत कोठें बर्फाचा व कोठें पाण्याचा प्रलय माजला; जसें, उत्तर ध्रुवाभोवतालचें असलेलें पूर्वोक्त जमीनीचें कडें खालीं दबलें! व एशिया खंडांत उत्तरकुरूपासून हिमालयापर्यंत जलप्रलय झाला व हिमालयापासून विंध्याद्रीकडे हिमनद्या वाहत गेल्या!

(३) ह्या जलप्रलयांत किंवा प्रालेयप्रलयांत वनस्पती व प्राणी किती मेले गेले व देशोधडीस लागले ह्याची गणतीच नाहीं! यांत चमत्कार हा कीं एशियेच्या ज्या भागांत आपले श्रोत्रीय वसाहत करून होते, त्या भागांत यांतील ज्यास्त सुखाचा जलप्रलय झाला आहे व आमचे पूर्वज पूर्वोक्त सुमेरुखंडांतून गलबतानें जंबुद्वीपकल्पाच्या वरच्या भागांत सुखरूप येऊन पोहोचले आहेत!

(४) ज्या ठिकाणीं वनस्पती मरून पडल्या, त्या ठिकाणीं दगडी कोळसे सांपडतात, व ज्या ठिकाणीं प्राणी मरून पडले, त्या ठिकाणीं त्यांच्या अस्थींचे अवशेष सांपडतात; जसें, सिबिरियांतील मेमॉथचीं शवें, व हस्तिदंत.

(५) युरोप व अमेरिका या खंडांप्रमाणें एशिया खंडाच्या उत्तर भागीं हिमपाताचा वर सांगितल्याप्रमाणें फारसा उपद्रव झाला नाहीं तरी स्पिटसबर्गेनपासून उपरिनिर्दिष्ट अज्ञात भूमीपर्यंत पूर्वीं असलेल्या ब्रह्मरमहा ऊर्फ सदा वसंताचा हिवाळा झाला व तेथील जमीन नोवा झेंबला, रंगेल वगैरे बेटें किंवा टापू शिवायकरून खालीं बर्फाच्या वजनानें दबली व तिचा सिबिरियाच्या किनाऱ्यावर बॉफर्ट नांवाचा उथळ समुद्र बनला!

पण हें अपूर्व हिम कां पडलें? ह्याचा [illegible] आम्हांस भौगर्भिक दृष्टीनें कांहीं करितां येत नाहीं. पण ह्याचा विचार पुढें करूं. सध्या आमचें उत्तर आर्यावर्तांतील फेरफाराचें वर्णन सिबिरियापर्यंत आणून पोहोचविलें आहे, तें आपण प्रथम दक्षिण आर्यावर्तापर्यंत नेऊन पोहोचवूं.

सुमेरू ( मर्व्ह ) व त्रिविष्टप ( तिबेट ):—" अगणित शतकेंपर्यंत एशिया खंडाचा भूभाग हळूहळू वर चढत आहे. तेणेंकरून एशिया खंडाच्या व युरोप

खंडाच्या हवापाण्याचें तसतसें स्थित्यंतर होत आहे. गोबीचें मोठें विस्तीर्ण वाळवंट आहे. तें एकेवेळीं एका मोठ्या समुद्राचें पात्र होतें, व त्या समुद्राचें कास्पियन समुद्रांतून बाल्टिक समुद्राशीं दळणवळण होतें. ह्यास पुरावा काय ? तो तेथील भूमिच्या व भूगर्भाच्या स्थित्यंतरांत भरपूर सांपडतो. हें स्थित्यंतर पाहण्यास काय करावें ? त्यास सेल्युरियन व टर्शिअरी काळांचे उठावदार नकाशे प्रसिद्ध झाले आहेत ते पहावे. ते जरी अपुरे आहेत, तरी ते पाहिल्याबरोबर तेथील भागाच्या सदरहू ढळढळीत बाबीच्या संदेहास बिलकुल जागा राहू देत नाहींत. त्या काळापासून अलीकडे युरोपच्या उभ्या भूभागांत निर्विवाद पालट झाला आहे. व तो कित्येक ठिकाणीं २००० फुटांचा आहे. असल्या हालचाली किंवा फेरफार फार हळूहळू होतात. ते सहज कळत नाहींत. पण त्यांचा परिणाम वनस्पती व प्राणी यांजवर कालान्तरानें फार महत्वाचा होतो. याचें कारण असें कीं ३५० फूट उत्पात्ताचा परिणाम वार्षिक उष्णतामानांत एक अंश शीताबरोबर (थंडी] अथवा तें स्थळ भूपृष्ठावर उत्तरेस ६० मैल ढकलल्यासारखा होतो. हें हळूहळू होणारे उत्पात अजून थांबलें असें झालें नाहीं. ऐतिहासिक काळामध्यें त्याचे परिणाम युरोपला फार बाधक झाले आहेत. ते असें कीं मध्य एशियेंतील उडाणटप्पू लोक युरोपांत त्या त्या कटिबंधांतील पूर्वपश्चिम मार्गांनीं येऊन अवचित भरले आहेत ! जमिनीच्या पातळींत पुनः पुनः असा फरक पडल्यामुळें ती निर्जल झाली व म्हणून तेथील लोकांस तहानभूक भागविण्यास स्थलांतर करणें प्राप्त झालें. त्यांच्या बैल पाजण्याची आक्सस ( उक्ष=बैल ) व यक्षांच्या वसाहतीची अकस्टार्टिज ( यक्ष=एक आर्य लोकांची जात ) ह्या नद्या ऐतिहासिक काळांत कित्येक वर्षें सुक्या टाक होऊन पडल्या. निरनिराळ्या जमातींच्या ज्या महत्वाच्या मोहिमा युरोपखंडावर झाल्या त्या असल्या अस्मानी फेरफारामुळें झाल्या व त्या सुलतानी अमलामुळें झाल्या असें बिलकूल झालें नाहीं. अशी मध्यएशियेमध्यें लोकसंख्या फार वाढते अथवा तेथील लढवय्ये सरदार मोठें महत्वाकांक्षी आहेत म्हणून अशा मोहिमा होतात असें म्हणण्याचा युरोपांत प्रघात पडला आहे. त्याचप्रमाणें ते प्रदेश मनुष्याच्या वस्तीस फार सोईचे आहेत. म्हणून तेथील लोकांच्या धंद्याचा विचार करितां तेथील लोकसंख्या भराभर वाढते ह्यांत संशय नाहीं व तेथील लोकनायकांनीं त्या लोकांस दुसरे ठिकाणीं मुद्दाम नेलें आहे—असेंही पुष्कळ प्रसंग आहेत ह्यांतही संशय नाहीं. पण ज्या नियमांनीं मनुष्याचें उत्पादन नियमित होतें व ज्या प्रमाणाप्रमाणें पृथ्वीचें वरील कवच सगतिक राहतें म्हणजे तें एका ठिकाणीं वर चढतें व दुसऱ्या ठिकाणीं खालीं जातें—हें तत्व अर्वाचीन इतिहासज्ञ ध्यानांत ठेवतील तेवढें थोडेंच होय. लोकसंख्या वाढली असतां सर्वत्र पुरी दाटी होऊन किंवा लोकांस युद्धाचा चेव चढला असतां ते चोहोंकडे पसरून जितक्या त्वेषाच्या व आकस्मिक मोहिमा होतात त्यापेक्षां एशियांतील लोकांच्या टोळ्यांच्या झालेल्या मोठमोठ्या स्वाऱ्या जास्त त्वेषाच्या व आकस्मिक झाल्या आहेत. ज्या

दुर्जेय भौमिक कारणानें बाल व वृद्ध, सशक्त व अशक्त लोक आपलीं गुरेंढोरें, रथगाड्या, व बकऱ्यामेंढ्या घेऊन हताश व निराश होऊन आपला देश निरुपायास्तव टाकितात अशा कांहीं अनिवार अगत्याकरितां ते एशियेंतून युरोपांत घुसलेले दिसतात. असलें कारण म्हटलें म्हणजे तेथील भूभागांत बदल व पाण्याच्या प्रवाहांत फरक होय. लोकांच्या ज्या टोळ्यांना स्थलांतर करावें लागलें, त्यांस त्या कटिबंधांतील मार्गांनीं जाणें प्राप्त झालें म्हणजे त्यांचे रस्ते त्यांच्या अक्षांशाच्या सुमारानें पूर्वपश्चिम होते व रेखांशांच्या सुमारानें दक्षिणोत्तर नव्हते. म्हणून त्यांचा प्रवास सुकर होता ":—

" ह्या भौगर्भिक क्रांती मनुष्याच्या इतिहासांत घुसल्या व पूर्वोक्त भूमध्यसमुद्र संपुष्टांत येतां येतां तो कास्पियन समुद्राएवढाच शिल्लक राहिला व त्याचा संबंध बाल्टिक समुद्रापासून अजिबात तुटला ".–धी इन्टेलेक्चुअल डेव्हलपमेन्ट ऑफ युरप–खंड १, भाग २, पान २८.

ह्या भूमध्यसमुद्रांत स्वर्गवाचक त्रिविष्टप ऊर्फ तिबेट ऊर्फ बैलाच्या तीन वशिंडा (कोळें)सारखें द्वीप किंवा द्वीपकल्प होतें व त्याच्या अलीकडे भूमध्यसमुद्रापार जंबुद्वीप होतें. त्यांच्यामध्यें ह्या जलप्रलयाच्या काळीं वरील प्रमाणें आपली भूमिमाता हिमालय नांवाचें अद्वितीय पुत्ररत्न प्रसवली. त्या वेळीं तिच्या पोटांत ज्या प्रसववदेना झाल्या, तेणेंकरून त्रैलोक्य हादरलें व घर्मयुक्त झालें. त्यांत जागोजाग अनेक उत्पात व बर्फाचे व पाण्याचे प्रलय झाले व त्यांत किती वनस्पती, जीवजंतु, प्राणी व मनुष्यें मेलीं व देशोधडीस लागलीं ह्याचा अंदाज करितां येण्यासारखा नाहीं. हे पाण्याचे पूर ओसरले तेव्हां असें पाहाण्यांत आलें कीं अफगाणिस्थान व इराण ह्यांच्या दरम्यान मर्व्ह किंवा मेरू म्हणजे पृथ्वीचें आडें या अर्थाचें पुराणप्रसिद्ध व इतिहासगर्भ स्थळ असें होतें कीं ज्याप्रमाणें मुंबईचें सर्वोत्कृष्टत्व व अग्रगण्यत्व यांवरून पश्चिम हिंदुस्थानास हल्लीं मुंबईइलाखा हें सामान्य नांव मिळालें आहे, त्याप्रमाणें ह्या उत्तरेच्या कुमेरूशीं अथवा उत्तरध्रुवाशीं तुलना करितां ह्या सुमेरूवरून उत्तर एशियेस त्रिविष्टप, सुमेरू, ऐरावत व उत्तरकुरूसुद्धां सुमेरुखंड ऊर्फ समरकंद हें नांव पडलें होतें, त्या सुमेरूचा सर्वांत उंचपणा वगैरे यथापूर्व राहिला नाहीं ! त्याचें महत्त्व त्याच्या जवळच्या पामीर पठाराकडे जाऊन त्यापासून ईशान्येस थिअनशान, आलताई, याब्लोनाई, खिंगन व स्टानोव्हाई हे पर्वत ओळीनें अफाट पासिफिक महासागराच्या किनाऱ्यापर्यंत एकाशीं एक लगटून बसले व त्यापासून आग्नेयीस त्याहून एकापेक्षां एक वरचढ असे काराकोरम, कुएनलन व हिमालय हे पर्वत ओळीनें ब्रह्मदेशापर्यंत एकाशीं एक लगटून बसले व सदरहू पामीर अथवा सुमेरू पश्चिमेस कास्पियनपासून काकेशस पर्वत व काकेशसपासून अपिनाइनपर्यंत व अपिनाईनपासून आल्पसपर्यंत व आल्पसपासून पिरिनीजपर्यंत आजूबाजूस अधिक उण्या उंचीच्या शाखा पसरीत अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यास जाऊन भिडला (डा० गीकी याचें भूगर्भशास्त्राचें पहिलें पुस्तक पा. ११५) व हिमालय व

कुएनलुन यांमधील तिबेट अथवा त्रिविष्टप द्वीपकल्पाचें समुद्रापासून चार हजार फूट उंचीचें पठार झालें व हिमालयाच्या उत्पातानें त्या पलीकडील जुंबुद्वीपाचें जंबुद्वीपकल्प झालें ! व सिंधू, सरस्वती, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा वगैरे नद्या त्या द्वीपकल्पांत उत्तरवाहिनी जुन्या नद्यांच्या ऐवजीं दक्षिणेकडे वाहूं लागल्या ! व त्या सिंधू, गंगा, यमुना आदिक नद्यांच्या गाळानें हिमालय व विंध्य यांमधील दरी ३००० फूट भरत येऊन अगस्त्य प्रमुख आर्यसंततीस आर्यावर्ताची वसाहत उरकल्यावरही दुर्लंघ्य वाटणारा विंध्याद्री त्यांस गोदावरी कांठच्या जनस्थानावरून कृष्णाथडीवरील अगस्त्याश्रमापर्यंत जाण्यास अपूर्व सुलंघ्य झाला; एवढेंच नाहीं तर पूर्वीं अनेक द्वीपयुक्त असल्यामुळें समशीतोष्ण राहणारी पृथ्वी त्रिखंड युक्त झाली व तेणेंकरून ती भूमध्यावर विशेष उष्ण, पुढें समशीतोष्ण व नंतर शीत-कटिबंध यांनीं युक्त झाली ! कारण, त्या विस्तीर्ण व अफाट खंडाच्या भूमीची दैनिक व आर्तव उष्णता शमविण्यास जवळच्या समुद्रावरील पवन येत असत, ते ह्या नवीन व्यवस्थेनें पूर्ववत वाहण्याचें बंद पडले ! व कांहीं प्रदेश अतीं थंड, कांहीं प्रदेश मध्यम उष्ण व कांहीं अती उष्ण झाले ! व तेणेंकरून पृथ्वीवरील वनस्पतिसृष्टींत व जीवसृष्टींत अत्यंत उलथापालथ झाली ! ती अशी कीं तेथील समुद्रांचीं वाळवंटें होऊन पडलीं ! एवढ्यावरच त्यांची दुर्दशा थांबली नाहीं ! तर तीं दिवसानुदिवस अधिक रुक्ष म्हणजे वनस्पती व प्राणी यांच्या जीवनास अयोग्य झाली ! ( एशियाचें भूगोलवर्णन वाचा ). आतां कोणी हिमालय हा एका भूमध्यसमुद्रांतून बाहेर पडला यास प्रमाण काय म्हणून कोणी पुसेल तर त्यास सांगणें कीं त्याचीं कांहीं लेखीप्रमाणें आमचा आर्यललितविस्तार व हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची प्रस्तावना यांत दिलीं आहेत. त्याशिवाय, पुढील नवीनप्रमाणें पहा.–डाक्तर गीकी आपले भूगर्भाचे प्राथमिक पुस्तकांत असें म्हणतो.–"पृथ्वीवरील विशाळ पर्वतांच्या ओळींपैकीं कांहीं ओळी बहुतेक चुनखडीच्या आहेत. उदाहरणार्थ, आल्पसपर्वताच्या शिखरामध्यें व हिमालयाच्या ओळींत उंच जमिनीच्या ज्या मोठमोठ्या ओळी आहेत, त्या समुद्रांतील प्राण्यांच्या अवशेषांच्या बनल्या आहेत व त्यांवर अक्षय्य हिम राहतें व त्यापासून बर्फाच्या नद्या खालील दऱ्यांत घसरत जातात." मि. ई. मार्सडेन आपल्या १९१७ त प्रसिद्ध झालेल्या जॉग्रफी फॉर सिनियर क्लासिस–पा. १२५ यांत म्हणतो.– "हिमालय हे वस्तुतः पाहतां, घड्यांचे पर्वत आहेत. ते महासागराच्या तळापासून वर वाढले आहेत. तो महासागर दक्षिण हिंदुस्थानचे उत्तरेस एकदां पृथ्वीच्या पृष्ठभागावर खळाळत होता. ते पर्वत तक्त्यांचे (प्रस्तर) व रूपान्तरविशिष्ट खडकांचे झाले आहेत." ( आमचें भूगर्भदर्पण पहा ). ह्या भूगर्भाच्या इओसीन ते प्लेइस्टोसीन काळांत झालेल्या ह्या उत्पाताची गंधवार्ता नसलेले चांगल्या ठिय्याच्या (पाया) दाक्षिणावर्तांतील लोक आपल्या रोजच्या तोंडपाठ स्नानसंकल्पांत जंबुद्वीपकल्पाचा उल्लेख जंबुद्वीप म्हणजे जंबुफळासारखें बेट म्हणून निःशंक करितात ! असा फेरफार कां झाला ? हें भौगर्भिक दृष्टीनें सांगणें आम्हांस अशक्य आहे.

म्हणून त्याचें कारण भौगर्भिक कारणाशिवाय इतर कारण देण्याची सौलत आम्हांस मिळेल तर जें पूर्वींच्या आमच्या ग्रंथांत दोनदां सांगितलें होतें, तेंच आणखीं विशेष सारासार विचार करून पुन्हां सांगणें सयुक्तिक वाटतें कीं अपूर्व फेरफार होण्यास पृथ्वीच्या कक्षेतील म्हणजे गमनमार्गातील संपातचलनाशिवाय व अक्षचलनाशिवाय दुसरें कारण खास झालेलें नाहीं. ह्या संपातबिंदूच्या म्हणजे पृथ्वीच्या व सूर्याच्या गमनमार्गाच्या छेदनबिंदूच्या चलनाची एक प्रदक्षिणा होण्यास सुमारें २५,००० वर्षें लागतात व त्याचा परिणाम दर संवत्सरांत जमतां जमतां सुमारें १०–१२ हजार वर्षांनीं चांगला जाणवतो असें आमचें पूर्वींप्रमाणेंच अजून मत आहे.

" विद्यमान काळीं आपल्या ह्या भूमिमातेच्या आकाशांतून सूर्याभोवती फिरण्याचा मार्ग (कक्षा–आर्बिट) साधारणतः वाटोळा (सर्क्युलर) आहे, पण डा. क्रोलच्या अभिप्रायाप्रमाणें अत्यंत अर्वाचीन काळांत ( प्लेइस्टोसिन एज) तो पुष्कळच दीर्घ ( इलॉंगेटेड ) होता. सदरहू युगामध्यें पृथ्वी ही सूर्यापासून अत्यंत दूरच्या केंद्रस्थानीं ( अफेलियॉन–ऍपो, दूर व हिलियॉस, सूर्य ) उत्तर गोलार्धांचा हिंवाळा झाला असतां, तो हिंवाळा हल्लींच्या हिंवाळ्यापेक्षां अनेक दिवसांनीं दीर्घ होता व त्याचें दैनिक उष्णतामान पुष्कळच कमी होतें. त्यांत हें खरें कीं त्या वेळचा उन्हाळा हल्लींच्या उन्हाळ्यापेक्षां पुष्कळ उष्णतर असला पाहिजे; पण तो इतका लघू होता कीं त्याच्या जाद्या गर्मीस त्या वेळच्या हिंवाळ्यांतील फाजील बर्फास वितळवितां आलें नाहीं. म्हणून असें बर्फ जमतां जमतां उत्तरेकडील देश खंडप्राय बर्फाच्या अवगुण्ठनाखालीं दडपले गेले व अर्थात तेथें प्रालेयावस्थेचें ( ग्लेसियल कंडिशनस ) साम्राज्य चालू झालें. इतक्यांत इकडे दक्षिण गोलार्धामध्यें अक्षय्य वसंतऋतूचें सुखकर ( जेनियल ) साम्राज्य चालू होतें म्हणजे येथें दीर्घ व शीत उन्हाळे व ऱ्हस्व व अतीव्र हिवाळे चालू होते. पण प्रत्येक १०,५०० वर्षांनीं ह्या दोन्ही गोलार्धांची प्राकृतिक ( फिजिकल ) परिस्थिती संपातबिंदूच्या ( इक्विनॉक्सिस ) सामान्य चलनानें हळूहळू विपर्यस्त (रिव्हर्संड)होते. दक्षिण गोलार्धांतील ही वासंतिक सुखाची परिस्थिति जाऊन तिच्या ठिकाणीं प्रालेयाची परिस्थिती हळूहळू येते व उत्तरगोलार्धांतील दीर्घ प्रालेय-अथवा अत्यंत अर्वाचीन (प्लेइस्टोसीन) युगांतील उष्णतर काळामध्यें येऊन त्यांतलि जमलेलें बर्फ वस्तुतः सगळें अंतर्धान पावतें. असल्या आळीपाळीनें येणाऱ्या प्रालेय व वासंतिक (ग्लेसियल व जेनियल) काळांनीं आपल्या हिंदुस्थानच्या प्रदेशामध्यें ह्या उपन्यासाप्रमाणें अत्यंत अर्वाचीन ( प्लेइस्टोसीन ) काळांत शिंपांपासून पंचजनापर्यंत उत्तरेकडील व दक्षिणेकडील प्राणिसमुदायाचें बाह्यतः संमिश्रण होतें. शेवटीं, कांहीं शास्त्रज्ञ असें मानितात कीं ही प्रालेयावस्था ( ग्लेसियल ) जर ज्योतिषांतर्गत कारणांनीं उद्भवली असेल तर तींत वस्तुतः अंतर्प्रालेय काळ ( इंटग्लेसियल पिरियड ) नसतात. तर मोठ्या हिमाच्या फलकांची स्थानिक प्रगती ( ऍडव्हान्स ) व प्रत्यागती ( रिट्रीट )

आकस्मिक, स्थानिक अथवा उष्णतामानांतील वार्षिक भिन्नता ( व्हेरिएशन्स ) हिमपात व तत्सम कारणांनीं होते.

याप्रमाणें उत्तर गोलार्धांतील मोठ्या पर्वतांच्या ओळी, जसें, स्पेनमधील पिरिनीज, इतालींतील आल्पस, एशियामायनर मधील काकेशस, हिंदुस्थानांतील हिमालय वगैरे पासिफिक महासागरापर्यंतच्या तत्सम ओळी यांवर प्राचीन प्रालेयावस्थेचीं चिन्हें अधिकउणी अद्याप आढळतात. उत्तर अमेरिकेंत उत्तरेकडील प्रालेयफलक न्यूयॉर्कपर्यंत पसरला होता, व लोंढ्यापासून उत्पन्न झालेले डोंगर–लॉंग आयलंडपासून रॉकीपर्वतापर्यंत–आहेतः—" ( आमचें—भूगर्भ-दर्पण– भाग १९ )




समजा कीं पृथ्वी ही उत्तरगोलार्धांत उ येथें आहे. व सूर्य सू येथें आहे व तेव्हां हिंवाळा झाला आहे. पुढें कांहीं काळानें उ ह्या बिंदूचें चलन उं येथें झालें तेव्हां तो हिंवाळा पृथ्वी उं येथें असतां होऊं लागेल. संपात बिंदू ठरींव असतात तरी ह्या संपातांच्या चळनानें एक फेरफार होईल. तो हा कीं उ येथें पृथ्वी असतां सू सूर्यापासून तिचें जितकें अंतर होतें त्यापेक्षां ती उं येथें गेली कीं वाढेल व तेणेंकरून पृथ्वीवर उत्तरभागीं हिंवाळा वाढेल व असें होतां होतां तो संपात बिंदू द पर्यंत चळेल तेव्हां व पुढें पृथ्वीवर हिंवाळ्याची परमावधी होईल व हिमयुग उत्पन्न होईल, व सुमारें १०,०००–१२००० वर्षांनीं भूभाग, वनस्पती व प्राणी यांच्या पूर्वव्यवस्थेंत उलथापालथ होईल. हीच स्थिती पृथ्वीवरील उन्हाळ्याची होईल.

या डॉक्टर क्रोलच्या उत्तम उपपत्तीस आम्ही पहिले दोन ग्रंथ लिहिले तेव्हां नांव ठेवणारे कोणी आहेत असें आमच्या पाहण्यांत नव्हतें; पण एनसायक्लोपिडिया ब्रिटानिकाच्या नवीन आवृत्तींत त्या उपपत्तीस अगदीं नादान ठरविण्याची जेवढी चतुराई दाखविली आहे तेवढी तीस–सवत–उपपत्ती आणून उभी करण्यांत दाखवावयात पाहिजे होती, पण ती कोणी दाखविली नाहीं. हें तर काय पण कै० विद्वद्वर्य टिळकांनीं तेंच केलें आहे. ती त्यांनीं सर्वथैव टाकिली असें झालें नाहीं. पण सदरहू उपपत्ती आम्हांस बरी वाटत आहे, म्हणून आम्ही तिचें पुनरुच्चारण करण्याचें येथें धाडस केलें आहे याबद्दल विद्वज्जन आम्हांस क्षमा करतील असें आम्हांस वाटतें.

अनुभवः—१ देशी व २ विदेशी.–उत्पातांचे--परिपोषक.--हे अनुभव दोन प्रकारचे आहेत.--१ स्वतःचे खुद्द अथवा प्रत्यक्ष व २ दुसऱ्याचे अथवा परोक्ष--परोक्ष ज्ञान ग्रंथोक्त असतें. वरील मोठा प्रलय व उत्पात झाल्याचा उल्लेख शतपथ ब्राह्मण, अथर्ववेद, महाभारत, भागवत, मत्स्यपुराण व अवेस्ता या देशी ग्रथांत आला आहे. ह्यांतील शकापूर्वी ३००० वर्षांच्या शतपथ ब्राह्मण इ

ग्रंथा ( भा. ज्यो. इ. ) प्रमाणें व (भा. व. अ. १५-९०) प्रमाणें सूर्य, बृहस्पती व पुष्य-नक्षत्र एका राशीस आलीं असतां कृतयुगाचे प्रारंभीं हा प्रलय होऊन गेला आहे. याचें वर्णन पुढें अवतार या सदराखालीं सविस्तर दिलें आहे. दुसऱ्या उत्पाताचा उल्लेख सह्याद्री खंडांत परशुराम अवताराच्या वसाहतीकरितां कोकणच्या उत्पादनांत अथवा लागवडीच्या इतिहासांत आहे. तिसऱ्या प्रलयाचा उल्लेख श्रीरामाचे अवताराच्या इतिहासांत लंकेच्या व लेमुरियाच्या निःपातांत आहे. चवथ्या प्रळयाचा उल्लेख श्रीकृष्णाच्या अवताराच्या इतिहासाच्या शेवटीं द्वारकेच्या निःपातांत आहे. भूगर्भशास्त्राप्रमाणें सिंधू व गंगा ह्या नद्या पश्चिमेस एकत्र राजपुतान्याभर पसरलेल्या आरबी समुद्रास मिळत होत्या. पण पुढें राजपुतान्याचा उत्पात व बंगालकडील बाजूचा जास्त निःपात झाल्यामुळें त्यांतील गंगा अथवा इतिहासगर्भ नांवाची भागीरथी भगीरथाच्या अंशतः प्रयत्नामुळें बंगालच्या उपसागरास–सिंधूस मागें पंजाबांत टाकून–एकटी मिळाली. इकडे सिंधू पंजाबांत एकटी राहिली ती कांहीं दिवस कच्छच्या रणास मिळत असे, व त्या कच्छच्या रणाचें पाणी खंबायतच्या अखातास मिळत असे. म्हणजे काठेवाड पूर्वी एक बेट होतें. पण एका उत्पातांत तिकडील ब्राह्मणाबाद शहर एकाएकीं वाळूच्या हल्लयानें नेस्तनाबूद होण्याच्या सुमारास ती नदी त्या शहराची बाजू सोडून कराची बंदराकडे पश्चिमेस सरकली आहे. याप्रमाणेंच केरळ म्हणजे मलबार प्रांतांत समुद्राचें पाणी शिरून तेथील देवालयें, ऋष्याश्रम व तीर्थस्थानें वाहून गेल्याचें वर्णन ब्रह्माण्ड पुराणांत आहे.

२ आमचे स्वतःचे खुद्दः—पश्चिम हिंदुस्थानचा किनारा उत्पतांनीं किंवा दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें दिवसानुदिवस वर येत आहे. या प्रतिपादनास आमचीं स्वानुभविक प्रमाणें अशीं आहेतः–( १ ) आमच्या बाळपणीं आमची जन्मभूमी जी चिपळूण बंदर यांत मोठमोठीं गलबतें त्या बंदराच्या धक्कयास धक्के देत असत व त्यांच्या शेजारींच जळमार्गाच्या खात्याची ( कस्टमस ) मांडवी ( ऑफिस ) इतिहासाप्रमाणें हपशांचा कारकून श्रीयुत बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून जुनी होती. आम्ही पांच सात वर्षांचे असतां म्हणजे सुमारें साठएक वर्षांपूर्वीं इंग्रज सरकारनें कुंभारल्या घाटाची जुनी सडक दुरुस्त करून चिपळूण बंदर व गोवळकोट बेट यांमध्यें पूल बांधिला. तो पहिल्याच पावसाळ्यांतील वाशिष्ठी व शिव ह्या नद्यांच्या पुराच्या तडाक्यानें वाहून वाशिष्ठी व शिव नद्यांची खाडी चिपळूणच्या बंदरापासून गोवळकोटाच्या नवीन इंग्रजांनीं बांधिलेल्या धक्क्यांपर्यंत अशी रेवली (होरली) कीं मोठमोठीं गलबतें पूर्वींप्रमाणें वरच्या चिपळूणच्या बंदरांत येईनाशीं झालीं, व तीं तेथून तीन एक मैलांवरील इंग्रजांच्या गोवळकोट किल्ल्याच्या धक्कयास लागूं लागलीं ! पण अलीकडे पाहतों तों तीं त्या गोवळकोट किल्ल्याच्या धक्कयासही लागण्याची मुष्कील झाली आहे ! कारण त्या वाशिष्ठी नदीच्या खाडीमध्यें त्या गोवळकोटापासून त्या खालच्या तीन कोशांवरील दीवें बेटापर्यंत भोपणें म्हणजे भोप्याच्या झाडांचें जंगल व भाटणें म्हणजे गाळाचे वर आलेले उंचवटे

( शोल्स ) वाढले आहेत ! चिपळूण बंदराच्या लगत एक मोठें डोंगरांनीं चोहोंकडून वेढलेलें दहाबारा मैलांचें मैदान आहे. त्या ठिकाणीं कुंभारल्या घाटावरचा माल आणणाऱ्या बैलगाड्या उतरत असतात. म्हणून त्यास तळ[क्यांप] असें म्हणतात अशी आमची पूर्वीं समजूत होती; कारण कधीं काळीं भरतीचें खारें पाणी येथें येत जात असेल असा संशय घेण्यास जागाही नव्हती. पण त्यांत विहिरी खणल्या तर त्यांच्या तळीं खाऱ्या पाण्याच्या दलदलींत होणारे भोंप्यांच्या झाडांचे खुंट लागलेले आम्ही प्रत्यक्ष बाळपणीं पाहिले ! यावरून आमची बालंबाल खात्री होऊन चुकली कीं वरल्या वाशिष्ठी व जगबुडी ह्यांच्या संगमावरील घोक्याच्या जागेबद्दल इशारा करण्यास दिवा लावावयाच्या दिवें बेटापासून ह्या खाडीच्या तळापर्यंत आठ नऊ कोश जमीन तींतील पाण्याच्या क्रियेनें भरून आली आहे असा इतिहास त्या तळ शब्दानें नवीन सांगितला ! (२) आमच्या आठवणीप्रमाणें हजीकासम याच्या आगबोटी इंग्रजांनीं प्रथम पेशव्यांकडून मुद्दाम उत्तम बंदर म्हणून मिळविलेल्या बाणकोटच्या खाडींत खुशाल बिनधोक शिरत असत. पण प्रस्तुत तींत इतकीं भाटणें वाढलीं आहेत कीं तींतील त्या उत्तम बंदरांत आगबोटी घालण्याची सोय बिलकुल राहिली नाहीं ! म्हणून त्या आगबोटी आमचा कुलस्वामी जो श्रीहरिहरेश्वर याच्या स्थानाबाहेर समुद्रांतच उभ्या करितात ! व उतारूंस चढण्याउतरण्याचें काम कसें तरी उरकून घेतात ! (३) कुलाबा जिल्ह्यांतील खाड्या होरल्या [रेवल्या] मुळें दळणवळणास येणाऱ्या अडचणीबद्दल तक्रारी मुंबईच्या कायदे कांउसिलांत त्या वेळेचे लोकनियुक्त नामदार मि. परांजपे दर वर्षीं करीत असत ! ( ४ ) ठाणें जिल्ह्यांतील सोपारें ऊर्फ प्राचीन शूर्पारक हें हल्लींच्या मुंबईबंदराप्रमाणें पूर्वीं बौद्धकाळांत फार मोठ्या देवघेवीचें बंदर होतें. पण त्या बंदरापासून समुद्र दोन तीन मैल दूर गेल्यामुळें व बी. बी. सी. आगगाडी जास्त सोईची झाल्यामुळें तें बंदर वरील चिपळूण बंदरांप्रमाणेंच रद्दी झालें आहे ! ( ५ ) आम्हीं मागें सुरतेस गेलों असतां तेथील तापी नदीची खाडी होरल्यारेवल्यामुळें तेथील वळंदे व इंग्रज यांच्या एकाही वखारीस सध्या गलबतें लागत नाहींत, तीं तेथून खालीं सहा कोशावर लागतात असें तेथील लोकांनीं सांगितलें ! ( ६ )प्राचीन काळीं पालिबोथ्रा म्हणून परदेशीं प्रसिद्ध असलेल्या भडोच किंवा भरुकच्छ बंदराच्या बाजूस मैलोगणती चिखल साचल्यामुळें त्याचीही स्थिती सुरतेप्रमाणें होऊन पडली आहे ! ( ७ ) खंबायतचें आखात रेवल्यामुळें घोघोबंदर उत्तम म्हणून प्रसिद्ध असतां तें निरुपयोगी होत चाललें आहे ! (८) काठेवाडांतील तुपाकरीतां प्रसिद्ध पोरबंदर येथील विहिरींच्या भिंती आम्हांस समुद्रजात कीटकाच्या शुक्तींच्या वगैरे झालेले सडकांच्या आढळल्या ! ( ९ ) गुजराथच्या बाजूच्या एका लहान बेटांत सिंहाचे वगैरे प्राचीन प्राण्यांचे अवशेष सांपडतात म्हणून तिकडे पुराणवस्तुशोधक जातात. ( १० ) कोचीन व अलेप्पो येथें समुद्र मागें हटत चालल्याचीं चिन्हें स्पष्ट आढळतात !

यावरून आम्हांस आमच्या पश्चिम हिंदुस्थानचा किनारा वर चढत आहे असें स्वानुभवानें छातीठोकपणानें सांगतां येतें !

विदेशी.—ह्या हळूहळू होणाऱ्या जमीनीच्या हालचालींत कांहीं विशेष आहे असें नाहीं. जें काय असंख्यात वर्षें होत आलें त्यांतीलच ह्या हालचाली आहेत. टर्शिअरी (तृतीय) काळापासून युरोपखंडाचा भाग समुद्रसपाटीवर चढला आहे. नार्वे देशाचा किनारा ६०० फूट वर आला, आल्पसपर्वत २००० अथवा ३००० फूट व अपिनाइन १०००ते२०००फूट वर चढला. निओलेथिक युगापासून ब्रिटिश बेटांच्या पातळींत फरक पडला आहे, व इंग्लंडचा अधःपात व स्काटलंडाचा उर्ध्वपात झाल्यामुळें त्यांत एक विलक्षण फेरफार झाला. तो हा कीं तें सगळें बेट युरोपखंडाच्या मुख्य भागापासून अगदीं वेगळें पडलें आहे !

निष्कर्ष.—या सिद्ध व साधक प्रमाणांवरून काय ठरतें? एशियाखंडांत उत्तरध्रुवापासून तिबेटापर्यंत पसरलेल्या उत्तर आर्यावर्तांत संपातबिंदू व अक्षबिंदू यांच्या चलनानें सुमारें १०।१२ हजार वर्षांपूर्वीं तिबेट व जंबूद्वीप ह्यांतील भूमध्यसमुद्रांतून हिमालय पर्वत वर निघाला. तेव्हां कोठें कोठें निःपात व कोठें कोठें उत्पात होऊन मोठा जलप्रलय माजला, व त्यांतील आर्यांनीं हिमालयाच्या उत्पत्तीमुळें जंबुद्वीपाचें जंबुद्वीपकल्प बनलेल्या देशांतील अमरकोशोक्त विंध्य व हिमालय यांतली पूर्वपरचित मायभूमी जी भूमध्यसमुद्रकाठचें दक्षिण आर्यावर्त (गोंड, गोंडवन ) यांत तेथील लोकांस विंध्याद्रीपलीकडे दक्षिणेस गोदावरीकाठीं जनस्थान ( नासिक ) व कृष्णाकाठीं अगस्त्याश्रमापर्यंत लोटून सिंधू, सरस्वती, गंगा, यमुना वगैरे नव्या नद्यांच्या काठीं सदानीरा ( गंडकी ) नदीच्या पलीकडील मगध ( बहार ) देशापर्यंत आर्येतर चार जनांसह नवीन वसाहतींची भरतीच्या जागेंत खूप गर्दी करून सोडिली, व त्यावेळीं " ते हिंदू उत्कृष्ट प्रतीचे तात्त्विक व धार्मिक प्रश्न काढून त्यांचे समाधानकारक उलगडे करण्यांत गुंतलेले होते व त्यांची सामाजिक स्थिती फार सुधारलेली होती."—असें पूर्वोक्त पुस्तकांत मि. ड्रेपर म्हणतो. हें आपले पाहण्यांत आलें आहे कीं वैदिक सारस्वतांत दीर्घकालिक ( अधिकांत अधिक ३० दिवसांच्या ), अखंड पुष्कळ दिवसांचा काळोख, व दहा महिन्यांचे यज्ञाचें सत्र यांचा उल्लेख करणारीं अनेक वचनें आहेत, त्याप्रमाणें त्या उत्तर आर्यावर्ताच्या स्थानांतून दक्षिण आर्यावर्तांत विंध्य व हिमालयामध्यें येण्यास लावणाऱ्या एक किंवा अनेक कारणांचा उल्लेख प्रत्यक्ष करणारें वचन नाहीं असें कै० विद्वद्वर्य टिळकांप्रमाणेंच आमचें मत आहे ( आर्टिक होम पा. ३५४ ). मग आमच्या दोघांच्या मतांत फरक म्हणून जो आहे, तो कोठें आहे ?

१ कै. विद्वद्वर्य टिळक यांचें मतः—टिळक म्हणतात कीं आर्य हे कोठें उत्पन्न झाले असतील ते असोत, पण ते आमच्या हिमालयाच्या उत्पत्तीच्या वेळच्या जलप्रलयाच्या वेळीं सुमारें ८००० वर्षांपूर्वीं विंध्य व हिमालय यांमधील प्रदेशांत [ आम्ही कुमेरु ठरविलेल्या ] मेरूवरून उर्फ उत्तरध्रुवावरून प्रथम

राहण्यास आले, व त्या प्रदेशाचें आर्यावर्त हें नांव सार्थ केलें ! कारण ते ह्या मध्यांविंध्यहिमालयोः प्रदेशास आर्यावर्त किंवा ऐर्यन वैजो म्हणजे अर्थात पितृदेश म्हणण्यास बरेच तयार आहेत.

आमचें मतः—आमचे मूळ पूर्वज भूगर्भशास्त्राप्रमाणें (आमचें भूगर्भदर्पण पहा) गोदा व नर्मदा या जंबुद्वीपांतील प्रदेशांत टर्शिअरी [ तृतीय ] युगांत प्रथम उत्पन्न ऐतरेय उपनिषदाप्रमाणें सूर्याच्या लंबरूप किरणांनीं उघड्या पडलेल्या जागीं झाले व ते क्रान्तिप्रदेशांतील त्याच कारणास्तव उघड्या पडलेल्या ईजिप्त, मेक्सीको व पेरू ह्या देशांत पूर्वपश्चिम फिरूं लागले व ते एकाचे पांढरे, तांबडे, पिवळे, काळे व फिके असे पंचरंगी पंचजन देशकालपरत्वें झाले. तेव्हां ह्या भागांत प्रथम सदावसंताचें साम्राज्य होतें. पुढें कालवशात ह्या क्रांतिप्रदेशाच्या दक्षिणेच्या व उत्तरेच्या जागा त्या सूर्याच्या किरणांनीं दोन्ही ध्रुवांकडे उघड्या पडत जाऊन पूर्वोक्त सदावसंत आपलें साम्राज्य दक्षिणोत्तर वाढवूं लागला, त्याप्रमाणें यांतील जमीन व पाणी यांवरून हत्यारें व नौकानयन यांच्या जोरावर पलीकडे जाण्यास समर्थ असलेले आर्य लोक—त्रिविष्टप [ तिबेट ] सुमेरू ( मञ्ई ), ऐरावत ( मेमोथचा प्रदेश ) व उत्तरकुरू ( तीस दिवसांच्या उषेच्या अमलाचा प्रदेश ) म्हणजे एकंदर सुमेरुखंडांत अथवा उत्तर एशियेंत वसाहती करीत गेले व हिमालयाच्या उत्पत्तीच्या वेळीं झालेल्या जलप्रलयांत आपलें मूळ ऐर्यन वैजो अथवा पितृदेश जो विंध्य हिमालयांतील दक्षिण आर्यावर्त आठवून आपत्कालीं घरचे मुलगे घरीं येतात त्याप्रमाणें तडक आले ! त्याबरोबर आमच्यापैकींच कांहीं अवैस्तिक पारशी आले व कांहीं अर्धीनें इराणांत राहिले ! त्या मागें इराणांत राहिलेल्या अवैस्तिक पारशांवर पुढें आरबस्तानांतील महंमदानुयायांनीं कुराण व तरवार यांनीं धर्मांतराचा गहजब केला तेव्हां तेही आपलें हिंदुस्थानांतील ऐर्यन वैजो आठवून आपल्या खंबाइताच्या राज्यांत आपला सिद्धाग्नी घेऊन सनजान येथें आले तेव्हां आर्यांनीं आपला पूर्वागत भाईचार ओळखून बिनदिक्कत आपले देशांत घेतलें ! ह्या दोघांनीं उत्तरकुरूकडून हिंदुस्थानांत येतांना आपल्या वसाहतींच्या अजरामर खुणा उत्तरकुरू, ऐरावत, सुमेरू, सुमेरुखंड ( समरकंद ), त्रिविष्टप, ऐर्यन वैजो ( आर्यबीज ), हरोयू ( शरयू )—हिरात हरहवैती ( सरस्वती )—हरुत, हेतुमंत ( सेतुमंत)—हेलमंड, चख ( चक्र ), वरेण ( वरुण )—घिलत, हत हेंडु ( सप्तसिंधू )—पंजाब, रंघ ( रसा ) वगैरे इतिहासगर्भ शब्दांत ठेविला णाहे; एवढेंच नाहीं तर हिंदूचे वेद व पारशांचा अवेस्ता हीं जुळीं शास्त्रें आहेत. तीं इतकी कीं जेव्हां जरूर असेल तेव्हां त्यांतील प्रमाणांची एकमेकांत पुस्ती देण्यास हरकत नाहीं असें कै० विद्वद्वर्य कुंटे यांनीं प्रथम व्हिसिसिटयूड्स इन आर्यन सिव्हिलिझेशन व नंतर कै० विद्वद्वर्य टिळक यांनीं आर्कटिक होम यांमध्यें दाखविलें आहे. तें आम्हांस सर्वस्वी मान्य आहे. कारण आम्ही वरवर सामाजिक व धार्मिक व्यवस्था वैदिक व अवैस्तिक यांची तोलली तर दोघांत जानवीं, विटाळशांचा विटाळ, सिद्धाग्नी वगैरे अनेक संस्था अगदीं

समान आहेत. हिमालयाच्या उत्पत्तीच्या वेळीं पूर्वींच्या जमिनीच्या पट्टया एक झाल्या. तेणेंकरून तांबडे, पिवळे, काळे व फिके आर्येतर लोक आपल्या देशांत आलेले आहेत ! कारण त्यांस तेव्हांपासून नौकानयनाची अडचण जी होती ती त्यांच्या मार्गांत येईनाशीं झाली !

म्हणून अलताई ( अल तौ ) पर्वताच्या शेजारीं जे मोगल लोक राहतात, ते (व्हीलरप्रमाणें) अजून वैदिक दैवांची पूजाअर्चा करणारे आहेत, व पूर्व तुर्कस्थानांत सप्तसिंधू या अर्थाचा सेमिरेटचेन्स्की हा प्रदेश आहे. त्यांस लेब्सा, वास्कन, अक्सू सर्कू, बिया, कर्तल व कोक्सू ह्या सप्तसिंधू ( सात नद्या ) आहेत ( डाक्तर सर-देसाई ) व अवैस्तिक काळीं मध्य एशियेंत पुढील पंचजन होतेः—( १ ) आर्य ( २ ) तुर्य, ( ३ ) सिरीय, ( ४ ) साइनी [ चायनी ] व [ ५ ] दाही. ऐर्यन वैजोच्या गयोमर्द राजाच्या वंशावळींत—[ १ ] मश्य, [ २ ] यिम [ यम ], [ ३ ] नृसिंह, [ ४ ] तुर ( तुर्क ), [ ५ ] इर्क [ इराणी ], [ ६ ] हुण, [ ७ ] निशक, [ ८ ] इराणी व [ ९ ] तुसक. शिवाय समरकंदमधील पडझ-डींत आफ्रासिआबची समाधी आहे [ मे. मोदी ].

**पाणी व वनस्पतीः**—ह्या मुद्याचा विचार करण्याकरितां सर्व पृथ्वींत ह्या बाबी-संबंधें अती उत्तम असलेल्या दक्षिण अमेरिकेचें उदाहरण घेऊं. एमॅझोनसारख्या महानद्यांच्या योगानें तेथें पाण्याचा पुरवठा भरपूर झाला आहे. म्हणून या खंडांत अद्वितीय अरण्यें आहेत, व आस्ट्रेलियामध्यें पाण्याचा बहुतेक ठणठणाच आहे. म्हणून या बेटांत सावली विरहित झाडें आहेत, व त्यांचीं पानें सुरकुललेलीं व बाणाकार चिंचोळीं आहेत. मलबार किनाऱ्याभर चोंहोंकडे हिरव्यागार बागा आहेत, व गोबीच्या वाळवंटांत केवळ लाकडी झुडपें आहेत, व त्यावर करडी भीस आहे. यावरून काय सिद्ध होतें ? हवेंत पाण्याचें परिमाण जसें अधिक उणें असतें त्याप्रमाणें तेथील वनस्पती अधिकउण्या बऱ्या वाईट असतात, व पाण्याचा अधिकउणेपणा होण्यास पर्वतांच्या ओळींचा अधिकउणा होणारा प्रतिबंध कारण होतो, व तेणेंकरून वनस्पतीची जी स्थिती होते, तीच तेणेंकरून मानव-प्रमुख प्राण्यांची होते. म्हणून पूर्वोक्त तीस दिवसांच्या उषेच्या अंमलाच्या उत्तर मर्यादेपासून तिबेटाच्या खालील गतभूमध्यसमुद्रापर्यंत पसरलेल्या उत्तर आर्या-वर्तांत ऊर्फ सुमेरुखंडांत ( समरकंद ) अती उंच व लांब मेरुपर्वताची ओळ व त्याच्या व त्रिविष्टपाभोंवतीं भूमध्यसमुद्राचा गराडा होता. तव्हां त्रिविष्टप अथवा तिबेट हें खरोखरीचें स्वर्ग होतें, व त्यांतील राहणारे गंधर्व, किन्नर, पिशाच, गुह्यक, सिद्ध वगैरे देवयोनींतील लोक त्यावरील मेरूपर्वतावर मजेनें राहत होते. पण तेथील मेरू व तिबेट व भूमध्यसमुद्र यांची परिस्थिती हिमालयाच्या उत्पत्तीनें बदलून गेल्याबरोबर त्यांतील वैभव इराण, ईजिप्त, ग्रीस, रोम येथें फाकलें व त्यांतील कांहीं वैभव हिंदुस्थान, ब्रह्मदेश चीन व त्यांचे भोंवतालचे समुद्र व त्यांतील बेटें यांस आलें, व येथील ऋषि, मुनी, व देव हिमगिरीवर दक्षिण आर्यावर्तांत मजेनें राहू लागले !

टीप:—पण हल्लीं ह्या शतकांत ह्या हिमगिरींतील सिमला, मरी, दार्जीलिंग नैनिताल वगैरे ठिकाणीं विदेशी लोक येऊन रहात आहेत! त्याचें हिंदीकरण होणार काय?

यावरून पुढील गोष्टी सिद्ध झाल्याः—

( १ ) मेरुपर्वत दोन होतेः–१ सुमेरु ( मर्व्ह–एन. ब्रिटानिका–पहा ) हा पामीरजवळ होता व आहे. पण हल्लीं त्याजवळ दुसऱ्या पर्वतांनीं येऊन गर्दी केल्यामुळें व त्यापासून समुद्र दूर गेल्यामुळें त्याचें पूर्वींचें *सुधारणेचें वैभव अगदीं नष्टप्राय झालें आहे. दुसरा कुमेरु हा उत्तरध्रुवावर होता व आहे, व त्याची पूर्वोक्त स्थिती त्यावर नवीन येऊन बसलेल्या बर्फाच्या पांढऱ्या टोपीनें पूर्वींपेक्षां अधिक दुःखतर झाली आहे, मग ती टोपी डॉक्टर क्रोलच्या म्हणण्याप्रमाणें संपातबिंदूच्या व अक्षबिंदूच्या चलनानें होवो किंवा आमच्या आकाशाच्या अनंतत्वाची आराधना नामक भक्तिरसपूर्ण ज्योतिषाच्या ग्रंथांत दाखविल्याप्रमाणें उदानवायुपरिपुरीत धूमकेतूच्या भेटीचे वेळीं ह्यांतील उदानवायू व पृथ्वींतील प्राणवायू यांचा अकस्मात संयोग हिमाच्या व जलाच्या प्रलयांत परिणत होऊन होवो! उत्तरध्रुवापेक्षां हल्लीं तर काय पण पूर्वींही मर्व्ह हें देवांस म्हणजे आमच्यांतील अपूर्व सुधारलेल्या लोकांस राहण्यास अत्यंत योग्य होतें ही गोष्ट सुमेरुखंड (म्हणजे हल्लीं म्हटलेलें समरकंद) हा भूगोलावर अवशिष्ट राहिलेला शब्द आपल्यांतील ( सु ) ह्या उपसर्गानें दुनियेस कण्ठशोष करून सांगत आहे! पण हल्लींचे सुशिक्षित म्हणविणारे लोक तें त्यांचें ऐकत आहेत कोठें? मेरू हे नांव प्रत्यक्ष ऋग्वेदांत नसो, पण महामेरू हें तत्समपूज्य तैतिरीय अरण्यकांत आहे. तेव्हां हा महामेरू वर सांगितल्याप्रमाणें पामीर जवळच असला पाहिजे; कारण मुंबईवरून मुंबईइलाखा हें नांव ज्याप्रमाणें निघालें आहे. त्याप्रमाणेंच ह्या सुमेरूवरून सुमेरूखंड हें नांव निघालें आहे. त्याची उत्तरमर्यादा ह्या तित्तिर ऋषीची संहिता खंड ४ प्र.पा.३ अनु. ११-६ प्रमाणें३०दिवसांच्या उषेच्या उत्तरकुरूंतील साम्राज्यापर्यंतच होती व ती त्यापलीकडे असेल तर उत्तरध्रुवावर कुमेरू होता हें समजण्यापुरतीच असली पाहिजे; जसें, ह्या आमच्या नाशिकच्या पश्चिमेस असलेल्या पेठ तालुक्याची हवा फार वाईट आहे हें आम्हांस ऐकून माहित आहे पण आम्ही तेथें कधींही गेलों नाहीं. याप्रमाणेंच एशिया खंडाचीं बेटरूप शकलें कितीही होतीं असें कल्पिलें तरी तेणेंकरून सूर्याच्या उभ्या आडव्या किरणांचे सापेक्ष बरेवाईट परिणाम केवळ पृथ्वीच्या पोटांतील सांसिद्धिक धगीनें सर्वस्वी दुरुस्त होण्यासारिखे नसतात. तेव्हां पूर्वोक्त महामेरू हा पामीर येथें असला पाहिजे व लघुमेरू हा उत्तरध्रुवाजवळ असला पाहिजे व आमचें स्वर्ग त्रिविष्टप व हा महामेरू ह्यांतील इतिहासगर्भ अर्थास लाथडून त्या लघुमेरूवर ऊर्फ उत्तरध्रुवावरच होतें असा हट्ट धरण्यांत

* ज्याप्रमाणें केळीस फूल आलें कीं ती मरते. त्याप्रमाणें मानवी सुधारणेस चैनीचें फूल आलें की ती सुधारणा मरते।

डा० वारेनसारख्या महापण्डिताच्या हाताला हात लावण्यापलीकडील कांहीं परमार्थ दिसत नाहीं ! हें सिद्ध झालें.

टीप—आपल्या पृथ्वीवरील पहिलें पाणी सूर्याच्या लंबरूप किरणांनीं तिच्या क्रान्तिप्रदेशांत नाहींसें प्रथम होऊन येथें सदावसंत चालू झाला व कालान्तरानें संपातबिंदूच्या वगैरे चलनानें क्रोलप्रमाणें उत्तरेकडे चलन पावत गेला व पुढें तद्भव हिमालयाच्या उत्पत्तीनें पृथ्वीवरील पट्टे एकत्र जुळून शीत, समशीतोष्ण व उष्णकटिबंध प्रादुर्भूत झाले आहेत !

२ उत्तरआर्यावर्त व सुमेरुखंड हे समानार्थक शब्द आहेत. त्या इलाख्याची उत्तरमर्यादा सदरहू तित्तिर ऋषीच्या व कै० विद्वद्वर्य टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें ३० दिवसांच्या उषेच्या अधिकारक्षेत्रापर्यंत ठरते व त्याची दक्षिण मर्यादा त्रिविष्टप (तिबेट—स्वर्ग) या शब्दांतील ध्वनितार्थाप्रमाणें हिमालयाखालील गतभूमध्यसमुद्रापर्यंत होती असें आमचें निश्चित मत झालें आहे; कारण त्याप्रमाणें आपले धर्मप्रमुख पांच पांडव द्रौपदी व श्वान यांच्या भारतांतील स्वर्गारोहणाच्या प्रसिद्ध काळापासून आजतागाईत चांडालापासून ब्राह्मणापर्यंत ह्या हिंदुस्थानांतील पंचजनांची प्रचलित रूढी पाहिली तर काय दिसतें ? त्यांतील प्रत्येक जण ह्या नवीन झालेल्या हिमालयावरून पूर्वोक्त त्रिविष्टप ( तिबेट ) ऊर्फ स्वर्गाकडे जाण्याची आहे. ह्यावरून सदरहू वहिवाटीचा परिपोष होतो. ही वहिवाट प्रत्येक हिंदूस माहित आहे. तेव्हां आमच्या स्वर्गास तेथील सुमेरूवरून काढून उत्तरध्रुवापासून कुमेरूवर वसविण्यांत परमार्थ कोणता ?

३ या प्रलयाच्या वेळीं एशियेंतील लोक युरोपांत घुसले. ते मोगल आचारविचारांचे होते असें डाक्तर ड्रेपर म्हणतो, त्याप्रमाणेंच स्थिती हिंदुस्थानांत घुसलेल्या वैदिक, अवैस्तिक वगैरे जमातींची होती असें उमेश चंद्र विद्यारत्नानीं, विद्वद्वर्य टिळकांनीं आणिलेलीं प्रमाणें तपासून ठरविलें आहे ( २०-२-१३ चा मुमुक्षु पहा ). तें आम्हांस ग्राह्य दिसतें. ह्या आर्यांच्या जमाती हिंदुस्थानांत प्रालेय प्रलयानंतर घुसल्या तेव्हां त्या तत्त्वज्ञानाचीं मोठमोठीं कोडीं उकलण्यांत पटाईत होत्या असें डॉ. ड्रेपर म्हणतो, व आलताई ( आलताऊ ) पर्वतावरील मोंगल खान अजून वैदिक देवतांची पूजाअर्चा करणारे आढळतात असें व्हीलर ( व्हीस्टरी आफ इंडिया, पान ५३७ वर ) म्हणतो. तर त्या आर्य जमातींस उत्तरध्रुवाजवळील असुर्यानाम अन्धेन तमसावृत्त लोकांतील एस्किमोच्या पदवीस नेऊन बसविण्यापेक्षां त्यांस सुमेरुखंडांतील मोंगलांच्या पदवीस नेऊन बसविणें जास्त सयुक्तिक दिसत नाहीं काय ?

४ कोणासही हें विचाराविरुद्ध वाटण्याचें कारण दिसत नाहीं कीं जळजळित पृथ्वीवर संपातबिंदूच्या चलनानें त्या वेळच्या हिमयुगांत जल उत्पन्न झालें. तें जल ऐतरेय उपनिषदाप्रमाणें ओसरून क्रांतिप्रदेशांत त्यांतून जमीन बाहेर पडली. त्यांतील जंबुद्वीपांत गोदा व नर्मदा नद्यांमधील प्रदेशांत मनुष्यं

प्राणी उत्पन्न झाले व ते पूर्वपश्चिम त्या क्रांन्तिप्रदेशांतील इजित, मेक्सिको, पेरू वगैरे देशांत फिरूं लागले. त्यांपासून पांढरे, तांबडे, काळे, पिवळे, फिके हे पंचजनांचे वर्णभेद उत्पन्न झाले. त्यांतील पांढऱ्या लोकांत सुधारणेची वाढ इतर जनांपेक्षां लोकोत्तर झाली ! ते पूर्वपश्चिम क्रांतिप्रदेशांत २७ नक्षत्रांचा शोध होईतों पसरल्यावर ते सदावसंतांच्या दक्षिणोत्तर चलनानुरोधानें मसाल्याच्या बेटांपासून उत्तरकुरूपर्यंत अन्नपाण्याच्या सोईप्रमाणें पसरत गेले व ते तेथें सुमेरुखंडांत जाऊन इतकी भराभराट पावले कीं ते आपल्यास देव म्हणवूं लागले तेव्हां दक्षिणचें जंबुद्वीप हें त्यांची पितृभूमी किंवा मातृभूमी ठरली व ह्या पितृ किंवा मातृ भूमीबद्दल त्या वसाहत करणाऱ्या लोकांस अत्यंत अभिमान असे. ह्याचें प्रत्यक्ष अनुभवाचें उदाहरण श्रीयुत द. पा. भोसेकर असिस्टंट इंजिनियर, द्वारका, यांनीं आपल्या नौकानयन पुस्तक पा. ८ वर दिलें आहे. त्याप्रमाणें पाहतां जावा बेटाच्या पूर्वेस बलिबेटांत हिंदू लोकांच्या जुन्या वसाहती आहेत. तेथील लोक जळमार्गानें श्रीद्वारकानाथाच्या दर्शनास येतात ! यावरून आमचे लोकांस नौकानयन येत होतें हें सिद्ध होतें; कारण एरवीं ' यांस आसल्या बेटांतील वसाहती करणें शक्यच नव्हतें. अशीच गोष्ट त्या उत्तरेकडील वसाहतींची आढळली असती. पण संपातबिंदूच्या चलनानें दुसरा जलप्रलय होऊन त्या उत्तरेकडील वसाहत करणाऱ्या लोकांस परत विंध्य व हिमालय यांतील नवीन जमिनींत आत्मनिरपेक्ष वसाहत करण्यास घुसावें लागलें आहे. ( शतपथ ब्राह्मण पहा. ) म्हणून उत्तरेकडील असला अनुभव घेण्यास जागा राहिली नाहीं !

५ मनुष्य–प्रभृती प्रत्येक प्राण्यास वर सांगितल्याप्रमाणें दक्षिणोत्तर प्रवास करण्यापेक्षां पूर्वपश्चिम प्रवास करणें सोपें जातें. म्हणून आपली मनुष्याची जात प्रथम अन्नपाण्याच्या सहज स्थितींत पूर्वपश्चिम फैलावलेली आढळते. ते जंबुद्वीपांतील साग व कापूस व काथ्या व खिळे ह्यांच्या सहाय्यानें गलबतें बांधून परदेशांशीं दळणवळण, वसाहती व व्यापार करून होते ! त्या गलबतांच्या विकासाबरोबर येथें अर्थात नौघटन, नौकानयन व ज्योतिष ह्या विद्यांची लोकोत्तर वाढ झाली. म्हणून आमच्या लोकांस सर्वांआधीं सत्तावीस नक्षत्रें, त्यांचे बारा भाग व त्या बारा भागांस एशियेच्या पश्चिम टोकापासून त्या नक्षत्रपुंजांखालील भूभागांच्या विशेष लक्षणाप्रमाणें नांवें व चित्रें सर्वांच्या आधीं तयार करितां आलीं; कारण त्यांच्यासारखे प्रवासी दुनियेंत दुसरे कोणी नव्हते. म्हणूनच आमच्या आर्यांचा मूळ पुरुष मनू आहे तर इजिप्शियन लोकांचा मूळपुरुष मेनिस व मेक्सीकन लोकांचा मूळपुरुष मेनूस आहे. ही त्यांच्या पराक्रमाची गोष्ट झाली. ज्योतिर्विद गर्गाचार्य व भक्तशिरोमणी नारद श्वेतद्वीपांत ऊर्फ अमेरिकेंत जाऊन आल्याचे उल्लेख संस्कृत सारस्वतांत आहेत. ही त्या लोकांच्या प्रवासप्रियतेची गोष्ट होय.

६ हिमालयाच्या जन्मानंतर आर्यप्रधान पंचजनांनीं विंध्य व हिमालय यांमधील प्रदेशांत जी गर्दी केली त्यांत आर्यांचें प्राबल्य एवढें होतें कीं त्या गतभूम-

ध्यसमुद्राच्या काठच्या तुरळक वस्तीच्या जुन्या आर्यावर्ताचें नवें आर्यावर्त हें नांव अमरकोशकारांनीं अमर केलें व त्या दक्षिण आर्यावर्ताची गोंडवन दरी सिंधू, सरस्वती, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा वगैरे नद्यांच्या गाळानें भरली, तसा पूर्वी उलंघण्यास अवघड असलेला विंध्याद्री एवढा सुलंघ्य झाला कीं आर्यांतील बिनीवाले शिल्पविशारद अगस्त्य प्रभृती ऋषी विंध्य ह्या शब्दाच्या विंध म्हणजे भोंक पाडणें ह्या धातूप्रमाणें त्यास भोंक पाडून केलेल्या रस्त्यानें गोदाथडीवरील नाशकास गौतम ऋषीस ठेऊन कृष्णाथडीवर आपला आश्रम स्थापण्यास गेले! नंतर कांहीं काळानें त्या आर्यप्रधान पंचजनांस श्रमविभागाची कल्पना सुचली. त्या कल्पनेप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ही गुणकर्मविभागशः चतुर्वर्णाची व्यवस्था त्यांनीं लाविली. तिचें रूपरेखन प्रसिद्ध पुरुषसूक्तांत ऋग्वेदाच्या अखेरीस आहे. तोच आर्यांचा पाहिला राष्ट्रपुरुष होय! मग यांतील कांहीं आर्य मौल—मूळचे—असोत किंवा *यथामूल असोत!

आतां या भागाचा शेवट पुढील टिपणानें करूं.—

"पृथ्वी प्रथम वायुरूप, मग द्रवरूप व नंतर घनरूप झाली. तीवर प्रथम काळोख होता, म्हणून तींत ज्या वनस्पतींचे व प्राण्यांचे अवशेष सांपडतात, ते साध्या वनस्पतींचे व प्राण्यांचे आढळतात. त्या साध्या वनस्पतींपासून व प्राण्यांपासून मिश्र वनस्पती व प्राणी उत्पन्न झाले व त्या सृष्टीपासून निरिंद्रिय व सेंद्रिय सृष्टी उत्क्रान्त झाली. ही सर्व सृष्टी पाहूं जातां दोन प्रकारची आढळते. (१) चर व (२) अचर. त्या चर सृष्टींत मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे मन अथवा आत्मा होय. त्याच्या अस्तित्वाचा शेवट कधींही होत नाहीं.

प्राणी सदोदित हालत डोलत असतात. त्या प्राण्याचा प्रत्येक परमाणू हालत, वाढत, जगत व मरत असतो. त्याच्या ठिकाणीं दुसरे परमाणू येत असतात. त्यास अन्न लागतें. तें घन व द्रवरूप असतें. त्याचा जो भाग निरुपयोगी होतो, तो आंतड्यांतून बाहेर पडतो. त्या अन्नरसानें रक्त, मांस व हाडें सुधारतात. तेणेंकरून गती व मती यांस जोर येतो. हवेनें रक्तशुद्ध होतें, व त्यांतील उष्णता वाढते. यास चार रासायनिक तत्वें लागतातः १ नायट्रोजन [ उदासीन वायू ] २ आक्सीजन [ प्राणवायू—विष्णुपदामृत ], ३ कार्बन [ अंगार—नीलकण्ठहालाहल ], व ४ हायड्रोजन [ उदान वायू ]. शिवाय, त्यांत गंधक, चुना, रेतीतत्व, फास्फरस [ प्रस्फुरक—आग्यावेताळ ]—हीं तत्वें असतात. पण ह्यांच्या एकीकरणास जीवनशक्ती लागते. ती शक्ती त्यांचे कोश बनविते.

---

* ह्या आर्यांत यथामूल अथवा अनुकृत (इमिटेशनचे) आर्येतरांचा समावेश वैयक्तिक केलेला नाहीं, तर घमघोकार जमातीद्वारा केलेला आहे असें आम्हांस आढळलें आहे; कारण, ह्यांत धर्म बदललेल्या लोकांस रोटीबेटी व्यवहारास सरळ वाव सांपडतो व ते कधींही जखमदिल वैयक्तिक ख्रिस्ती बाटग्यांप्रमाणें पस्ताव्याचे उद्गार काढणारे आढळले नाहींत! त्यांस सारख्या हाडामांसाच्या लोकांशीं हरयेक ओला सुका व्यवहार करितांना कांहीं हरकत येत नाहीं; जसें, बाढे ब्राह्मणास बाटग्या महारणीशीं

चमत्कार:—वड, आंबा, फणस वगैरे झाडांच्या बियांस जमीन, हवा व पाणी वगैरेंच्या सारख्या परिस्थितींत ठेविलें असतां त्यांपासून एकसारखीं एक-रूपें उत्पन्न होतात असें नाहीं, त्यांपासून मध्येंच विचित्र व अद्भुत रूपें आपो-आप उत्क्रान्त होतात.

सृष्टीस आवश्यक गोष्टी:—सृष्टींत उष्णतामान कमींत कमी (–) ४६१° फा. व त्या सृष्टींतील सूर्याची उष्णता १०,०००° फा. असते. कांहीं ताऱ्यांची उष्णता ह्या सूर्यापेक्षां जास्त आढळते. पण सेंद्रिय वस्तूंची उत्पत्ती–थिजण्याच्या बिंदूपासून कढण्याच्या बिंदूपर्यंत होते. पण त्यांतील आल्ब्यूमेन ( बलक ) हा घटक १६०° फा. उष्णतेवर घट्ट होतो. यावरून पृथ्वी प्रथम वायुरूप होती. ती पुढें थंडावतां थंडावतां ह्या स्थितीस येऊन पोहोचली तेव्हां तीवर सेन्द्रिय पदार्थ उत्पन्न झाले.

सूर्याची उष्णता:—पृथ्वीवर सूर्याची उष्णता येणार नाहीं तर तीवरील सर्व समुद्र थिजतील, व सर्व प्राणी मरतील. शिवाय तीजवळ उजेड पाहिजे. तो नसेल तर त्यांस कार्बानिक आसिडपासून कार्बन ( अंगार ) ग्रहण करितां येत नाहीं. म्हणून काळोखांतील उष्णतेंत हलके प्राणी उत्पन्न होतात.

प्राण्यांचा मुख्य घटक:—प्राण्यांचा मुख्य घटक म्हटला म्हणजे पाणी होय. पृथ्वीवर महासागराचा भाग मोठा आहे. तो इतका कीं तीवरील उंचवटे दूर केले तर झाडून सर्व पृथ्वीवर दोन मैल खोलीचें पाणी होईल. ह्या महासागराच्याच पाण्याच्या योगानें जमिनीवरील वातावरणास ओलावा मिळतो. पण हा ओलावा किंवा पाणी सर्व ठिकाणीं सारखा नाहीं. म्हणून हींत कांहीं ठिकाणीं निर्जन वाळवंटें आहेत. ह्या पाण्याचे योगानें हवेंतील उष्णता समतोल होत राहते व वातावरण समघन राहतें. पण डोंगरावर ती समघन नसते, म्हणून तेथें बर्फ जमतें. पाण्याच्या योगानें पृथ्वीवर उष्णता कायम राहते. हवेंत विजेचीं वादळें झाल्यानें आमोनिया उत्पन्न होतो. सदरहू वादळें पृथ्वीची गती, भरती, ओहोटी हवेची घनता, ओलावा व सूर्याची उष्णता यांच्या योगानें उत्पन्न होतात. त्यांत कार्बोनिक आसिड ग्यास ( नीलकण्ठहालाहल ) ही योग्य प्रमाणांत असला पाहिजे. पृथ्वीचा आकार, तिचें सूर्यापासून अंतर, तिचा फिरण्याचा काळ, तिच्या विषुववृत्ताशीं क्रान्तिवृत्ताची वक्रता योग्य पाहिजे. नाहीं तर तीवर प्राणिसृष्टी होणें किंवा राहणें संभाव्य नाहीं.

---

शरीरसंबंध व अन्नव्यवहार करावा लागत नाहीं. म्हणून ह्या अनुकृत जमाती मूळ आर्यांत हळूहळू समाधानानें एकजीव हिंदू झालेल्या अग्निमुख रजपुत कुळांप्रमाणें सगळ्या हिंदुस्थानांत जागोजाग मार्मिकांस आढळतात! ह्या योजनेवर इंग्रजी फेडरेशनची ( भाइचाराची ) कल्पना त्या लोकांच्या कल्पना सृष्टींत येरझारा करून राहिली आहे. आपल्या कांग्रेसनें सचविलेली भाषावार प्रांतांच्या राजपद्धतीची व्यवस्था ह्याच योग्य-तेची आहे. ती कालांतरानें अनेकत्वापासून एकत्व उत्पन्न करण्यास समर्थ होईल अशी आम्हांस खात्री आहे.

**पृथ्वीचें वातावरण**:-हें पृथ्वीचा आकार व तिचें गुरुत्वाकर्षण यांवर अवलंबून असतें. तेणेंकरून पृथ्वीवर पडणाऱ्या ताऱ्यांची धूळ व ग्यास ( वायू ) येतात, व तिचा आकार वाढतो, व तीवरील हवा घनदाट होते. याच क्रियेनें शनी व गुरू यांवरील हवा हीं इतकी दाट झालेली आहे कीं त्यांवरील वातावरणांतून त्यांच्या आंतील पदार्थ दिसत नाहींत. फक्त शुक्राचें वातावरण पृथ्वीसारखें आहे. मंगळावर पृथ्वीच्या $\frac{1}{6}$ अंश वातावरण आहे, व त्यावर बहुधा पाणी नाहीं.

**पृथ्वी वायूंची निवड करिते**:-पृथ्वीचा वातावरणांतील ग्यास ( वायू ) त्या बाहेर पडत नाहींत. चंद्रावर तें वातावरणच नाहीं. मंगळावर फक्त जड ग्यास आहेत. पण त्यावर हायड्रोजन ( उदान वायू ) व पाणी नाहीं. पण पृथ्वीवर सर्व प्रकारचे ग्यास आहेत. त्यांपासून तीवर पाणी विपुल वास करतें. शुक्राचें वातावरण पृथ्वीसारखेंच आहे. पण त्यावर प्राणी नाहींत. कारण त्याचें जें विषुववृत्त आहे, त्याकडील जमीन फुगीर नाहीं, व त्याच्या अर्ध्याभागावर सदा दिवस व अर्ध्या भागावर सदा रात्र असते. त्यावर हवा कोठेंही नाहीं.

यावरून ही सगळी सृष्टी सहेतुक दिसते. कारण तींतील बाताबेताप्रमाणें मनुष्य उत्क्रान्त झाला आहे व पृथ्वीवर तिच्या संघटनेस व अस्तित्वास योग्य व तीवरील जीवांच्या सृष्टीस योग्य अशीं पाहिजे तितकीं व चमत्कारिक तत्वें सुस्थित आहेत, मग तीं इतर ग्रहांप्रमाणें भौतिक असोत किंवा अध्यात्मिक असोत.

पृथ्वीवरील युगें व त्यांच्या-अवधी—

१ पालियालिथिक युग-अवधी— १,००,००० वर्षें

२ बर्फाचें युग— अवधी-(?) देखावे-
 १ मेमॉथ, २ आस्वलें, ३ तरस, ४ गेंडे ५ देवदार

३ प्लिओसीन युग-अवधी १०,००,००० वर्षें-देखावे—
 १ एप माकडें, २ तीन नखी घोडा, ३ पाणघोडा, ४ हत्ती व ५ कासव, ६ नवीन झाडें व ७ फुलें.

४ इओसीन युग-अवधी— १६,००,००० वर्षें-देखावे—
 १ मस्तोडन, २ पहिले एप, ३ वाघ, ४ घोड्याचा पूर्वज, ५ मगर, ६ वटवाघुळें.

५ कवचयुक्त प्राण्यांचें युग-अवधी— ३,००,००,००० वर्षें-देखावे—
 १ पक्षी, २ बीजपर्णी ( फर्नस ), ३ उष्ण युगांतील वनस्पती.

६ जुरासिक युग-अवधी— ३०,००,००० वर्षें-देखावे—
 १ बीजपर्णी ( फर्नस ) घोड्यांची शेपटें ( हॉर्स टेल्स ), समुद्रांतील सर्प.

७ अंगारयुक्त ( कार्बन ) युग-अवधी (?)— देखावे—
 १ बीजपर्णी ( फर्नस ), २ घोड्याचीं शेपटें ( हॉर्सटेल्स ), ३ मगर.

८ डेव्हनयुग-अवधी— ६०,००,००,००० वर्षें-देखावे—
 १ मासे, २ पोवळी.

९ ज्वालामुखीचें युग-अवधी— १२,००,००,००० वर्षें-देखावे—
१ समुद्रांतील विंचू, २ पोवळी व स्पंज, ३ समुद्रांतील वनस्पती.
१० प्राथमिक युग-अवधी— ४,००,००,००,००० वर्षें-देखावे—
१ अमीबा ( जीवाणू )

हें वर्णन खडकांत सांपडणाऱ्या ११० वनस्पती व प्राणी यांच्या इतिहासावरून तयार केलेलें आहे.

प्रचलित काळः—हा काळ १,००,००० वर्षांचा आहे. ह्या अवधींत मनुष्य हत्यारांचा उपयोग करूं लागल्यापासून भिन्नत्व व श्रेष्ठत्व पावला. पुढें त्यापासून नाना जातीचे लोक उत्पन्न झाले, व त्या जंगली लोकांपासून सुधारलेले लोक उत्पन्न झाले.

बर्फाचा काळः—हा काळ ३०,००० वर्षांचा होता. त्यांत मनुष्य हा मेमॉथ, आस्वलें, व गेंडे, यांशीं समकालीन होता व तो एपपासून [माकडें] उत्क्रांत झाला असें डार्विन म्हणतो. पण तें आम्हांस मान्य नाहीं त्याचें कारण अन्यत्र आलें आहे.

तिसरा काळः—हा काळ ३,००,००,००० वर्षें टिकला. ह्यांत अर्धवट उष्ण प्रदेशांत मनुष्यें घोडे व वाघ उत्पन्न झाले.

दुसरा काळः—अवधी (?)—हा पक्षांचा काळ होय . ह्यांत सर्पांचे पक्षी झाले. ह्यांत सर्व पृथ्वी उष्णकटिबंधांत होती. ह्यांत मगर व सर्प फार होते.

पहिला काळः—अवधी (?)—ह्या काळांत घोड्यांचीं शेपटें व फर्नस ( पर्णबीजी ) ह्या झाडांपासून उष्ण दलदलींत दगडी कोळसे उत्पन्न झाले व समुद्रांतून जमीन बाहेर पडूं लागली व तीवर भूचर प्राणी उद्भवले. डेव्होनियन काळांस ( आपल्या ऐतरेयोपनिषदांत सांगितल्याप्रमाणें ) सर्व पृथ्वीभर समुद्र होता व त्यांत मासे परिपूर्णतेस आले. यांत तांबडे रेतीचे दगड उत्पन्न झाले. यांत पोवळीं फार होतीं. ह्यांत प्राण्यांचें उत्क्रान्तीकरण हळूहळू होत होतें. म्हणून या युगाचे काळ दीर्घ आहेत. प्राण्यांचा उषःकाल.—चार कोटी वर्षांपूर्वीं ह्या पृथ्वीवर प्रथम जीवाणू ( अमीबा ) उत्पन्न झाले. ते कसे उत्पन्न झाले हें आम्हांस ठाऊक नाहीं. ह्यापूर्वीं पृथ्वी घन होऊन तीवर महासागर व खडक यांनीं युक्त जमीन तयार होऊं लागली होती. अशा प्रकारें काळाच्या निनादविशिष्ट भागावर आम्ही बिनदिक्कत परमेश्वराकारणें सजीव वस्त्र विणलें आहे:—

At the whiring loom of time unawed
I weave the living garment of God.

C. W. Seeleeby

सोलापूर २४-८-१८ *Hamsworth's History of the World-P. 91.*

समानाधिकरण ( संगती-कोऑर्डिनेशन ):-आर्यावर्त ही पुण्यभूमी किंवा श्रौतभूमी स्थूलमानानें लंकेपासून उत्तरकुरूपर्यंत पसरलेली होती.

254029

२ ह्या भूमीचे दोन भाग होतेः १ पितृदेश अथवा दक्षिण आर्यावर्त अथवा हिंदुस्थान व भरतखंड. हिंदुस्थानचे दोन पोट भाग होते. १ गौड देश अथवा उत्तर हिंदुस्थान, व २ द्रविडदेश, अथवा दक्षिण हिंदुस्थान अथवा दक्षिणावर्त वा जंबुद्वीप. २ वसाहत देश अथवा सुमेरुखंडः–ह्याचें दुसरें नांव उत्तर आर्यावर्त, अथवा उत्तर एशिया. ह्या उत्तर आशियाचे चार पोट भाग होते.– १ त्रिविष्टप अथवा तिबेट; २ ब्रह्मपुरी अथवा इलावृत्त, ( सुमेरू यांतच पामीर जवळ होता), ३ ऐरावत अथवा मॅमॉथ देश; व ४ उत्तरकुरू अथवा औषस देश. हे भाग अनादी आर्य नकाशांत बरोबर सांपडतात.

टीपः–ज्या प्रमाणें गोल्डस्मिथनें पूर्वोक्त डेझरटेड व्हिलेजचें काव्य लिहिलें त्याप्रमाणें आम्हीं हल्लींच्या आर्यशून्य सुमेरुखंडाचें हें इतिहासगर्भ वर्णन केलें आहे. ह्यानें जिज्ञासूंची तृप्ती होणार नाहीं. म्हणून आम्हीं त्यांस त्या सुमेरुखंडांतील इंद्राची राजधानी जी अमरावती हिचें वर्णन ( भारत, वनपर्व ३) खुद्द अर्जुनाच्या व व्यासांच्या शब्दांनी पुढें समर्पण करितोंः––

अमरावतीः–( १ ) ततः शक्रस्य भवनमपश्यममरावतीम् ।
दिव्यैः कामफलैर्वृक्षै रत्नैश्च समलंकृताम् ।
न तत्र सूर्यस्तपति न शीतोष्ण न च क्लमः ॥
न बाधते तत्र रजस्तत्रास्ति न जरा नृप ।
न तत्र शोको दैन्यं वा दौर्बल्यं चोपलक्ष्यते ॥
न क्रोध लोभौ तत्रास्तां सुरदीनां विशांपते ।
नित्यपुष्पफलास्तत्र पादपा हरितच्छदाः ॥
पुष्करिण्यश्च विविधाः पद्मसौगंधिकायुताः ।
शीतस्तत्र ववौ वायुः सुगंधी जीवनः शुचिः ॥
सर्वरत्नविचित्रा च भूमिः पुष्पविभूषिता ।
विमानगामिनश्चात्र दृश्यन्ते बहवोऽम्बरे ॥
ततोऽपश्यं वसून् रुद्रान् साध्यांश्च समरुद्गणान् ।
आदित्यानाश्विनौ चैव तान्सर्वान्प्रत्यपूजयम् ॥
प्रविश्य तां पुरीं दिव्यां देवगंधर्वपूजिताम् ।

(२) " ततो ददर्श शक्रस्य पुरीं तामरावतीम् ॥
सर्वर्तुकुसुमैःपुण्यै पादपैरुपशोभिताम् । २०–१०३६–१०४३
नंदनं च वनं दिव्य कुसुमै राव्हयाद्भिरिव द्रुमैः ॥

(३) " ददर्शाद्भुतरूपाणि विमानानि सहस्रशः ॥
न तत्र सूर्यः सोमो वा द्योतते न च पावकः । ११-५१२-५१४

स्वयैव प्रभया तत्र द्योतन्ते पुण्यलब्धया ॥
तारारूपाणि यानीह दृश्यन्ते द्युतिमन्ति वै ।
ततोऽपश्यत्स्थितं द्वारि शुभं वैजयिनं गजम् ॥
ऐरावतं चतुर्दंतं कैलासमिव शृंगिणम् ११–५०९–५१२

यावरून काय दिसतें ? इ. स. ३००० वर्षांच्या सुमारास भारत झालें. त्या सुमारास, त्या इंद्राच्या अमरावतींत पाहिजे ते फळभारानें लवलेलें वृक्ष होते, त्या राजधानींत लागतील तीं रत्नें होतीं, तेथें सूर्याचा ताप बिलकुल होत नव्हता, त्या ठिकाणीं शीत व उष्ण ह्याची पीडा अगदीं होत नव्हती, तेथें धूळ उडत नसे, त्या ठिकाणीं लोकांस अकालीं म्हातारपण येत नसे, तेथील लोकांस शोक, दैन्य, क्रोध, लोभ यांची बाधा होत नसे, तेथील झाडांस पानें सदा हिरवीं असून त्यांस फुलें व फळें नित्य येत असत, त्या ठिकाणीं सुगंधी कमळांनीं भरलेल्या नाना प्रकारच्या पुष्करिणी होत्या, त्या ठिकाणीं जीवांस शुद्ध करणारा थंड वारा वाहत असे, तेथील जमिनी फुलांनीं सुशोभित दिसत असत व तींत विचित्र रत्नें भरलेलीं होतीं, तेथील आकाशांतून अनेक लोक विमानांनीं फिरतांना आढळत, त्या ठिकाणीं वसू, रुद्र, साध्य, मरुत, आदित्य, अश्वी, गंधर्व व देव रहात असत, तेथें नंदनवन होतें, त्या वनांत प्रत्येक ऋतूद्भव पुष्पें होतीं, त्यांत जीं झाडें होतीं तीं आपल्या दिव्य कुसुमांनीं त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्या प्राणिमात्रास आपल्याकडे जणूं बोलावित आहेत असें वाटे, त्या ठिकाणीं हजारों विमानें होतीं, तेथील सूर्य, चंद्र व तारे आपल्या भरतखंडातल्या प्रमाणें प्रखर तेजाचे नसत, तेथील प्रत्येक वस्तू आत्मतेजानें चमकत असे, त्या इंद्राच्या दाराशीं चार दातांचा ऐरावत (मॅमॉथ) नामक कैलासासारखा पांढरा हत्ती होता.

**रस्ते व रथ.**—मागील भागांत दक्षिण आर्यावर्तांतून उत्तर आर्यावर्तांत जाणारा रस्ता हिमालय व गंधमादन पर्वत व गोबीचें वाळवंट ह्यांतून स्वर्गाकडे जातो असें दाखविला आहे. त्याचा पहिला भाग अत्यंत डोंगराळ मुलखांतून जात असल्यामुळें त्यांतून पायीं कित्येक महिने रखडण्यावांचून अर्जुनास गत्यंतर नव्हतें. पण पुढील रस्ता सपाट लागल्यामुळें त्यास मोटरसारख्या किंवा बगीसारख्या रथानें अमरावतीपर्यंत प्रवास करितां आला आहे. यास प्रमाण.—

( १ ) इत्युक्त्वा ते गताः सर्वे पायः शत्रुनिबर्हणः ।
चिंतयामास राजेन्द्र देवराजरथं प्रति ॥
रथो मातलीसंयुक्त आजगाम महाप्रभः ।
ततोऽर्जुनो हृष्टमना गंगायामाप्लुतः शुचिः ॥
आरुरोह रथं दिव्यं द्योतयन्निव भास्करः ॥
११. ३ वनपर्व–५०७-५०९

यांत रथाला घोडे जोडिले होते असें दाखविलेलें नाहीं. यावरून विमानासारखी येथें मोटार गाडी होती असा भास होतो. पण

( २ ) अथापश्यं हरियुजं रथमैंद्रमुपस्थितम् ॥
दिव्यं मायामयं पुण्यं यत्र मातलिना नृप ।
२०-३ वनपर्व-१०३४-३५

यांत त्या रथास घोडे जोडलेले होते असें प्रत्यक्ष दिलें आहे. तेणेंकरून ही बगी असावी असें वाटतें.

लष्करी शाळा.—उत्तर आर्यावर्तांत दोन तीन लष्करी शाळा होत्या असें दिसतें. यास प्रमाण.—

( १ ) शिवशालाः-स मामभ्येत्य समरे तथैवा विमुखं स्थितम् ।
शूलपाणि रथोवाच तुष्टोऽस्मीति परंतप ॥ १०१८ ॥
अस्त्राणीच्छाम्यहं ज्ञातुं यानि देवेषु कानिचित् ।
ददानीत्येव भगवानवीत्र्यंबकश्च माम् ॥ १०१९
प्रददौ च यमप्रीतः सोऽस्त्रं पाशुपतं महत् ।
उवाच च महादेवो दत्वा मेऽस्त्रं सनातनम् ॥ १० २०
न प्रयोज्यं भवेदेतन्मानुषेषु कथंचन ।
जग द्विनिर्दहे देवमल्पतेजसि पातितम् ॥ १०२१
पीड्यमानेन बलवत्प्रयोऽष्यं स्याद्धनंजय ।
तदप्रतिहतं दिव्यं सर्वास्त्रप्रातिषेधनम् ॥ १०२२ ॥
२०-३ वनपर्व.

या शाळेची शिष्यशाखा परशुराम, कर्ण वगैरे होय. त्या. शाळेंतच अर्जुन पाशुपतप्रयोग शिकला.

( २ ) शक्रशालाः—या शाळेमध्यें अर्जुन सगळी अस्त्रविद्या शिकला. यास प्रमाणः—

तंत्राहं देवगंधर्वैः साहितो भुरि दाक्षिणैः ॥ १०४४
अस्त्रार्थमवसं स्वर्गे शिक्षाणोस्त्राणि भारत ।
विश्वावसोश्च वै पुत्रश्चित्रसेनोऽभवत्सखा ॥ १०४५
२०-३ वनपर्व.

गांधर्व महाविद्यालयः—या शाळेमध्यें अर्जुन-गायन, वादन व नर्तन शिकला. यास प्रमाणः—

स च गांधर्वमखिलं ग्राहयामास मां नृप ।-१०४५
२०-३ वनपर्व.

इंद्रसभाः—ह्या सभेमध्यें इंद्राचें वैभव असें होतें व त्यानें अर्जुनाचा सत्कार असा केला.—

ततः पार्थो महाबाहुरवतीर्य रथोत्तमात् ॥ ५१४
ददर्श साक्ष द्देवेशं पितरं पाकशासनम् ।
पांडुरेणातपत्रेण हेमदण्डेन चारुणा ॥ ५१४
दिव्यगंधाधिवासेन व्यजनेन विधूयता
तमोऽभिगम्य कौंतेयः शिरसाभ्यगमद्बली ॥ ५१६
स चैनं वृत्तपीनाभ्यां बाहुभ्यां प्रत्यगृह्णत ।
ततः शक्रासने पुण्ये देवर्षिगण सेविते ॥ ५१७

इंद्राची उदारताः—इंद्रानें अर्जुनास तनुत्राण, अमोघ कवच, दिव्य किरीट, वगैरे देणग्या देऊन पांच वर्षांनीं आपल्या स्वर्गांतून त्यास दक्षिण आर्यावर्तांत भावांकडे परत पाठवून दिलें !

टीपः—ही माहिती वाचून कोणास असें वाटेल कीं ही आपणास उत्तर आर्यावर्ताच्या प्रलयापूर्वींच्या स्थितीची माहिती मिळाली. पण अशा भ्रमांत कोणी राहूं नये. ही माहिती भारत काळांतील ( इ. स. पू. ३००० वर्षांची ) आहे. हीवरून पाहिजे तर वाचकांनीं मागील स्थितीचें अनुमान करावें.

---

## भाग सातवा.

## चार वर्णांची संस्था.

उद्देश—पंचजनशुद्धि.

Good Heaven! what sorrows gloom'd the parting day,
That called them from their native walks away;
When the poor exiles, every pleaswro past,
Hung round the bowers, and fondly looked their last.
And took along farewell, and wished in vain.
For seats like those beyond the southern main–
And, shuddering still to face the distant deep,
Returned and wept, and still return'd to weep.
The good old sire, the first prepar'd to go
To new-found worlds, and wept for others' woe–
But for himself, in curious virtue brave,
He only wish'd for worlds beyond the grave.
His lovely daughter, lovelier in her tears,
The fond companion of his helpless years,
Silent went next, neglectful of her charms,
And left a lover's for her father's arms.

With loudar plaints the mother spoke her woes,
And blessed the cot where every pleasure rose,
And kiss'd her thoughtless babes with many a tear,
And clasp'd them close, in sorrow doubly dear–
Whilst her fond husband strove to lend relief
In all the silent manliness of grief:–

*Adapted–Goldsmith P. 44.*

Every country presents the story of ths fusion of races and blood–mixture and India is no exception × × The aborigines (pre-Aryans or so called Dravidians) should be regarded as the basic factor in Indian humanity both in the North and in the South.–Prof. Benoy Kumar Sirker, M.A., Modern Review–Feb-1917–P. 211:– *Varnashramdharma and Racefusion.*

अर्थः–प्रत्येक देशांत जातीचें एकीकरण व रक्ताचें मिश्रण यांची गोष्ट आढळते व ह्यास हिंदुस्थान हें अपवादक नाहीं. × × हिंदुस्थानच्या उत्तरेकडील व दक्षिणेकडील हिंदू लोकांत मूळचे लोक आर्यांच्या पूर्वींचे अथवा द्रवीड ( द्रुईड?) म्हटलेले लोक मूलभूत आहेत.

"The Shatpath Brahman, in the story of the advance of Aryan civilization our Koshala and Videh, preserves a clear tradition of this time and a piece of evidence that in the Kuru-Panchalas is reasonably obvious from the geographical position, but the true Brahman culture appears to have been brought to them from the Kuru–Panchala country. It is very probable that the East was less Aryan than the West and that it was less completely reduced under Brahman spiritual supremacy, as the movement of Buddhism was Eastern and the Buddhist texts reveal a position in wnich the Kshatriyas rank above Brahmins. With this agrees the fact that the later Vedie texts display towards the people of Magadha a marked antipathy, which may by reasonably explainsd by that people's lack of orthodoxy, and which may perhaps be traced as far back as the Vajasnayi Samhita"–Vedie Index of Names and Subjects.—

*Dr. A.A. Macdonell P. 154.*

"What makes a people one?" Neither blood, nor territory, nor language, but only the fact of being more or less compactly organised in a politifal society, will be found to yield the unifying principle required.–
*Anthropology–R.R. Marett, M. A. P. 25*

अर्थः–लोक कशानें एक होतात ? ते रक्तानें एक होत नाहींत, तर त्यांचें ऐक्य करणारें तत्त्व उद्भवतें कशापासून ? राजकीय समाजांत त्यांची संघटना अधिकउण्या दाबानें झाली असली तर फक्त त्या गोष्टीपासून त्यांचें ऐक्य करणारें तत्त्व उत्पन्न होतें—असें आढळतें.

To study the plot without studying the characters will never make sense of the drama of human life.–

*The Same–P. 242.*

अर्थ:-पात्रांचा अभ्यास न करितां संविधानकाचा अभ्यास केला तर मानवी चरित्राच्या नाटकाचा उमज कधींच पडत नाहीं.

मागील भागांत वसाहत देशाच्या ( सुमेरुखंडाच्या ) चेहेरेपट्टींतील फेरफारांचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत चार वर्णांच्या संस्थेचें वर्णन कर्तव्य आहे. ह्या संघटनेच्या मुळाशीं हल्लीं *अर्थशास्त्र म्हटलेल्या श्रमविभागाचें तत्व आहे. तें येथें वैदिक, अवैस्तिक वगैरे सिद्धाग्नी बाळगणाऱ्या लोकांमध्यें प्रथम प्रादुर्भूत होऊन तें आमच्या ग्रीस व रोम ह्या वसाहत देशांत पसरलेलें आढळतें. तें प्रारंभीं हरयेक आर्य म्हटलेल्या लोकांस गुणकर्मविभागशः लावण्यांत आलें, व तें जमातिवार किंवा जातवार लाविलेलें नव्हतें.

साहित्य:—वेदादी ग्रंथावरून कुलगणती करितां पूर्वोक्त जलप्रलयानंतर येथें सदुसष्ट जमातीं ( क्लॅन्स–कुळें ) आपल्या दक्षिण आर्यावर्तांत भरल्या असें आढळतें:—

१ अंग:—ह्या कुळाचें नांव अथर्व वेदांत ( ५–२२–१४ ) एकदां आलें आहे. त्याच्याबरोबर गंधारी, मूजवंत व मगध या कुळांचीं नांवें आलीं आहेत. ह्या कुळाचें नांव ( अंगमागधाः ) या समासांत आहे. ते लोक सोन व गंगा ह्या नद्यांवर वसाहत करून होते. ते समुद्रावरून पूर्व हिंदुस्थानांत आले. हें कुळ अनार्यांचें होतें असें कांहीं पाश्चात्य पंडिताचें मत आहे. पण ह्यास सारस्वतांत कांहीं आधार नाहीं. महाभारतांत अंग देशाचें नांव अनेक ठिकाणीं आलें आहे. त्यांतील अंगराज कर्ण हा प्रसिद्ध वीर कौरवपक्षपाती होता. अंग, वंग, पुंड्र व कलिंग ह्यांची उत्पत्ती दीर्घतमा ऋषीस सुदेष्णेपासून झाली. असें वर्णन आहे, व त्या पुत्रांपासून ह्या नांवाच्या जमातींचा प्रादुर्भाव झाला.

२ अज:–ह्या कुळाचें नांव ( ऋ. ७. १८. १९. ) सूक्तांत आलें आहे. त्यांत तृत्सू व सुदास यांनीं ह्या कुळाचा पराभव केल्याचें वर्णन आहे. त्या कुळाचें नांव यक्षू व शिग्रू यांच्या बरोबर आलें आहे. ह्यांनीं सुदासाविरुद्ध कट केला आहे. त्यांचा मुख्य भेद हा होता. हें कुळ आर्य होतें किंवा अनार्य होतें याबद्दल कांहीं सांगतां येत नाहीं. ह्या कुळाचें अज हें नांव ह्या कुळाच्या पवित्रतेचें दर्शक असावें असें कोणी म्हणतात. पण ह्याबद्दल कांहीं निश्चित मत देतां येत नाहीं.

३ अनु:–ह्या कुळाचें नांव यदू, तुर्वश, द्रुह्यू व पुरू यांजबरोबर ऋग्वेदांत ( १-१०८-८, ७-१८-१४, ८-१०-५ )आहे. ऋग्वेदाच्या एका वाक्यांत

---

* अर्थशास्त्र ह्या शब्दाचा जुना अर्थ एकंदरराज्यकारभार असा आहे व दुसऱ्याचें पागोटें घेण्याची विद्या असा हल्लीं प्रमाणें नाहीं.

(८-७४-१५व७-१८-१४) ह्या कुळांतील लोक परुष्णी नदीवर रहात होते असें दिलें आहे. इंद्राचा रथ अनूनीं तासून तयार केला (५-३१-४), इंद्र इतरांनीं बोलावला गेला असतांही अनूंकडे जातो (८-४-१) असे उल्लेख आहेत. यदिंद्राग्नी यदुषु तुर्वशेषु यद्द्रुह्युष्वनुषु पूरुषुस्थः ॥ अतःपरि वृषणावा यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ (ऋ १-१०८). अर्थ.—हे इंद्राग्नीनो, तुम्ही जरी यदूंमध्यें व तुर्वशांमध्यें व द्रुह्यूंमध्यें व अनूंमध्यें व पुरूंमध्यें असाल तरी येथें या, व हा काढिलेला सोमरस प्या. यावरून अनू हे वैदिक धर्माभिमानी, अग्न्युपासक व इंद्रभक्त होते हें सिद्ध होतें. पण ॥ यदोस्तु यादवा जातास्तुर्वसोर्यवनाः स्मृताः ॥ द्रुह्योः सुतास्तु वै भोजा अनोस्तुम्लेच्छजातयः ॥ भा. आ. पा. १९९ अर्थ—यदूपासून यादव झाले तुर्वसूपासून तुर्क यवन झाले, द्रुह्यूपासून भोज झाले व अनूपासून म्लेच्छ झाले. हें धर्मांतर कशानें झालें ? म्हणजे हे वैदिकांचे अवैदिक कशानें झाले ? अथवा ही कांहीं हरिवंशकाराची चूक आहे, हें कळत नाहीं. ह्या अनूंचा संदर्भ एका असिरियांतील वादळांत सांपडलेल्या शूर्पारक व नारगोळ येथील वणिकजन अथवा फिनिशन यांच्या गलबतांच्या दुर्दशेच्या काहणींत आला आहे. ती कहाणी पुढें दिली आहे.

४ अलीनः—ह्या कुळाचें नांव ऋग्वेदांत (७-१८-७) एके ठिकाणीं आलें आहे. ही तृष्णूची पोटजात दिसते. सुदासानें ह्यांचा पक्थ, भलाण, शिव व विषाणीसह परुष्णीजवळ पराजय केला. ते काफ्रिस्थानच्या पश्चिमेस रहात असत असें एक पाश्चात्य पण्डित म्हणतो.

५ अंध्रः—हें एका कुळाचें नांव आहे. ह्यांचा उल्लेख पुंड्र, शबर, पुलिंद व सुतिब ह्या कुळांतील लोकांबरोबर करण्यांत आला आहे. हे जातिबहिष्कृत लोक होते. विश्वामित्रानें शुनःशेपास दत्तक घेतलें होतें. हें कृत्य त्याच्या पन्नास मुलांनीं अमान्य केलें. त्या अमान्यतेचा हा परिणाम होय असें म्हणतात. (ऐ. ब्रा. ७-१८ श्रौ. सू. १५-२६). हे लोक पूर्व हिंदुस्थानांत गोदावरी व कृष्णा नद्यांच्या मध्यें रहात असत. हे अंध्र अनार्य होत. यावरून हे सगळे लोक अनार्य ठरतात.

६ आंबष्ठ्यः— हें एका कुळाचें व राजाचें नांव होतें. (ऐ. ब्रा. ८-२). त्या राजानें यज्ञ केला तेव्हां त्याचा अध्वर्यू नारद होता. अर्वाचीन संस्कृतामध्यें ह्या शब्दाचा अर्थ ब्राह्मण बाप व वैश्य आई यांपासून झालेला मनुष्य असा झाला आहे.

७ उदीच्यः—हें ब्राह्मणांचें कूळ उत्तरेस रहाणारें होतें (श. ब्रा. ११-४, १, १ व गो. ब्रा. १-३, ६). ह्यानीं आपल्या वतीचा वक्ता स्वैदायन शौनक यास करून कुरुपांचाल ब्राह्मण उद्दालक आरुणी यासी वादास आरंभ करून त्यास जिंकिलें. सदरहू ब्राह्मणांवरून (श. ब्रा. ३-२-३, १५) असें दिसतें कीं ह्या उदिच्यांची व कुरुपांचालांची भाषा सारखी होती, तेव्हां त्यांचा संबंध निकट असला पाहिजे. उदीच्यांची भाषा मोठी शुद्ध असे. म्हणून कौशितकी ब्राह्मणाप्रमाणें (७-६) इतर ब्राह्मण उत्तरेस विद्वद्वर्य टिळकांच्या मताप्रमाणें

हिमालयापलीकडे व आमच्या मताप्रमाणें सुमेरुखंडांत जात असत. अर्जुनही युद्धकला शिकण्यास तिकडेच गेला होता. बौद्ध ग्रंथावरून असें दिसतें कीं येथील विद्यार्थी गंधार (कंदाहार) देशांत तक्षशिला येथें शिकण्यास जात असत. काश्मिरांत संस्कृतांत भाषा चांगली विकास पावली होती असें एक पाश्चात्य पण्डित म्हणतो. औदिच्य ब्राह्मण आम्हांस गुजराथेंत आढळले.

उशीनरः—ह्या कुळांतील लोक कुरुपांचाल व वश या लोकांबरोबर मध्य देशांत होते—असें ऐतरेय ब्रह्मणांत (८–१४) दिलें आहे. कौशितकी उपनिषदांत ( ४–१ ) असें सांगितलें आहे कीं हे कुरुपांचाल व विश यांच्या बरोबर रहात होते, पण गोपथ ब्राह्मणावरून असें दिसतें कीं उशीनर व वश हे उत्तरेकडील म्हणजे सुमेरुखंडांतील लोक होते. ऋग्वेदांत ( १०-५९-१० ) यांचा उल्लेख त्यांची राणी जी उशीनराणी हिच्या संबंधानें एका वाक्यांत करण्यांत आला आहे. भारतकालीं हे लोक कुरुक्षेत्राच्या उत्तरेस रहात होते. पण हिंदुस्थानांतील वैदिक काळांत ते मध्यदेशाच्या बाहेर राहत होते असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं.

९ कंबोजः—ह्या कुळांतील लोक इतर आर्यांच्या कुळांतील लोकांपेक्षां भिन्न होते असें यास्क आपले निरुक्तांत [ २-२ ] म्हणतात. कंबोज हे सिंधू नदीच्या वायव्येस पुष्कळ पुढें राहण्यास आले. त्यांस जुन्या फारशी लेखांत कंबुजीय असें म्हटलें आहे. वंश ब्राह्मणामध्यें कांबोज औपमन्यव नांवाच्या गुरूचा व त्याचा गुरू मद्रगार यांचा उल्लेख आहे. यावरून कांबोज व उत्तरमद्र ह्याचा व इराणी व हिंदू यांचा निकट संबंध दिसतो. उत्तरमद्र व उत्तरकुरू या दोन कुळांतील लोक ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें ८-१४ हिमालयापलीकडे व ( आमच्या मताप्रमाणें ) सुमेरुखंडांत राहणारे होते.

टीपः—नवयुग—( जून १९१४ पान ५५४ ) श्रीयुत फफे यांचें अनंतपारं किल शब्दशास्त्रम्—यांतील—कंबोज, खंबायत, खंबाटा, खांबेटे—या शब्दांतील इराण देशाशीं सांपडणारा संबंध विचार करण्यासारखा आहे.

१० कारक्षरः—ह्या कुळांतील लोकांचा नामनिर्देश बौद्धायन श्रौतसूत्रांत ( २०-१३ ) व आपस्तंब ( २२-६-१८ ) व हिरण्यकेशी ( १७-६ ) सूत्रांत आला आहे.

११ काशीः—हा शब्द अनेक वचनी वापरला असतां काशीकुळांतील लोकांचा दर्शक होतो. शतपथ ब्राह्मणांत ( ११५,४,१९,२१ ) असें दिलें आहे कीं ते लोक जेथें राहतात तेथील नगराचा धृतराष्ट्र म्हणून एक राजा होता. शतानिक सत्रजितानें त्याचा पराभव केला. तेव्हां त्या कुळांतील लोकांनीं सदरहू ब्राह्मणाच्या वेळेपर्यंत ( इ. पू. ३००० ) अग्निहोत्राचा त्याग केला. सत्राजित हा भरतकुलोत्पन्न होता. बृहदारण्यक उपनिषदावरून ( २-१;१-८,२; कौ. उ. ४-१ ) असें दिसतें कीं अजातशत्रू हा काशीचा राजा होता व उद्दालकाचा समकालीन भद्रसेन अजातशत्रू हाही काशीचा राजा होता.

काशी व विदेह हे प्रांत जवळ असल्यामुळें त्यांतील लोकांचा निकट संबंध होता. कौशितकी उपनिषदामध्यें काशिविदेह हा समास आला आहे. बृहदारण्यक उपनिषदांत ( ३-८,२ ) गार्गीनें अजातशत्रूला काशीचा अथवा विदेशचा राजा होता असें म्हटलें आहे. शांख्यायन श्रौत सूत्रांत ( १६-२९-५ ) एक पुरोहित काशी, कोसल व विदेह या प्रांताच्या राजाचें काम करीत होता—असें दिलें आहे. बौद्धायन श्रौत सूत्रांत काशी व विदेह हे प्रांत अगदीं जवळ आहेत असें म्हटलें आहे. काशी व विदेह मिळून उशीनर झाले होते—असें एक पाश्चात्य पंडित प्रतिपादितो, पण या उशीनरांचा नामनिर्देश वैदिक सारस्वतांत क्वचित येतो.

कोसल व विदेह ह्यांचा निकट संबंध होता. म्हणून गोपथ ब्राह्मणांत (१-२,९ ) काशिकौशल्य असा समास आढळतो.

काशी, कोशल व विदेह यांची जूट असल्यामुळें त्याशीं कुरुपांचालांचें वैर होतें. शिवाय त्यांची संस्कृतीही कांहीं निराळी होती. शतपथ ब्राह्मणांत ( १-४, १,१० ) आर्य संस्कृतीचा कोसल व विदेह प्रांतावर छाप बसल्याबद्दल एक आख्यायिका आहे, व ब्राह्मणसंस्कृतीचें खरें केन्द्र कुरुपांचाल प्रांतांत होतें—याचीं प्रमाणें आहेत. कुरुपांचालापेक्षां कोसलविदेह हे जास्त पूर्वेस आहेत. यावरून कोसलविदेह हे जुने रहिवासी आहेत, पण त्यांजकडे ब्राह्मणांची खरी सुधारणा कुरुपांचालांतून आणण्यांत आली असें दिसतें. हें बरेंच संभवनीय वाटतें कीं पश्चिमेकडील लोकांपेक्षां पूर्वेकडील लोक कमी आर्य बनलेले होते व ह्या पूर्वेकडील लोकांवर ब्राह्मणधर्माचा पगडा कमी बसलेला होता; कारण बौद्धांची चळवळ पूर्वेकडील होती व ब्राह्मणांपेक्षां क्षत्रिय श्रेष्ठ असें बौद्ध ग्रंथावरून उघड दिसतें. म्हणूनच वैदिक ग्रंथावरून पश्चिमेकडील लोक मगधांस कां पाण्यांत पाहत हें उघड दिसतें. कारण ते आर्यांचे शिष्टाचार मानणारे नव्हते, व ही गोष्ट वाजसनेयी संहितेपासून ( ३-५.२२ ) अशीच चालली होती. हें शक्य आहे कीं कोसल, विदेह व काशी ह्या कुरुपांचालांच्याही शाखा असतील व त्यांचें मूळच्या लोकांशीं मिश्रण परिपूर्ण झाल्यामुळें त्यांची ब्राह्मणसंस्कृती अंमळ पातळ झाली असेल व ह्या गोष्टीस शतपथ ब्राह्मणांतील दंतकथेचा पुरावा आहे.

१२ कीकट— ह्या लोकांचें नांव ऋग्वेदांत ( ३-५३, १४ ) एका वाक्यांत आलें आहे. त्यांचा पुढारी प्रमगंद हा होता. त्यांस गाणें आवडत नसे. यास्क ( निरुक्त ६-३२ ) म्हणतो कीं हें अनार्यांच्या एका देशाचें नांव होतें, व तो पुढें कीकटांस हें नांव देतो. पण मगध हें बौद्धांचें केन्द्रस्थान असल्यामुळें व तेथील लोक पाखांडी निवडल्यामुळें तेथील लोकांस कोणी आर्य व कोणी आर्य पण अनार्य वागणुकीचे होते असें म्हटलें आहे. हा शब्द अथर्व वेदांत आढळतो. तेथें आपल्यांतील ताप गंधारी व मूजवंत ह्या उत्तरेकडील लोकांत व मगधांतील कीकट लोकांत जावो अशी इच्छा प्रकट केली आहे. यजुर्वेद संहितेंत पुरुषमेधाच्या वेळीं दिलेल्या बळीच्या यादींत मगधवासी कीकटांचा उल्लेख आढळतो. अथर्व वेदांत व्रात्यस्तोम आहे. त्यांत व्रात्यांस आर्यांमध्यें

समाविष्ट करीत. तेव्हां त्यांचीं जुनीं वस्त्रें तेथील ब्रह्मबंधूस देत असत असें श्रौतसूत्रांवरून दिसतें. पूर्वोक्त ऋग्वेदांतील ( ३-५३-१४ ) सूक्तांत विश्वामित्र ऋषी हा सुदासास त्यांच्या मगध देशावर स्वारी करण्यास उत्तेजन देतांना आढळतो, कारण तेथील लोक इंद्राकरितां पायस शिजविणारे नव्हते. अर्थात हे लोक वैदिक नव्हते. भागवत पुराणावरून असें दिसतें कीं बौद्धधर्मस्थापक गौतमबुद्ध हा कीकट होता. इतिहास संशोधक श्रीयुत राजवाडे व चांदोरकर हे कीकट म्हणजे कैकाडी होत असें म्हणतात. ह्या लोकांचा देश ब्राह्मणांच्या वस्तीस निषिद्ध समजत असत.

१३ कुरू:–हें कुळ ब्राह्मणांच्या सारस्वतांत अती महत्त्वाचें आहे. या कुळांतील लोकांच्या कुरू प्रांतांत किंवा कुरुपांचाल प्रांतांत ब्राह्मणसारस्वताची रचना करण्यांत आली—याबद्दल भरपूर पुरावा आहे. कुरू यांचा एकट्यांचा नामनिर्देश कधींही करण्यांत येत नाहीं. पण त्यांचा पांचालाशीं निकट संबंध असल्यामुळें त्यांचा जेथेंतेथें कुरुपांचाल असा नामनिर्देश येतो. ब्राम्हण सारस्वत म्हणजे पंचविंश ब्राम्हण, ऐतरेय ब्राह्मण, शांखायन ब्राह्मण, ऐतरेय व शांखायन आरण्यकें, शतपथ ब्राह्मण, जैमिनीय ब्राह्मण, गोपथ ब्राह्मण, तैत्तिरीय ब्राह्मण, मैत्रायणी संहिता वगैरे. कुरु–पांचाल हें एक राष्ट्र आहे–म्हणून याचा उल्लेख वारंवार करण्यांत आला आहे. ( जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण ( ३-७,६;८–७;४–७,२ ); कौशितकी उपनिषद् ( ६-१ ); गोपथ ब्राह्मण ( १-२,९ ); काठक संहिता ( ९-३, ३ ); वाजसनेयि संहिता ( ११-३, ३ ) कण्वशाखा (?)—कुरुपांचाल येथील भाषा उत्तम म्हणून प्रसिद्धी होती ( शतपथ ब्राह्मण,३-२,३,१५ ) कुरुपांचाल येथील यज्ञाची पद्धती सर्वोत्कृष्ट होय म्हणून ख्याती होती ( श. ब्रा. १-७,२,८; शांखायन श्रौत सूत्र, १५–३;१५; लाट्यायन श्रौत सूत्र ८–११, १८); कुरुपांचाल राजांनीं राजसूय यज्ञ केला ( श. ब्रा. ५–५,२,३–५ ); त्यांचे राजे दंव पडत असतां हिंवाळ्यांत स्वाऱ्या करून उन्हाळ्यांत परत येत ( तै० ब्रा० १–८,४,१,२, ). पुढें कुरुपांचाल ब्राह्मण लोक उपनिषदांत प्रसिद्धी पावले ( जै० ब्रा० ३–३०६;४-६,२; बृहदारण्यक उपनिषद् ३–१, १;९–२० वगैरे ). वक्रदाल्भ्य पांचाल अध्वर्यू व धृतराष्ट्र वैचित्र्य वीर्यराजा यांमध्यें संस्कारपद्धतीविषयीं एक वाद उत्पन्न झाला होता, पण तो तात्पुरता होता ( का.सं. १०-६ ). त्याच वाक्यांत नैमिषीय यज्ञाचा उल्लेख आहे. यावरून या दोन कुळांत किती निकट संबंध होता हें दिसून येतें. कांपिलकर सुभद्रिका म्हणून या कुळाच्या शेजारीं राहणाऱ्या दुसऱ्या एका कुलाची राणी होती. तिच्या नवऱ्याकरितां सदरहू अश्वमेध करण्यांत आला होता. ( का. सं. १०,३,३ ) प्रमाणें ( कण्वशाखा ) राजसूय यज्ञांत जें एक वाक्य योजिलें आहे, त्यावरून ह्या दोन्ही कुळांचा राजा एकच होता असें सिद्ध होतें. (श. ब्रा. १३–५,४,७) प्रमाणें असें दिसतें कीं पांचाळ कुळांचें दुसरें नांव क्रिबी असें होतें. हा शब्द कुरू शब्दाचें अन्यरूप वाटतो, कुरू व क्रिवी मिळून ऋग्वेदाचें वैकर्ण (?) बनलें

(७–१८,११),कारण ह्या दोन्ही कुळांतील लोक सिंधू व असिक्नी ह्या दोन नद्यांच्या आसपास राहात होते.

कुरुक्षेत्रांत कुरूशिवाय दुसरीं कांहीं कुळें राहत होती--असा कोठें उल्लेख नाहीं. शत. ब्राह्मण ( २-४, ४,५ ) प्रमाणें कुरू व सृंजय या दोन कुळांचा एकच पुरोहित होता. तर त्या दोन्ही कुळांचा केव्हां तरी निकटसंबंध असला पाहिजे. छांदोग्य उपनिषदांत कुरूंचें रक्षण एका घोडीनें ( अश्वा ) केलें व त्यांजवर गारांच्या वादळाची एक अस्मानी आफत गुदरली होती असें वर्णन आहे. शांखायन श्रौत सूत्रांत ( १५-३-१५ ) कुरूंनीं वाजपेय संस्कार केला अशी कथा आहे. तेथें त्यांस एक शाप झाला व म्हणून त्यांस कुरुक्षेत्रांतून हाकण्यांत आलें असें त्याच सूत्रांत (१५-१६,११) सांगितलें आहे. महाभारतामध्यें ज्या कौरवांवर गुदरलेल्या आपत्तीची कथा दिली आहे तिचें हें बहुधा अंधक छायाचित्र आहे.

ऋग्वेदांत कुरू म्हणून कोणी लोक होते अशी कथा कोठेंही आलेली नाहीं. पण ऋग्वेदांत ( १०-३३, ४ व ८-३ २१ ) येथें राजा कुरुश्रवण व पाकस्थान कौरयाण यांचा नामनिर्देश आला आहे. अथर्ववेदांत ( २०, १२७, ७; खिल ५-१० ) परिक्षित राजाचें नांव आलें आहे. शत. ब्राह्मणांत ( १३-५, ४ ) त्याचा मुलगा जन्मेजय यानें मोठा अश्वमेध केला म्हणून वर्णन आहे.

एक पाश्चात्य पण्डित म्हणतो कीं कुरुकुळांत ऋग्वेदांत उल्लेखिलेल्या दुसऱ्या कांहीं कुळांचा अंतर्भाव होतो. कुरुश्रवण या नांवावरून असें दिसतें कीं त्यांचा कुरुकुळाशीं कांहीं तरी संबंध होता. त्यास ऋग्वेदांत त्रासदस्यव म्हणजे त्रसदस्यूचा वंशज असें म्हटलें आहे. तो त्रसदस्यू पुरुकुळाचा राजा होता. आणखीं असें शक्य दिसलें कीं पुरुकुळाचे तृत्सुभरत म्हणून शत्रू होते. असें ऋग्वेदांत सांगितलें आहे. त्यांचा मिलाफ होऊन कुरुकुळ झालें. ब्राह्मण ग्रंथांत भरतकुळाची चोहोंकडे मोठी ख्याती गाइलेली आहे, त्या कुळाचें पुढें कोठें नांवही आढळत नाहीं, त्या अर्थी तें कुळ दुसऱ्या कांहीं कुळांत मुरून गेलें असें मानण्यावांचून गत्यंतर नाहीं. ज्या ठिकाणीं पुढें पुरू आढळतात, त्या ठिकाणीं पूर्वीं भरत राहत होते ह्याबद्दल सबळ पुरावा आहे. ऋग्वेदाच्या एका सूक्तांत ( ३-२३ ) त्या दोन्ही कुळांतील लोकांनीं दृषद्वती, आपया व सरस्वती ह्या नद्यांच्या कांठीं म्हणजे पुढील कुरुक्षेत्रांतल्या तीर्थांच्या जागीं यज्ञ केल्याचें वर्णन आहे. याप्रमाणेंच भारती व सरस्वती ह्या देवतांचें स्तवन अग्नी नामक सूक्तांत बारंवार येतें. आणखीं, शतपथ ब्राह्मणाप्रमाणें एका भरत राजानें काशिकुळांतील राजावर जय मिळविला ( १३-५,४,११ ) व दुसऱ्या एका राजानें गंगा व यमुना या नद्यांस हविर्भाग दिले ( २१ ) व ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें भरतांनीं सात्वतांवर स्वाऱ्या केल्या ( २-२५ ) असें दिसतें. ही गोष्ट हलकी सलकी नाहीं कीं वाजसनेयि संहितेच्या ( ११-३,३ ) एका वाक्यांत कुरुपांचाल हें भारतांचें दुसरें नांव म्हणून दिलेलें आहे, व अश्वमेध करणाऱ्या महायजमानांच्या

यादींत एका कुरू राजाचें व दोन भरत राजांचीं नांवें दिलीं आहेत, पण ते कोणत्या लोकांवर राज्य करीत होते हें कोठें दिलें नाहीं व दुसऱ्या कांहीं राजांच्या बाबतींत ही माहिती मुद्दाम सविस्तर दिली आहे.

ऐतरेय ब्राह्मणांत कुरुपांचालाच्या देशास मध्यदेश असें म्हटलें आहे. (८-१४). कुरुकुळांतील लोकांचा समूह आणखीं उत्तरेस–म्हणजे हिमालयाच्या पलीकडे उत्तरकुरूंत–म्हणजे आमच्या मताप्रमाणें सुमेरुखंडाच्या अगदीं शेवटच्या उत्तरेकडील ( उत्तरकुरू ) प्रांतांत–बाकी राहिलेला होता. शतपथ ब्राह्मणांतील एका वाक्यावरून असें दिसतें कीं त्या उत्तरेकडील लोकांची म्हणजे उत्तरकुरूंची भाषा व कुरुपांचाळांची भाषा सारखी होती व विशेष शुद्ध होती ( ३-२,३,१५ )–कुरुपांचाळ हे उत्तरेस रहात होते–असें दिसत नाहीं, व कौशतिकी ब्राह्मणाप्रमाणें (७-६) उत्तरेची भाषा शुद्ध होती असें दिसतें. ह्यांत संशय नाहीं कीं ब्राह्मणांच्या सुधारणेचा विकास कुरुपांचाल देशांत झाला व ती तेथून पूर्वेस, पश्चिमेस व दक्षिणेस पसरली. ह्याचीं चिन्हें पंचविंश ब्राम्हणाच्या (१७·१, १) अब्राह्मण आर्यांचा ब्राह्मण आर्यांत समावेश करणाऱ्या व्रात्यस्तोमांत व शांखायन ब्राह्मणांस ( ७-१३ ) व ब्राह्मणास मगध देशांत राहण्यास केलेल्या मनाईंत आढळतात. शतपथ ब्राह्मणांत (११-४, १, २,) कुरुपांचाल ब्राह्मणांचा उल्लेख वारंवार करण्यांत येतो. त्यावरून ते धर्मप्रचारकाचें काम जारीनें करणारे होते असें ठरतें.

कुरुपांचालांच्या निवासस्थानावरून असें दिसतें कीं ते कोसलविदेह अथवा काशिकुळाहून पुढें पुष्कळ हिंदुस्थानांत आलेले लोक आहेत. व त्यांच्या पश्चिमेकडून आलेल्या नव्या लाटेनें त्या आर्यांच्या जुन्या लाटेस पुढें लोटलें आहे. पण ह्या पूर्वेकडील आर्यांच्या पाठीमागून ते पश्चिमेकडील आर्य किती वेळानें आले हें दाखविणारें एकही प्रमाण वैदिक सारस्वतांत नाहीं. पण हें संभवनीय आहे कीं कुरू हे प्राचीन काळीं हिमालयाच्या उत्तरेस सुमेरुखंडांत [ उत्तर आर्यावर्तांत ] कुरुक्षेत्रांत व सिंधू व आसिक्नी ह्या नद्यांच्या कांठीं आसपास चोहोंकडे मोठ्या प्रमाणावर पसरलेले होते व त्यांच्या पूर्वीं दुसरे आर्य भरतखंडांत पूर्वपश्चिम पसरलेले होते व ह्या भरत आर्यांनीं अगस्त्य प्रमुख गत भूमध्यसमुद्राच्या कांठच्या पूर्वपश्चिम वसाहत करून राहिलेल्या आर्यांस हिमालयाच्या उत्पत्तीच्या सुमारास [ १०।१२ हजार वर्षांपूर्वीं ] विंध्याद्रीच्या पलीकडे लोटिलें, व जंबुद्वीपास भरतखंड हें नांव दिलें. या प्रमाणेंच या भरत आर्यांस कुरूपांचाल आर्यांनीं पश्चिमेकडून मुसंडी मारून येऊन पुढें लोटीत नेलें असलें पाहिजे.

( १०-३३,२ ) यांत वरील कुरुश्रवणास चोहोंकडून पर्शू हे पीडा देत आहेत असें म्हटलें आहे. (८-४,१९ ) यांत कुरुंग राजानें कण्वांस १०० घोडे दिल्याचा उल्लेख आहे.

महाभारतांत ह्या कुळांत प्रसिद्धीस आलेल्या दोन व्यक्तींचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो. त्या दोन व्यक्ती म्हणजे देवापी व शंतनू ह्या होत.



इन्द्र-सभा

5060—Lakshmi Art, Bombay, 8

यास्काचार्यांनीं असें म्हटलें आहे कीं देवापी व शंतनू हे दोन भाऊ होते. धाकट्या शंतनूला राज्याभिषेक झाला व देवापी तपास गेला. शन्तनूच्या राज्यांत अवर्षण पडलें तेव्हां ब्राह्मण म्हणूं लागले कीं वडील भावास टाकून शन्तनूस राज्याभिषेक झाला म्हणून असा दुष्काळ पडला. तेव्हां शन्तनूनें देवापीस राज्य दिलें. पण देवापी म्हणाला मी पुरोहित होतों व तुजकडून यज्ञ करवितों.

कुरू, पुरू, भरत, तृत्सू वगैरे एकच होते असें उत्तरकालीन सारस्वतावरून दिसतें.

१४ क्रिवी—शतपथ ब्राह्मणाप्रमाणें [ १३–५,४,७ ] हें पांचाल देशाचें जुनें नांव आहे. ह्या प्रतिपादनास पुष्टी पुढील गोष्टीनें येते. ती ही कीं तेथील राजास क्रैव्य पांचाल असें म्हणत असत. ऋग्वेदांत ( ८–२०,२४,२२,१२ ) क्रिवी हे लोक सिंधू व असिक्नी ह्या नद्यांच्या कांठीं रहात होते असें दिलें आहे. हें संभाव्य दिसतें कीं हे कुरूस मिळून वैकर्ण लोक उत्पन्न झाले. ह्याचा कवश हा पुरोहित होता. पांचाल कुळ हें क्रिवी कुळापेक्षां महत्वाचें होतें व त्या कुरुपांचालांनीं भरताशीं जूट केली. शतपथ ब्राह्मणावरून [ १३-५, ४, १६ ] असें दिसतें. कीं पांचालांत तुर्वश तर काय पण दुसरींही तीन चार कुळें अंतर्भूत होत होतीं. त्यास प्रत्यंतर प्रत्यक्ष पांचाल हा शब्द आहे. ह्या सर्व जाती त्या पांचाल कुलांत अशा मिलाफ पावल्या कीं त्यांचें नामरूपही ह्यापुढील सारस्वतांत आढळत नाहीं. शतपथ ब्राह्मणांत [ १३–५, ४, ७ ] क्रैव्य पांचाल राजानें परिवक्त्रा नदीवर *अश्वमेध केल्याचें वर्णन आहे.

१५ गंधारी—हें हिंदुस्थानच्या वायव्येकडील एका लोकांचें नांव आहे. ऋग्वेदांत [ १-१२६,७ ] गंधारी लोकांच्या मेंढ्यांच्या उत्तम लोकरीचा उल्लेख आहे. गंधारी लोकांचें नांव मूजावंत; अंग व मगध कुळांतील लोकांच्या साहचर्यानें अथर्ववेदांत [५-२२, १४] आलें आहे. श्रौत्र सूत्रांत (हिरण्यकेशी श्रौ. सू.२२-६-१८)गंधारी अथवा गांधारी कुळाचें नांव आलें आहे. बौद्धायन श्रौतसूत्राप्रमाणें ह्या कुळांतील लोक कुभा ही सिंधूस मिळेतों–तिच्या दक्षिण किनाऱ्यावर व सिंधूच्या पूर्व बाजूस कांहीं अंतरापर्यंत वैदिक काळीं वसाहत करून होते. हे पुढें इराणाच्या साम्राज्याच्या कांहीं भागांत वस्ती करून राहिले व गंधारी लोकांच्या कांहीं टोळ्या झर्कसीसच्या ग्रीसवरील स्वारीबरोबर होत्या (ऐतरेय आरण्यक २३). यांचेंच उत्तरकालीन संस्कृत नांव गांधार व अर्वाचीन नांव कंदाहार होय. ऐतरेय ब्राह्मणांत नग्नजित नांवाच्या गांधार राजाचा उल्लेख आहे.

१६ चेदीः—हें एका कुळांतील लोकांचें नांव होतें. त्यांच्या राजाचें नांव कशुचैद्य असें होतें. त्यांचा उल्लेख फक्त दानस्तुतींत आहे. ऋग्वेदाच्या एका सूक्ताच्या शेवटीं ( ८-५,३७-३९ ] त्यांच्या अतुल औदार्याची स्तुती आहे. महाभारतांत त्यांचें नांव मत्स्य कुळांतील लोकांवरोबर आलें आहे. हे लोक बुंदेलखंडांत राहत होते. वैदिक काळांत ते बहुतेक त्याच ठिकाणीं राहत होते.

---

१ हे सर्व हीनाहीन यज्ञ पुढें दिले आहेत.

१७ तुर्व किंवा तुर्वशः—तुर्व हें नांव ऋग्वेदांत [ ६·६२,१० ] आलें आहे. तें लोकांचें किंवा राजाचें नांव निःसंशय आहे. तुर्वश हें नांव ऋग्वेदांत [ १·३६,१८;५४;६;१७४,९;६;२०;१२;४५;१;८·४,७;७.१८;९,१४;४५; २७;१०.३९,८;७·१८,६ मध्यें यक्षूच्या साहचर्यानें आलें आहे. यक्षू हें कदाचित यदूचें तुच्छता व्यंजक नांव असावें. ऋग्वेदांत [ ५-३१,८ ] तुर्वश, यदू अथवा यदुतुर्वश यांमध्यें उभयान्वयी अव्यय घातल्याशिवाय एकवचनी शब्द आला आहे. ऋग्वेदांत [ १-१०८,८ ] तुर्वश हें अनेक वचनी रूप एकदां यदूंच्या बरोबर आलें आहे, व ज्यांत एकवचनी रूपाचा उपयोग करण्यांत आला होता, त्याच सूक्तांत तें एकदां एकाकी [ ८.४,१८, व ८-४,१ त ] आनवबरोबर एकवचनी प्रयोग करण्यांत आला आहे. एका वाक्यांत [ ४-३०,१७ ] तुर्वशायदू- हें द्विचनी रूप प्रत्यक्ष आलें आहे, व दुसऱ्या एका वाक्यांत [ ६-५२,१० ] यदुस्तुर्वश्च म्हणजे यदू व तुर्व अशी विग्रह करून या शब्दांची योजना आहे. दुसऱ्या कांहीं वाक्यांत [१.४,७७;६.२७;७] तुर्वश हा शब्द एकटा आला आहे व एका वाक्यांत [ ७—१९,८ ] तुर्वश व यादव शब्द आले आहेत.

यावरून एका पाश्चात्य पंडितास उर्वश हें कुळाचें नांव आहे असें वाटत नाहीं, तर तें एका राजाचें नांव आहे असें वाटतें. पण ह्यास पुरावा भरपूर नाहीं. ह्या उपपत्तीवर फारशी भिस्त न ठेवतां विचार केला तर ऋग्वेदांतील पंचजन म्हणजे अनू, द्रुह्यू, तुर्वश, यदू व पुरू हे होत, व तुर्वश व यदू हीं निरनिराळी दोन पण निकटसंबंधाचीं कुळें आहेत. ऋग्वेदांतील मंत्रद्रष्टयांस तीं खरोखरीं तशीं वाटत होतीं. तुर्वशय्यदू असा द्विवचनी व यदुतुर्वशश्च असे शब्द प्रयोग योजिले आहेत. असा अर्थ घेतला तर ऋग्वेदांतील दोन्ही सूक्तांतला तुर्वश शब्दाचा अनेकवचनी प्रयोग बरोबर जुळतो.

ऋग्वेदांतील तुर्वशाचा मुख्य पराक्रम म्हटला म्हणजे सुदासाविरुद्ध चाललेल्या युद्धांत त्यानें त्याच्या शत्रूस सहाय्य करणें हा होय. सुदासानें त्याचा पराभव केला ( ५-३१,८ ). तो लढाईतून त्वरेनें पळाला म्हणून त्यास तुर्व हें नांव पडलें असावें असें एक पाश्चात्य पंडित म्हणतो. या पळापळींत त्यास मदत इंद्राची झालेली दिसते. म्हणून कांहीं वाक्यांत तुर्वश व यदू यांस त्यानें सहाय्य केल्याबद्दल उल्लेख येतो; ह्या पराजयांत अनू व द्रुह्यू या कुळांचे राजे बुडून मेले असा उल्लेख येतो, पण तुर्वश व यदू कुळांचे राजे मेले असा उल्लेख कोठेंही येत नाहीं. ( ऋ. १.१७४,५;४ ३०,१७;५-३१,८;८-४,७ ). ऋग्वेदाच्या आठव्या मण्डळांत तुर्वश व बहुधा बुडून मेलेल्या राजाच्या मागून गादीवर बसलेला राजा अनू हे दोघे इंद्राचे भक्त होते असें आढळतें.

ऋग्वेदाच्या दोन वाक्यांत ( ६–४५, १,९.१, २ ) ह्यांत दिवोदासाचा नामनिर्देश आहे ( ७-१९, ८ ) त्यास अतिथिग्व असें म्हटलें आहे. तुर्वश व यदू यांनीं सुदासाचा बाप जो दिवोदास ह्याजवर हल्ला केल्याची कथा आहे. ह्या ठिकाणीं

ह्या दोन्हीं कुळांतील लोकांनीं दिवोदासावर हल्ला केला असें मानणें संयुक्तिक दिसतें. त्याचा मुलगा जो सुदास याजवर तुर्वशानें हल्ला केला असें मानणें कांहींसें असंभाव्य दिसतें.

पुढें शतपथ ब्राह्मणांत ( १३-५, ४, १६ ) असें दिलें आहे कीं तुर्वश हे पांचालांचें सहाय्य ३३ घोडे व ६००० सशस्त्र लोक घेऊन करीत होते. पुढें हे लोक पांचाळांत असे मिळून गेले कीं त्यांचें नांव कोठें आढळत नाहीं.

सुदासाशीं लढण्यांत गुंतले असतां तुर्वश लोक कोठें रहात होते हें समजण्यास मार्ग नाहीं. त्यांनीं परुष्णी ओलांडली होती हें निश्चित आहे, पण ती कोणत्या बाजूनें ओलांडिली होती हें अनश्चित आहे. जेथें भरत रहात होते तेथून म्हणजे पश्चिमेकडून पूर्वेकडे ते गेले असावे हें जास्त संभाव्य दिसतें.

यदुतुर्वश हे भरतांचे पिढीजाद शत्रू दिसतात. त्यांच्या युद्धास दाशराज्ञ युद्ध असें म्हणतात. हे दोन्ही पक्षाचे लोक एकाच वैदिक संस्कृतीचे होते. म्हणून ह्या लढाईस आपसांतील यादवी ( सिव्हिल वॉर ) असें म्हटल्यास चालेल. यांत धुनी व चुपुरी हे भरतांचे दास दिसतात. यांपैकीं धुनी यास मारून इंद्रानें यदु-तुर्वश यांचें वैय्य व तुर्वीती ह्यांजबरोबर रक्षण केलें (१-५४, ६.१-१७४, ९) इंद्रानें तुर्वशास सृंजयाच्या ताब्यांत दिलें व दैववाताकरितां वृचिवानास शिक्षा केली. ( ६, २७, ७ ) तुर्वशानें मत्स्य देशावर व भृगु व द्रुह्यू यांजवर स्वारी करून धन मिळाविलें ( ७-१८, ६ ). इंद्रानें तुर्वश व यदू यांजकरितां अन्हवायस नाहींसें केलें ( ८-४५, २७ ) तुर्वशांकडून कण्वास सोम मिळाला (८·१३,४१) यावरून कण्व हें तुर्वशांचे पुरोहित ठरतात. अभ्यावर्ती चायमानानें वृचीवंतांचा पराजय केला व हा पार्थव होता असें म्हटलें आहे. [ ६-२७, ५; ६-२७, ८ ] त्याअर्थीं तुर्वश व वृचीवंत हरियुपिया म्हणजे अर्वाचीन हिरिक्रिटी हिच्या थडीवर रहात असावे. व ते भरतांस आर्यावर्तांत येतांना रस्त्यांत भेटले असावे. यदूचे वंशज यादव हे महाभारतकाळीं फार महत्वास चढलेले दिसतात.

१८ तृत्सुः—हें विशेष नाम आहे. हें ऋग्वेदांतल्या एका वाक्यांत ( ७·८, १३ ) एकवचनी व अनेक ठिकाणीं ( ७. १८, ७, १५, १९; ३३-५, ६-८३, ४. ६, ८, ) बहुवचनी आढळतें. शिम्यू, तुर्वश, द्रुह्यू, कवश, पुरू, अनू, भेद, शंबर, दोन वैकर्ण, व यदू व त्यांचे सहाय्य संकेती मत्स्य, पक्थ, अलिन, भलान, विषाणी, शिव, अज, शिग्रू, व यक्षू यांतील दहा राजांविरुद्ध सुदासाचें जें मोठें युद्ध झालें, त्यांत तृत्सू हे सुदासाचे सहाय्यकारी होते. या कुळांपैकीं पक्थ, अलीन, भलान, विषाणी, शिव, अज, शिग्रू व कदाचित यक्षू हीं कुळें बहुवा वायव्येस सिंधू नदीच्या पश्चिमेस व काबूलनदी भोवतीं वसाहत करून होतीं, अनू. पुरू, तुर्वश, यदू व द्रुह्यू हीं बहुधा पंजाबांत राहाणारीं कुळें होतीं, अज, शिग्रू, व यक्षू—ह्या जमाती भेदाच्या तांब्यांतील पूर्वेकडे राहणाऱ्या होत्या; विम्यू, व कवश ह्या जमाती कोठें राहत होत्या हें कळत नाहीं; व दोन वैकर्ण ह्या जमाती बहुधा वायव्येकडील होत्या. दहा राजांच्या पराजयाची तुतारी

ऋग्वेदांच्या एका सुक्तांत ( ७.१८ ) वाजविली आहे, व दुसऱ्या दोन ठिकाणीं ( ७.३३ व ८३ ) त्याचा उल्लेख आला आहे. एक घनघोर युद्ध परुष्णी नदीवर झालें. पण दुसरें एक युद्ध यमुनेवर झालें तेव्हां विरुद्धपक्षास–भेदप्रमुख अज, शिग्रू, व यक्षू ह्या जमाती होत्या. यमुना व परुष्णी ह्या नद्या तृत्सूंच्या प्रदेशांच्या दोन टोकांजवळ आहेत तेव्हां कोणत्या दहा राजांची कशी जूट झाली होती हें ठरविणें कठीण आहे. पण ह्या जुटीचा उल्लेख पुढील दोन सूक्तांत झाला आहे. पण ज्या सूक्तांत ह्या युद्धांचें वर्णन आहे, त्यांत तिचा उल्लेख नाहीं. म्हणून ह्या जमातीच्या राजांची संख्या अगदीं निखालस बरोबर आहे असे म्हणवत नाहीं.

ऋग्वेदांत ( ३–३३;५३,९–१२ ) भरत कुळांतील लोक विश्वामित्राच्या मार्गदर्शित्वानें भरभराट पावत होते व विपाश व शतुद्री ह्या नद्यांकडे पसरत चाललें होते असें दिलें आहे. त्या भरतांशीं तुत्सूचा संबंध काय होता हे समजत नाहीं. तृत्सू हे ऋग्वेदाच्या आठव्या मंडळाच्या द्रष्टया वसिष्ठाप्रमाणेंच डोक्याचे केश राखीत असत, तेव्हां तृत्सू हे वसिष्ठकुलोत्पन्न दिसतात (ऋ.७–३३,१) श्वित्यांचो दक्षिण तस्कपर्दाः ( व ७–८३,८, श्वित्यांचो++कपर्दिनः ). ऋग्वेदांत एके ठिकाणीं ( ७–१८,१३ ) तृत्सू हा शब्द एकवचनी योजिलेला आहे, तेथें त्याचा अर्थ तृत्सू राजा म्हणजे सुदास दिसतो ( ऋ.७–१८,१४) तेरा व चोवीस या मंत्राचा सारखेपणा निर्विवाद आहे. आणखीं सुदास व भरत यांची स्तुती ऋग्वेदांत ( ३–५३,९;१२–२४ ) मध्यें आहे, तशी दिवोदास व भरत यांची स्तुती ऋग्वेदांत ( ६–१६;४–६ ) मध्यें आहे. ती अशा रीतीनें जोडिलेली आहे कीं दिवोदास हा भरत कुळांत उत्पन्न झालेला होता असें निखालस वाटतें. हा—अर्थ घेतला तर तृत्सूनां विंशः । म्हणजे तृत्सू गोत्रजांचे तावेदार हा अर्थ जुळतो. वशिष्ठांचा या राजघराण्याशीं निकट संबंध होता तेव्हां वशिष्ठांस तृत्सू म्हणण्यास हरकत नाहीं.

तृत्सू व त्यांचे तावेदार जे भरत हे वैदिक काळीं परुष्णी व यमुना ह्या नद्यांमधील प्रदेशाच्या दोहोंकडील लोकांशी द्विधा भावानें राहत असतील तर हें उघड आहे कीं ते पुरू व दुसऱ्या जमातींच्या लोकांशीं मिळून कुरू हे लोक उत्पन्न झाले. ऋग्वेदांत ( ६—४७ ) तृत्सू हे सृंजयाचे कुळांतील लोकांचे साथीदार आहेत वे शतपथ ब्राह्मणांत [ २—४,४,५ ] एकच पुरोहित कुरू व सृंजय यांचें पौरोहित्य करणारे असत असें दिलें आहे.

पण सुदासाचा बाप दिवोदास व भरत हे इराणांत आर्कोसियामध्यें हरक्वैतीच्या काठीं रहात होता व तो मर्णियन [ पणी ] यांशीं लढला असें कांहीं पण्डित मानितात.

तृत्सू हे या प्रदेशांत प्रथम आलेले होते. त्यांच्या मागून सुदास प्रभृती भरत आले. नंतर तृत्सू व भरत हे एक झाले.

१९ द्रुह्यू हें नांव आर्य कुळांतील एका लोकांचें आहे. त्यांचा उल्लेख ऋग्वेदांत

अनेक ठिकाणीं आला आहे. एका वाक्यांत ( १-१०८,८ ) ह्या शब्दाचा प्रयोग अनेक वचनी आहे व त्याचा उपयोग यदू, तुर्वश, अनू व पुरू यांच्या नांवाबरोबर केलेला आहे. यावरून कांहीं पण्डित म्हणतात कीं ऋग्वेदांतील पंच-जन म्हणतात ते हेच होत. पण आमचें मत आम्ही पूर्वी प्रदर्शित केलें आहे. तें हें कीं पंचजन हे पृथ्वींतील या आपल्या मायभूमींत जंबुद्वीप व सुमेरुखंड यांचा हिमालयानें संयोग झाल्यानंतर घुसलेले पांढरे, तांबडे, पिवळे, काळे व फिके लोक होत. ह्या द्रुह्यूंचा पराजय त्यांच्या साहाय्यसंकेत्यासह दाशराज्ञ युद्धांत परुष्णी व यमुना ह्या नद्यांवर सुदासानें केला व ( ऋ. ७-१८ ) प्रमाणें तो पाण्यांत बुडून मेला. दुसऱ्या एका वाक्यांत द्रुह्यू, तुर्वश व यदू यांचा उल्लेख एकवचनी ( ८-१०,५ ) करण्यांत आला आहे. व दुसऱ्या एका वाक्यांत पुरू व द्रुह्यू यांचीं नांवें आलीं आहेत ( ६,४६,८ ). द्रुह्यू हे वायव्येकडील लोक होते व महाभारतांत गांधार व द्रुह्यू ह्यांचीं नांवें एकत्र आलीं आहेत. ह्यांचें नांव ऋग्वेदांत सहा ठिकाणीं आले आहे. हे सोमयाग करून इंद्राग्नींस संतुष्ट करणाऱ्या वैदिक परंपरेंतील होते.

२०* नहुषः—या जमातीचा उल्लेख ऋग्वेदांत ( ६.२२,१० ) आला आहे. हे इतके बलिष्ट होते कीं त्यांच्या बळाचा मत्सर इंद्रासही वाटे(६-४६,७) त्यांचे ते उत्तम घोडेस्वार असल्यामुळें त्यांपुढें कोणाचाही निभाव लागत नसे ! [ ८-६,२४ ]. या नहुषांच्या राजाचें नांव ययाती असें होतें. ( ययातेर्नहुषस्य बर्हिषि देवा आसते—१०-६३,१ ). महाभारतांत नहुषानें इंद्रपद मिळविल्या-बद्दल प्रसिद्ध कथानक आहे. तें ह्याच संविधानकावर रचिलें आहे असें दिसतें. ह्यांतील मुख्य नायक ययातीस मानितां येईल. पण त्याच्या अनू आदिक पुत्रांचा पत्तामुद्दा ऋग्वेदांत सांपडत नाहीं. ह्या राजाची प्रजा इंद्राग्निपूजक आहे तरी तीस पंचजनांत थारा मिळालेला दिसत नाहीं.

२० निषादः—हा शब्द पुढील संहिता व ब्राह्मणें ( तै. सं. ४-५,४,२; का. सं. १७.३; वै. सं. २-९,५; वा. सं. १६-२७; ऐ. ब्रा. ८ ११; पं. ब्रा. ( १६-६,८ ) ह्यांत आला आहे. निषाद हें कांहीं विशेष कुळ होतें असें दिसत नाहीं. शूद्रांप्रमाणें जे आर्येतर आर्यांच्या ताब्यांत नव्हते अशा सगळ्या लोकांस हें सामान्य नांव लावीत असत. चार वर्ण व निषाद मिळून पंचजन होतात असें औपमन्यव मानितो. पण महीधर नामक टीकाकार वाज. संहितेंतील हा शब्द भिल्ल ह्या अर्थीं धरितो. निषादांच्या खेड्यांचा उल्लेख लाट्या. श्रौत सूत्रांत ( ८-२,८ ) आला आहे, व कात्यायन श्रौत सूत्रांत ( १७,१,१४ ) उल्लेख आहे व त्यानें उतारा घेतलेल्या ब्राह्मणांतील वाक्यांत निषाद स्थपिती नामक एका नायकाचा उल्लेख आहे. एक पाश्चात्य पण्डित म्हणतो कीं निषाद हा शब्द नि म्हणजे खालीं व सद् म्हणजे राहणें ह्या धातूवरून सिद्ध झाला आहे. तेव्हां निषाद याचा अर्थ कायमचे रहिवासी, मूळचे लोक असा होतो व ह्या बेबंद लोकांच्या विरुद्ध अर्थाची पुष्टी पुढील वहिवाटीनें झाली आहे. ती वहिवाट अशी

कीं ( कौ. ब्रा. २५·१५ ) प्रमाणें विश्वजित यज्ञाच्या संस्कारांत यजमानास निषाद लोकांमध्यें कांहीं दिवस जाऊन राहावें लागे, व ते त्यांस आपल्यामध्यें घेऊन राहूं देत. यावरून त्यांजवर आर्यांच्या संस्कृतीची छाप कांहीं तरी बसली होती असें दिसतें. पण निषाद हा शब्द आर्येतर सर्व लोकांस सरसाहा लावितां येण्यासारिखा आहे. मनू ( १०.८ ) प्रमाणें निषाद ही ब्राह्मण बाप व शूद्री बायको ह्यांची संतती होय असें दिलें आहे व वराहमिहिराच्या बृहत्संहितेप्रमाणें [ १४-१० ] निषादाचें मध्यदेशाच्या नैऋत्येस राष्ट्र होतें. पाली ग्रंथाप्रमाणें निषादांचा उल्लेख कोळी व पारधी यांप्रमाणें केला आहे. विश्वजित यज्ञाच्या धात्वर्थाप्रमाणें त्या यज्ञ करणाऱ्या मनुष्यानें तो करण्यापूर्वीं सर्व लोकांस जिंकलेलें पाहिजे असें दिसतें, म्हणून त्यास निषादांमध्यें राहून त्यांस कह्यांत आणून जणू ठेविलें असे नाटक करून दाखवावें लागे ! ह्यांतील स्थपिती म्हणजे शिल्पज्ञ नायकांस शूद्रांस असाधारण असा यज्ञ करण्याचा अधिकार असे असें आमचे मित्र रा. यशवंतराव दाते म्हणतात [ वेदकालीन राष्ट्रें पा. ४३ ]

२१ नाड नैपदः—ह्या कुळाच्या राजाचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत [२-२,२;१.२] आला आहे. हा पितृपती यमासारिखा दक्षिणेचा राजा आहे. नाडकर्णी, नाडकर वगैरे नाड शब्द कानडी व मलबारी भाषेंत एका जमातीचा वाचक आहे. यावरून त्यांच्या उत्पत्तीचें दिग्दर्शन होतें. ह्या नाडांची योजना नायरांच्या राजवस्थेंत फार करून आढळते. आमचा पुढील नायर लोकांचा इतिहास पहा.

२२ पक्थ— हें ऋग्वेदांतील ( ७-१८-७ ) एका जमातीचें नांव आहे. दशराजन्यांत अथवा दहा राजांच्या लढाईत तृत्सूभरतांच्या विरुद्ध ज्या जमाती लढत होत्या, त्यांत पक्थ ही एक जमात होती· हे पूर्व अफगाणिस्थानांतील अर्वाचीन पक्थन अथवा पठाण लोक होत, हिरोडोटस नामक ग्रीस इतिहासकार म्हणतो कीं ह्यांची एक जमात हिंदुस्थानच्या वायव्य भागीं होती व भरत हे मध्यदेशांत होते. तर वरील विधान समर्पक दिसतें. ऋग्वेदाच्या तीन वाक्यांत ( ८-२२.१०;४९, १०;१०·६१,१ ) अश्विनदेवभक्त पक्थांचा उल्लेख आहे. त्यांतील दुसरे वाक्यांत पक्थांचा संबंध त्रसदस्यूशीं दाखविला आहे. त्रसदस्यू हा पुरू कुळांतील होता. ह्या पुरुकुळांतील लोकांनीं सुदासावर हल्ला चढविला होता. तेव्हां ही पक्थ जमात त्यांच्या मदतीस होती. तिसऱ्या वाक्यांत हीस तुर्वायण असें म्हटलें आहे. त्यांचा राजा चवानाचा प्रतिस्पर्धी असावाअसें दिसतें.—यावरून हा पक्थ लोकांचा राजा होता असें ठरतें. श्रीयुत दाते म्हणतात कीं, ह्या लोकांस हल्लीं पुखतुनरत्ना असें नांव आहे. यांच्या तुर्वयाण राजानें ( ४-६१, १ ) दिवोदास, कुत्स व आयू ह्यांचा पराजय केला पण दिवोदासाचा मुलगा सुदास यानें त्याचा पराजय केला. हे लोक हल्लीं मुसलमानी धर्माचे झाले आहेत. ह्यांस पठाण असें म्हणतात. ह्यांत कंदाहारी ( गंधार ) वगैरे जाती मोडतात.

२३ पंचजनः—( पाचजमातीः— वैदिक सारस्वतांत ह्या पांच लोकांचा उल्लेख निरनिराळ्या प्रकारें करण्यांत आला आहे ( ऐत. ब्रा. ३-३१; ४·२७; तैति.सं.

१-६,१, २; का. सं., ५.६, बृह. उप. ४,२-९ ] [ पंचजनाःसमान ]. पुढील प्रमाणें पहा—पंचमनुष्याः, ऋ. ८.९.२; मानवाः, अ, ३-२१, ५, २४, ३; १२-१,१६ जनाः, ऋ.३-३७, ९; ५९, ८; ६.१४, ४; ८-३२, २२; ९-६५, २३; ९२, ३; १०.४५, ६; कृष्टयः, २-२, १०; ३-५३,१६; ४. ३८, १०.६०, ४, ११९.६; अ. ३-२४. ३; क्षित्यः, ऋ.१—७, ९; १७६; ३; ५—३६ व २; ६—४६; ७; ७—७५, ४; ७९, १; चरषण्यः, ऋ. ५—८६, २; ७—१५, २; ९—१०१, ९०, ऋग्वेदाच्या प्रत्येक मण्डळांत पंचजनांचा उल्लेख आहे. त्यांत तसला एक उल्लेख २ व ४ यांत; दोन उल्लेख १, ५, ६, ७ व ८ यांत; व तीन उल्लेख ३ व ९ यांत; व चार उल्लेख १० व्या मण्डळांत आहेत ). हे पांचजन कोण ? हें अनिश्चित आहे. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें [ ३.३१ ] पंचजन म्हणजे [ १ ] देव [ २ ] नर [ ३ ] गंधर्व व अप्सर [ ४ ] नाग व [ ५ ] पितर हे होत. औपमन्यव प्रमाणें [ यक्ष, निरुक्त ३, ८ ] चार वर्ण व निषाद मिळून पंचजन होतात, व सायनाचेंहि असेंच मत आहे. [ ऋ, १- ७, ९ ). यास्क यांचें असें म्हणणें आहे कीं पंचजन म्हणजे गंधर्व, पितर, देव, असुर व राक्षस हे होत. अथर्ववेद ( ३-२४. ३ ]—पंचप्रदिशो मानवीः पंचकृष्टयः । म्हणजे पांचदिशा व मनुष्यांच्या पांच जाती—या प्रमाणाप्रमाणें पंचजन ही संज्ञा पांच जमातींत किंवा पांढऱ्या, तांबड्या पिवळ्या, काळ्या व फिक्या ह्या सर्व मानवजातींस लागते. सरस्वती नदीच्या कांठच्या पांच जमाती [ ऋ. ६-६१, १२ [पंच जाता] १०-५३, ४ ] म्हणजे अनू द्रुह्यु, यदू, तुर्वश, व पुरू ह्या होत असें समजावें; कारण या पंचजनांत सोम पेय पंचजन्य इंद्र देवास अर्पण करण्याची वहिवाट होती. [ ऋ. ९, ६५; २३, ५-३२.११ ] व अग्नी व अत्री हे पंचजनातील होते [ऋ. ९-६६,२०;१-११७ ३ )व या पंचजनांचीं संयुक्त नांवें ऋग्वेदाच्या दोन सूक्तांत [ १-१०८, ८ व ७ १८ ] आलीं आहेत. व त्यांतील चार जमातींचें नांव एकदां ऋग्वेदाच्या दुसऱ्या एका सूक्तांत [ ८-१०, ५ ] आलें आहे. पण इतर ठिकाणीं असा संकुचित अर्थ धरून राहण्याचें कारण नाहीं; कारण पंचजन म्हणजे पांच जामाती असा सरसकट निर्बाध अर्थ घेऊन सर्व वैदिक ग्रंथांतील पंचजनांच्या कोड्याचा उलगडा होत नाहीं व त्याप्रमाणें [ १ ] वरील पांच जमाती ह्या अर्थांच्या पंचजनांपैकीं तुर्वश ही जमात नाहीं तर तुर्वश हे यदू किंवा यक्षू कुळाच्या राजाचें नांव आहे तेव्हां ते जन पांच भरत नाहींत तर ते चारच भरतात व [२] त्याप्रमाणें एका सूक्तांत त्यांच्या चारच जमातींचा नामनिर्देश आहे, व वस्तुस्थितीही ह्याच सर्वव्यापी विधानाची समर्पकता दाखविते, म्हणजे हिंदुस्थानांतील सध्याच्या लोकांचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर ऐतरेय ब्राह्मण, औपमन्यव, व सायन यांचीं मतें जास्त ग्राह्य दिसतात; कारण पृथ्वींत मनुष्याची वस्ती प्रथम क्रान्ति प्रदेशांतील हिंदुस्थान, चीन, मेक्सीको, इजिप्त व मलय या देशांत होऊन त्यांवर सूर्याच्या लंबरूप किरणांच्या जास्त उष्णताजनक-

तेव्हां व प्रण्यांच्या पूर्वपश्चिम अक्षांशांवर पसरण्याच्या—नियमाप्रमाणें—सदरहू देशांत—पांढरे, निवळे, तांबडे, काळे व फिके लोक—मूलतः आहेत व त्यांचे दळणवळण पूर्व–पश्चिम अनादी कालापासून त्यांच्या त्यांच्या सुधारणेप्रमाणें व देवत्रेत्रीप्रमाणें व अस्मानी व सुलतानी कारणांप्रमाणें अधिकउणें सदरहू पंचजन या जंबुद्वीपांत वेळोवेळीं भरले आहेत व ते येथें अती शुद्ध स्थितीपासून अती मिश्र स्थितीपर्यंत संकराच्या नियमाप्रमाणें वर्गवारीनें आढळतात. तेव्हां पंचजन या संज्ञेचा अर्थ विशेष स्थळीं संकुचित, पण तदितर ठिकाणीं सामान्यतः सर्वव्यापी अभिप्रेत आहे ह्यांत संशय नाहीं; कारण हा दुसरा अर्थ हल्लींच्या भौगोलिक शोधाप्रमाणें अगदीं अक्षरशः व तत्वतः अगदीं यथामूळ म्हणजे मुळांत जसा असला पाहिजे तसा आहे.

२४ पांचाल.—ऋग्वेदांत ज्या लोकांस क्रिवी असें म्हटलें आहे, त्या लोकांचें पांचाल हें, पुढील काळांत मिळालेलें नांव आहे. ( शत. ब्रा. १३-५,४,७ ). पांचाल ह्या शब्दाचा स्वतंत्र प्रयोग क्वचित आढळतो, म्हणजे त्याचा उपयोग कुरू ह्या शब्दाबरोबर नेहमीं करितात, व याप्रमाणें ऐतरेय ब्राह्मणांत ( ८-१४ ) कुरु—पांचाल राजांचा उल्लेख आहे. काठक संहितेमध्यें हे [ ३०-२ ] पांचालकेशिन् दाल्भ्याचे लोक आहेत असें दिसतें. उपनिषदांमध्यें व त्यांपुढें बृह. उ. ६-१,१ [ माध्यंदिन=६-२,१ कण्व ]; छांदो. उ०, ५-३,१; ऋग्वेद प्रातिशाख्य, २-१२,४४; निदान सूत्र, १·६; शांखायन श्रौत सूत्र, १२-१३,६ इ०] पांचालांतील ब्राह्मण तत्वज्ञानपर व भाषाशास्त्रपर वादविवादांत पूर्वपक्ष व उत्तर पक्ष करून नांवलौकिकवान् झालेले आढळतात. संहितोपनिषद् ब्राह्मणांत [ २ ] प्राच्य पांचालांचा उल्लेख आहे.

पांचालांत क्रिवींशिवाय दुसऱ्या जमातींचाही अंतर्भाव होत असे. ह्या कुळाच्या नांवावरून ह्यांत पांच जमातींचा समावेश होत असे असें दिसतें व कांहीं पण्डितांचें मत असें आहे कीं पंचजन म्हणतात, त्या ह्याच जमाती होत व हें मतही असंभाव्य आहे असें नाहीं पण आमच्या मतें हा अर्थ वर सांगितल्याप्रमाणें पहिला संकुचित होय व दुसराही सर्वव्यापी नव्हे. महाभारतांत पांचालांचे दोन विभाग दिले आहेत. [ १ ] उत्तर पांचाल व २ दक्षिण पांचाल. पण त्यांचा छडा वैदिक सारस्वतांत आढळत नाहीं. शतपथ ब्राह्मणांत [ १३-५,४,७ ] त्यांच्या शहराचें नांव परिचक्र असें दिलें आहे. त्यांचीं दुसरीं शहरें म्हटलीं म्हणजे कांपिल व कौशांबी हीं होत. कुरुपांचालांच्या राजेरजवाड्यांप्रमाणें प्रसिद्ध राजेरजवाडे म्हटले म्हणजे कैव्य, दुर्मुख, प्रवाहन, जैवाली व शोन हे होत. कुरुपंचाल हे राजसूययज्ञ करीत, दिग्विजय वगेरे करीत. कुरुपंचालदेश हा ब्राह्मणसंस्कृतीचें उगमस्थान होय.

२५ परशु:—हा शब्द ऋग्वेदांतल्या एका दानस्तुतींत [८-६,४६] आला आहे. हें एका मनुष्याचें नांव आहे. परशु व तिरिंदिर हे एकच कीं काय हें निश्चित समजण्यास मार्ग नाहीं, पण शांखायन श्रौत सूत्रांत [ १६-११,२० ] तिरिंदिर

पारशव्याचा उल्लेख आहे. तो वत्स कण्वाचा पुरस्कर्ता होता. ( १०-८६,२३ ) पाणिनीवरील [ ४-१,१७७ ] वार्तिक, परशू म्हणजे परशूंची राजकन्या-[कुवर] वृषाकपी सूक्तांत परशुमानवी हा शब्द आला आहे. त्या शब्दाचा अर्थ मनूची मुलगी असा होतो, पण ती कोण होऊन गेली ह्याचा पत्ता लागत नाहीं. ऋग्वेदातील ह्या दोन स्थळांशिवाय दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं हा शब्द विशेषनामासारिखा योजिलेला नाहीं–असें एका पण्डिताचें मत आहे. पण दुसऱ्या एका पण्डिताचें असें निराळें मत आहे कीं परशूंचा नामनिर्देश अनेक ठिकाणीं आला आहे. ऋग्वेदाच्या एका वाक्यांत [ १०-३३, २ ] परशूनीं केलेल्या कुरुश्रवणाच्या पराजयाचा उल्लेख आहे; दुसऱ्या एका ठिकाणीं [ ७-८३, १ ] पृथू व परशू म्हणजे पार्थियन व पर्शियन यांचा नामनिर्देश आहे. ऋग्वेदाच्या एका सूक्तांत [ ६-२७, ८ ] पार्थव हा शब्द आला आहे. त्यांस तो पार्थिव लोकांचा वाचक आहे असें वाटतें. पण पाणिनींत [ ५-३, ११७ ] परशूंचा उल्लेख आहे. तें एका लढवय्ये जातीचें नांव आहे. पारशव जातीचे लोक मध्यदेशाच्या नैऋत्येस राहात होते. पेरिप्लसमध्यें परथोईची जमात उत्तर हिंदुस्थानांत राहात होती असें दिलें आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं हिंदू व इराणी [ पारशी ] ह्यांचा संबंध फार प्राचीन काळापासून आहे. इतिहाससंशोधक श्रीयुत राजवाडे यांच्या मताप्रमाणें परशुराम अवतार हा ह्या परशूंपैकींच आहे. प्रत्यक्ष ऐतिहासिक संबंध ह्यापेक्षां जास्त सबळ पुराव्यानें ठरविणें शक्य नाहीं. सुदास पूर्वेकडे चढाई करून जात असतां त्यास या परशूनीं सहाय्य केलें ( ७-८३, १ ) ह्याच्या रीतिभाती महाराष्ट्रांतील मराठ्यांसारख्या होत्या. अभ्यावर्ती चायमान हा एक पार्थिवांचा राजा होता. त्यानें आपले पुरोहितास ( ६-२७, ८ ). त्यास दक्षिणा दिली आहे. हरियुपिया नदीवर इंद्रानें ह्या आपल्या भक्तांकरितां वृचीवानांचा पराजय केला (६,–२७–५) हे पर्शियन सुदासाबरोबर हिंदुस्थानांत येऊन राहिले ( श्रीयुत दाते ).

निष्कर्षः–वरील विवेचनावरून असें सिद्ध होतें कीं वैदिक व अवैस्तिक लोकांची वस्ती पार्थिया ( पर्शिया ) पासून यमुनाथडीपर्यंत ऋग्वेदकाळीं झाली.

२ या जमातींत पंचजन अथवा पांच राष्ट्रें मुख्य होतीं. त्यांच्या उत्कर्षास दिवोदास व सुदास यांचीं तुंबळ युद्धें कारण झालीं. सुदासाचें परुष्णी व यमुना या नद्यांवर तेथें पूर्वीं असलेल्या मुख्य दहा राजाशीं युद्ध झालें व त्यांत त्यास पूर्ण जय मिळाला. म्हणून त्यांचें वसाहतीचें काम फार सुकर झालें.

३ हीं राष्ट्रें एकएकटीं किंवा जूट करून आपसांत किंवा परक्याशीं लढत असत. व त्यांचीं नांवें त्यांतील पराक्रमी पुढाऱ्याच्या नांवाप्रमाणें वेळोवेळीं बदलत.

४ हे इन्द्र, अग्नी वगैरे वेदप्रसिद्ध देवांचीं आराधना लढाईंत जय मिळविण्याकरितां आपआपल्या वशिष्ठ, विश्वामित्र, भारद्वाज वगैरे पुरोहितांमार्फत करीत

५ हे वैदिक व अवैस्तिक पुष्कळ सुधारलेले होते. त्यांस तेथें असलेल्या हीन संस्कृतीच्या इतर लोकांशीं लढाया कराव्या लागत.

६ ब्राह्मण लोक धर्मसंस्कारांचेंहि काम करीत, व हीन संस्कृतीच्या मनुष्यांचें संघांस व्रात्यसोमाच्या संस्कारानें [ व्रात=समुदाय ] आपल्या समाजांत सामील करून घेत. तेणेंकरून त्या संघास स्वतंत्रतेनें रोटीबेटीव्यवहाराचें सुख निरामयपणें यथापूर्व भोगितां येत असे. ते हल्लींचे ख्रिस्ती व मुसलमान बाट्यांप्रमाणें या बाबतींत बिलकूल दुःखी होत नसत.

७ या वसाहत करणाऱ्या जमाती हिंदुस्थानांत समुद्राच्या लाटांप्रमाणें एकावर एक लोटत आल्या आहेत--त्या एकदम या देशांत घुसल्या नाहींत.

८ चेदींची जमात ऋग्वेद काळांत बुंदेलखंडांत शिरलेली आढळते, म्हणजे ती विंध्यापलीकडे दक्षिणेस गेलेली आहे.

---

# भाग आठवा.

## चार वर्णांची संस्था.

—[ २ ]—

उद्देशः-पंचजनशुद्धी.

Ah, no! To distant climes, a dreary scene,
Where half the convex world intrudes between,
Through torrid tracks with fainting steps they go,
Where wild Gandaki murmurs to their woe.
Far different therefrom all that charm'd before,
The various terrors of that horrid shore;
Those blazing suns that dart a downward ray,
And fiercely shed intolerable day–
These matted woods where birds forget to sing;
But silent bats in drawsy clusters cling–
These poisonous fields with rank laxuriance crown'd,
Where the dark scorpion gathers death around–
Where crouching tigers wait their hapless prey,
And savage men murderous still than they–
While oft in whirls the mad tornado flies.
Mingling the ravag'd landscape with the skies.
Far different these from every former scene;
The cooling brook, the grassy-vested green,
The busy covert of the warbling grove,
That only sheltar'd thefts of harmless love.–;

• Adapted-Goldsmith-*P.* 43.

निषादपंचमान् वर्णान् मन्यते शाकटायनः ॥ बृहद्देवता—६९

गोरा ब्राह्मण, काळा शूद्र, तांबडा क्षत्रिय, पिवळा वैश्य व फिका निषाद हे सामान्य रंग पंचजनांचे होत.

"वैदिक अर्यांशिवाय इतरही आर्य त्यावेळीं भारतखंडांत वसती करून राहिले असावे. त्यांच्यामध्यें यज्ञसंस्थेचा विकास फारसा झालेला नसावा व ते इन्द्राची उपासना करीत नसावे. यांपैकीं कांहीं भारतादी राष्ट्रांच्या पूर्वींचे आलेले असावे.

युद्धांत मिळणारा जय किंवा अपजय इंद्रादी देवतांच्या कृपेवर अवलंबून आहे अशी त्यांची समजूत असावी व ही देवतांची कृपा यज्ञ करून पुरोहितांच्या द्वारें मिळविण्याचा ते प्रयत्न करीत. त्यामुळें पुरोहितांस मोठें महत्व असे व एकमेकांचे पुरोहित आपणाकडे वळवून घेण्याचीही ते युक्ती योजित असत.

राजांप्रमाणें त्या वेळचे पुरोहित फारसे स्थान त्याग करीत नसावे, तर ते नवीन येणाऱ्या राजांचें पौरोहित्य मिळवून स्वस्थ रहात असावे. त्यामुळें पौरोहित्याबद्दलहि स्पर्धा विशेष चालत असे.

महाभारतकालीं वैदिक संस्कृतीचा प्रसार सर्व उत्तर हिंदुस्थानभर झालेला दिसतो."—श्रीयुत यशवंतराव दाते—हिंदुस्थान—पा. ४२—(जानेवारी १९२४)

वेदब्राह्मणयो वैंदनामधेयम् । बौद्धायन सूत्र.

अर्थ.—वेदांचा अभ्यास करणारे लोक वैदिक काळाचे दोन भाग पाडितातः १ संहिता काळ व २ ब्राह्मण काळ.

"ऋग्वेदांत उल्लेखिलेले ध्रुवावरील सृष्टिचमत्कार वर्णन करणारे बहुतेक मंत्र पंजाबांतच रचले गेले आहेत. याप्रमाणें ज्याला वेदकाल म्हणतां येईल तो काल फार मोठा आहे. तथापि बहुतेक वेदमंत्रांची रचना पंजाबांत सरस्वतीतीरीं आर्य रहात होते त्या काळीं व त्यानंतर झालेली आहे".—सदर.

"ऋग्वेदांत जर अपणास एखादें महत्वाचें कथासूत्र गोंवलेलें आढळत असेल तर तें भरतांनीं सुदासाच्या नेतृत्वाखालीं केलेल्या दिग्विजयाचें वर्णन होय."—सदर.

मागील भागांत चार वर्णांच्या संस्थेच्या साहित्याच्या पूर्वार्धाचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत त्याच्याच उत्तरार्धाचें वर्णन कर्तव्य आहे.

साहित्य—२६पारावत.—हा शब्द ऋग्वेदांतील अनेक वाक्यांत आला आहे. ह्या शब्दाचा अर्थ दुरून आलेले असा होतो. हें यमुनेच्या कांठच्या एका लोकांचें नांव होतें. पंचविंश ब्राह्मणांत तें त्या नदीवरील एका लोकांचें नांव म्हणून आलें आहे. हे मूळचे डोंगरी लोक होते. पारावतासंबंधें सरस्वतीचा उल्लेख आला आहे.

[ ऋ.५-९२,११;८-१००,६; अ. २२-१३५,१४;] पारावतघ्नी सरस्वती [ ऋ. ६-६१,२१ ]. पंचविंश ब्राह्मणांत ( ३-४,११;ऋ०८-३४,१८ ) ते यमुना नदीच्या कांठीं राहत होते असें दिलें आहे. हीं दोन्हीं स्थळें बरोबर जमतात.

२७ पुंड्र—हें एका जमातीचें नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें ( ७–१८; शांखायन श्रौत सूत्र, १.२ ) ते जातिबहिष्कृत होते. त्यांचें नांव सूत्रांतही आलें आहे ( बौ० ध० सूत्र ( १—२, १४ ).

२८ पुलिंदः–हें नांव एका जातिबाह्य जमातीचें होतें. ह्या जमातीचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत ( ८–१८ ) आंध्रांबरोबर केलेला आहे, पण त्यांचा उल्लेख शांखायन श्रौतसूत्रांत ( १५–२६ ) शुनः शेपाच्या कथेबरोबर केलेला नाहीं. अशोकाच्या काळीं पुलिंदांचें नांव आंध्राबरोबर केलेलें आढळतें.

२९ पुरूः–हें ऋग्वेदोक्त एका कुळाचें व त्यांच्या राजाचें नांव होतें. ऋग्वेदाच्या एका वाक्यांत त्यांचें नांव अनू, द्रुह्यू, तुर्वश व यदू या कुळांच्या नांवाबरोबर आलें आहे [ १-१०८, ८ ] सुदासाच्या जयाच्या सूक्तांत ( ७-१८, १३ ) हे तृत्सूंचे शत्रू म्हणून वर्णन आहे. ह्यांचा पुरोहित विश्वामित्र होता. लढाई चालली असतां तो सुदासाचा पराजय व्हावा म्हणून लोकसभेंत प्रार्थना करीत होता. ऋग्वेदाच्या एका सूक्तांत ( ७-८, ४ ) भरतांच्या अग्नीला पुरूंवर जय मिळाला असें वर्णन आहे. हा उल्लेख सुदासाच्या सदरहू महाविजयासंबंधेंच असण्याचा संभव आहे. ऋग्वेदाच्या अनेक वाक्यांत ( १-५९,६; १३१-४; १७४,२; ४-२१-१०; ३८-१; ६-२०, १०; ७-५,३; १९-३ ) पुरूंनीं मूळच्या लोकांवर जय मिळविले असें वर्णन आहे.

पुरुकुळांतील मोठे राजे म्हटले म्हणजे पुरुकुत्स, व त्याचा मुलगा त्रसदस्यू हे होत. त्रसदस्यूच्या नांवावरून दस्यू नामक मूळच्या लोकांचा हा काळ होता असें दिसतें. ह्याप्रमाणेंच ह्या कुळांतील दुसऱ्या एका राजाचें नांव तृक्षी त्रासदस्यव असें होतें. तेंही पूर्वोक्त विधानाचें समर्थन करितें.

ऋग्वेदांत ( ७-१६,२; व ८-६४,१०,११ प्रमाणें पुरू हे शार्यणावंतावर राहत होते असें दिसतें ) पुरुकुळांतील लोक सरस्वतीवर राहत होते असें सुस्पष्ट दिलें आहे. ही सरस्वती कुरुक्षेत्रांतील होय. म्हणून ज्याप्रमाणें तुर्वश व क्रिवि पांचाळांत मिलाफ पावल्यामुळें वैदिक कथांत त्यांचा पत्ता पुढें लागत नाहीं, त्याप्रमाणेंच पुरू हें कुळ कुरुकुळाशीं मिलाफ पावल्यामुळें वैदिक संघांत त्याचा पत्ता पुढें लागत नाहीं. ऋग्वेदोक्त ( १०-३३,४ ) कुरुश्रवणाचें गोत्रनाम त्रासदस्यव हें होतें. यावरून असें दिसतें की कुरू व पुरू हीं राजकुळें परस्पर विवाहसंबंधानें एक झालीं होतीं. अलेक्झांडर ( अलक्षचंद्र ) शीं सामना करणारा राजा पुरुकुलोत्पन्न होता, तर त्याचा मेळ वरील विधानाशीं कसा घालावयाचा ? पुरुकुळांतील लोकांचें मूळचें राहणें हिडॉस्पिसवर होतें व तेथून कांहीं लोक पूर्वेस निघून गेले तरी कांहीं लोक तेथेंच राहिले होते, किंवा हे पौरव पूर्वेकडून पश्चिमेकडे चढाई करून आलेले होते.

ऋग्वेदाच्या अनेक वाक्यांत ( १-३६,१; १-६,३,७; ह्यांत पुरुराजा पुरुकुत्स ह्याचा उल्लेख आहे; १-१३०, ७, ह्यांत पुरुराजा व दिवोदास अतिथिग्व

ह्यांच्या दस्यूंवरील जयांचा उल्लेख आहे; [१-१२९, ५; ४-३९, २; ५-१७ १; ६-४६,८; १०-४-१; ४८,५ ] पुरूंचा लोक या अर्थी उल्लेख आहे. ऋग्वेदांतील [ ७-८,४ ] पुरूचा अर्थ शतपथ ब्राह्मणांत [ ६-८, १, १४ ] असुर राक्षस असा दिला आहे. महाभारतांत ययाती व शर्मिष्ठा यांच्या मुलाचें नांव पुरू असें आलें आहे.

" शतपथ ब्राम्हणांत पुरुकुत्साला ऐश्वाक म्हटलें आहे. इक्ष्वाकू नांव ऋग्वेदांत एकदांच आलें आहे. पण तेथें त्याचा अर्थ राजा असा होतो. असमानी सूक्तांतील राजा इक्ष्वाकुवंशांतील समजतात. अथर्व वेदांत इक्ष्वाकूचा उल्लेख फक्त एकदांच आला आहे. पण तेथेंहि तें कुळाचें नांव किंवा व्यक्तीचें नांव आहे ह्याबद्दल संशय आहे. शतपथ ब्राम्हणांतील वरील उल्लेखावरून पुरूंनाच पुढें इक्ष्वाकू म्हणूं लागले असावे असें वाटतें.

जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत ऐक्ष्वाकवार्ष्णी यांचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणांत हरिश्चंद्राचा व पंचविंश ब्राह्मणांत अरुणाचा ( हें त्रसदस्यूचें पर्याय—वाचक नाम ) ऐक्ष्वाकू म्हणून उल्लेख आढळतो.

घुरू, दिवोदास, व सुदास हे सर्व पुरूच होते. ह्यांतीलच पुरुकुत्सही होता. ह्याच्याकरितां इंद्रानें दासांचीं सात पुरें विध्वंसिलीं ( १–६३,७;१०,१७४,२; ६–२०,१० ).—पुरुकुत्स हा एकदां कैदेंत पडला होता. त्यावेळीं त्याची राणी पुरुकुत्सानी हिच्या पोटीं सप्तर्षींच्या प्रसादानें त्रसदस्यू नांवाचा पुत्र झाला ( ऋ. ४–२२,८ व बृहद्देवता ). ह्या पुरुकुत्साला कारागृहवास आयू व दिवोदास यांच्या बरोबर तुर्वयाणाकडून झालेल्या पराजयाच्या वेळीं प्राप्त झाला असावा. ( १–५३,१० ). त्रसदस्यूला दुसरीं नांवें ऋग्वेदांत पौरुकुत्स्य, पौरुकुत्सी व ब्राह्मणांत त्र्यरुण, त्रैवृष्ण अशीं आहेत. तैतिरीय संहिता व काठक संहिता याप्रमाणें पाहतां, त्रसदस्यू पौरुकुत्स्य यानें अनेक यज्ञ केले तेव्हां त्यांचे पुरोहित वीतहव्य श्रायस, व कक्षिवंत औशिज हे होते ( तै० स० ५–६५; का० सं० २२–३ ). महाभारतांत याच्या पराक्रमांचें पुष्कळ वर्णन आहे, व याचेच कुळांत पुढें कौरव पांडव झाले असें वर्णन आहे.

३०पृथ्वी अथवा पृथू:—ऋग्वेदांत [ १–११२, १५ ) हें एका ऋषिचें नांव आहे. तो वैन्य म्हणजे वेनाचा पुत्र होता असें अनेक वाक्यांवरून दिसतें ( ऐ० ब्रा० १–७,४;२;७-५,१; ऋ. ८–९,१०; अ० ८—१०,२४; पंच. ब्राम्हण, १३—५,१९; शत. ब्राह्मण, ५—३,५,४; काठक संहिता,३७; वैन्य व पृथ्वीचा उल्लेख—ऋ.—१०–१४८,५ ). तो कृषिशास्त्राचा कल्पक व पहिला अभिषिक्त राजा होता. हें एका जमातीचें नांव होतें. तिचा उल्लेख ऋग्वेदाच्या एका वाक्यांत ( ७—८३,१ ) परशूं बरोबर आहे. ते तृत्सू भरतांचे शत्रू होते. पण ही कल्पना कांहीं पण्डितांस मान्य नाहीं. अभ्यावर्ती चायमान हा ह्या पार्थवांचा राजा होता व त्यानें व त्यानीं भारद्वाजांस दक्षिणा दिली आहे. [ ६-२७,८ ]. हे सुदासाबरोबर भरतखंडांत आले. ह्यांच्या रीतिभाती महाराष्ट्रीं-

तील मराठ्यांच्या रीतिभातींशीं मिळत्या आहेत. हे हारियूपिया नदीच्या कांठीं रहाणारे होते.

३१ प्राच्यः—हें पूर्वेकडे राहणाऱ्या लोकांचें नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणांत [ ८-१४ ] जी कुळांची यादी आहे, तींत ह्यांचें नांव आहे. हे लोक काशी, कोसल, विदेह, व कदाचित मगध असूं शकतील. शतपथ ब्राह्मणाप्रमाणें [ १-७,३,८ ] हे प्राच्य लोक अग्नीस शर्व म्हणत असत व ते आपलीं प्रेतें थडग्यांत पुरीत असत. ही थडग्यांत प्रेतें पुरण्याची पद्धती या ग्रंथाच्या कर्त्यास अगदीं नापसंत होती असें दिसतें. पंचविंश ब्राह्मणांत [ १७-१ ] आबडघोबड रथ ह्या अर्थाचा विपथ हा शब्द आला आहे. त्याचा खुलासा लाट्या० श्रौ० सूत्रांत [ ८-६,९ ] पौर्वात्यांचा रथ असा आला आहे. संहितोपनिषद् ब्राह्मणांत [ २ ] प्राच्य पांचालांचा नामनिर्देश आहे.

३२ बाल्हिकः—हें नांव अथर्ववेदांतील ( ५-२२,५-७,९ ) एका लोकांच्या जमातीचें आहे. त्यांत ताप ( तक्मन ) मुजवंत, महावृष, व बाल्हिक या लोकांकडे जावो अशी प्रार्थना आहे. मूजवंत हें उत्तरेकडील एका जमातीचें नांव आहे. तेव्हां बाल्हिक हें नांव उत्तरेकडील लोकांचेंच असलें पाहिजे. आपला ताप शब्द तक्मन शब्दासारिखाच आहे. यावरून इराणी लोकांचा संबंध हिंदू लोकांशी जुनापुराणा दिसतो.

३३ बाहिकः—शतपथ ब्राह्मणाप्रमाणें ( १-७,३,८ ) पंजाबच्या पश्चिमेकडील कांहीं लोकांचें नांव आहे. बाहिक ही संज्ञा प्राच्य ह्या संज्ञेच्या उलट आहे. हे लोक अग्नीस भव असें म्हणत असत. महाभारतांत ( ८-२०-३० ) हे लोक पंजाबांत सिंधूवर राहणारे होते—असें दिलें आहे. ह्या विधानाचा मेळ शतपथ ब्राह्मणांतील विधानाशीं आहे.

३४ भरतः—ऋग्वेद व त्यापुढील सारस्वत ह्यांत हें नांव अती महत्वाच्या कुळाचें म्हणून आलें आहे. ह्या लोकांचा उल्लेख सुदास व तृत्सू ह्या राजांच्या संबंधानें प्रामुख्येंकरून तिसऱ्या व सातव्या मण्डळांत आलें आहे ( ३-५३,९; २—२४; ३३, ११—१२ ) विश्वामित्राचा जयजयकार 'भरतर्षभ' म्हणजे भरतांतला बैल ह्या अर्थानें केला आहे, ऐतरेय ब्राम्हण, (७-१७,७;७-८,४;३३-६, यांत भरतांचा झालेला पराजय व त्यांच्या वशिष्ठांच्या मदतीनें झालेल्या सुटकेचा उल्लेख आहे, व त्याच्या सहाव्या मण्डळांत ह्या कुळाचा नामानिर्देश दिवोदासाबरोबर करण्यांत आला आहे ( ६.१६,४.५ ). एका वाक्यांत ( ७.८,४ ) भरत हे तृत्सूप्रमाणें पुरूंचे शत्रू आहेत असें दिलें आहे, पण भरत व तृत्सू हीं एकच कुळांचीं नांवें आहेत व तृत्सू हे वशिष्ट आहेत व तृत्सू हे कदाचित भरतराजांच्या कुळांत उत्पन्न झालेले असण्याचा संभव आहे. ऋग्वेदांत मध्यदेशस्थ सरस्वती, आपया व दृषद्वती नद्यांवरील पवित्र भूमींतील दोन भरत राजांचें वर्णन आहे. ( ३.२३,४ ) यांत देवश्रवस व देववात ह्या

दोन भरत राजांचा उल्लेख आहे. महाभारत, ३.६,७५ त सरस्वतीच्या कौशिकी नामक पोटनदीचें नांव दिलें आहे व कुशिक हें विश्वामित्राच्या कुळाचें नांव आहे व भरत व विश्वामित्र यांचा तिशीं संबंध होता. ह्यांत संशय नाहीं. दिवोदासाचा संबंध भरद्वाज कुळाशीं आहे व त्याचा मुलगा सुदास अथवा त्याचा नातू पिजवन ह्याचा संबंध वशिष्ठ व विश्वामित्र ह्या दोन कुळांशीं आहे.

पुढील सारस्वतांत भरत हे फार नांवारूपास चढले. शतपथ ब्राह्मणांत (१३. ५,४ ) भरत दौःषती व भरत शतानीक सात्राजित अश्वमेधकर्त्या राजाचें वर्णन आहे. ऐतरेय ब्राह्मणांत ( ८.२३ व २१ ) भरत दौःषतीला दीर्घतम मामटेय ह्याचे हातून राज्याभिषेक झाला व शतानिकाला सोनवाजरजायनाच्या हातून राज्याभिषेक झाला. भरत राजांनीं काशी कुळांतील लोकांवर जय मिळविले व गंगा व यमुना नद्यांवर यज्ञ केले—असें शतपथ ब्राह्मणांत ( १३.५,४,११,२१ ) दिलें आहे. यावरून भरत कोठें रहात होते हें निखालस ठरतें. आणखीं, प्रजांस पाठविलेल्या राजांच्या जाहिरनाम्यांतील निरनिराळ्या प्रकारांत पुढील कुळांची नोंद आहे ( तै. सं. १.८,१०,२ व तै. ब्रा. १.७,४,२—यांत—एषवो भरता, राजा, वा. सं. कण्व, ११.३,३,६,३ यांत—कुरवः पांचालाः (उघड संयुक्त लोक) आपस्तंब, १८.१२,२० यांत—भरताः, कुरवः, पांचालाः, कुरुपांचालाः व जनताः—याप्रमाणें ज्या लोकांचा राजा असेल, त्याप्रमाणें वैकल्पिक प्रयोगपाठ आहेत; काठक सं., १५.७ व मैत्रायणी संहिता, २,६,७ यावरून त्यांत पुढील लोकांचा समावेश झालेला दिसतोः—( १ ) कुरवः, ( २ ) पांचालाः, ( ३ ) कुरुपांचालाः; व४ भरताः; व महाभारतांत कुरू हे भरतकुलोत्पन्न होते असें सुस्पष्ट दिलें आहे. तेव्हां ब्राह्मणकाळांत भरत हे कुरुपांचालांत मिलाफ पावत होते असें ठरतें, कारण शत. ब्रा. [ १३.५,४ ] कुरुराजा जन्मेजय व भरत राजे असें नुसतें म्हटलें आहे पण ते ज्या लोकांवर राज्य करीत होते त्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत.

पंचविंश ब्राम्हण ( १४.३,१३;१५-५,२४ व १८-१०,८ ), ऐतरेय ब्राम्हण [ २-२५;३-१८ यांत ८-१४ तील यादीप्रमाणें मानवधर्मशास्त्रांत अथवा बौद्ध ग्रंथांत भरतांचें नांव आढळत नाहीं. कारण भरत हें मोठें कुळ राहिलें नव्हतें तर तें एक लहान कुटुंब राहिलें होतें ]. शतपथ ब्राम्हण [ ५-४,४,१ ] व तैतिरीय आरण्यक [ १-२७,२ ] यांमध्यें भरतांच्या संस्कारपद्धतीचा उल्लेख वारंवार आला आहे. ऋग्वेदांत (२-७,१-५,४; २५,४; ५-१६, १९; तै. सं., २-९, १; श. ब्रा. १-४, २; २ ) भरतांपैकीं अग्नि भरतांचा नामनिर्देश आहे. आप्री सूक्तांत ( ऋ. १-२२, १०; १४२, ९; १८८,८; २-१; २-३-८; ३.४,८ इत्यादी ) भारती नांवाच्या देवीचें नांव दिलें आहे. ही देवी भरतकुल देवता दिसते. ह्यासूक्तांत तिचें नांव सरस्वती बरोबर येतें, त्याअर्थीं भरतांचा ऋग्वेदोक्त सरस्वतीशीं संबंध कायम दिसतो. आणखीं, शतपथ ब्राह्मणांत [ १-४, २, २ ) अग्नीला ब्राह्मण भारत म्हणजे भरतांचा अध्वर्यू म्हणून संबोधिलें आहे.

व त्यास मनुषवत्, भरतवत् ऋ ज मनूप्रमाणें, भरताप्रमाणें हविर्भाग चट्ट करण्याविषयीं प्रार्थना केली आहे. [ १–५–१–७ ]

एकदोन वाक्यांत सुदास अथवा दिवोदास व दुसऱ्यापक्षीं पुरुकुत्स अथवा त्रसदस्यू हे एकमेकाशीं स्नेहांकित झालेले दिसतात. यावरून भरत व कुरू यांचा संयोग कुरूशीं झालेला दिसतो.

ऋग्वेदाच्या पांचव्या मंडळांत [ ५-५४,१४ ] एका भरताचा उल्लेख आहे. पण तो कोण होता हें कळण्यास मार्ग नाहीं.

वैदिक सारस्वतांत या जमाती एवढी महत्वाची दुसरी एकही जमात नाहीं. ह्या जमातीस जें महत्व आलें आहे, तें यांतील दिवोदास, सुदास विश्वामित्र वगैरे विभूतींच्या पराक्रमांनीं आलें आहे. आपल्या या मायभूमींत भारतीय युद्ध झालें म्हणून जी प्रसिद्धी आहे, त्या प्रसिद्धीस या कुळांतीलच कौरव व पांडव हे कारण झाले. ह्या भरत लोकांवरूनच ह्या आपल्या देशास भारतवर्ष किंवा भरतखंड हें नांव पडलें आहे. म्हणूनच युधिष्ठिरास भरतर्षभ ह्या पदवीनें अनेक ठिकाणीं संबोधिलें आहे असें आढळतें. पुराणांत पुरू, कुरू व भरत हे एकवंशी होते म्हणून वर्णन आहे, पण भरतांचा उल्लेख ऋग्वेदाच्या तिसऱ्या, सहाव्या व सातव्या मण्डळांत आला आहे. ह्या जमातीचें पहिले पुरोहित भरद्वाज, दुसरे विश्वामित्र व तिसरे वशिष्ठ झाले. हे दिवोदास, सुदास प्रमुख भरत गान्धार देशाकडून यमुनेकडे आले आहेत. तेव्हां आपल्या या पितृदेशास भारत हें नांव देणारा भरत दुष्यंतपुत्र भरताच्या पूर्वीं होऊन गेलाला दिसतो; कारण, ह्या देशास हें नांव ह्या दौष्यन्ती भरताचे कुरुक्षेत्रांत यज्ञयाग होऊन त्याची प्रसिद्धी होण्या-पूर्वींच मिळालेलें आहे.

१ दिवोदासः—ह्यानें इंद्राच्या कृपेनें शंबरदासाचीं ९९ नगरें उध्वस्त करून त्यांतील लुटलेल्या द्रव्यापैकीं कांहीं आपले पुरोहित भरद्वाजास दिलें. त्यानें यदू व तुर्वश ह्याचा पराजय केला. त्यानें पर्णय व करंज यांचा पराभव करून त्यांस ठार मारिलें ( १.५३.८ ). ह्यानें गुंगू लोकांचा पराजय केला ( १०.४८,८ ). ह्यानें पणी ( फिनिशन–वणिग्जन ) पारावत व बृसय यांचा पराभव केला. पण ह्यास एक बलाढ्य शत्रू तुर्वयाण म्हणून होता. हा तुर्वयाण पक्थांचा राजा होता. दिवोदास यानें कुत्स व अयू यांशीं संगनमत करून तुर्वयाणाशीं लढण्यास सुरवात केली तरी त्या दिवोदासाच्या संग्रांतिल त्रयींचा पराभव त्या तुर्वयाणानें केला ( ६.१८,१३;८.५२,२;२.५३,१० )

२ सुदासः—हा दिवोदासाचा मुलगा. यानें दिग्विजय केला. त्यास नांव दाशराज्ञ युद्ध म्हणून आहे. या युद्धांत ह्यानें पुढील व्यक्ती किंवा जमाती यांचा पराभव केलाः—१ शिम्यू, २ यदू, ३ तुर्वश, ४ अनू, ५ द्रुह्यु, ६ मत्स्य, ७ पक्थ, ८ भलानस, ९ अलीन, १० विषाणिन्, ११ अज, १२ शिव, १३ शिग्रू १४ यक्षू, १५ भेद, १६ वैकर्ण, १७ कवष, १८ मन्यू वगैरे ( ऋ. ७.१८ ). ह्यानें अश्वमेघ यज्ञ केला. तेव्हां घोडा सोडून दिग्विजयास प्रारंभ केला व विपाट

व शुतुद्री या नद्यांच्या संगमावर गेला असतां त्यास विश्वामित्रानें त्या नद्यांची प्रार्थना करून त्यांपार नेऊन सोडिलें ( ३.५३.९ ) व त्याजकडून विश्वामित्रानें कीकटांचें धन हरण करविलें; कारण ते इन्द्राला पायस अर्पण करणारे नव्हते. पुढें पुरोहिताचें काम, त्याचेकडचें वशिष्ठाकडे गेलेलें दिसतें. वशिष्ठ पुरोहित झाल्यावर विश्वामित्रानें त्याची निंदा केली आहे, पण वशिष्ठ पुरोहित झाल्याबरोबर दिवोदास सदाविजयी झाला व त्यानें आपले भरत घेऊन विपाट, शुतुद्री, सिंधू, परुष्णी वगैरे नद्यांपार यमुनेवर जाऊन थडकला ! फार तर काय सांगावें पण त्याच्या पित्याचा पराभव करणारे तुर्वयाण पठाण व तुर्वश तुराणी यांसही त्यानें जिंकलें ! मग ते कितीही चपळ घोडेस्वार असोत. [प्रलयकालच्या सुमारास]

३५ भलानसः–(अनेक वचनी)–पक्थ, भलानस, अलिन, विषणी, व शिव ह्या पांच कुळांतील लोक दाशराजज्ञांच्या (दहा राजांच्या लगटीच्या ) लढाईत सुदासाच्या शत्रूच्या पक्षास मिळालेले होते. यांतील एका जमातीचें भलानस हें नांव त्यांच्या जवळच्या बोलन घाटावरून पडलें होतें. यावरून ही जमात पूर्वकाबुलांत राहणारी ठरते. ही जमात अवैदिक असावी असें श्रीयुत दाते यांचें मत आहे.

३६ मगधः–हें एका जमातीचें नांव आहे. वैदिक सारस्वतांत ह्या जमातीस फारसें महत्व दिलेलें आहे–असें आढळत नाहीं. त्यांचें नांव प्रत्यक्ष ऋग्वेदांत आलें नाहीं. पण त्यांचें नांव अथर्ववेदांत (५-२२,१४) आढळतें. त्यांत ताप ( ज्वर ) गंधारी व मूजवंत, हे उत्तरेचे लोक व अंग व मगध हे पूर्वेकडील लोक या लोकांकडे जावो अशी प्रार्थना आहे. आणखीं यजुर्वेदांतील ( वाज.संहिता, ३०-५,२२; तै. आ., ३-४,१,१ ) पुरुष मेधांतल्या बळींच्या यादींत मागध म्हणजे मगधांतील पुरुषाच्या बळीचा अंतर्भाव केलेला आहे, व तो अतिक्रुष्टास ( मोठा आवाज ? ) अर्पिलेला आहे, व अथर्ववेदाच्या व्रात्यसूक्तांत [ १५-२११-४ ] मगध लोकांचा व्रात्याशीं संबंध दाखविला आहे. तो असा कीं ते त्याचे चोहोंकडील मित्र, मंत्र, हास्य व मोठा आवाज यांत एक रूप आहेत, श्रौत सूक्तांत ( लाट्या. श्रौत सूत्र, ८-६, २८ ) कात्यायन श्रौत सूत्र, २२-४,२२; सायन, पंचविंश ब्राह्मण–२७-१, १६,१५ व्रात्यांस आर्यब्राह्मणांत घेत तेव्हां व्रात्यांची लक्षणें मगधांत राहाणाऱ्या बाईट ब्राह्मणाला दिलीं आहेत. तीं अशीं–ब्रह्मबंधू, मागध देशीय, पण हा मुद्दा पंचविंश ब्राह्मणांत ( २७-१, १६ ) नाहीं. उलटपक्षीं, सन्मान्य ब्राह्मण मगधांत कधीं कधीं राहत असत, कारण कौशीतकी आरण्यकांत ( ७-१३ ) मगधवासी मध्यम व प्रातीबोधीपुत्र यांचा उल्लेख आहे. पण ही गोष्ट त्यांच्या पूर्वीच्या ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेली नाहीं तेव्हां हा विशेष प्रकार दिसतो.

मगध लोकांचें वर्णन बौद्धायन धर्मसूत्र, ( १-२,१३ ) १ बौद्धायन श्रौत सूत्र, ( २०-१३ ); आपस्तंब व श्रौत सूत्र, (२२-६,१८ ); हिरण्यकेशी* श्रौत

* संस्कृत ऱ्हस्व इकारान्त व ऱ्हस्व उकारान्त शब्द आम्ही मराठींत सरसकटदीर्घ लिहिणाऱ्या पक्षाचे आहों हें ध्यानांत धरा.

सूत्र, ( १७-६ ); ऐतरेय आरण्यक, ( २-१,१ ) आलेलें आहे, तेव्हां हे लोक तत्कालीन ठरतात. मनू ( १०-११ ); गौतम धर्म सूत्र, ( ४-१७ ); प्रमाणें मगध ही मिश्र जात असेल, पण वैश्य पुरुषाचें लग्न क्षत्रिय स्त्रीशीं होऊन सगळी मगध जमात उत्पन्न झाली असें म्हणतात, तें आम्हांस बिलकुल मान्य नाहीं. ही गोष्ट खरी आहे कीं मागध हे अगदीं अर्वाचीन काळापर्यंत भाटांचा धंदा करीत असत व फिरते भाट लांब लांब पश्चिम देशापर्यंत जात असत तेव्हां मगध देश हें भाटपणाचें उगमस्थान ठरतें.

कीकट व मगध यांनीं ब्राह्मणत्व स्वीकारिलें नव्हतें, म्हणून त्या जमातीविषयीं ऋग्वेदाच्या कालापासून आर्यलोकांस तिटकारा वाटत असण्याचा फार संभव आहे, व त्याप्रमाणें शतपथ ब्राह्मण ( १-४, १, १० ) याच्या लेखी पुराव्यावर-हुकूम कोसल व विदेह ह्या देशांतील लोक पुरें ब्राह्मणत्व पावले नव्हते. मग त्या पलीकडील मगध देशांतील लोक ब्राह्मणत्व कोठून पावणार ? मगधाविषयीं तिट-कारा उत्पन्न होण्यास आणखीं दोन कारणें उत्पन्न झालेलीं दिसतात. तीं हीं कीं ( १ ) मगध हे मूळचे तद्देशीय होते व ( २ ) त्यामध्यें बौद्ध धर्माची प्रथम उत्पत्ती झाली. एका पण्डिताचें असें म्हणणें आहे कीं कांहीं परदेशचे लोक पूर्वे-कडून समुद्रावरून ( ताम्रलिप्ती बंदरांतून पूर्व हिंदुस्थानांत येऊन भरले होते, त्यांशीं आर्य लोक मिसळले. पण ह्यास फारसा आधार नाहीं—असें कोणास वाटो, पण एवढें मात्र खचित कीं जितकें जितकें पूर्वेस जावें, तितकी तितकी तेथील मूळच्या लोकांवर आर्यत्वाची छाप कमी पडलेली दिसते व मनुष्याच्या जातीच्या शास्त्राप्रमाणें जसजसें पूर्वेस प्रयाण करावें तशीं तशीं आर्यांच्या चेहेरेपट्टीचीं माणसें कमी आढळतात. पण जिकडे तिकडे मिश्र जातींची रेलचेल आहे तर उडदामाजीं काळें गोरें काय निवडावें निवडणारें. पण एक पण्डित निखालस असें म्हणतो कीं हिंदुस्थानांतील पांढऱ्या लोकांत काळ्या व तांबड्या लोकांची मिसळ झाल्यानें त्यांच्या उन्नतीस बाधा बिलकुल झाली नाहीं, पण त्यांत ह्या पूर्वेकडील पिवळ्या ( मोंगल ) लोकांची मिळस होऊं लागल्याबरोबर त्यांच्या उन्नतीचा भरीवपणा पोकळ होत चालला !

( विश्वभारती जानेवारी १९२४ ) जेनिसिस ऑफ बेंगालीज.

३७ मत्स्यः—मत्स्य म्हणजे मासा. माशाचें नांव ऋग्वेदांत एके ठिकाणीं ( १०.६८,८ ) व पुढें अनेक ठिकाणीं आलें आहे ( अ. १०.२,२५; मैत्राणी संहिता, ३.९,५;१४.२; वाज. सं०, २४.२१,३४; तै० सं०, २.६,६,१,१; शत० ब्रा०, १.८,१,१ ( प्रलयांतील प्रसिद्ध मत्स्य. ह्या वेळेला जे लोक हिंदु-स्थानांत शिरले, त्यांस मत्स्य हें नांव पडलें किंवा मत्स्य हें हिंदूंचें मोठें आवडतें खाद्य नाहीं पण जे लोक त्यांवर ताव मारीत, त्यांस मत्स्य हें नांव पडलें असें दिसतें);छां. उ., १.४,३; कौ०उ०,१.२; बृ.उ.,४.३,१८;शत०ब्रा०, १३.४, ३,१२; आश्व. श्रौ० सू०,१०.७,८; शां. श्रौ. सू., १६.२,२३ ). ऋग्वेदाच्या एका वाक्यांत ( ७.१८,६ ) मत्स्य हें एका कुळाचें नांव म्हणून आलें

आहे. हे सुदासाच्या शत्रूंचे सहाय्यसंकेती होते. अश्वमेध करणाऱ्या लोकांच्या यादींत ( शत. ब्रा., १३-५,४,९ ) ध्वसन् द्वैतवन हें मत्स्यराजाचें नांव आलें आहे. मत्स्य हें लोकांचें नांव कौ० उपनिषदांत ( ४.१ ) वश लोकांबरोबर व गोपथ ब्रा. त ( १.२,९ ) शाल्वांबरोबर आलेलें आढळतें. मनूप्रमाणें (२.१९; ७.१९३ ) ब्रह्मर्षी-देशांत-कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल व शूरसेनक हे प्रांत मोडतात. मत्स्यलोक भारतकालाप्रमाणें अलवार, जैपूर, व भरतपूर येथें रहात होते.

३८ मद्रः—हें एका लोकांचें नांव आहे. त्यांचा उल्लेख बृहदारण्य उपनिषद ( ३-३,१;७.१ ) यांत आला आहे. त्या लोकांमध्यें काप्य पतंचल रहात होता. त्याचें नांव वैदिक सारस्वतांत-फक्त उत्तर मद्र शाखेंत-आढळतें. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें ( ८-१४,३ ) हे उत्तरमद्र हिमालयापलीकडे [ परेण हिमवंतम् ] उत्तरकुरूंजवळ राहत होते. उपनिषदोक्त मद्र हे कुरूंप्रमाणें मध्यदेशांत कुरुक्षेत्रांमध्यें राहत होते.

३९ महावृषः– हें एका जमातीचें नांव आहे. हिचें नांव अथर्ववेदांत ( २-२२,४-५-८ ) मूजावंत नांवाच्या जमातीबरोबर आलें आहे. ह्या स्थळीं ज्वरानें जावें अशी त्यांत प्रार्थना आहे, त्या अर्थी ते लोक उत्तरेकडील राहणारे होते व ज्वर न लागण्यासारिखे ते सशक्त होते असें महावृष ह्या शब्दावरून दिसतें. छांदोग्य उपनिषदांत(४-२,५) रैक्वपर्ण हें महावृष देशांत होतें असें म्हटलें आहे. जैमिनीय उपनिषद ब्राम्हणांत( ३-४०,२ ) हृत्स्वाशय हा महावृषांचा राजा होता असें दिलें आहे. बौद्धायन श्रौत सूत्रांतील एका ग्रंथांत ( २-५ ) महावृष लोकांचें नांव आलें आहे. ह्यांची भाषा उत्तर कुरूंप्रमाणें चांगली होती.

४० मूतिब-मूबीपः– ऐतरेय ब्राम्हणांत हें एका जंगली जमातीचें नांव आहे. शांखायन श्रौत सूत्रांत ( १५-२६,६, ) मूबीप हें मूबीपाचें अन्यरूप आहे.

४१ मूजवंतः—हें एका लोकांचें नांव आहे. ह्यांचा उल्लेख, महावृष, गंधारी, व बाल्हिक ह्या लोकांच्या नांवाबरोबर अथर्ववेदांत [ ५-२२; ५, ७-८-१४; बौ. श्रौ. सूत्र, २, ५ ] करण्यांत आला आहे. हे लोक फार दूर राहत होते, व त्यांजकडे तापानें जावें अशी त्यांस प्रार्थना आहे. यावरून ते लोक ताप न येण्यासारिखे बळकट होते असें दिसतें. या प्रमाणेंच यजुर्वेद संहितेंत ( तै. सं. १-८, ६, २; काठ. सं., ९-७; ३६-१४, मै. सं., १-४, १०-२०; वा. सं., २-६१ श. ब्रा., २-६, २, १७ ) या दूरच्या लोकांकडे रुद्रानें आपलें धनुष्य घेऊन जावें अशी प्रार्थना आहे. ऋग्वेदांत ( १०-३४, ११ ) सोमास मौजवत म्हणजे मूजवत लोकांकडून येणारा किंवा यास्काप्रमाणें ( नि., ९-८ ) मूजवंत पर्वतापासून येणारा असें वर्णन आहे. महीधर [ वा. सं ], सायन ऋ. १-१६१, ८. व बौद्धायन श्रौ. सूत्र व प्रयोग यांप्रमाणें मूजवंत हें एका पर्वताचें नांव होतें व महाभारतांत तें हिमालयांतील एका पर्वताचें नांव आहे असें दिलें आहे. सोमवल्ली ही यज्ञाकरितां आर्यलोकांस लागे. ते ती त्या पर्वतावरील भिल्ल कोळ्यासारख्या डोंगरी लोकांपासून गाय देऊन विकत घेत असत. पण [ पुढील

आमचे हीनाहीन यागाचे भाग पहा ]. त्यावरून असें दिसून येईल कीं त्या गांवढळ लोकांपासून ते आर्य लोक सोम घेऊन त्यांच्या थोड्याशा चेष्टा करीत असत. हें ठीक नव्हतें. तैत्तिरीय संहितेच्या वेळीं हे आर्य उत्तरेस राहात असतां त्यांस ही वल्ली दुर्मिळ झाली होती, म्हणून ते तीबद्दल दुसरी कोणती वल्ली घ्यावी ह्याच्या विचारांत गुंतलेले आमच्या दक्षिणआर्यांप्रमाणेंच दिसतात. तेव्हां हे लोक उत्तर आर्यावर्त व दक्षिण आर्यावर्त यांच्यामध्यें कोठें तरी हिमालयासारख्या पहाडी मुलखांत तिबेट व हिंदुस्थानजवळ राहत असावे असें दिसतें; कारण, त्याप्रमाणें वैदिक सारस्वत वाचतांना एक दोन ठिकाणीं ती वल्ली स्वर्गातून आणिल्याचे उल्लेख आढळले आहेत. तें स्वर्ग कदाचित तिबेट [ त्रिविष्टप ] असूं शकेल.

४२ यक्षूः—हें नांव ऋग्वेदांतील एका सूक्तांत [ ७-१८,६,१९ ] एकदां एक वचनी व एकदां बहुवचनी आलें आहे. त्या सूक्तांत सुदासाच्या दहा राजांबरोबर झालेल्या लढाईचें वर्णन आहे. त्या लढाईतील यक्षू हे कोण होते व त्यांनीं कोणती कामगिरी बजाविली हें अनिश्चित आहे. ते त्या युद्धांतील [ १ ] परुष्णी येथें व [ २ ] यमुना येथें झालेल्या दोन लढायांत होते. त्यांच्या मदतीस अज व शिग्रू ह्या कुळांतील लोक होते व त्या सर्वांचा पुढारी भेद हा होता. यदू हें यक्षूचें पाठांतर समजावें. अज व शिग्रू हे आर्येतर होते. त्यांच्या जोडीला यदू गेल्यामुळें त्यांस हीनत्वदर्शक यक्षू हा शब्द लावण्यांत आला असेल.

४३ यदूः—हें एका कुळाचें व त्याच्या राजाचें नांव आहे. ह्या कुळाचा उल्लेख तुर्वश कुळाबरोबर ऋग्वेदांत [ १-३६,८;५४,६;१७४,९;४-३०,१७; ५-३१,८;६-४५,१;८-४,७;७,१८;९-१४,१०. ५;४५,२७;९-६१,२; १०. ४९,८; अनेक वचन, १.१०८,८ ] वारंवार करण्यांत आला आहे. ते सुदासाशीं झालेल्या लढाईत होते. यदू व तुर्वश या कुळांचे राजे प्राणास मुकले. ऋग्वेद [ १-१७४,९;४-३०,१७;५.३,८;६-२०-१२ ] यांच्या सरळ अर्थाप्रमाणें हा खुलासा आहे.

४४ रुशमः—हें नांव ऋग्वेदांत तीन ठिकाणीं [ ८.३,१३;४,२;५१,९ ] आलें आहे. हा इंद्राचा आश्रित होता. ऋग्वेदाच्या दुसऱ्या वाक्यांत [ ५.३०, १२–१५ ] ऋणंचय हा ह्या जमातीचा राजा होता. अथर्ववेदांत [२०-१२७,१] त्यांच्या कौरम राजाचा निर्देश आहे. श्रीयुत दाते म्हणतात कीं कोरम हें कौरव यांचें अपभ्रष्ट रूप असावें"–पा. ३९ पण त्यांनीं या विधानास २०-१२०,१ या ऋचेचा आधार दिला आहे.

४५ वंग—हें बंगाल प्रांताचें नांव होय. हें नांव जुन्या वैदिक सारस्वतांत आढळत नाहीं. ऐतरेय अरण्यकांत ( २-१, १; ) मगध–वंग–मत्स्याः–हा शब्द प्रयोग अथर्ववेद परिशिष्टांत ( १-७, ७ ); आला आहे, पण तो फार अर्वाचीन आहे. वंगावगधाः–हा शब्दप्रयोग आला आहे–यांत वंग हा शब्द आला आहे. त्यावरून सदरहू शब्दप्रयोग वंग–मागध नामक जवळच्या दोन जातींचा असावा

असें वाटतें व त्याप्रमाणें हें नांव बौद्धायन धर्म सूत्रांत ( १-१, १४ ) आलें आहे. तेव्हां वंगावगधाः—हा अपपाठ असावा.

४६ वराशिखः—हें नांव जमातीच्या एका पुढाऱ्याचें आहे. हें नांव जमातीचेंही आहे. ह्या जमातीचें नांव ऋग्वेदांत ( ६-२७, ४-५ ) आलें आहे. या जमातीचा पराजय अभ्यावर्ती चायमान ह्यानें केला.

४७ वशः—( अनेक वचन ) हें एका कुळाचें नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणांत ( ८-१४, ३ ) यांची वस्ती मध्यदेशांत कुरू, पांचाल व उशीनर या जमातींबरोबर होती असें दिलें आहे. कौषीतकी उपनिषदाप्रमाणें ( ४-१ ) त्यांचा संबंध मत्स्यांशीं दाखविला आहे. गोपथ ब्राह्मणांत वश व उशीनर ह्या जमाती संयुक्त होत्या असें दिलें आहे. वश व उशीनर हे दोन्ही शब्द वश(?)म्हणजे इच्छिणें ह्या धातूवरून साधले असल्यामुळें वश व उशीनर हे एका हाडामासाचे दिसतात.

४८ विदेहः—हें एका कुळाचें नांव आहे. ह्या कुळाचा उल्लेख ब्राह्मण काळाच्या पूर्वीं कधीं करण्यांत आलेला नाहीं. शतपथ ब्राह्मणांत ( १-४, १, १० ) विदेह माथव याची कथा आहे. तीवरून असें दिसतें कीं विदेहांत संस्कृती पश्चिमेकडून आली, व तिचा पगडा कोसलांत विदेहापूर्वीं पडला. पण विदेहाची ख्याती त्यांतील कर्मयोगी जनकाच्यामुळें झाली; कारण हा राजा बृहदारण्यक उपनिषदांत ३-८, २; ४. २, ६; शतपथ ब्राह्मण (११-३,१,२; ६-२,१;३-१; तैतिरीय ब्राम्हण, ३-१०,९,९) यांत ब्राम्हण धर्ममताचा एक मुख्य धुरस्कर्ता आहे असें आढळतें. कौशीतकी उपनिषदावरून ( ४-१ ) असें दिसतें कीं विदेह हें कुळ काशी कुळाशीं संयुक्त होतें. ऐतरेण ब्राम्हणांतील लोकांच्या यादींत [ ८-१४ ] विदेहाचें नांव आलें नाहीं, याचें कारण असें असेल कीं कोसल व काशी या लोकांबरोबर विदेहांचें नांव प्राच्य ह्या संज्ञेंत अंतर्भूत झालें होतें. आणखीं शांखायन श्रौतसूत्राप्रमाणें [ १६-२९,५ ] असें आहे कीं काशी कोसल व विदेह ह्या देशांचा जलजातुकर्ण हा एकच पुरोहित होता व याच ग्रंथाच्या दुसऱ्या एका वाक्याप्रमाणें [ १६-९,११,१३ ] विदेह राजा, परआटणार, कोसलराजा, हिरण्यनाभ यांच्या संबंधाचा खुलासा होतो. तो शतपथ ब्राह्मणाप्रमाणें [ १३-५,४,४ ] असा आहे कीं पर आटणार हिरण्यनाभाचा वंशज म्हणून कोसलाचा राजा होता.

पंचविंश ब्राह्मणांत [ २५-१०;१७ ] नमी साप्य नामक दुसऱ्या एका विदेह राजाचा उल्लेख आहे. यजुर्वेदाच्या संहितेंत ( तै. सं. २-१,४,५; का० सं. १४-५ ] विदेहांतील गाईचा उल्लेख आहे. बौद्धायन श्रौत सूत्रांत [२-५; २१-१३ ] ब्राह्मणासारख्या वाक्यांत विदेहाचा नामनिर्देश आला आहे.

कोसल व विदेह ह्यांची हद्द सदानीरा ही होती. तिचें हल्लींचें नांव गंडकी असें आहे [ इम्पेरियल ग्या० आफ इंडिया ]. ती नेपाळांत उगम पाऊन गंगेस पाटणा शहराच्या समोर मिळते. विदेह म्हणजे हल्लींचा तिऱ्हुत प्रांत होय.

४९ विदर्भः—जैमिनीय उपनिषद ब्राह्मणाप्रमाणें [ २-४४ ] विदर्भ हें

एका देशाचें [ वऱ्हाड ] नांव आहे. त्यांतिल मेचल नांवाचे कुत्रे वाघांस मारणारे असत.

५० विषाणीः—हें नांव ऋग्वेदांत एकदां [ ११-७; १९ ) आलें आहे. तें एका जमातीचें नांव आहे. त्या जमातीचा अंतर्भाव तृत्सूंच्या शत्रूंच्या यादींत होतो. ह्यांच्या नांवावरून ह्यांच्या शिरस्त्राणांवर शिंगें लाविलेली असावीं असें वाटतें. अलिन, भलाण, शिव व पक्थ—या जमातींप्रमाणें ही जमात वायव्य देशीय दिसते.

५१ वृचिवंतः—हें ऋग्वेदोक्त ( ६-२७,५ ) एका जमातीचें नांव आहे. त्या मंत्रांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं सृंजय राजा, देववात यानें तुर्वश व वृचीवंत ह्यास जिंकलें. तुर्वश वृचीवंत हीं सहाय्यसंकेती कुळें होतीं. पंचविंश ब्राह्मणांत [ २१-१२, २ ] असें कथानक आहे कीं जन्हू व वृचीवंत ह्यांमध्यें राज्याबद्दल लढा उत्पन्न झाला. तेव्हां विश्वमित्रास एक संस्कार जास्त माहित असल्यामुळें (!) जन्हुराजा विजयशाली झाला.

५२ वैकर्णः—हें नांव एकदां ऋग्वेदांत ( ७-१८-११ ) दशराजज्ञांच्या अथवा दहाराजांच्या युद्धांत आलें आहे. त्यांत सुदासानें वैकर्णांच्या दोन शाखांपैकीं एकवीस जमातीचा पराभव केला. असें वर्णन आहे. हे कुरु-क्रिवी लोक होत. महाभारतांत [ ६-२१-५ ] ह्या विकर्णांचें नांव आलेलें आहे.

५३ शफालः— हे ऋतुपर्णाच्या राज्याचें नांव होय. ह्याचा नामनिर्देश [ २०-१२ ] बौद्धायन श्रौत सूत्रांत आला आहे.

५४ शबरः—हें एका जंगली जमातीचें नांव आहे. त्यांचें वर्णीकरण ऐतरेय ब्राह्मणांत दस्यू म्हणून आंध्र; पुलिंद, मुतिब व पुंड्र या जमातींबरोबर केलें आहे. [ ७-१८, २; शां. श्रौत सूत्र, १५-२६,६ ].

५५ शाल्वः—हें नांव एका लोकांचें आहे. तें गोपथ ब्राह्मणांत [ १-२,९ ] मत्स्याशीं जोडलेलें आहे.

५६ शिग्रूः—हें नांव एका जमातीचें आहे. ते ऋग्वेदांतील एका वाक्यांत [ ७ १८, १९ ] आलें आहे. शिग्रू, अज, व यक्षू यांचा पराजय तृत्सू व राजा सुदास यांनीं केला. त्यांचा पुढारी भेद होता. ह्याचें कुलचिन्ह शेवगा हें होतें. हे बहुधा अनार्य होते.

५७ शिबीः—हा उशीनराचा मुलगा. तो इंद्राचा आश्रित होता असें बौद्धायन श्रौत सूत्रांत ( २१,१८ ) दिलें आहे. त्यानें वार्षिष्ठीय नामक मैदानांत यज्ञ करून परचक्रापासून आपली सुटका करून घेतली.

५८ शिम्यूः— हें कांहीं लोकांचें किंवा त्यांचे राजाचें नांव आहे. तें ऋग्वेदांत ( ७-१८,५ ) आलें आहे त्या लोकांचा पराभव दाशराज्ञ युद्धांत सुदासानें केला. दुसऱ्या एका वाक्यांत ( १-१००,१८ ) त्यांचें नांव दस्यूंबरोबर आलें आहे. तेव्हां ही जमात आर्येतर दिसते.

५९ शिवः—हें एका लोकांचें नांव आहे. हें ऋग्वेदांत एकदां ( ७-१८,७ ) आलें आहे. सुदास यानें शिव, अलीन पक्थ, भलानस, व विष्णी यांचा पराभव केला. ही जमात सिंधू व असिक्नी या नद्यांमध्यें अलक्षचंद्राचे ( अलेक्झांडर ) वेळीं रहात होती. पाणिनींत शिवपूर नांवाच्या उत्तरेकडील एका खेड्याचा उल्लेख आला आहे. त्यावरून ह्यांच्या राहण्याच्या जागेची दिशा कदाचित कोणास ताडितां येईल.

६० शिष्टः—हें एका अप्रसिद्ध कुळाचें नांव आहे. तें ऋग्वेदाच्या वालिखल्य सूक्तांत [ ८-५३, ४ ) आलें आहे.

६१ शूरसेनकः—ह्या जमातीचें राहण्याचें ठिकाण ब्रह्मर्षी देशांत होतें. तो देश सरस्वती व दृषद्वती ह्या नद्यांमध्यें होता. त्यांत कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल शूरसेनक व ब्रह्मावर्त ह्या पांच देशांचा समावेश होत होता.

६२ शिक्तः—हें एका जमातीचें नांव आहे. तें शतपथ ब्राम्हणांत ( १२-८ ३, ७, व १३-५, ४, १५ ] दोनदां त्यांचा राजा ऋषभ याज्ञतुर याच्या संबंधानें आलें आहे.

६३ सत्वंतः—हें एका लोकांचें नांव आहे. हे ऐतरेय ब्राम्हणांत ( ८-१४; ३ ] दक्षिणदेशी काठेवाडांत राहाणारे होते म्हणून वर्णन आहे. शतपथ ब्राम्हणांत ( १३-५, ४, २१ ] भरतानें ह्या सत्वंतांचा पराभव करून त्याचा अश्वमेधार्थ तयार केलेला अश्व हिरावून नेला असें दिलें आहे. हे अहिरांसारखे लोक दिसतात.

६४ सत्यः—हें एका लोकांचें नांव शतपथ ब्राम्हणांत एका वाक्यामध्यें ( १०-४, १, १० ) आलें आहे. हे कुरुपांचालांचे संबंधी होते. हे यमुनातीरीं विजयी झाले.

६५ सृंजयः—हें ऋग्वेदोक्त एका जमातीचें नांव आहे. देवरात नांवाच्या पूर्वोक्त राजानें तुर्वश व वृचीवंत ह्यांजवर जय मिळविला [ ऋ. ६-२७, ७ ) व यानें एक यज्ञ केला ( ऋ. ४; १५, ४ ) ह्यांचा साहदेव्य सोमक दुसरा राजा होता. ( ऋ. ४-१५-७ ). ह्यास व ह्याचा बाप सहदेव सारंजय यास पर्वत व नारद यांनीं राज्याभिषेक केला ( ऐ. ब्रा. ७-३४, ९ ). ह्यांचा राजा प्रस्तोक व दिवोदास यांची ऋग्वेदांत ( ६-४७, १२, २५ ) दानस्तुती केली आहे. सृंजय व तूत्सू हे स्नेही होते व तुर्वश हे त्यांचे शत्रू होते. याप्रमाणेंच देवभाग श्रौतर्ष हा कुरू व सृंजय यांचा एकच पुरोहित होता.

स्पर्शुः—बौद्धायन श्रौत सूत्राप्रमाणें ( २१-१३ ) हें पश्चिम दिशेकडील एका जमातीचें नांव होतें.

टीपः—या प्रमाणें, दक्षिणेपेक्षां उत्तरेकडून व पूर्वेपेक्षां पश्चिमेकडून पण सामान्यतः चाऱ्ही दिशांनीं ह्या गोंड, गौड जंबुद्वीकल्प किंवा दक्षिण आर्यावर्त म्हटलेल्या देशांत नवीन खुष्कीच्या मार्गानें पांढरे तांबडे, पिवळे

काळे व फिंके लोक जलप्रलयानंतर समुद्राच्या एकावर एक येणाऱ्या लाटांप्रमाणें मारे मारे करीत घुसले ! यांच्या एकंदर जमाती सदुसष्ट होत्या, ह्या इतक्या जमातींचीं मूलस्थानें निराळीं असतां, ह्यांची राहणीं निराळी असतां, ह्यांची संस्कृती निराळी असतां, ह्यांचा इतिहास निराळा असतां, त्यांत एकमेकांच्या दाबानें समान हितसंबंध उत्पन्न होऊन त्यांच्या लोकनियुक्त ग्रामसंस्थांत सरसहा चार वर्णांची स्थापना अर्थशास्त्रदृष्ट्या कशी झाली ! ह्याचा अभ्यास अंतर्मुख दृष्टीनें करणें मोठें हृदयस्पर्शी आहे.

[ १ ] भरभराटः—ह्या होळीच्या होळकरांसारख्या बेबंद सदुसष्ट जमाती नव्या गाळानें भरलेल्या दक्षिण आर्यावर्तांत पोटापाण्याच्या अडणीस्तव प्रलयानंतर म्हणजे सुमारें १०।१२ हजार वर्षांपूर्वीं घुसल्यावर त्या अर्यांच्या व आर्येतरांच्या मोठ्या अडचणीचे दिवस निघून गेले. त्यांनीं तोडलेल्या किंवा सिद्धाग्नीनें जाळलेल्या झाडांच्या खुंटांनीं किंवा सोटांनीं भरलेल्या ब्रम्हवर्ताच्या मैदानांची मोठी अफाट सुपीक सुंदर शेतें एका लेव्हलींत ( पातळींत ) तयार झालीं ! त्या शेतांतील खालून पाचेसारिखी हिरवीं व वरून सोन्यासारखीं पिवळीं गव्हांची वगैरे पिकें प्रत्येक वाऱ्याच्या झुळकी बरोबर समुद्राच्या एकावर एक लोटत येणाऱ्या लटांप्रमाणें खालवर होऊं लागलीं ! जणूं तीं आपल्या मालकांस आपल्यास काढून नेऊन आपआपल्या घरच्या बांबूंच्या कणग्यांत भराभर भरण्यासच सांगत आहेत ! तसें त्यांनीं केल्याबरोबर नद्यांच्या कांठच्या मेढेकोट करून राहिलेल्या त्यांच्या गवळी झोपड्यांच्या वाड्या खेड्यांचीं विटाकौलांनीं शाकारलेल्या एक मजली, दुमजली, तुटक किंवा जोड घरांचीं नगरें व शहरें झालीं ! त्यांतील धंदेवाले पारधी, लांकुडतोड्ये, गावोगांव यात्राजत्रा करीत फिरणारे वाणीउदमी व जागोजाग दळीं करून त्यांची नांगरणी व पेरणी करणारे गांवढळ उपरी मजूर लोक हे जन्मभर पुढील पिढीच्या जंगलोजंगलीं चाललेल्या सुधारणेचे जणू मराठ्यांच्या सैन्यांतील बिनीवाल्यांप्रमाणें म्होरक्ये होऊन बसले. त्या सुधारणेची असली पूर्वतयारी होत जाई तसे ते पुढें पुढें जाऊं लागले. हें सुधारणेचें काम पुरें होत गेलें, तसे हे लोक कमी होत गेले ! त्यांच्या जागीं त्या लोकांचे मुलगे, नातू, पणतू व खापरपणतू आले. ते विलक्षण त्वरेनें विकास व परिवर्तन पाऊं लागले. त्या आर्यप्रमुख पंचजनांत सद्गुणी व दुर्गुणी लोक, हिंमती व निर्दय लोक, झाडून सर्व बऱ्यावाईट लक्षणांचे लोक व अतोनात व्यक्तिस्वातंत्र्यानें उद्धवणाऱ्या व्यंगांनीं भरलेले लोक उत्पन्न झाले. त्यांच्या ठायीं स्वालंबनासक्ती व स्वार्थपरायणता अतुल वास करीत असल्यामुळें त्यांस आपल्या कर्तव्यापेक्षां स्वतः-च्या हक्कांची जाणीव जास्त होती व त्यांस आपल्या आंगच्या उणीवांची जाणीव बिलकुल नव्हती. त्या पिढीच्या भांडखोर लोकांच्या पाठीमागून उद्योगपरायण लोकांची पिढी आवतरली. त्यांतील शांत लोकांस यश मिळत चाललें तशी त्यांची संख्या वाढत चालली व या आर्यावर्ताच्या वसाहतीच्या हव्यासांत व अट्टहासांत त्यांच्या आत्मसंयमी पूर्वजांना ज्या तत्वज्ञानाकडे थोडें दुर्लक्ष्य करावें लागलें होतें,

त्या तत्वज्ञानाकडे ते इंद्रियनिग्रहपूर्वक पुन्हां वळले. म्हणजे त्यांचे पूर्वज कांहीं वेळ बहिर्मुख दृष्टीचे झाले होते, पण त्यांचे वंशज पुन्हां अंतर्मुख दृष्टीचे निपजूं लागले. त्यांत कर्मयोगी लोकांमध्यें ज्ञानयोगी लोक पुन्हां उद्भवूं लागले व त्यांची त्या योगमार्गांत प्रगती होत चालली, तशीं त्यांस पुढील ध्येयें व प्राप्तव्यें अधिक उर्णी स्पष्ट दिसूं लागलीं, व त्या ध्येयांस व प्राप्तव्यांस मूर्तस्वरूप देण्याची उत्कण्ठा परमावधीची उत्पन्न झाली असतां कर्मयोगी हे ज्ञानयोग्यांच्या लगामांत आपखुशीनें लागूं लागले; कारण तसें करितांना ॥ ज्ञानाविण जे जे कळा ॥ ते ते जाणावी अवकळा ॥ ह्या अर्वाचीन दासोक्तींतील ध्वन्यर्थ त्या प्राचीन काळीं त्यांच्या हृदयांतरीं मूर्तिमंत उभा राहिला होता.

ह्या सहकार्य करणाऱ्या आर्यप्रधान पंचजनांच्या प्रगतीस पुढील दोन गोष्टींनीं सहज सहाय्य केलें. १ त्या परिश्रम करणाऱ्या लोकांची दृढहिंमत व व्यवास्थितपणा व २ सुपीक सृष्टीच्या प्रसादानें मिळणारें अपरिमित फळ. येथील जमिन मळईची अत्यंत फळद्रुप होणारी व त्या जमिनीचे घटक योग्य रासायनिक द्रव्यांचे व येथील नियमित काळीं पडणारा पाऊस व सिंधू, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा, नर्मदा, तापी, गोदावरी, कृष्णा, कावेरी वगैरे भरपूर पाण्याच्या महा व लघू नद्या यांची शेतवाडीस पुरी पाणभरती व येथिल वाताच्या आवरणांतील उष्णता व आद्रता जशी पाहिजे तशी माफक म्हणून सदरहू आत्मसंयमी लोकांस त्यांच्या परिश्रमाचें फळ यथायोग्य मिळूं लागलें. तशी त्यात परंपरागत शिस्त व अखंड वहिवाट यांनीं सतत व व्यवस्थित काम करण्याचे कामीं अपूर्व उत्तेजन प्राप्त झालें व त्यांचें भांडवल व व्यवहार अपरिमित वाढलें; व सर्व लोकांचे गुण व कर्में यांच्या आधिक्याप्रमाणें प्रथम मुख्य दोन भाग पडले. १ मनाचे श्रम करणारे व २ शरीराचे श्रम करणारे. म्हणजे मनाचे श्रम करणारांनीं (अथवा कल्पकांनीं) एखादी योजना तयार करावी व तीस मूर्तस्वरूप शरीराच्या श्रम करणारांनीं (अथवा मजुरांनीं) द्यावें, व याप्रमाणें त्यांच्या सहकारित्वानें त्या वसाहतींत भांडवल–अधिकाधिक उभें राहत चाललें व योजकांनीं त्या मजुरांच्या जुटी, व्यवस्था व काटकसर यांतील करामतीच्या परिमाणाप्रमाणें त्यांस त्या भांडवलांतून नफा नांवाचा पुष्कळ मोबदला मिळूं लागला व त्यांच्या टोळ्यांतील अथवा श्रेणींतील मजुरांस त्यांच्या आंग मेहनतीबद्दल वेतन नांवाचा मोबदला मिळूं लागला. त्यांत कल्पक योजकांची संख्या मजुरांच्या संख्येपेक्षां साहजिक कमी होती तरी ते कल्पक योजक आपल्या बुद्धिवैभवानें व संपत्तिवैभवानें ढोरमेहनती मजुरांपेक्षां दिवसानुदिवस वरचढ व भारदस्त होत चालले व त्यांचे गुण व कर्में यांच्या परिमाणाप्रमाणें वैदिक व अवैस्तिक यांचे चार भाग किंवा चार वर्ण निर्माण झाले: १ ब्राम्हण, २ क्षत्रिय, ३ वैश्य व ४ शूद्र–यांतील ब्राम्हण हे शिकविणारे, क्षत्रिय हे रक्षण करणारे, वैश्य हे व्यापार करणारे व शूद्र हे मजुरी करणारे बनले–असें स्थूलतः म्हटल्यास चालेल. ह्यांत विशेष फायदा हा झाला कीं गुन्ह्यांची चौकशी होऊं

लागली, वेतनांचा दर ठरला, कामाच्या वेळा कायम झाल्या, व गरीब विधवा व पोरें ह्यांचें पालनपोषण होऊं लागलें हें तत्वतः खरें होतें, पण तें अक्षरशः खरें नव्हतें. म्हणून त्याचा बंदोबस्त करण्याकारितां प्रत्येक गावांत गांवपंचाईती ( ग्रामसंस्था ) उत्पन्न झाल्या. त्यांत पुढील अधिकारी होतेः १ पाटील २ कुळकर्णी ३ बारा नारूकारू अथवा बलुतेदार. ह्या ग्राम संस्थांचा बंदोबस्त करण्याकरितां त्या अनेकांवर मिळून एक राजा निवडावा लागला. तो आपलें लोकनियुक्ततेचें मूळ विसरून जुलूम करूं लागला ! म्हणून त्याच्या नियंत्रणास त्याच्या मदतीस प्रधान दिले. ते राजाप्रमाणेंच आपले निवडीचें मूळ विसरून राजाबरोबर जुलूम करूं लागले. वृषपर्वा आदिक आर्येतरां दानवांपक्षां इद्रादिक आर्यांमध्यें हा दुष्ट प्रकार जास्त जाचक झाला, व तेणेंकरून आर्येतरांच्या अथवा दानवांच्या राज्यापेक्षां आर्यांचीं अथवा देवांचीं राज्यें सुखासमाधानांत व स्थिरस्थावरतेंत कमी आढळून आलीं. तेव्हां देवगुरू बृहस्पतीनें आपला मुलगा कच यास दानवगुरू शुक्र याजकडे गुप्त पाहणीस पाठवून दानवांच्या राज्यांतील लोकनियुक्ततारूप संजीवनी विद्येचें रहस्योदक आणिलें व त्यानें तें देवांच्या राज्याच्या आम्राच्या कोईतील किड्यावर गारुड्याप्रमाणें सिंचन केल्याबरोबर त्यांतील किडा मरून गेला व त्यांच्या लोकनियंत्रित खालील गणपतींचा आम्रवृक्ष चोहोंकडे भरतखंडभर असा फोफावला कीं त्याची छाया, मोहोर व फळें यांचें अप्रतिम सुख येथील प्रजासत्ताक ग्रामवृंदांनीं अनेक युगें अप्रतिहत भोगिलें ! पण हाय ! हाय ! त्या आमच्या आम्रवृक्षाचीं पाळेंमुळें हल्लीं आमचे हितशत्रू आमचे हातपाय बांधून आमच्या समक्ष तोडीत आहेत ! कारण हा अमृतसंजीवनी वृक्ष नदीनाल्यांतील दर्भांच्या बेटांप्रमाणें पुन्हः पुन्हां येणाऱ्या पुरांत दाद न देणारा आहे असें त्यांस सुस्पष्ट आढळलें ! ह्यावरून पुढील अनुमानें निघतातः—

( १ ) सृष्टीच्या नियमांच्या प्रभावाच्या स्वाभाविक योगानें मनुष्यादिक प्राण्यांचीं व बीजपर्ण्यादिक ( फर्न ) वनस्पतींचीं स्थलांतरें व वसाहती व मनुष्याच्या उद्योगाचीं केंद्रें उद्भवतात.

( २ ) अर्वाचीन काळीं वर्णभेदानें दोन जातींमध्यें मिश्रणें ( संकर ) कमी होत असोत किंवा बंद पडलीं असोत तरी मुळांत मनुष्य एक वर्णाचा होता व त्यापासून आपणांस पुढें आढळणारे प्रकार हवापाण्याच्या भेदानें पुढें उद्भवले आहेत ( हॅमस्वर्थ हिस्टरी आफ धि वर्ल्ड व्हा. १ )

( ३ ) अमेरिकेंत वसाहत करण्यास गेलेल्या पांढरे लोकांचें रूप कांहीं दिवसांनीं अमेरिकेंतील परिस्थित्युनुरूप तेथील मूळच्या रेड इंडियनाप्रमाणें होत चाललें आहे असा प्रयोगसिद्ध अनुभव वरील ग्रंथांत ब्राईसच्या म्हणून सचित्र दिला आहे त्याप्रमाणें अन्नपाण्याच्या सुखसोईप्रमाणें भूमध्यवृत्तापासून पूर्वेस व पश्चिमेस, दक्षिणेस व उत्तरेस पसरलेल्या लोकांपैकीं पुढें झालेल्या अन्नपाण्याच्या नाशाप्रमाणें वसाहत देश अथवा उत्तर एशिया यांतून पितृदेश अथवा हिंदुस्थान

थांत परत आलेले आर्य येथील आर्येतर द्रविडांसारखे रूपानें दिसूं लागले आहेत ! याप्रमाणें जपानी भुइमुगाच्या शेंगा हल्लीं हळूहळू मराठी शेंगांप्रमाणें होऊं लागल्या आहेत.

( ४ ) वनस्पती व प्राणी यांस समघात उष्णता, निर्मळ जल व पौष्टिक अन्न मिळालें कीं त्यांची कोठेंही अमूप वाढ होते व ही सृष्टीच ह्या गोष्टींची तरतुद करीत असतां त्यांतील मनुष्यासारख्या प्राण्यांत त्यांतील नैसर्गिक बीजाप्रमाणें त्यांत ज्ञानकला विकास पावते; जसें, आपले हिंदुस्थानांतील पंजाबांत किंवा अमेरिकेंतील ओहिओंत रान रेडेपाडे आजारी झाले तर ते मीठ पोटांत जावें म्हणून तेथील लवणाद्रींतील खडक चोखतात व माणसें तदर्थ काडेचिराईत व कोयनेल घेतात किंवा हिंस्रपशूंपासून स्वसंरक्षण करण्यास डोंगरकपारीवर चढून त्यावरील धोंडे त्यांस मारितात किंवा त्यांच्या अंगावर लोटितात किंवा पोट भरण्याकरितां मीठ चोखण्यास आलेल्या रानरेडेपाड्यांस किंवा अन्नाच्या वासानें आलेल्या आस्वलांस दगड मारून ठार करितात व खातात.

( ५ ) ज्याचा अंत होत नाहीं अशी सद्वस्तू म्हटली म्हणजे जीवाणूंच्या विकसित परंपरेंतील मनानें अनुमित होणारा आत्मा होय, मग ती परंपरा सृष्टिनियमांनीं उद्भवणाऱ्या प्रलयांनीं मधून मधून खंडित होऊन कोठेंही स्थलांतर करून वसाहत करण्यास जावो.

---

# भाग नववा.

## लोकमताची स्थिति.

### १ राजन्य ( क्षत्रिय )

"The society was feudal so far as its political organization and social and religious institutions are concerned. The courts of the chieftans were models which shaped and determined social ranks.— The vicissitudes of Aryan civilization in India—*Mr. M. M. Kunthe.*

अर्थः—आर्यांची राजकीय व्यवस्था व त्यांच्या सामाजिक व धार्मिक संस्था यांचा विचार करितां त्यांचा समाज सरंजामी जहागिरी पद्धतीचा होता. त्यांचे जे राजेरजवाडे व अमीरउमराव असत, त्यांचीं दरबारें असत. तीं दरबारें ज्या नमुन्यांची असत, त्याप्रमाणें त्यांच्या समाजांत त्यांचा दर्जा ठरत असे.

मागील भागांत चार वर्णांच्या संस्थेचें वर्णन करण्यांत आलें. आतां या भागांत आर्यांच्या समाजाच्या स्थितीचें वर्णन कर्तव्य आहे.

दर्जाः—प्रत्येकाच्या इतमामाप्रमाणें त्याचा समाजांत दर्जा अधिकउणा होत असल्यामुळें प्रत्येक घरभारी गृहपतीला एक हाव असे. ती कोणती म्हणाल तर सांगणें कीं आपलें घरदार व आगरवाडी नीटनेटकी व सुंदर करावी. ( १-६६,

२, ४ ), आपल्या गोठ्यांत पुष्कळ गुरेंढोरें बाळगावीं ( शन्यू सूक्त ), आपलें अंतःपुर चांगलें टुमदार ठेवावें. [ ३-६२, ८, ५; व ७-२६, ३ ], आपले पदरीं चाकरनोकरांचा मोठा परिवार ठेवावा व आपले भोवतीं पुष्कळ अनुयायी जमवावे व यज्ञ करून अन्नदाते म्हणवून घ्यावें [ १-१७,४ ]–तो आपल्या कुटुंबाचा अधिपती असे. त्याचीं मुलेंबाळें व नातूपणतू त्यास मोठा आदरमान देत असत. [ १-१३०, १ ]–त्यास बोलावून आणल्याशिवाय व आणीपर्यंत त्यांपैकीं कोणीही अन्नग्रहण करीत नसत. तो जरूर पडल्यास आपल्या अनुयायांसह लढाई मारून आपले सामाजिक वैभव व योग्यता कायम ठेवण्यास सदा तयार असे. तो देवाजवळ नेहमीं तीन वर मागेः १ आरोग्य; शरीरत्राण; व ३ सुखायतन ( १–११४, ५ ). त्याचा जामानिमा लढवय्यांस योग्य असा असे. तो कमरेस तरवार किंवा बिचवा ठेवी. तो चिलखत घाली ( ५-५३, ४ व ५–५७, २). तो कण्ठभूषणें व भिकबाळ्या घालीत असे ( ५-५४,११ व १२२, १४ ). त्याला हाव जवानमर्द म्हणवून घेण्याची असे. योद्धा होणें हा तो, आपला धर्म समजत असे. कारण युद्धांत मेल्याबरोबर स्वर्गाची प्राप्ती होते असा त्याचा भरंवसा दृढमूल असे ( ८–१३,८ ). त्याच्या शिक्षणाची विशेष खबरदारी घेण्यांत येत असे. त्याकरितां लष्करी शाळा असत ( ४–४२,१ ) व त्यास धर्माचें शिक्षण देण्याच्या सोई असत [ १०–७१–ज्ञानसूक्त ]. प्रत्येक यज्ञाच्या वेळीं यज्ञासंबंधी मनोरंजक व तात्विक वाद होत असे. तेणेंकरून त्याचें मन सुसंस्कृत होऊन त्याच्या महत्वाकांक्षेस नवीन स्फूर्ती मिळत असे [ १–१६४, ३४ ]. त्याचीं मुलें त्याची आज्ञा पाळीत असत, व त्याचे जे मोठे बनण्याचे बेत असत, ते तडीस नेण्यास व त्याचा म्हणून व्यावहारिक सुखाचा जो वाटा असेल तो वाढविण्यास तीं त्यास झीज सोसून हातभार लावीत असत व तो देवाजवळ नेहमीं आपल्यास बलाख व निरोगी मुलें देण्याबद्दल प्रार्थना करीत असे [ १-९४,१५; १-८५,१२; १-१२,११; १-१८,११; १-६४; १४; १-८४, ६ ]. तो कधीं कधीं आपल्या वाड्याच्या दिवाणखान्यांत बसून न्यायमनसुबा करीत असे [ १०-१२४, ७ ]. त्याला अनेक बायका असत शौर्यशाली काळामध्यें सुंदर स्त्रियांचें चोज करण्याची वहिवाट सर्रास चालू असते, त्याप्रमाणें सणासुदीं त्यांचा मोठा बडेजाव चालत असे ( १ २८, ३ उलूखल ]. कांहीं कुमारिका तहाहयात अविवाहित राहत असत व कांहीं स्वयंवर करण्यास म्हणजे आपल्या नवऱ्याची स्वतः निवड करण्यास योग्य उमरीच्या झाल्या म्हणजे त्या पद्धतीचा विवाह करीत असत(१०-८५,२२). एखादा भिक्षुक त्याच्या धर्मादायावर निर्वाह करून असे. तो त्याच्या वाड्यांत अनेक वेळां राहत असे व तो त्याच्या नित्य व नैमितिक हव्यकव्याचें काम करीत असे. ( १-९४, ६–अध्वर्यू, होता, प्रशास्ता, पोता व पुरोहित. ) त्याच्या पदरीं एक गायक असे. तो वेदाचीं सूक्तें म्हणत असे. तीं सूक्तें कधीं कधीं जुनी रच-

लेलीं असत, किंवा नवी रचलेलीं असत. कुलस्त्रिया मोठ्या चैनीनें राहत असत. त्याच्याजवळील हत्ती व घोडे यांस शिकवून त्यांवर डोळ्यांत भरण्यासारख्या सुंदर झुली घालीत असत. [ १-८४, १७; ३-४१-९; ३-४२, १ ]. चैन अथवा सुख यास लागणारे जिन्नस तेथील कारागीर लोक करीत असत. ते जिन्नस करणारांस त्याचा व त्याच्या परिवाराच्या मोठा उदार आश्रय असे. त्या कारागिरांचें वर्णन पुढें एकत्र दिलें आहे. असलीं गृहपतींचीं अनेक कुटुंबें असत. त्यांच्या स्वतंत्र मालमिळकती व जमीन जुमले असत. तीं अनेक कुटुंबें मिळून एकजात किंवा जमात होत असे. त्या जाती किंवा जमाती आपल्या म्होरक्या सरदाराशीं सरंजामी करारमदारांच्या बंधनानीं कांहीं ठराविक काम काज करण्याबद्दल बांधलेल्या असत. पण ह्यापलीकडे त्या सरंजामी मालमत्तेची व कामाची पोटफाळणी केलेली नसे. पण ह्या झाडून सर्व सरदारांची उघड मोठी जूट असे. पण निरनिराळ्या जातीजमातीविरूद्ध आपली जूट कशी घट्ट कायम राखावी ह्याची जाणीव त्यांस सर्वोत्कृष्ट असे. म्हणून एकाच सूक्तांत अमुक अमुक आर्य अमुक दासांचे विरुद्ध असून त्यांचें अमुक अमुक पुढारी आहेत—असा निर्देश अनेक ठिकाणीं आढळतो. तेथील मजुरांना मजुरी मिळत असे [ १-११२,२४; १-७९, १ ] त्यांतील कोणी साहसप्रिय असला तर त्याच्या त्या गुणाची त्या जहागिरींत वहादारी होत असे [ १-१७,३१. ] म्हणून येथील मौल अथवा मूळचे लोक जिंकले जाऊन हीनबळ होत चालले तसतशी येथील आर्यांची सत्ता वर्धमान होत चालली असें उघड दिसतें, (१०-९,११,१२—पुरुषसूक्त).

---

## भाग दहावा.

## २ भट-भिक्षुक.

"Theoretically the priests commanded respect. The princes as well as influencial patriarchs who even possessed small towns listened to their request, gratified their desires and adopted their advice in the celebration of periodical sacrifices or domestic rites."—The vicissitudes of Aryan civilization in India.—*Mr. M. M. Kunthe.*

अर्थः—उपपत्तिदृष्ट्या, भटभिक्षुकांना येथे बहुमान मिळत असे. अगदीं लहान शहरांचे मालक असे राजेरजवाडे व वजनदार गृहपती त्यांच्या इच्छा ऐकून परिपूर्ण करीत असत व नियतकालिक यज्ञ अथवा गृह्य संस्कार करीत असतां त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागत असत.

मागील भागांत राजन्यांच्या समाजस्थितीचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत त्या वेळच्या भटभिक्षुकांच्या स्थितीचें वर्णन कर्तव्य आहे.

संबंधः—भटभिक्षुकांच्या बोलण्याचालण्यासंबंधें गृहपतीच्या कुटुंबांतील प्रत्येक इसम माठा आदरमान ठेवीत असे. जे भिक्षुक एखाद्या सरदारदरकदार याच्या वाड्यांत उपाध्ये म्हणून राहत असत, त्यांचा संबंध त्यांच्या गांवाशिवाच्या व्यवस्थेंत किंवा राज्यकारभाराच्या व्यवस्थेंत फारकरून नसे. त्यांच्या अधिकाराची मर्यादा तेथील धर्मकार्यापुरतीच, प्रामुख्येंकरून, असे. म्हणून त्यांचा तेथें दर्जा सेनानायक अथवा राजकार्यधुरंधरापेक्षां कमी असे. पण त्याची स्वतःची म्हणून कांहीं खाजगी मालमिळकत व जमीनजुमला असे. म्हणून तेही मोठ्या थाटानें रहात असत ( १-१२६ ). त्यांचे स्वतःचे आश्रित व अनुचर असत. त्यांचे यजमान राजे त्यांस अनेक वेळां सधन करीत असत. त्यांस ते शेकडों गाई व दास दान देत असत ( ५-३३,६,८,१० ). इतक्या गाईंचें लटांवर अथवा गौळवाडे व दासांचा लवाजमा बाळगून ठेवण्याची त्यांस ऐपत व सामर्थ्य असे. ह्या गौळवाड्यांवरून गोत्रांची व त्यांतील*पोळांवरून सगोत्रज शरीरसंबंध टाळण्याची वहिवाट उत्पन्न झाली. सदरहू उपाध्ये अनेकवेळां राजदरबारीं जात असत, त्यांचा प्रवेश राजांच्या अंतःपुरांत निरर्गल होत असे व त्यांचे स्तुतिपाठ भाटचारण करीत असत. कोणत्याही वजनदार गृहपतीचें गृहकार्य असल्या पुरोहितावांचून चालत नसे. प्रत्येक दिवशीं सकाळच्या व संध्याकाळच्या यज्ञ ( वैश्वदेवाच्या वेळीं देवांच्या आव्हानास व ठरलेल्या पद्धतीप्रमाणें त्यांतील हव्यवाहक अग्नीस समिधाहुती देण्यास त्यांची गरज लागत असे. त्यांवर असलें सोपविलेलें काम तडीस नेण्यासारिखें त्यांस शिक्षण मिळे ( १-११२,४—कक्षिवतास तीनदां करावयाच्या यज्ञाची माहिती देण्यांत येत असे. त्यांत उपदिष्ट शब्द विद्यार्थ्याप्रमाणें ऐका—हे महत्वाचे उल्लेख आहेत; १०-७१—ह्यांत शाळांची व्यवस्था, त्यांतील विद्यार्थ्यांच्या परीक्षा, व त्यांस मिळणारीं पारितोषिकें ह्यांचा स्पष्ट निर्देश आहे ). याशिवाय त्या उपाध्यायांस कांहीं विशेष धर्मसंबंधीं संस्कार करावे लागत असत व कांहीं विधी चालले असतां त्यांवर देखरेख करावी लागत असे. मुलग्यांस कुमारांची अवस्था प्राप्त झाली कीं त्यांस त्यांना चूडाकर्मांचा ( म्हणजे शेंडी राखण्याचा ) संस्कार करावा लागे ( ६—७५,१७ ). वधू आपल्या आईबापांस सोडून जाऊं लागली कीं ब्रह्मोपाध्ये तीस कांहीं विशेष प्रकारचें शिक्षण देत असत ( १०-८५,१५,२०—२८ ). गृह्यसूत्रांत जे सोळा संस्कार सांगि-

---

* ह्या गौळवाड्यांतील शास्त्रप्रयोगांवरून ऋषींनीं असें सिद्ध केलें कीं त्यांतील सपिण्डज व सगोत्रज पोळांचे शरीरसंबंध भिन्न पिण्डज व भिन्न गोत्रज शरीरसंबंधापेक्षां वंशाची ताकद व चिवटपणा कमी करणारे असतात. त्यावरून त्या अनुभवाची परिणती वरील वहिवाटींत उद्भवली हें खरें. पण इतक्या गुणांनीं त्या तत्वाची अमलबजावणी हल्लीं शास्त्राची केवळ थट्टा करण्याकरितांच अशी रूढ ठेविली आहे ! असें उघड दिसतें; मग त्या वहिवाटीवर त्या ऋषींच्या सर्वज्ञत्वाची खोळ केवढीही अभेद्य घातलेली असो ? कारण त्या तत्वांत हल्लीं राम कालगत्या बिलकुल राहिला नाहीं. आमचा सुप्रजा प्रजन प्रकाश पहा ).

तले आहेत, ते तेव्हां माहित नसावेत. पण जेव्हां चलाख मुलें देण्याबद्दल लोक वारंवार देवाच्या विनवण्या करीत असत तेव्हां पुंसवनाच्यावेळीं त्यांस त्या देवांस हविर्भाग देण्याचा संस्कार जरूर करावा लागत असे. नियत कालिक यज्ञाच्या वेळीं ऋक् संहितोक्त होता व पोता या याज्ञिकांची योजना करावी लागत असे. या यज्ञांत सोमरस काढून तो इन्द्र–अश्विन–प्रधान देवांस समर्पण करण्यांत येत असे. हे यज्ञ मोठ्या थाटमाटानें करण्यांत येत असत. याप्रमाणें पुष्कळ भटभिक्षुकाचा निर्वाह समाजांतील महाजन लोकांवर चाले [ १–३४,३–४;१–११२।४;१–६६४,३९ ] ते एका दरबारांतून दुसऱ्या दरबारीं व एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतीं प्रवास करीत असत. ते तेथील हव्यकव्यांत कधींकधीं काम करीत असत, पण ते अनेक वेळां आपल्या देवांचीं कथानकें तोंडपाठ म्हणत असत. या वेळीं सूक्तें तोंडपाठ म्हणण्याची वहिवाट इतकी वाढलेली होती कीं ती वहिवाट एका दिशेनें अगदीं सदोष अशी ठरविली आहेः– "सूक्त कितीही पवित्र असो, पण त्याचा अर्थ पाठकास समजत नसेल तर त्याचा उपयोग त्या भारवाहकास काय होय"–असे टोमणे यास्कादिकांनीं दिले आहेत तरी त्या कोरड्या पठणापासून फार फायदे झाले आहेतः–[ १ ] तात्कालिक व ( २ ) दूरकालिक. ह्या कथानकाच्या तोंडपाठ म्हणण्यानें श्रोते मण्डळीस मोठें कौतुक वाटे व अशा घड धारणेच्या भिक्षुकांचा चरितार्थ या सूक्तपठणावर चाले. पण या कथेकऱ्यांची संस्था अतीशय वाढली तेव्हां त्यांत बऱ्यावाईटाची निवडानिवड होऊं लागून सगळ्यांस सारखी दानदक्षिणेची बिदागी मिळेनाशी झाली [ १-१७,४;७-३३ ] तेव्हां त्यांनीं दानस्तुतिपर सूक्तें म्हणण्याचा पाठ ठेविला [ १-१८,६; ६-४७ ] तरी दात्याची वृथा स्तुती करणाऱ्या कथेकऱ्यांचा खरडपट्टी काढण्यांत येत असे [ १-१४७,७ ]-तेणेंकरून त्या भाटभटांची संख्या नियंत्रित होत असे व त्यांच्या हृदयस्पर्शी कथानकांचा उपयोग त्या काळच्या लोकांच्या शिक्षणांत मोठा स्फूर्तिदायक होत असे. हा ह्या पठणापासून तात्कालिक फायदा झाला. शिवाय भट पाठकांस पोपटपंची करणारे आहेत असें कोणी म्हणणारे निघतील तर खुशाल म्हणोत, किंवा मुद्रणकलेच्या उत्कर्षाच्या ह्या काळांत त्या लोकांस कोणी भारवाहक म्हणत असतील तर तसेंही खुशाल म्हणोत पण त्या बिचाऱ्या भटभिक्षुकांनीं यच्चयावत जगताच्या इतिहासांत स्मरणशक्तीच्या विकासाचें एक अद्भुत व चमत्कारिक शतकृत्य व पराक्रम करून ठेविला आहे. तो कोणता म्हणाल तर सांगणें कीं त्यांनीं ऋगादी चारी वेद तर काय पण त्यांचीं नऊ उपांगेंही त्या अनादि वैदिक काळापासून मुद्रित पुस्तकांत गोवलीं जातीं आपल्या जिव्हाग्रीं अशीं काळजीपूर्वक व दक्षतापूर्वक बाळगून ठेविलीं आहेत कीं कल्पें गेलीं, युगें गेलीं, मन्वंतरें झालीं धर्मांतरें झालीं, प्रालेयप्रलय व जलमय, अग्निप्रलय घडले तरी त्यांतील अनुकूळ किंवा प्रतिकूळ स्थितींत त्या मन्त्राचा कान्हा, मात्रा, ऱ्हस्व वेलांटी, दीर्घ वेलांटी, अनुस्वार व विसर्ग तर काय

पण अधःस्वर किंवा उच्चस्वर यत्किंचितही ढळूं न देतां त्यांतील धर्म व इतिहास यांचीं कथानकें त्यांनीं जशाचीं तशीं आमेरू लंकेपर्यंत तर काय पण त्रैलोक्यांतही अत्रुटित व अस्खलित जाऊन पोहोचविलीं आहेत ! अशी त्यांनीं त्या विश्वेश्वराची अप्रतिम सेवा केली आहे ! ह्या भटभिक्षुकांनीं सारस्वत व तत्वज्ञान हींही फार वृद्धिंगत केलीं. ते सभा भरीत, ते त्या सभेंत कांहीं विषयावर वादविवाद करीत व तरुण विद्यार्थ्यांस यजन चालविण्यास योग्य याज्ञिक झाल्याबद्दल दाखले देत. त्या दाखल्यांचा प्रकार अगदीं साधा असे. भटभिक्षुकाच्या सभेंत जे वृद्ध आचार्य व गुरू असत. ते उमेदवारांची उघड प्रशंसा करीत. जो उमेदवार या परीक्षेंत नापसंत ठरे त्यास नागरगड्या वर्गांत लोटीत ( १०-७१, ९, १०; ७-१०३, ५ ) त्यांची शिक्षणाची पद्धती कोणती होती ? म्हणून पुसाल तर सांगणें कीं हल्लींच्या संस्कृत पाठशाळातील वहिवाटीप्रमाणें गुरुजी तोंडी जे शब्द सांगत, ते त्यांचे विद्यार्थी तोंडीं शिकत. यज्ञ हें ऐहिक व पारमार्थिक लाभाचा उगम होय. असें कायम ठरून गेलें असल्यामुळें यज्ञकर्त्या ब्राह्मणांची चहा चोहोंकडे पुष्कळ असे ( १०-९०, ११, १२५–पुरुषसूक्त ).

---

## भाग अकरावा.

### ३ वैश्य व ४ शूद्र.

Men's tastes and trades are multifarious,
And so their ends and aims are various,
The smith seeks something cracked to mend,
The leech would fain have sick to tend,
The priest desires a devotee,
From whom he may extract his fee.
Each crsftman makes and vends his ware,
And hopes the rich man's gold to share.
My sire's a leech; and I a bard,
Corn grinds my mother, toiling hard.
All craving wealth, we each pursue,
By different means, the end in view,
Like people running after cows,
Which too far off have strayed to browse.
The draught horse seeks an easy yoke,
The merry dearly like a joke,
Of lovers youthful belles are fond,
And thirsty frogs desire a pond.–*(Dr. Muir. 9 112)*

अर्थ.—१ आम्ही निरनिराळीं मनुष्यें अहों, त्याप्रमाणें आमच्या कल्पना व बेत निरनिराळे आहेत. सुतार नीट करण्यास मोडकीतोडकी जिन्नस पाहतो,

त्याप्रमाणें वैद्य रोगी व भट दाता शोधितो. हे सोमा, इंद्राकारणें परिस्राव कर. २ सुक्या काटक्या, पक्षांचीं पिसें, धातू व विस्तव घेऊन कारागीर हे हिरण्यवान लोकांचा शोध करितात. हे सोमा इ० ३ मी कवी आहें. माझा बाप वैद्य आहे व माझी आई धान्य दळणारी आहे. निरनिराळ्या हेतूनें लाभ मिळविण्यास पाहत असतां गुरांमागें गुराखी जातात, त्याप्रमाणें आम्ही आमच्या निरनिराळ्या ध्येयांच्या मागें धाव घेत असतों. हें सोमा इ० ४ घोड्याला हलकी गाडी लागते; गुलहौसी लोकांस नकलाविनोद आवडतो; स्त्रियांस पुरुष आवडतात; व बेडकांना तलाव आवडतात. हे सोमाइ०

The classes next to the warriors and priests constituted the populace often called Janasus or the people, Krishi or the cultivators, the Vish or the working classes.–The vicissitudes of Aryan civilization in India–*Mr. M. M. Kunthe.*

अर्थ.—क्षत्रिय व ब्राम्हण यांपुढील वर्ग म्हटले म्हणजे सामान्य जनांचे होत. त्यांस वैश्य व शूद्र असें म्हणत असत.

Before they ( Mussalmans ) could spread their religion by the sword, they must have made the sword. The manufacture of swords indicates a great progress in civilzation.–*The same.*

अर्थः– मुसलमानांनीं आपले धर्माचा प्रसार तरवारीनें केला तर त्यापूर्वीं त्यांनीं तलवार केली असली पाहिजे. तलवार घडण्याची क्रिया ही सुधारणेची पुष्कळ प्रगती दाखविते.

मागील भागांत क्षत्रिय व ब्राह्मण ह्यांच्या स्थितीचें वर्णन झालें. आतां या भागांत वैश्य व शूद्र यांच्या स्थितीचें वर्णन कर्तव्य आहे. हें वर्णन मधमाशी-प्रमाणें निरनिराळ्या ठिकाणांतून कणकणशः आणून येथें जमा करावें लागलें आहे. कारण श्रुतींतील चतुर्वर्णभेदमूलक सूक्तावरून ब्राह्मण व क्षत्रिय या जातीं-प्रमाणें वैश्य व शूद्र यांच्या स्थितीचें वर्णन त्यांत कोठेंही सुस्पष्ट व तुटक आढळत नाहीं. पण प्रत्येक राष्ट्राचा जीव म्हटला म्हणजे वस्तुतः पाहतां ह्याच सामान्य जातींत राहतो. ह्या सामान्य जातींतील लोक जसे उत्पादक असतात, तसे महा-जनांच्या जातींतील लोक उत्पादक नसतात. ते परभृत व परोपजीवी असतात. ह्मणून या महाजनांच्या जातीचें वर्णन म्हणजे तो एखाद्या राष्ट्राचा खरा इतिहास नव्हे. कारण खरें राष्ट्र म्हटलें म्हणजे ते झोंपड्यांतील सामान्य वैश्यशूद्रांत राहतें, व त्याचें मूळ जमीन, उष्णता, हवा वगैरे पूर्वोक्त भौतिक शक्तींत असतें.

**सुधारणेंत प्रगतीः**—ऋग्वेदामध्यें आपल्यास,–धनुष्यें, बाण, वाशी, असी, परशू, स्वधिती, चिलखतें, रथ–[ १–१६२,२०;१०–७९,६;१०–८६,१८; ९–९६,६; १-१२७,३; ७–१०४,२१; १०–२८,८; १०-५३,९; ६-३,५; ६-४७,१०;८-९१,१९] वगैरे लढाईचीं हत्यारें, सुकृत भद्र वस्त्रें [५-२९,१५] उष्णिष ( पागोटें ) ( अ. वे. १५.२,१ ), सोन्याचीं नाणीं ( १-१२६,२,४ )

[ शंभर निष्क, दहा रथ, पाणीदार तांबुस घोडे, यांचें कक्षीवानास दान दिल्याचें वर्णन आहे ] व कंठे, वाळे, आंगाठ्या, कडीं वगैरे दागिने [ ५-५४,११;१–६४,४;१-१६६,१०;२-३४,२,३;७-५६,११–१३ ] यांचा जागोजाग उल्लेख आहे. यावरून आर्य श्रेष्ठत्व पावले तेव्हां त्यांची सुधारणेंत पुष्कळ प्रगती झालेली होती. तेव्हां वैश्य समुद्रावरून सफरी करीत असत व जमिनीवरून जागोजाग जाऊन उदीमव्यापार करीत असत. [ १-५६, २–प्रवासास निघण्याच्या वेळीं धाडसी, धनार्जनेच्छू लोकांची समुद्रावर गर्दी होते–असें दिलें आहे–श्रुतिबोध ). नद्यांच्या द्वारें आर्यावर्तभर दळणवळणाच्या उत्तम सोई होत्या व त्या सोईचा व्यापारी ( वणिकजन–फिनिशियन लोक–चांगला फायदा घेत असत. ( १-१४०, १२ ). उशिजाच्या कुळांतील दीर्घश्रवा नांवाच्या तृषित वाण्याचे व्यापाराचा उल्लेख [ १-११२, ११ ] त आहे. लढाई व शेती ह्यांच्या हत्यारांत तर काय पण नगरांच्या तटासही लोखंड वापरीत असत. तेव्हां लोहाराचा धंदा उत्तम चालत असला पाहिजे [ १–५८, ८;१-५६,३ ]. सुतारांना लाकडांच्या पुरवठ्याचा बिलकुल तुटवडा नसे, कारण आर्यावर्तामध्यें चोहोंकडे अनादिसिद्ध जंगलें होतीं [ १-१०५,८-मग काम करकरून पाठींत कळ आलेल्या सुताराप्रमाणें तो हळूहळू उठला ] [४–२, १४—चक्रकार रथ करितात ] [ १-६१४–ज्या मनुष्याला रथाची गरज असते, त्याचेकडे एखादा सुतार रथ करून पाठवितो ] [ १–४८,३,७—मुक्कामास राहिलेल्या गाड्या, शंभर रथ ]. सरकी पेरीत असत व लोकर तयार करीत असत. शौर्यशाली कालांतील स्त्रियांकरितां साळी लुगडीं विणीत असत [ १-१०५,८—ज्या प्रमाणें उंदीर कोष्टयाच्या मागांतील दोरे खाऊन टाकितात, त्याप्रमाणें मला चिंता खाऊन टाकीत आहे–श्रुतिबोध ). पांढऱ्या कपड्यांची फार चहादारी असे [ ३-३९,२ ]. चांगल्या तोलाच्या [ तरमाच्या—आमचें गलबतें—हें पुस्तक पहा]—नावा करण्यास पुष्कळ कसब लागतें. म्हणूनच अनेक वेळां समुद्रांत जाणाऱ्या व वल्हीं असलेल्या गलबतांचा उल्लेख ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आहे ( १-११६,३—हे अश्विन हो, जसा एखादा मृत मनुष्य हे ऐहिक वैभव सोडून निघून जातो, त्याप्रमाणें खरोखर त्या तुग्रानें भुज्यूला उदकाच्या प्रवाहांत टाकून दिलें होतें. पण अंतरिक्षांतून उड्डाण करणाऱ्या व उदकाच्या स्पर्शापासून अलिप्त राहणाऱ्या अशा नौकांत बसवून त्यांस तुम्ही सुरक्षितपणें घेऊन आलां; [ १-१३१,२; २–३९-४; ८–४२,३; ८–७२,३; ९—७०,१०;१०–१०१,२–नावमरित्रपर्णीम्; १-२५,७–नावः समुद्रियः ] [ १-११६,४-शतारित्रानावम्–शंभर वल्ह्यांची नाव. कच्चें कातडें घेऊन त्यांत पाणी किंवा दारू ठेवण्यास धृती म्हणजे बुधले, बाल्ड्या वगैरे करीत असत. [१-१९१,१०;४-४५,१,३;५-८३,७;६-४८,१८;७-८९,२;७-१०३,२;८-५, १९]. [ १-८५,५–ज्याप्रमाणें पाण्याच्या योगानें एखादी पखाल चिंब भिजावी, त्याप्रमाणें त्या नद्या आपल्या प्रवाहांत पृथ्वीस चिंब भिजवितात-दोऱ्या करणाचा

धंदा चांगला चाले [ १-१६२,८;२-१३,९;७-८४,२ ]. न्हाव्याचा धंदा यावेळीं चालत असे [१०-१४२,४-न्हावी दाढी करितो, अग्नी पृथ्वीवरील गवत जाळतो]. आर्यावर्तांत या वेळीं सोनार होते; कारण वेदामध्यें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पुष्कळ दागिन्यांचा उल्लेख आहे. शेतीचींही सुधारणा पुष्कळ झालेली होती. शेतीच्या मोजणीचा उल्लेख ( १-११,५ ) त आहे व नागराच्या योगानें धान्य पेरून अन्नसामुग्री निर्माण करण्याचा उल्लेख [ १-११७,२१ ] त आहे. या वेळीं नाना प्रकारचीं धान्यें वापरीत असत; कारण त्यावेळीं विहिरी ( १-५५,८;२-८५,१० ) तलाव व पाट असत-असें दिसतें [ १०-३४,१३-ह्यांत एका जुगाऱ्यास शेती करण्याचा उपदेश आहे.—"Abandon play, and till the soil, for this shall better pay thy toil. Well pleased with what thou hast, forbear, To crave of wealth an ampler share"-*Dr. Muir.* ( ३-४५,३;१०-४३,७;७-९,२—तलाव व सरोवरें यांपासून खणून केलेल्या पाटांनीं धावत जाणारें पाणी असे ). पण ह्यांतील कोणत्याही प्रकारें शौर्यप्रताप अजून कमी झाला नसल्यामुळें त्यांचें चरित्र कांहींसें शेतकऱ्यासारखें व कांहींसें मेंढपाळासारखें असे. दायभाग ( १-७३,१;१-६८,५ ) व करारमदार यांचें व्यवहारशास्त्र पुष्कळ वाढलें होतें; कधींकधीं रिणकोपासून धनको जबर व्याज काढीत असत. पुष्कळ लोक कर्जबाजारी असत व त्या कर्जबाजारीपणाचा परिणाम फार प्रतिकूळ होत असे [ १०-३४,१०—कर्जबाजारी मनुष्य चोऱ्या करण्यास प्रवृत्त होतो.—"In went, at night he seeks relief, By graceless shifts, a trembling thief"-*Dr.Muir.* तायू, तस्कर, स्तेन, परिपंथिन्, मुषीवन्, वगैरे चोर, वाटमारे, दरवडेखोर वगैरे गुन्हेगार आर्यावर्तांत असत [ १-५०,२; १-६५,१; १ १९१,५; २-२८,१०; ४-३८,५; ५-१५,५; ५-५२,१२ ] जिकडे तिकडे उद्योगीपणाची वहावा केलेली आहे. यावरून आपल्या आर्यावर्तांत उद्योगावांचून राहणारेही लोक इतर देशांसारखे असावेत, मग त्यांची संख्या फार का नसेना. पुष्कळ लोकांस जुगाराचा छंद असे. म्हणून वेदाच्या अनेक सूक्तांत जे लोक नेहमीं जुगार खेळत असत त्यांबद्दल लोकमत कसें होतें? ह्याबद्दल विवरण आलें आहे[१०-३४,१०]. जुगाऱ्याची दुर्दैवी बायको व आई दुःखी होते.—"The gambler's hapless wife is sad; His mother mourns her wayward lad."-(*Dr. Muir.*) अ. वे. ७-५०,१; ७-१०९,१; ६-११८,१; ४-३८,१ ). पण हे खेळाडू लोक बहुधा चांगले मजूर असावे. कारण ते सुतार, लोहार वगैरे कारागिरांच्या हाताखालीं किंवा कारखान्यांत काम करकरून केलेली सगळी कमाई ते ह्या व्यसनांत साफ घालवीत असत. म्हणून वरील सूक्तें त्यांच्याविषयीं अत्यंत कींव उत्पन्न करणारीं आहेत. अजून डोळे उघडले तरी सुधारणा होईल असा त्या सूक्तांचा मथितार्थ आहे. "Be, gracious Dic, we now implore; Bewitch us with your spells no more"-*Dr. Muir.* हे वरुणा, हें आम्ही जाणूनबुजून पाप केलें नाहीं तर दारू, राग, जुवा व अविचार यांच्या मोहानें आम्ही कुमार्गवर्ती झालों आहों. सबळ हा दुबळ्याला वाईट

छंदाला लावितो. झोपेंत देखील मनुष्याकडून मनानें पाप होतें. तर आम्हांस या पापापासून सोडीव इ० ). ऋग्वेद व अथर्ववेद यांची रचना होत असतां त्या वेळच्या लोकांस जुगाराचा नाद लागला होता व अक्षकामा व मनोमुहा *अप्सरा ह्या जुगार खेळण्याच्या कामांत पटाईत होत्या असें दिसतें ( अ० वे०२.२,४ ). या वेळीं अर्याच्या समाजामध्यें इष्कबाज स्त्रिया व पुरुष असत (४-३२,१६). त्यांमध्यें निरनिराळे वेश धारण करणाऱ्या व वक्षःस्थलें उघडीं टाकणाऱ्या नर्तकी स्त्रिया होत्या ( १-९२,४ ). यांत उद्योगी लोकांप्रमाणें निरुद्योगी ही लोक असत. ते भीक मागण्याचा धंदा करीत व ते तो धंदा असा करीत कीं तो त्यापासून सुटण्याची आशा नसे. १ आपण भुकें मरावें असा देवांचा संकेत नाहीं. सुपुष्ट लोकांसही निरनिराळ्या प्रकारें मरण येतें. उदार पुरुषाची भरभराट कधींही, कमी होत नाहीं; पण अनुदार मनुष्याची भरभराट राहत नाहीं. कारण त्यास कोणीही बरें म्हणत नसतो. २ स्वतःस यथेच्छ खावयास असून त्याजकडे अन्नाकरितां येत राहणाऱ्या भुके मरणाऱ्या गरीब मनुष्याचा जो अव्हेर करितो त्याशीं कोणीही मित्रत्वानें राहत नाहीं. ३ अन्नाकरितां जिगजिग करणाऱ्या रोडक्या भिकारड्यास अन्नदान करणाऱ्या मनुष्यास उदार म्हणावें. अशा मनुष्यास यज्ञ-कर्मांत यश मिळतें व त्यास एक मित्र मिळतो. ४ पोटाकरितां जवळ येणाऱ्या मित्रास जो कांहींही देत नाहीं, तो त्याचा मित्र होय असें समजूं नये. अशा मनुष्यापासून प्रत्येकानें निघून जावें; त्याचें घर हे घर होय असें समजूं नये. व जो उदार असेल त्याजकडे जाऊन रहावें, मग तो कसाही परकी असो. सबळ मनुष्यानें शरणार्थ्यास उदारत्व दाखवावें; त्यानें पुढील मार्गावर लक्ष द्यावें. कारण अहो, संपत्तीही गाडीच्या चाकासारिखी फिरणारी आहे. ती एकदां एकाकडे जाते व एकदां दुसऱ्याकडे जाते. ६ त्या मूर्खाला व्यर्थ अन्न मिळतें. खरोखरी पाहतां तें त्याच्या नाशाचें मूळ होऊन बसतें. तो आपल्या मित्राला किंवा संवगड्याला पोशीत नाहीं. जो स्वतः जवळचें अन्न स्वतःकरितांच राखून ठेवितो, तो आपलें पाप आपल्याकरितांच राखून ठेवितो असें म्हटलें पाहिजे ( १०.११७ ). हीं सूक्तें त्या भिकाऱ्याचे विचार प्रदर्शित करितात. ते विचार डा. मूर ह्यास फार आवडल्यामुळें त्यानें त्याचें इंग्रजींत रूपान्तर असें केलें आहे.—

The gods have not ordained that we
Should die of want; the lean and weak
Are not death's only prey; the sleek
Themselves must soon his victims be.
The man endowed with ample pelf
Who steals his heart, in selfish mood,

---

*हें अप्सरांचें वर्णन सुमेरुवरील चैनबाज यक्षगन्धर्वांचें तर नव्हेना? कीं ज्या चैनीमुळें त्यांजवर जलप्रलयाची अस्मानी आफत दैवास सोडावी लागली ! अशीच शिक्षाच देवानें रोमन लोकांवर जंगली लोक सोडून केली आहे !

Against the poor who sue for food
Shall no consoler find himself.
No friend is he who cooly spurns
Away his needy friend forlorn;
He, thus, repulsed, in wrath and scorn
To some liberal stranger turns.
Relieve the poor while yet ye may;
Down future time's long vista look,
And try to read that darkling book;
Your riches soon may flit away.
Ye cannot trust their fickle grace,
As chariot wheels, ceaseless round,
Now upward turn, now touch the ground,
To riches ever change their place.
The man whose friend receives no share
In all his good, himself destroys;
Who thus alone his food enjoys
His sin alone shall also bear.

मागें हें सांगण्यांत आलें आहेच कीं आर्य लोक हे खेडीं, शहरें व किल्ले यांत रहात असत ( १·११४,१;१·४४,१०;१-१४९,४;४-३०,२०;१-५८, ८;१-१६६,८;७-१५,१४ ).– शहर व किल्ले यांत क्षत्रिय, ब्राह्मण, व्यापारी व कारागीर राहत असत व खेड्यांमध्यें, मुख्यत्वेंकरून, शेतकरी व मजूर राहत असत. मुख्य गावाच्या वेशींवर बहुधा नगारखाने असून प्रातःकाळीं त्यांत हल्लीं-प्रमाणें दुंदुभी, बकुरादी सूरसनया व तुताऱ्या वाजत असत [ १-२८,५;६-४७,२९-३१ व अ. वे. ५-२०;१-११७,२१ ]. सर्व वर्णांचे लोक पहाटेस उठून अग्नी पेटवीत व त्यांत हविर्भाग अर्पण करीत असत [ १-४९,३,४ ] हे देदिप्यमान देवी, द्यूलोकाच्या आसमंतात् भागापासून तुझें आगमन झाल्या-बरोबर उडणारे पक्षी, द्विपाद् व चतुष्पाद प्राणी बाहेर निघण्यास सिद्ध झाले. जी तूं आपल्या किरणांनीं जगावर प्रकाश पाडीत त्यास प्रकाशमय करून सोडि-तेस, त्या तुझा, हे उषे, कण्वांनीं संपत्तीची इच्छा धरून स्तोत्रांचे योगानें धावा केला आहे. [ १-९२,९·विश्वं जीवं चरसे बोधयन्ती विश्वस्य मतायोः वाचं अविदत्–सर्व जीवांना संचारार्थ जागृत करून उषेनें अखिल प्रतिभाशाली कवींची स्तवनें संपादन करून घेतलीं आहेत–वगैरे उषेचीं सूक्तें [ १–१;१–९; १–६५, ५ वगैरे अग्नीचीं अनेक सूक्तें ]. त्या वेळचे लोक अत्यंत उद्योगप्रिय असत. म्हणून ते असे लौकर उठत व आपलें धर्मकर्म आटोपून आपआपले कामास लागत.—क्षत्रिय राजकार्यास लागत, ब्राह्मण पठणपाठणाच्या कार्यास लागत, व वैश्य व शूद्र व्यापार व शेती यांच्या कार्यास लागत. ह्या सर्व लोकांचे निरनिराळे पुढारी असत. ते बरेच श्रैनी व उदार असत. त्यांचे वाडे पूर्वोक्त दरबारच्या थाटाचे असत. पण यांत शूद्रांची स्थिती चांगली होती असें म्हणतां येत नाहीं [ १०—९०,१२ ]. शूद्र हे राष्ट्रपुरुषाच्या पायापासून उत्पन्न झालेले होते-पुरुषसूक्त. ]

## भाग बारावा.

### रीतिभाती.

The liberal does not mourn or die;
No pain or care his life annoys;
This world is his with all its joys,
And future bliss beyond the sky.
He owns a princely palace bright,
And dwells in godlike pomp and pride;
A richly desked and winning bride
Sits fair and blooming by his side,
And fills his heart with loves delight.
With plentious stores of corn and wine
Supplied, a merry life he leads;
Swift and'er the plain his chariot speeds,
Whirled on by prancing, snorting steeds;
He smites his foes by aid divine—*Dr. Muir.*

अर्थ—उदार लोक कधींही मरत नाहींत किंवा संकटांत पडत नाहींत. त्यानां दुःख अथवा अन्याय सोसावा लागत नाहीं. त्यांच्या उदारपणाच्या योगानें हें झाडून सर्व जग व स्वर्ग त्यांना मिळतें. उदार लोकांस प्रथम सुखकारक गृह, सुवस्त्रभूषित स्त्री, व मद्याचा चषक प्राप्त होतो. त्यांच्यापुढें चालणाऱ्या लोकांस ते सहज पादाक्रान्त करितात. उदार मनुष्याकरितां तलख घोड्यास शिक्षण देण्यांत येतें. त्यांच्या वाट्यास सुंदर अप्सरा येतात. त्यांचें घर देवांच्या गृहाप्रमाणें सुंदर शृंगारलेलें व कमलांच्या सरोवरासारखें असतें. उदार मनुष्यास चपळ घोडे बसावयास मिळतात दानदात्याचा रथ हलक्या चाकांवर हळूच पुढें लोटत जातो. अहो, देवांनो उदार लोकांना लढाईंत राखा, ते युद्धांत शत्रूंना जेर करोत. १०-१०७,८-११

जो मनुष्य इंद्राचा सखा असतो त्याजवळ घोडे, रथ, गाई व रथ हे असतात व तो घष्टपुष्ट असून सभास्थानीं चमकत राहतो.—[ ८-४,९ ]

मागील तीन भागांत क्षत्रिय, ब्राम्हण, वैश्य व शूद्र यांचें वर्णन देण्यांत आलें. आतां ह्या भागांत त्यांच्या रीतिभातींचें वर्णन कर्तव्य आहे.

भेद.—वरील अवतरणांवरून अर्यांच्या समाजांत महाजन व सामान्य जन अथवा श्रीमंत लोक व गरीब लोक हा भेद ढळढळीत दिसून येतो. हे महाजन अथवा श्रीमंत लोक, प्रायः, हल्लीं, आढळतें, त्याप्रमाणें, मोठे आढ्यताखोर व सोवळे म्हणजे इतरांस आपले जवळ न येऊं देणारे असत, [ १-१४५,२ ] व मध्यम प्रतीचे लोकही आपआपले कामधंदे करून सुखानें राहत असत, पण त्यांच्या खालच्या लोकांची केवळ हातातोंडांशीं गांठ असे. असल्या प्रकारचा

प्रत्येक वर्णाचा विभाग ऋक्संहितेंत सुचित केलेला आहे [ ४-२५,८ ]. त्यांचीं घरें मोठीं भपकेदार बांधलेली नसत. त्यांचीं रचना अगदीं साधी असे. तीं अर्वाचीन घरांप्रमाणें बिलकुल घोट्याळ्यांचीं नसत. घराजवळ कुत्रे असत. गृह्यसूत्रांमध्यें ह्या वेळच्या घरांच्या निरनिराळ्या भागांची माहिती दिली आहे. त्यांतील कांहीं घरांवर दुसरे मजले असत. पण त्यांत विशेष लक्ष ह्मटलें ह्मणजे पुढील गोष्टींकडे देण्यांत येत असेः—१ स्वच्छता, २ नीटनेटकेपणा, ३ आरोग्यावहता. वास्तोष्पतीस उद्देशून एक सूक्त ऋग्वेदांत आहे. त्याप्रमाणें ज्यांच्या सभोवार फुलझाडांचे ताटवे असत अशा सुंदर व मनोहर पादवीथिकांचा उल्लेख आहे ( ७-५४,३ ) व तो मोठ्या प्रेमानें केला आहे. पण पारशांच्या अवेस्तामध्यें त्यांचा ह्या गोष्टींकडे विशेष कल व ओढा दाखविण्यांत आला आहे. ह्या घराच्या माजघराच्या एका पश्चिमोत्तर ठिकाणीं हव्यकव्य करण्याचें देवघर असे. त्या घरांत एक स्थंडिल व तीन अग्निकुंडें बांधिलेलीं असत. त्या जागेस प्रथम सदस ह्मणजे बैठक व त्याच्या अधिदेवतेस सदसस्पती असें म्हणत असत. अद्‌भुत पराक्रम करणाऱ्या सदसस्पतीजवळ मी गेलों आहें. हा उदार असून भक्ती करण्यास योग्य आहे व इंद्राशीं ह्यांचें मित्रत्व आहे ( १-१९,६ ). म्हणून त्याचें रक्षण शत्रूंपासून आत्मनिरपेक्ष करण्यांत येत असे. त्याच्या दर्शनानें कुटुंबामध्यें आशापूर्ण वृत्ती जागृत होत असत, व नूतन अपेक्षा त्यांच्या मनांत प्रादुर्भूत होत असत. ह्या पवित्रस्थानीं त्या त्या कुटुंबांतील झाडून सर्व मुलगेबाळगे व नातूपणतू जमा होत असत व ते तेथें पवित्र सूक्तें बरोबर म्हणत असत [ १-१,७,८ ]—यांत रोज करावयाच्या यज्ञाची महती वर्णिली आहे. येथें सकाळच्या व संध्याकाळच्या इष्ट देवतांस आव्हान करून ते त्यांत आचार्यांमार्फत हविर्भाव बिनचुक देत असत, तेव्हां स्वाहा व वौषट्—कारांनीं मुलेंबाळें, घर दणाणवून टाकीत असत. दर्भासनें व मृगासनें पसरण्यांत येत असत [ १-३८,९—सोमप्रयोगांत सदस श्रृंगारीत असत ] ती कशी श्रृंगारावीं याबद्दल सोमप्रयोगांत सूचना दिलेल्या आहेत. प्रत्येक पूर्णिमेचा किंवा प्रतिपदेचा दिवस मोठा पवित्र मानण्यांत येत असे. तेव्हां जिकडेतिकडे आनंदीआनंद चालत असे. सोमरस करण्याचें उलुखल [ उखळ ] व मुसल [ मुसळ ] यांपासून तालबद्ध आवाज निघत असल्यामुळें त्यांपासून असा जणूं भास होई कीं तीं स्वतः वेदाचींच सूक्तें म्हणत आहेत. प्रत्येक मनुष्यास सोमरस पिण्याचा अधिकार नसे. ज्यानें पाकयज्ञ केले आहेत असे गृहपती व ज्याचें मन भक्तीनें परिपूरित झालें आहे, त्यांसच फक्त अग्नींत सोमाचा हविर्भाग देण्याचा अधिकार असे. आश्वलायन व बौद्धायन सूत्रांतील सामान्य याजकांपेक्षां हे सोमयज्ञ करणारे लोक भिन्न असत. सोम-याग करणें हें मोठें प्रतिष्ठेचें चिन्ह मानण्यांत येत असे. म्हणून हे यज्ञ करण्याविषयीं समाजांतील लोकांस मोठी हांव असे. हे यज्ञ करण्याची मनुष्यास पात्रता येण्यास त्यांतील पती व पत्नी यांस प्रेमानें व गोडीगुलाबीनें राहण्याचें व्रत नेहमीं चालवावें लागे. त्या दंपतीस रोज सकाळ

संध्याकाळ एकत्र बसून गृह्याग्नीमध्यें हविर्भाग द्यावा लागे. [ ५-४३,५ ] तीं रोज नित्यनियमानें दोनदां एकत्र जमून एकमेकाशीं बोलत सोमयाग करीत असत. तेणेंकरून असें होत असे कीं संध्याकाळच्या हवीचें अर्पण झालें कीं त्यामध्यें कधींकाळीं धुसपुस झाली असली तरी ती फार वेळ टिकत नसे. तदर्थ तीं लगेच एकजीव होत असत.

निरनिराळया वर्णांत शेंडी राखण्याची पद्धती निरनिराळी असे [ ७-३३,१ ]. वशिष्ठाचे अनुयायी आपली शेंडी उजव्या आंगास ठेवीत असत. ते शुभ्र वस्त्रें पवित्र मानीत असत. वशिष्ठास अवेस्त्यांत वहिस्त असें म्हटलें आहे [ यस्त २-१८—वशिष्ठ म्हणजे अग्नी. तो अहुर माजदाचा पुत्र. आपल्या वेदांप्रमाणें वशिष्ठ म्हणजे उर्वशी व पुरुरवस नामक अरणींचा पुत्र, म्हणजे अग्नीच होय ]. म्हणून अवेस्तिक [ पारशी ] ब्राह्मण हल्लीं सुद्धां नेहमीं पांढरे फक्क कपडे वापरतात. ते इतके पांढरे कीं तसे पांढरे कपडे हल्लीं वैदिक ब्राम्हण वापरीत नाहींत.

प्राचीन आर्यांची मालमत्ता ह्मटली ह्मणजे जमीनजुमला, कुरणें व गाई ही असे. गोदोहन अथवा गाईचें दूध काढण्याची क्रिया हा प्रत्येक यज्ञाचा महत्वाचा भाग असे, मग तो यज्ञ सामान्य पूर्णिमेचा असो किंवा अग्निष्टोम असो. ज्या काळाचा हा इतिहास सांगण्यांत येत आहे, त्या काळीं तो लटुपटूचा आपल्या उपनयनविधीप्रमाणें होऊन बसला नव्हता, तो त्यावेळीं अगदीं खरा होता. गृहपती अगदीं पहाटेस उठत असे. तो आपला गाईगोठ्यांची साफसफाई वगैरे व्यवस्था करीत असे; व नंतर तो प्रत्येक गाईस—रंग्ये, गंग्ये ह्मणून—प्रेमानें हाक मारीत असे. पुढें तो तिच्या वासरास सोडून प्रथम पाजीत असे व नंतर तिचें दोहन ह्मणजे दूध काढण्याचें काम करीत असे व नंतर तो त्या वासरास बांधीत असे. अशा प्रकारें एका पाठीमागून एका गाईचें दूध काढणें होत असे. त्या वेळच्या लोकसमाजांत मानप्रतिष्ठा राहण्यास प्रत्येकाजवळ किमानपक्ष सहा तरी दुभत्या गाई लागत. ह्मणून अनेक वेळां गाईच्या चोऱ्या होत असत. येथील मौल अथवा मूळचे रहिवासी जे पंचजनांपैकीं दुसरे आर्येतर हे आर्यांच्या गाई चोरून नेत असत. तेव्हां त्या अनिष्ट गोष्टीचा प्रतिकार करण्यास तेव्हांचे ते आर्य रात्रंदिवस एका पायावर तयार असत. ते लगेच नगारा, ढोलकें वगैरे पूर्व—ठरावाप्रमाणें वाजवून मोठा गवगवा करीत [ १-१५१,५,६ ] व ते पावलांचे ठसे पाहून चोराचा माग काढणाऱ्या पगींची ( गुजराथी शब्द ) योजना त्या चोरांच्या शोधाच्या कामीं करीत असत.[ १—६५,१ ] गुरें चोरून नेऊन असला एखादा चोर अगदीं मोठ्या गुहेंत जाऊन अगदीं गपचुप लपून बसला तरी त्याच्या पावलांच्या ठशांवरून हे पगी त्या चोराचा माग अगदीं बिनचुक व बिनतोड काढीत असत [ आमचें ज्योतिषांतर्गत अंगुली मुद्रण पहा ]. याप्रमाणें ते पगी त्या चोराचा पत्ता लावण्यांत मोठे पटाईत असत, व ही गोष्ट त्या वेळीं इतकी वारंवार घडत असे कीं तिची छाया त्यांच्या दन्तकथा, भाषा व पुराणें यांवर पूर्णपणें पडून राहिली

आहे. त्यांच्या खासगी बोलण्यांत अगदीं ग्राम्य अलंकार आढळतात. त्या वेळीं प्रत्येक आर्यास जीं संकटें हरहमेष भोगावीं लागत त्यामध्यें त्या ग्राम्य शब्दांचा छडा सांपडतो. ज्या नरेंद्रांनीं ह्या पणीं मार्फत गाई चोरून नेऊन एकीकडच्या गुहेंत लपविणाऱ्या दासांचा माग काढून त्यांचा एका ठोशानें निकाल केला, त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गात त्यांचे कुळांतील भटभाट चोहोंकडे फिरत असत! वृत्रांचें गाईचें हरण व उलट इंद्राचें त्यांचें आलभन ह्यांच्या कथांचा उगम दासांचें गाई हाकून नेणें व योद्धयांनीं त्या परत हिसकून आणणें ह्यांच्या प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींपासून झाला आहे. त्यांच्यामध्यें अनेक प्रकारचीं पक्वान्नें करीत असत. त्यांत अती महती म्हटली म्हणजे दुधाच्या पक्व अन्नाची असे त्यांच्या प्रत्येक जेवणांत दहीं व लोणी अवश्य असे. त्यांस सत्तूंत किंवा लाहिपीठांत ( १-१६, २;३-१५,३;३-५२,५;६-२९,४ ) दूध घालून खाणें फार आवडत असे. ते सोमरसांत दूध मिसळीत असत. तें दिव्य ( म्हणजे बहुधा त्रिविष्टप—तिबेट-यांतून आणिलेल्या ) सोमाच्या रसाचें पेय-ग्रहांत म्हणजे लाकडी पेल्यांत घेऊन-पीत असत. त्या पेयाची रुची गोड असे. तें मादक असे. तें पाहून आर्यांस स्फुरण चढत असे, त्याच्या स्पर्शानें त्यांचें आंग त्वेषानें थरारत असे, तें कुटून काढण्याच्या आवाजानें त्यांच्या संतापाचें शमन होत असे, व त्याच्या सेवनानें त्यांच्या ठायीं ज्या भावना उत्पन्न होत असत, त्या अगदीं अवर्णनीय असत; कारण त्या वेळच्या ऋषिमण्डळास ऋग्वेदाच्या एका मण्डळांत ह्या पेयाचे गुणगण होते, ते झाडून सर्व साद्यंत सांगतां आले नाहींत; ह्यावरून हें पेय—चहा, काफी, भांग किंवा दारू—ह्या रूपाचें खचित नव्हतें. ऋग्वेदांत यवांचा उल्लेख आहे ( १-२३,१५;१,६६,२;१-११७,२७ ) व अथर्ववेदांत तांदूळ ( व्रीही ), यव, उडीद ( माष ) व तीळ यांचा उल्लेख आहे [ ६—१४०,२ ] यावरून ह्या धान्यांचा त्या वेळीं उपयोग करीत असत. देवांस अपूप ( वडे, घारगे ) अर्पण करीत असत ( ३,५२,७;६-५७,२ ). फळांचा निर्देश ( ३. ४५,४ ) मध्यें आहे, व ( १.१४६,५ ) मध्यें आहे. कांहीं वनस्पती देवांच्या पूर्वीं तीन युगें होऊन गेल्याचें व त्यांतील कांहीं दिव्य, कांहीं सपुष्प व अपुष्प व कांहीं सफळ असल्याचें वर्णन आहे. ( ६ ३९,१४;७ ३४,२३;७ ३५,५; १०—९७,१ ) ( आमचें भूगर्भदर्पण पहा ). यावरून फुलें व फळें वापरण्याचा लोकांमध्यें सरास प्रघात होता असें ठरतें. याप्रमाणेंच रोगनिवारक वनस्पतींचे अनेक उल्लेख असल्यामुळें त्या वेळचे लोक जडीबुट्टीचींच औषधें ( भेषजें ) फार वापरीत असावे असें दिसतें. ( १-१६१,१० ) मध्यें यज्ञार्थ यांस वापरल्याचा एक उल्लेख आहे, व ( १-१६४,४३ ) मध्यें बैल शिजविण्याच्या प्राचीन संस्थेचा म्हणून निर्देश आहे. यावरून या वेळीं इतर मांस खात असले तरी गोमांस खचित खात नसावे असें वाटतें. वेदकालीं मूर्तिपूजा येथें प्रचलित होती कीं नाहीं ह्याबद्दल पण्डित लोकांमध्यें एकमत झाल्याचें अजून आम्हांस आढळलें नाहीं. पण नव बालकांच्या कलाप्रमाणें नव राष्ट्राचा कल व्यक्तीकडून अथवा

मूर्ताकडून अव्यक्ताकडे अथवा अमूर्ताकडे जाण्याचा असतो. एवढेंच नाहीं तर प्रौढ राष्ट्रें प्रौढ मनुष्यांप्रमाणें अव्यक्ताचे कितीही ढंग करोत, पण तीं वस्तुपाठाच्या मिषानें तरी व्यक्ताकडून अव्यक्ताकडे सहज जातांना आढळतात. तर निर्गुण व सगुण ह्यांच्या वादाप्रमाणें प्रतीकांचें पूजन वेदांत नव्हतें पण तें पुढें त्यांच्या ऱ्हासाच्या बौद्धांच्या काळांत उत्पन्न झालें असें विनाकारण हट्टानें म्हणत बसणें जगांतील वस्तुस्थितीस धरून आहे असें कोणत्याही धर्माच्या इतिहासावरून दिसत नाहीं. ऋक् संहितेंत मूर्तिपूजा होती असें ठरलें कीं तींत ज्या पवित्र स्थळांचा नामनिर्देश आहे तीं सायणाचार्यांच्या मताप्रमाणें तीर्थें होतीं असें ठरेल. ज्या सनातन रूढी होत्या, त्यांचे कायदे होऊन बसले होते. त्या कायद्यांस ऋत असें म्हणत असत. ह्या ऋत शब्दाचा अर्थ सद्वर्तन असा होतो. लग्न संस्काराचे वेळीं वर व वधू यांच्या आंगास घृत व पय माखीत असत. असल्या रूढीचें वर्णन आश्वलायनाच्या गृह्यसूत्रांत आहे. वासरें गुरें व स्थावरजंगम मालमत्तेचें रक्षण करण्याबद्दल अग्नीचा धांवा ( १-७२,६ ) त आहे. औरस पुत्राचा उल्लेख ( १-६६,१ ) त आहे. दायभागाचा अमल जारीनें चालू झालेला होता. सर्व मुलांत जो वडील मुलगा असे, त्यास बापाच्या मालमत्तेचा वारसा मिळत असे. (१-६८,५;१-७०,५;१-७३,१). त्याकरितां त्यावर एक बोजा असे. तो हा कीं त्यानें, बहीण असल्यास ती सुस्थळीं पडेल अशा ठिकाणाबद्दल योग्य खबरदारी घेऊन तिचें लग्न करावें. निपुत्रिक निवडल्यास आईच्या आजाच्या मालमत्तेचा वारसा मुलीच्या मुलाकडे किंवा नातवाकडे जात असे; पण त्याबद्दल त्याच्या बापास मोठमोठ्या देणग्या द्याव्या लागत. कधींकधीं मुलगा प्रौढ झाला असल्यास तो त्यास आपली कांहीं मालमत्ता देत असे ( ३-३१ ). पण दायभाग व संस्कार यांचे प्रश्न निदान पन्नास वर्षांच्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध ( ब्रह्मा नामक ) लोकनायकाकडे नेण्यांत येत असत ( १--१५८,६ ममतेचा मुलगा दीर्घतमा ). असे ऋत म्हणजे सद्वर्तनाचे रूढ नियम व सत्य म्हणजे ब्रम्हत्वाच्या नियमनाचे सनातन नियम ह्यांच्या अनुरोधानें आर्य आपलें राज्य, उत्पन्न, व सुधारणा यांत दिवसानुदिवस प्रगती करीत राहिले होते असें सिद्ध होतें.

---

## भाग तेरावा.

### राजेरजवाडे.

"1 I have brought thee forward; remain in the midst; continue firm and immovable; may all thy subjects desire thee! may thy dominion not fall away from thee! 2 Remain here; do not fall; continue immovable as a mountain; abide here as firm as Indra; support here the realm. 3 Indra with a firm oblation has held him firm; may some Brahmanspati, take his part. 4 Firm is the sky, firm the earth, firm these hills, firm is the whole world and this prince is a

firmly established king over his subjects. 5 May king Varuna, may the divine Brihaspati, may Indra and Agni firmly maintain thy rule! 6 We urge the firm Soma with a firm oblation. And now may Indra make thy subjects devoted to thee alone, and bringers of tribute."—(10-103)—Dr. Muir.

अर्थ.–१मी तुला पुढें आणिलें आहे; तूं मध्यें रहा; तूं स्थिर व अचल रहा; तुझ्या सर्व प्रजा तुझी इच्छा करोत! तुझें राष्ट्र [राज्य] तुजपासून च्युत न होवो! २ तू येथें रहा; तूं पतन पाऊं नकोस; तूं पर्वताप्रमाणें निश्चळ रहा; तूं इंद्राप्रमाणें येथें ध्रुव [स्थिर] रहा; तूं येथें राष्ट्र धारण कर; ३ इंद्रानें ध्रुव हविर्भाग घेऊन त्यास पक्कें धरून ठेविलें आहे; सोम व ब्रम्हणस्पती त्याचा भाग घेवोत. ४ आकाश स्थिर आहे, पृथ्वी स्थिर आहे, हे पर्वत स्थिर आहेत, हें विश्व स्थिर आहे व हा राजा प्रजांवर पक्का प्रतिष्ठित आहे. ५ राजा वरुण, देव बृहस्पती, इंद्र व अग्नी हे तुझा अंमल स्थिर राखोत! ६ ध्रुव हविर्भाग देऊन स्थिर सोमाची आम्ही विनवणी करितों; व इंद्र आतां तुझ्या प्रजा तुझ्याशीं अनुरक्त होत्साता तुजकडे करभार आणणाऱ्या करो.

मागील भागांत आर्यांच्या रीतिभातींचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत त्यांच्या राजेरजवाड्यांचें वर्णन कर्तव्य आहे.

राजे.—तो [ बृहस्पती ] आपलें सर्व बल एकत्र करील; कारण राजांकडून तोच [ शत्रूंस ] मारवीत असतो. भीतीच्या प्रसंगीं देखील तो [ निभर्य ] असें स्थान तयार करून ठेवितो. लहान अथवा मोठ्या युद्धांत सुद्धां ह्या वज्रधारी देवास तोंड देणारा अथवा त्याचा पराभव करणारा कोणी नाहीं [ १–४०,८; १–१२६,१; ३–४३,५; ५–३७,४; १०–३३,४ ]. आर्य लोकांच्या राष्ट्रांत निरनिराळ्या जातींचे लोक असून त्यांचीं अनेक राज्यें होतीं [ १–१२६,१ ]–भाव्य नांवाच्या प्रसिद्ध राजाचें राज्य सिंधुनदीच्या तीरावर होतें. [८–२१,१८] ( चित्र व दुसरे राजे सरस्वतीजवळ रहात होते. ) सुदासाबरोबर दहा राजे लढल्याचा उल्लेख ( ७–३३,३, व ८-८३,६ ) मध्यें आहे. शत्रुमित्र राजांच्या सभा ( समिती ) होत असत ( १०–९७,६ ). राजांच्या अनेक बायका असत ( ७–१८,२ ). मित्र व वरुण हे ज्या मोठ्या वाड्यांत राहत असत, त्यांस हजार खांब व हजार दरवाजे होते [ २–४१,५; ५–६२,६, व ७–८८,५ ]. जो आपल्या आज्ञा सर्व लोकांस मानावयास लावितो, ज्यास द्वादश मासांचें–कीं ज्यांपैकीं प्रत्येकांत लोकसंख्येची वृद्धी एकसारखी होत असते–ज्ञान असतें; शिवाय त्यांस जोडूनच जो महिना कधींकधीं येतो त्याचीही ज्यास माहिती आहे, सर्वसंचारी, उत्तुंगगामी व सामर्थ्यवान अशा वायूची गती ज्यास विदित आहे व वायुलोकाच्या वरती जे राहतात, त्यांनासुद्धां जो ओळखतो; जो अंतरिक्षांतून परिभ्रमण करणाऱ्या पक्ष्यांचा मार्ग जाणतो; समुद्रनिवासी असल्यामुळें तारवांची वाट ज्यास माहित आहे; असा सर्वसमर्थ वरुण असल्या आज्ञां-

चें परिपालन करवीत साम्राज्य गाजविण्याकरितां सर्व लोकांत येऊन विराजमान झाला आहे; आपलें सुवर्णमय कवच घालून त्यानें देदिप्यमान वस्त्र धारण केलें आहे, सभोवार त्याचे दूत बसले आहेत; ह्यास दुष्ट लोक भीती दाखवूं शकत नाहींत; ह्यास पापकर्में खलही भयचकित करावयास समर्थ नाहींत १-२५,७,८,९,१०, १३,१४–ह्या सूक्तांतील राजांचीं घरेंदारें, त्यांचा अंमल, त्यांचा दुष्टांस दरारा, त्यांची लढाईस सदा तयारी, त्यांचें कालज्ञान, त्यांचें नौकानयनाचें ज्ञान, त्यांचें नुस्तें राज्य नव्हे तर साम्राज्य, त्यांचीं वस्त्राभरणें, त्यांचा बायका वगैरे यांत त्या काळच्या साध्या नव्हे तर एकमुखी राजाचें ध्येय वस्तुस्थिती पाहून दाखविलेलें दिसतें–हे राजे मोठ श्रीमान व दानशूर असत ( ५-३०,१२;६-४७,२३;८-४६,३३–यांत गाई, घोडे, रथ, सोन्याच्या लगडी, पोशाख, दासी यांच्या दानांचा निर्देश आहे. ) ह्या राजांच्या हाता खालीं मांडलिक राजे व प्रतिनिधी असत. त्यांस पुरपती व ग्रामणी ह्या पदव्या असत ( १-१७३, १०; १०; ६२, ११ )–पुरपती ह्याचा अर्थ नगरशेट किंवा किल्लेदारही होऊं शकेल. तसाच ग्रामणी ह्याचा अर्थ पाटील किंवा नाईक होऊं शकेल. अशा थाटांचीं राजांचीं दरबारें असल्यामुळें त्यांत प्रसिद्धीस आलेल्या अनेक लोकाग्रणींचीं नांवें ऋग्वेदांत नमूद आहेत. त्या लोकमान्यांचे तीन वर्ग पाडितां येतील- गौतम अथवा कण्व ह्या गोत्रांतील घरभारी वास्तोष्पती ( १-६१, १६, ८-३६, १० ) ऋज्राश्व, अम्बरीष, सहदेव, भयमान, सुराधा वगैरे उदार, यज्ञकर्ते ( १-१००, १७ ), कुत्स, पुरुकुत्स वगैरे धैर्यशाली लोकनायक ( १-६३, ७ ). उदार दिवोदासाची कीर्ती प्रस्थापित झालेली होती [ ४-३०, २०–त्याचे करितां इंद्रानें दस्यूंचीं शंभर तटबंदी शहरें उध्वस्त केलीं आहेत. ] राजांच्या चारित्राचे पांच प्रकार असत:—[ १ ] युद्धें, [ २ ] न्यायमनसुबा, [ ३ ] अंतःपुर, ( ४ ) शिकार व [ ५ ] भाट. ते मोठेपणाकरितां सात्विक, तामस वगैरे अनेक प्रकारें वरचढ अथवा चढाई करावयास पहात असत ( १-७४,८;७-३३- भरत व वशिष्ठ यांचा झगडा ४-४, १ ). राजेरजवाडे यांचे पदरीं वकील, अनुयायी, हत्ती, घोडे, गाई वगैरे असत [ ४-४, १ ]

---

## भाग चवदावा.

## युद्धाची पद्धती.

1 When a warrior in a coat of mail engages in battles, his form resembles a cloud; conquer without injury to thy body, let the power of (thy) mail save thee.

2 Come, we conquer countries by means of our bows, we win in battles by means of our bows. Our bows disconcert our enemy; we conquer in all directions by means of our bows,–(4, 75, 1, 2)

अर्थः–चिलखत घातलेला योद्धा लढाईस प्रवृत्त होतो, तेव्हां त्याचें स्वरूप ढगासारखें दिसतें. तुझ्या शरिरास इजा होऊं न देतां विजय मिळिव. तुझ्या चिलखताच्या योगानें तुझा बचाव होऊं दे.

२ आम्ही आमच्या धनुष्याच्या योगानें युद्धांत जय मिळवितों, आम्ही आमच्या धनुष्याच्या योगानें लढाईत यश संपादन करितों. आमच्या धनुष्याच्या योगानें आम्ही आमच्या शत्रूंची हवेलंडी उडवून टाकितों. आम्ही आमच्या धनुष्याच्या साधनानें चोहोंकडे विजय मिळवितों.

2 I have given (this) country to the Arya; (I have caused rainfall for the pious man ( Arya ). I have brought water ( for him) all the willing gods come ( and do ) as I bid.

3 Intoxicated with Soma, I destroyed 99 towns of Shambara (a Dasyu): I prepared the 100th town (for the residence of Devodasa) because in a sacrifice I protected Divodasa to whom itinerant Arya have recourse.-(4. 29, 2, 3).

अर्थः२–मी हा देश आर्य लोकांस दिला आहे. ह्या धार्मिक [आर्य] मनुष्याकरितां मी पाऊस पाडिला. मी [ त्याकरितां ] पाणी आणिलें. सर्व देव राजीखुशीनें येऊन मी सांगतों तसें [ करितात ].

३ सोमरसानें तर्र होऊन मी शंबराचीं ९९ शहरें उध्वस्त केलीं. मी दिवोदासाला राहण्याकरितां शंभरावें शहर तयार केलें. कारण ज्याकडे फिरते आर्य लोक येतात अशा दिवोदासाचें रक्षण मी यज्ञ काळीं केलें.

मागील भागांत राजेरजवाडे यांचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत आर्यांच्या युद्धाच्या पद्धतीचें वर्णन कर्तव्य आहे.

" शुष्ण मारावयास धावला असतां तूं कुत्साचें रक्षण केलेंस व अतिथिग्वाचा पक्ष घेऊन शंबराचा चुराडा करून टाकलास. अर्बुद एवढा मोठा असतांही तूं त्याच्यावर पाय देऊन उभा राहिलास. दस्यूंचें हनन करण्याकरितांच तूं पुरातन कालापासून जन्म घेत आला आहेस [ १.५१.६ ] हे सामर्थ्यवान वीरहो, पहिल्याप्रमाणें आमची उत्कर्षाकडे प्रेरणा करून व अभद्र दानवांच्या सर्व युक्त्यांचा मोड करून तुम्ही त्या पांचही प्रकारच्या लोकांस प्रिय अशा अत्री ऋषीस त्याच्या सर्व माणसांसह्—अतीशय भयंकर गुहेमधून बाहेर काढिलेंस [ १–११७,३ ]..

टिपा.–[ १ ] यावरून आर्यलोकांत जूट असून ते आपल्या पुढाऱ्याबरोबर कुच करीत असत–असें दिसतें.

[ २ ] आपला बचाव करून पुष्कळ शत्रूंस ठार करण्याची आर्यांची लढाईत प्रवृत्ती होती असें दिसतें.

"तूं नर्य, तुर्वश व यदू यांचें रक्षण केलेंस. हे सामर्थ्यवान् ( इन्द्रा ), तूं वय्य तुर्वशीचेंही रक्षण केलेंस. संग्रामाचा प्रसंग प्राप्त झाला असतां तूं रथ व एतश यांचें रक्षण केलेंस, व शत्रूंचीं ९९ पुरें फोडून टाकिलींस"–[१-५४,६].

टीप.-यावरून ह्या संग्रामांत नर्य, तुर्वश, यदू, तुर्वीती, रथ व एतश हे आर्यांचे अग्रणी होते असें दिसतें.

"येथें दृग्गोचर होणाऱ्या त्या तुझ्या श्रेष्ठ सामर्थ्याचा विद्वान लोकांनीं प्राचीन काळीं अती उच्च गौरव केला होता. तुझ्या शक्तीचा एक अंश पृथ्वीवर दृष्टीस पडतो व एक अंश स्वर्ग लोकीं अनुभवास येतो व ज्याप्रमाणें युद्धकालीं [ लढाईचें ] एक निशाण दुसऱ्याजवळ जाऊन मिळतें, त्याप्रमाणें ( तुझ्या शक्तीचे ते दोन्ही भाग तुझ्या ठायीं ) एकत्र होतात" [ १-१०३,१ ]

टीप.-यावरून प्रत्येक सेनानायकाचें निशाण निरनिराळें असे असें उघड होतें.

इत्यादि:—ते आपल्या पूर्वजांचीं स्तुतिस्तोत्रें गात व साहाय्यार्थ इंद्र, बृहस्पति वगैरे देवांचा धांवा करीत युद्धास जात असत ( १-११२,१,२३;१-१०२, ३,४ ). सेनापती रथांत बसून गमन करीत. त्यापैकीं कांहींजवळ धनुष्यबाण असत व कांहींजवळ भाले बरच्या असत ( ६-७५;६-४७-२६-यांत गाईबैलांच्या चामड्यांनीं झाकलेल्या रथाचा उल्लेख आहे ). सैन्याचे दोन भाग असत. १ पायदळ व २ घोडदळ [ घोडेस्वार ] अ. वे. ७-६२,१ रथी पत्तीला जिंकतो ). "हे अग्निदेवा, तूं आमचा रक्षक झालास तर आम्ही आपल्या अश्वांनीं [ शत्रूच्या अश्वास जिंकू. आम्ही आपल्या माणसांकडून शत्रूच्या माणसांस जेरीस आणूं व आम्ही आपल्या लढवय्यांकडून शत्रूकडील योद्धयांस पराभूत करूं. आमच्या कुळांतील विद्वान पुरुषांस वाडवडिलांनीं मिळविलेल्या संपत्तीचें स्वामित्व मिळून शंभर वर्षें अयुष्य प्राप्त होवो." ( १-७३,९ ).

टिपा.-( १ ) यावरून या वेळीं सैन्य दोन प्रकारचें असे. १ पायदळ व २ घोडदळ [ घोडेस्वार ] व त्यांचेजवळ धनुष्यबाण व भालेबरच्या असत; व

( २ ) त्यांत वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध पुरुषांची इतकी वहादारी असे कीं त्यांस शंभर वर्षें आयुष्य प्राप्त व्हावें म्हणून वरील सूक्तांत इच्छा प्रदर्शित केली आहे.

कधींकधीं सेनानायक शत्रूंच्या शहरांवर चोहोंकडून जुटीनें हल्ला चढवून आंत सांपडलेल्या लोकांची कत्तल करून तीं शहरें घेत ( इंद्राचीं सूक्तें पहा ). ते लूट मिळवीत असत ( ६·७५ ) असल्या एखाद्या शहरांत आर्यांचा प्रवेश झाला कीं ते तेथें आपल्या देवता, धर्म, यज्ञयाग, राजतंत्र वगैरे संस्था स्थापन करीत असत. "आर्य कोण व दस्यू कोण हें नीट ओळखून ठेव व त्यांतील जे तुझी आज्ञा न पाळणारे असतील, त्यांचें शासन करून आपल्या उपासकापुढें त्यांना शरण येण्यास लाव. तूं सामर्थ्यवान आहेस. आपल्या भक्तांस तूं ( उत्कर्षाप्रत ) पोहोचीव. तुझे पराक्रम यज्ञामध्यें गात असतां ते मला आनंद देतात.

९ जे इंद्राची आज्ञा पाळितात त्यांच्यापुढें त्याच्या आज्ञा न जुमानणाऱ्या लोकांना वाकावयास लावून हा इंद्र भक्तांकडून भक्तिहीनांचा नाश करवीत असतो. वम्र तुझें स्तवन करीत असल्यामुळें त्याला त्याच्या शत्रूनें साठवून ठेविलेल्या संपत्तीचा नाश करितां आला. हा त्याचा शत्रू अगोदरच फार बलिष्ट झालेला असूनही

त्याचें बल वाढतच चाललें होतें, व तो स्वर्गापर्यंत जाऊन भिडला होता" (१-५१,८,९,) "१ ज्यानें ऋजिश्वा ह्याचे हातून कृष्णवर्ण संततीच्या लोकांचा वध करविला, त्या आनंददायक इंद्रास हवींसह एक स्तोत्र अर्पण करा. त्यानें आमचें संरक्षण व्हावें ह्यासाठीं, त्याच्या मित्रत्वाची इच्छा धरून आम्ही त्या दक्षिण हस्तांत वज्र धारण करणाऱ्या पराक्रमी देवास मरुतासहवर्तमान निमंत्रण करितों. २ ज्यानें क्रोधाच्या भरांत व्यंसाचा वध केला, ज्यानें शंबराला मारिलें, व ज्यानें भक्तिहीन पिप्रूचेंही हनन केलें, नाश करण्यास अशक्य अशा शुष्णाचाही ज्यानें नायनाट केला, त्या इंद्राच्या मित्रत्वाची इच्छा करून आम्ही त्यांस मरुतांसहवर्तमान निमंत्रण करितों. ४ जो अश्वांचा प्रभू आहे, जो धेनूचाही प्रभू आहे, जो ( ह्या सर्वांना ) वश ठेवितो, जो सर्वत्र सन्मान पावतो व प्रत्येक कृत्यांत ज्याचें अस्तित्व निश्चयानें दृग्गोचर होतें, व हवी अर्पण करणारा अभक्त कितीही प्रबळ असला तरी त्याचा जो वध करितो, त्या इद्रास त्याच्या मित्रत्वाची इच्छा करून आम्ही मरुतांसहवर्तमान निमंत्रण करितों ( १-१०१,१,२,४ )

टीपः—१ ह्या सूक्तावरून आपल्या आर्य लोकांस अनेक शत्रु असून ते निरनिराळ्या वर्णांचे व प्रकारचे होते असें दिसतें. त्यांत कांहीं कृष्णवर्ण संततीचे दस्यू होते, काहीं नाश करण्यास अशक्य शुष्णासारखे होते, कांहीं भक्तिहीन हवी अर्पण न करणाऱ्या पिप्रूसारखे होते, कांहीं शंभर दिवस काळोख पाडणाऱ्या शंबरासारखे होते ( पुढील आमचें श्रौतभूमी हें प्रकरण पहा ). कृष्णवर्ण दस्यू हे आपल्या हिंदुस्थानांतील काळे भिल्ल कोळी दिसतात(२)शुष्ण हे दस्यू नव्हते. ते पारशी अवैस्तिक पांढरे आर्य दिसतात. ते शहानाम्यांत वर्णिलेले पेशदादी काळांतील इंद्राचीच जर स्तुती केलीत तर कल्याणाच्या इतर मार्गास मुकाल असें म्हणणारे निंदक (१०४, ५) व वैदिक इंद्र, शर्व (शिव) शुक्ल यजुर्वेद–६,२८ व नासत्य ह्या देवांस अंग्रोमन्यू म्हणणारे व इंद्रास न मानणारे अभक्त पण बलिष्ठ व हिक्मती शुष्ण–हुस्न–हुसेन–होशंग पारशी होत ( कुंठें ) ( ३ ) पिप्रू, व शंबर रजोलोकांतील अही ( वृत्र ) होत; कारण उत्तरध्रुवाकडील वसाहतींतील शेषशाई विष्णूला ( सूर्याला ) हे अही शंभर दिवस पांढऱ्या क्षिरसागरांतील आपल्या शेशोन् देशांत दरवर्षीं आपल्यामध्यें निजण्यास नेतात अशी दृढ कल्पना त्या सुमेरुखंडांतील शेवटच्या उत्तर कुरूंतील आपल्या श्रोत्रिय लोकांची होती तर हे अही म्हणजे दक्षिणेस मेक्सिकोपासून उत्तरेस आलास्कापर्यंत पसरलेले सूर्योपासक तांबडे इंडियन असावेत असें दिसतें. म्हणून "तुझें पूजन न करणाऱ्या लोकांस तूं नव्वद नद्यांपलीकडे फेकून एका मोठ्या खळग्यांत टाकून दिलेंस [ १-१२१,१३ ]." वृत्रहनन प्रसंगीं हे सज्जनाच्या नायका ( इंद्रा ), त्या आनंदकारक पेयांनीं, त्या उत्साहवर्धक हवींनीं व सोमरसांनीं तुला खचित नवीन आवेश आला. कारण [ त्याचे भरांत ] तुझ्याकरितां दर्भासन मांडून तुझी कीर्ती गाणाऱ्या भक्ताकरितां तूं कोणाच्याही प्रतिरोधाची पर्वा न करितां दहा हजार वृत्रांना कापून काढिलेंस ( १-५३,६ ). ज्याच्या साम-

र्थ्यापुढें शत्रूंचा निभाव लागत नाहीं अशा त्या इंद्रानें दधिच ऋषीच्या शरीरांतील अस्थी घेऊन त्यांच्या योगानें नव्याणव वृत्रांचा वध केला [ १-८४,१३ ]. दस्यूच्या मारलेल्या सैन्याची संख्या ( १.५३,९त ) ६०९९. (४·१६,१३त) ५०,०००, व (४-२३,२१ त ) ३०,००० दिलेली आहे. ११ द्युलोकांतील सीमान्तप्रदेशावर हे सुंदर पंखाचे पक्षी विराजमान झालेले आहेत व ते विस्तीर्ण उदकामधूनही तरून जाणाऱ्या लांडग्यास, मार्गांतून हाकून लावीत आहेत. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्षांत घ्या. १८ मी मार्गानें जात असतां मला एकदां एका लाल रंगाच्या लांडग्यानें पाहिलें. मग ( काम करकरून ) पाठींत कळ आलेल्या सुताराप्रमाणें तो हळू हळू उठला व माझे मागें चालूं लागला. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्षांत घ्या ( १-१०५,११,१८ )—हे लांडगे कदाचित तांबडे इंडियन असूं शकतील; कारण रंग तांबडा व त्यांचा दुष्टपणा लांडग्यासारखा व ते पाण्यावरून बहुधा गलबतानें जाणारे येणारे असावेत—असें दिसतें. शत्रूच्या क्रोधाची धुंदी उतरविणाऱ्या व ( अनेक ] युद्धें करणाऱ्या ह्या इंद्रानें आमच्या शूर पुरुषांचें सहाय्य घेऊन सूर्याचा शोध लाविला व अत्यंत निबिड अंधःकार पडला असतांही त्यांतून ह्यांनें तेजाची प्राप्ती करून घेतली [ १-१००, ६,८ ] व सूर्याची द्युलोकांत स्थापना केली [ १-५१,४ ] १ तुला संतोष उत्पन्न व्हावा म्हणून सोमरसाची ह्याप्रमाणें सिद्धता होतांच ह्या विद्वान उपासकानें तुझें महत्व वर्णन केलें आहे. हे अंत्यत बलशाली व वज्रधारी देवा, स्वतःचें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा करून तूं अहींस ह्या पृथ्वीवरून हाकून लाविलेंस [१·८०, १], हे उग्र इंद्रा, तुझें स्थैर्य वाखाणण्यासारखें आहे व तुझे अश्व पीतवर्णाचे आहेत. ज्या वेळीं तुझ्या आज्ञा न जुमानणाऱ्या दुष्टांस तूं अंतरिक्षांतून पृथ्वींतून व स्वर्गांतून (त्रिविष्टपांतून ) हाकून लाविलेंस, त्या वेळीं त्यांनीं आपलीं मस्तकें (लज्जेनें )पाठीमागें फिरविलीं. स्वतः तुझें यजन कधींही करीत नसून यजन करणाऱ्या लोकांबरोबर मात्र त्यांनीं स्पर्धा चालविली होती [ १·३३,५ ]. घृतांच्या हवींनीं उज्ज्वलता धारण करणाऱ्या हे अग्निदेवा, आमच्या शत्रूंचा नाश कर. त्यांनीं राक्षसांशीं सख्य जोडलें आहे [१·१२,५].अशा प्रकारें हे लोक इंद्रास न मानणारे, यज्ञ न करणारे, व अव्यवस्थित वागणारे होते म्हणून त्यांच्याशीं आर्यांस युद्ध मांडणें भाग पडलें होतें. त्याचें वर्णन डा. म्युरनें पुढील इंग्रजी कवितांत असें सुंदर वठविलें आहे.-

"Thou sweep'st away the dark-skinned brood,
Inhuman, lawless, senseless, rude,
Who know not Indra, hate his friends,
And spoil the race which he defends.
Chase, far away the robbers chase,
Slay those barbarians black and base;
And save us, Inra, from the spite
Of sprites that haunt us in the night,
Our rites disturb by contact vile,
Our hallowed offerings defile."

१ हे ऋभूंनो, आपल्या सामर्थ्यानें आम्हांस यज्ञयाग करण्यासाठीं आयुष्य द्या व आमचे आंगीं पराक्रम व बल यावें म्हणून आम्हांस उत्तम संतती व ( पोटभर ) अन्न द्या. ( शिवाय ) आम्ही आपल्या पदरच्या सर्व शूर पुरुषांसह ( निर्विघ्नपणें ) ( ह्या जगांत ) वस्ती करावी म्हणून आमच्या सेनेच्या आंगीं जोमदारपणा उत्पन्न करा. २ हे ऋभूंनो, आमची अभिवृद्धी करा, आमच्या रथांची अभिवृद्धी करा, तुम्ही आमची सदोदित अशी यशशाली अभिवृद्धी केली पाहिजे कीं जिच्यामुळें आमचे नातलग अथवा परके—कोणीही आमच्याशीं युद्ध करण्यास पुढें येवो—त्यांचा हटकून पराजय होत जावा. " ( १-१११,२,३ ).

हे इंद्रा, माझी अशी मनःपूर्वक समजूत आहे कीं आम्ही तुजवर विश्वास ठेविला आहे. तूं सामर्थ्यवान आहेस म्हणूनच तूं आमची प्रेरणा अतीशय संपत्तीकडे कर. [ अनेक भक्तांनीं ज्यास पाचारण केलें आहे असे हे इंद्रदेवा ] आम्हांस क्षुधा लागेल तेव्हां अन्नपाणी ( पुरवितांना ) आमचें घर बांधण्याचें तसेंच अपुरें ठेवून मात्र तें मात्र आम्हांस देऊं नकोस ( १-१०४,७,१—११७, १,१९—अन्नसामुग्री; १—१२०,९—वैभव, धेनू, धनधान्यसमृद्धी; १,१२१, १५—कृपा, धनधान्य, व धेनू यांची मागणी आहे; १—३३,१५ त भूमिसंपादनाची ईर्षा आहे )

टीप.—यावरून हीं युद्धें अन्नपाणी व घरदार यांकरितां होत होतीं हें सिद्ध होतें. याप्रमाणें कोणी धर्माकरितां, कोणी घर स्थिरस्थावर करण्याकरितां म्हणून प्रत्येक आर्य जातीचा पुढारी स्वतंत्रपणें आर्येतराशीं युद्धास प्रवृत्त होऊन स्वतंत्र स्वराज्यें स्थापित असे.

( २ ) पण ते आर्येतर कांहीं कमी नव्हते. ते संधी साधून त्यांजला बहुसंख्येनें घेरीत असत व त्यांचीं गुरेंढोरें पळवून नेत असत, व त्यांच्या पिण्याच्या पाण्यांत विष कालवून ठेवीत असत.

( ३ ) पण आर्यांचे भटभाट त्यांच्या शूरवीर पूर्वजांची व हरप्रसंगीं त्यांस सहाय्य करण्याऱ्या त्यांच्या इंद्राग्निदेवांची आठवण करून त्यांच्यांत जूट व आवेश असा उत्पन्न करीत कीं ते अल्पसंख्याक आर्य त्या बहुसंख्याक शूर पण फुटीनें राहणाऱ्या त्या अनार्यांस दांतीं तृण धरावयास लावीत. तेव्हां त्या अनार्यांनीं त्यांचा देवधर्म, रीतिभाती , यांचा स्वीकार केला तर ठीक, नाहीं तर ते त्यांचा सुपीक जमीनजुमला हिसकून घेऊन त्यांस रानावनांत व डोंगरकठड्यांत हाकून— [ भिल्लां प्रमाणें ] देत असत !

( ४ ) असें त्या आर्यांनीं त्या अनार्यांशीं शतकानुशतक व युगानुयुग युद्ध चालविलें तरी त्यांनीं त्यांच्या समूळ उच्छेदाची इच्छा कधींच केली नाहीं, म्हणून ते त्या रानावनांत व डोंगरकठड्यांत तर काय पण त्या आर्यांच्या कांहीं जातींत उघड्या माथ्यानें मिसळलेले आढळतात; एवढेंच नाहीं तर त्या अनार्यांपैकीं कांहींस आर्य म्हणणें त्यांच्या रंगारूपावरून शोभत नसलें तरी ते आर्य ह्या नांवानें चोहोंकडे खुशाल हल्लीं मिरवत फिरत आहेत ! हे तर काय पण, कांहीं लोक

वर्णसोपानाच्या अगदीं वरच्या ब्राम्हणाच्या पदावरही आरूढ होऊन बसलेले सध्यां आढळतात !

( ५ ) ह्या भांडणाऱ्या लोकांत कांहींस कळे कृष्ण असुर ह्या संज्ञेनें संबोधिलेलें आढळतें. ती संज्ञा अवैस्तिक पांढऱ्या इंद्रद्वेषी अवैस्तिक पारशांस हीनत्वदर्शक काळतोंड्ये ह्या अर्थानें लाविलेली आहे असें आम्हीं पुढें दाखविलें आहे [ आमचें श्रौतभूमी हें प्रकरण पुढें पहा ]

तात्पर्य, आर्येतर लोकांच्या सगळ्या जमातींच्या जमाती आर्य आपल्यामध्यें मोठ्या गोडीगुलाबीनें सामील करून घेत असत व त्या कालगत्या अनायासें सहज आर्यध्येयानुवर्ती होत असत. म्हणून याप्रमाणें उत्तरेकडील मूळच्या आर्यांपेक्षां दक्षिणेकडील यथामूल व अनुगृहीत तेलंगादिक लोक जास्त चांगले वैदिक व संस्कृतविद्याचारसंपन्न आढळतात.

---

# भाग पंधरावा.

## उपसंहार.

—:*:—

A glance at the athnological and linguistic map of India will show that the races and languages on the east are Mongolian and those on the west Persian or Scythian in character; while the Aryan civilization which predominates in the north is the result of invasions which can be traced historically, and Dravidian civilization which holds its own in the south is probably also due to invasions in prehistoric times—*Mr. E. J. Rapson—P. 26.*

अर्थः— हिंदुस्थानांतील वर्णशास्त्र व भाषाशास्त्र यांच्या नकाशाकडे लक्ष दिलें तर असें कळतें कीं त्याच्या पूर्वभागीं ज्या जाती व भाषा चालू आहेत, त्या मोंगोलियन म्हणजे पिवळ्या जातीच्या लोकांच्या आहेत व त्याच्या पश्चिमभागीं ज्या जाती व भाषा आहेत, त्या पारशी अथवा सिथियन ( शक ) म्हणजे पांढऱ्या जातीच्या लोकांच्या आहेत; त्याच्या उत्तरभागीं आर्यांच्या ऊर्फ पांढऱ्या लोकांच्या लोकांच्या सुधारणेचें वर्चस्व आढळतें व तें त्या लोकांच्या इतिहाससिद्ध स्वाऱ्यांच्या परिणामामुळें उद्भवलें आहे, व त्याच्या दक्षिणभागीं द्रविडांची ऊर्फ तांबड्या काळ्या लोकांची सुधारणा टिकाव धरून राहिलेली आहे व ती इतिहासपूर्व काळीं बहुधा झालेल्या त्यांच्या स्वाऱ्यांमुळें उत्पन्न झाली आहे.

We must also admit the probability that the influences which contributed to drag down Hindu religion were not wholly Dravidian. The Mongoloid races of the North East are responsible for much of the Tantric cults,—*Mr. L. D. Barnett.*

अर्थः—आपण अशी संभाव्यता आहे असें कबूल केलें पाहिजे कीं ज्या प्रभावांच्या योगानें हिंदू धर्माचें अधःपतन झालें ते झाडून सर्व द्रवीड नव्हते.

ईशान्येकडील मोंगल अथवा पिवळ्या वर्णांचे लोक त्यांत बिघडविण्यास शिरलेल्या शाक्तितंत्राबद्दल जबाबदार आहेत.

प्रत्यक्ष सूर्याच्या तापापेक्षां ज्याप्रमाणें त्यानें तापविलेली वाळू ज्यास्त तापद असते त्याप्रमाणेंच गोष्ट अस्सल व कम–अस्सल व नक्कल यांची असते.

मागील भागांत आर्यांच्या युद्धाच्या पद्धतीचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत त्यांचे वर्ण व भाषा यांचें विवरण कर्तव्य आहे.

वर्णशास्त्रः—अलीकडे मनुष्याचें मस्तक, नासिका व नासिकाकक्षा यांच्या [ ११०;११०–११२ व ११३ ] या इयत्ता मानाप्रमाणें वर्णशास्त्र काढण्यांत आलें आहे. त्याप्रमाणें पाहतां, हिंदुस्थानांतील वर्णांचें वर्गीकरण देशवार असें आढळतें.—

१ पांढरे लोकः—ह्यांचा रंग पांढरा; आंगकाठी उंच; डोळे सरळ व बहुधा काळे; चेहेरा अण्डाकृती व त्यावर पुष्कळ केश; नाक अरुंद व तरतरीत; व मस्तक लांब व रुंद असतें. असले लोक अफगणिस्तान, बलुचिस्तान, पंजाब, राजपुताना, काश्मीर वगैरे देशांत आढळतात. त्या लोकांचीं प्रचलित नांवें अशीं आहेतः—अफगाण, बलुची, ब्राहुई, रजपूत, खत्री, जाट वगैरे.

टीप—ह्या लोकांचीं हीं मासलेवाईक लक्षणें पंजाबाकडून बंगालकडे व दक्षिणेकडे व वरच्या ब्राम्हण वर्गाकडून खालच्या शूद्र वर्गाकडे अधिकाधिक विपरीत होत जातात; कारण त्यांत तांबड्या, पिवळया व काळ्या लोकांचा तसाच संकर झाला आहे.

२ पिवळे लोकः—ह्यांचा रंग पिवळा; आंगकाठी मध्यम; डोळे लहान व पापण्या तिर्कस; चेहेऱ्यावर केश थोडे व चेहेरा सपाट व मस्तक रुंद असतें. हे लोक हिमालय, नेपाळ, आसाम, व ब्रह्मदेश या ठिकाणीं आढळतात. ह्या लोकांची प्रचलित नांवें अशीं आहेतः–क्यानेद, लेपच्या, लिंबू, मुर्मी, मुरुंग, वोडो, व ब्रम्ही.

३ तांबडे लोकः—ह्यांचा रंग तांबडा; डोळे बहुधा काळे; आंगकाठी मध्यम उंच; केश सरळ; नाक मुळाशीं बसलेलें व अणकुचिदार; व मस्तक लांब असतें. हे लोक मद्रास इलाखा, हैदराबाद, मध्यप्रांत, व छोटा नागपूर या प्रांतांत आढळतात. या लोकांचीं प्रचलित नांवें अशीं आहेतः–कानडी, तेलगू, तामिळ व मलियालम्.

टीप—ह्या लोकांची वरील मासलेवाईक लक्षणें काळ्या लोकांच्या भारी मिश्रणानें उत्तरेकडील मुळापासून दक्षिणेकडे व वरच्या ब्राह्मण जातीकडून खालच्या शूद्र जातीकडे अधिकाधिक विपरीत झालेलीं दिसतात.

४ काळे लोकः—ह्यांचा रंग काळा; आंगकाठी मध्यम उंच; केश कुरळ; नाक बसकें; ओंठ पुढें; कुल्ले मोठे; व मस्तक लांब असतें.

टीप—हे लोक विंध्याद्रीपासून कन्याकुमारी भूशिरापर्यंत रानावनांतून व डोंगर कठड्यावरून जागोजाग एकीकडे आसा धरून राहिलेले आढळतात.

५ फिके लोक—ह्याचा रंग फिका ( ह्यांत पांढऱ्या, तांबड्या, पिवळ्या व काळ्या लोकांच्या अधिक उण्या मिश्रणाप्रमाणें त्या त्या अधिक उण्या रंगाची झाक मारिते ); त्यांची आंगकाठी तशीच लहान मोठी; केश तसेच सरळ, कुरळ किंवा विरळ; डोळे तसेच मोठे किंवा लहान; सरळ किंवा वांकडे; नाक लांब किंवा आखुड, तरतरीत किंवा बसकें; ओठ पुढें किंवा मागें; कुल्ले लहान किंवा मोठे; मस्तक लांब किंवा रुंद असतें. हे लोक संयुक्त प्रांत, राजपुताना, व बहार ह्या प्रांतांत तांबड्या लोकांच्या मिश्रणानें फिके पांढरे तांबूस दिसतात. ह्यांस हिंदुस्थानी म्हणतात. ह्याप्रमाणेंच हे लोक बंगाल व ओरिसा व छोटानागपूर व विशेषेंकरून पश्चिम बंगाल या प्रांतांत पिवळ्या व काळ्या लोकांच्या मिश्रणानें फिके, पिवळे व फिके काळे दिसतात. ह्या लोकांस बंगाली ब्राम्हण, कायस्थ व मुसलमान असें म्हणतात. ह्याप्रमाणेंच हे लोक महाराष्ट्रांत आढळतात. ह्यांत काळ्या, तांबड्या व पांढऱ्या लोकांच्या अधिक उण्या मिश्रणाप्रमाणें हे फिके काळे, फिके तांबडे, व फिके पांढरे दिसतात. ह्या लोकांस मराठे असें म्हणतात. तांबडया लोकांचें काळ्या लोकांशीं मिश्रण महाराष्ट्राच्या दक्षिणेस कानडी, तेलगू व तामीळ या लोकांत जितकें अधिक झालें आहे तितकें तें मराठ्यांत झालें नाहीं. म्हणून सदरहू कानडी, तेलगू व तामीळ लोकांपेक्षां मराठ्यांमध्यें पांढऱ्या व तांबडया लोकांचें सद्गुण जास्त उठावानें नजरेस पडतात, व तेच गुण कानडी तेलगू व तामीळ या लोकांत उतरत्या श्रेढीनें दृष्टोत्पत्तीस येतात; व ते वरच्या ब्राह्मणादी जातीपेक्षां खालच्या शूद्रादी जातींत उतरत्या श्रेढीनें दृग्गोचर होतात.

कातडीच्या वर्णांत फरक रसायनदृष्ट्या मुख्यतः हवेच्या फरकानें व गौणतः जातीच्या फरकानें होतो. उत्तरेकडील आर्य प्रथम पांढरें फक्क होतें. ते उत्तरेकडून दक्षिणेकडे उतरत गेले, तरी ते आनुवंशिक ब्राम्हण असतांही तिकडील हवेच्या तीव्रतेच्या फरकानें वर्णांतर पावत गेले. ते काळसर होत चालले. जे आर्येतर तांबड्या रंगाचे होते त्यांच्याशीं आर्यांचा वैवाहिक संबंध होऊन तांबुस उदी रंगाचे क्षत्रिय झाले. हे क्षत्रिय हल्लीं राजपुतान्यांत आहेत. आर्येतर पिवळ्या रंगाचे लोक होते. त्यांच्याशीं आर्यांचा वैवाहिक संबंध होऊन पिवळे वैश्य उत्पन्न झाले. ज्या जातींत आर्यांच्या रक्ताचें मिश्रण झालें होतें, त्यांस द्विज नांव प्राप्त झालें, ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य हे तीन वर्ण अशा प्रकारचे म्हणजे द्विज होते. चौथा वर्ण जो शूद्रांचा, त्यांचा निवळ काळा वर्ण जशाचा तसा कायम राहिला; कारण त्यांशीं आर्यांचे वैवाहिक संबंध प्रथम बिलकुल झाले नाहींत.

टीप—ह्यांत अतिशूद्र किंवा पंचम वर्ग आढळत नाहीं.

यांतील विद्वान ब्राह्मण हे बरेच शुद्ध पांढरे होते. लढवय्ये क्षत्रिय हे पांढऱ्या व तांबड्या वर्णांच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेले होते. व्यापारी वैश्य हे पांढऱ्या व पिवळया वर्णांच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेले होते. मजूर शूद्र हे बरेच शुद्ध काळे होते.

१ *पांढरे लोक हे उत्तरेच्या सुमेरुखंडांतील [ समरकंद ] आर्य.

२ तांबडे लोक हे पूर्वेच्या अमेरिकाखंडांतील टोलटेक.

३ पिवळे लोक हे पूर्वेच्या चिनांतील मोंगल.

४ काळे लोक हे पश्चिमेच्या आफ्रिका खंडांतील सिद्धी.

५ फिके लोक हे पूर्वेच्या ( मसाल्याच्या ) बेटांतील मले.

येणेंप्रमाणें पंचजन मिळून हिंदू लोक झाले आहेत. हेच वेदोक्त पंचजन होत–ह्यांत वर्णशास्त्रदृष्ट्या बिलकुल संशय नाहीं–मग त्यांच्या तेव्हांच्या व आतांच्या संख्येमध्यें व रंगामध्यें कितीही परिवर्तन म्हणजे उलथापालथ झाली असो.

याप्रमाणें हें वर्णशास्त्रदृष्ट्या आपल्या ह्या मायभूमींतील लोकांचें वर्गीकरण झालें. तर आतां त्यांचें वर्गीकरण भाषाशास्त्रदृष्ट्या करून पाहूं.

भाषा––१ पांढऱ्या लोकांच्या भाषेंत––पशथो, पिशाची, काश्मिरी ह्या भाषा मोडतात. पशथो ही भाषा अफगणिस्थान, व बलुचिस्थान यांमध्यें प्रचलित आहे. पिशाची ही भाषा आर्य ऋषींनीं प्रथमारंभीं वापरली तशी आहे. ती वर्णोच्चारांत वैदिक भाषेसारिखी आहे. अशी ही चमत्कारिक भाषा काश्मीर व वायव्येकडील प्रांतांतल्या डोंगराळ प्रदेशांतल्या लौकीक भाषांच्या मुळाशीं आहे, व तीवर दुसऱ्या पांढऱ्या लोकांच्या भाषेची वाढ झाली आहे. ती इतकी कीं अनेक प्रकारच्या वेलींनीं सर्वांगांनीं वेढलेला आंब्याचा वृक्ष दुरून ओळखण्यास कठीण जातो, त्याप्रमाणें इतर भाषांच्या वेलींनीं सर्व आंगांनीं वेढलेल्या ह्या भाषेचा वृक्ष दुरून ओळखण्यास कठीण जातो. ते प्राचीनकाळीं पंजाब सिंधमध्यें रहात असत. सांप्रत उत्तर हिंदुस्थानांत ज्या भाषा प्रचलित आहेत त्या झाडून सर्व ह्या पांढऱ्या लोकांच्या मूळच्या भाषेपासून, प्रामुख्येंकरून, उत्पन्न झालेल्या आहेत, मग ती मूळची भाषा बोलणारे लोक दक्षिण आर्यावर्ताच्या हिमालय व विंध्य या पर्वतांतील मध्यदेशामध्यें मूळचे राहाणारे असोत किंवा प्रलयानंतर पंजाबकडून किंवा चित्रळ व जिलजितकडून आलेले असोत. ह्या भाषांचे तीन वर्ग करितां येतातः–( १ ) वैदिक, ( २ ) अभियुक्त संस्कृत व ( ३ ) मूळ प्राकृत. ह्या मूळ प्राकृत भाषा मध्य देशामध्यें वैदिक काळापासून प्रचलित होत्या. ह्या भाषांपासून व्युत्पन्न भाषा म्हटल्या म्हणजे सहाव्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत रूढ असणाऱ्या दुसऱ्या प्राकृत भाषा होऊन गेल्या आहेत. त्यांची वंशावळी अशी आहे.–संस्कृतापासून पाळी व पाळीपासून महाराष्ट्री. हें रूपान्तर होत असतां वर्णोच्चार भ्रष्ठ होत गेले; जसें, संस्कृत शब्द व्रत, ह्याचे पाळींत अपभ्रष्टरूप ( वत ) असें होतें व त्या पाळी वत शब्दाचें अपभ्रष्टरूप महाराष्ट्री ( वअम ) झालें. दुसऱ्या प्राकृत भाषांपैकीं मुख्य भाषा म्हटल्या म्हणजे विहारमधील मागधी, अयोध्येमधील अर्धमागधी, मथुरेभोंवतालची शौरसेनी व

* जिऑग्रफी फॉर सिनियर क्लासिस-इ. मार्स्डेन–रेसिस आफ मनकाईंड–नकाशा व विवरण पा. ३३५

वऱ्हाडांतील महाराष्ट्री ह्या होत. अकरावे शतकामध्यें ह्या दुसऱ्या पिढीच्या प्राकृत भाषांपासून तिसऱ्या पिढीच्या प्राकृत भाषा उत्पन्न झाल्या. शौरसेनी भाषेपासून पश्चिम हिंदी व पंजाबी ह्या भाषा उत्पन्न झाल्या. ह्या शौरसेनी भाषेला जवळ अशी आवंती म्हणून एक भाषा होती. त्या आवंती भाषेपासून राजस्थानी व गुजराथी ह्या भाषा उत्पन्न झाल्या व अर्ध मागधीपासून पूर्व हिंदी उत्पन्न झाली. इतर कोणत्याही भाषेशीं संबंध नसलेल्या एका अपभ्रष्ट भाषेपासून काश्मिरी भाषा उत्पन्न झाली. व्राछदपासून सिंधी उत्पन्न झाली, व महाराष्ट्रीपासून मराठी उत्पन्न झाली, व मागधी पासून बिहारी, उरीय, बंगाली व आसामी भाषा उत्पन्न झाल्या.

२ **तांबड्या लोकाच्याभाषेंत**—कानडी, तेलगू, तामीळ व मलयालम ह्या भाषा मोडतात. या भाषांपैकीं कानडी भाषा कर्नाटक प्रांतभर चालते. तेलगू, तामीळ व मलयालम ह्या भाषा मद्रास इलाख्याच्या उत्तर, दक्षिण व पश्चिम भागांत चालतात. ह्या भाषांचा संबंध परस्पराशीं निकट आहे. पण त्यांचें खुलासेवार वर्णन करण्यास त्या भाषांचें सारस्वत फारसें जुनें नाहीं.

३ **काळ्या लोकांच्या भाषांत**—गोंडी, कोलेरियन व दुसऱ्या क्षुल्लक भाषा मोडतात. ह्या भाषा मध्यप्रांत, छोटानागपूर, वगैरे ठिकाणीं मोडतात. त्यांचा विचार करण्यासारखे त्यांचें स्वतंत्र सारस्वत मुळींच नाहीं, व तें असेल तर तें वरील तांबड्या सारस्वताशीं त्यास काळेंसावळें करण्या इतकें बेमालूम मिलाफ पावलें आहे.

४ **पिवळ्या लोकांच्या भाषेंत**—तिबेटी, ब्रह्मी व चिनी ह्या भाषा मोडतात. या भाषांपैकीं तिबेटी भाषा तिबेटांत चालते, ब्रह्मी भाषा ब्रह्मदेशांत चालते व मिश्र भाषा हिंदुस्थानच्या उत्तर व ईशान्य भागांत चालतात.

५ **फिक्या लोकांच्या भाषा**—आपल्या या मायभूमींत स्वतंत्र अशा आढळत नाहींत इतका त्याचा वर्णसंकर बेमालूम झाला आहे.

टीका—ह्यावरून आमच्या हिंदू राष्ट्रपुरुषाचें डोकें फिकें पिवळे वर्णाचें आहे. त्याचें धड तांबुस आहे; त्याचे पाय काळे आहेत; त्याचा उजवा हात पांढरा व डावा हात पिंवळा आहे—असें सिद्ध झालें. त्यांचें हेंच डोकें प्राचीन काळीं अगदीं पांढरें फक्क होतें. पुढें त्यांत मिसळ तांबड्या रंगाची झाली तरी त्यास तेणें-करून कमीपणा आला नाहीं. पण त्यांत मिसळ पिवळ्या रंगाची झाल्याबरोबर तें फिकट रंगाचें झालें. त्याचें धड प्राचीन काळीं पांढरें होतें. त्यांत मिसळ तांबड्या रंगाची झाल्या-बरोबर तें तांबुस झालें. पुढें त्यांत मिसळ काळ्याची झाली. तेणेंकरून तें काळसर तांबुस झालें आहे. त्याचा उजवा हात पांढरा आहे तसा त्याचा डावा हातही होता. पण त्यांत पिवळ्याची मिसळ इतकी झाली कीं त्याचा तो हात उजव्या हाता-प्रमाणेंच कधीं पांढरा होता असा संशय घेण्यासही त्यांत जागा राहिली नाहीं. प्राचीन काळीं त्याचे पाय पांढरे असावे. त्यांत तांबड्या व विशेषेंकरून काळ्या रंगाची मिसळ अशी झाली कीं ते पक्के काळे होऊन पडले. ते इतके कीं त्यांच्या

काळ्या रंगांत कांहीं तांबड्या रंगाची झाक सांपडते पण त्यांत पांढऱ्या रंगाची छटा बिलकुल आढळत नाहीं.

अनुकार व अनुग्रह.—*भाषा व संस्कार यांत.—ब्राहुई लोक हे तांबड्या लोकांसारिखी भाषा बोलतात, पण ते वर्णानें पांढऱ्या लोकांसारिखे आहेत. यावरून रक्तांत कोणत्याही प्रकारचें मिश्रण न होतांही भाषा व संस्कार एका समाजांतून दुसऱ्या समाजांत संसर्गानें कसे जाऊं शकतात ? ह्याचें उत्तम स्पष्टीकरण होतें. ही गोष्ट ह्या बाबतींत लहान प्रमाणावर जशी झाली आहे तशी ती मूळ पांढऱ्या व अनुगृहीत तांबड्या व काळ्या लोकांच्या जमातींत मोठ्या प्रमाणावर झाली आहे. म्हणून पांढरे लोकांत त्यांची मूळची संस्कृत भाषा व वैदिक कर्मठपणाचे संस्कार नष्टप्राय झाले असतांही ती भाषा व ते संस्कार हल्लीं ह्या अनुगृहीत काळ्या तांबड्या लोकांच्या जमातींत जागत्या ज्योतीप्रमाणें वास करून आहेत. ते इतके कीं असला एखादा महत्वाचा शास्त्रनिर्णय किंवा वैदिक संस्कार करणें झाला तर त्यास त्यांतील एखादा कुप्पाशास्त्री किंवा एयंगार शोधून काढावा लागतो. ह्यास अपवाद, स्थळासंबंधें असेल तर तो फक्त एका काशीक्षेत्राचा असेल. पण त्यांतील तद्देशीय पण्डितांमध्यें नामांकित पण्डितांचा भरणा म्हटला म्हणजे ह्या अनुगृहीत दाक्षिणात्यांचाच आहे. कारण, हें दाक्षिणात्य आर्यधर्माच्या बाबतींत तरी जास्त जीवंत आहेत असें आम्हांस वाटत आहे, मग ते सोवळें ओंवळें वगैरे आचारांत पाहिजेत त्यापेक्षां राष्ट्रसंघटनेच्या दृष्टीनें फाजील आत्मघातकी कर्मठ ठरोत ! जसें,

---

* हिंदूच्या मुख्य अर्वाचीन भाषांचे वर्गीकरण इ. स. १९०१ तल्या खानेसुमारी प्रमाणें:—

१ पांढरे लोकांच्या,—

( मूळ )

१पश्चिमहिंदी४,००,००,००० २राजस्थानी१,००,००,००० ३पहाडी३१,००,०००

४गुजराथी९४,००,००० ५पंजाबी१,००,००,००० ६पूर्वहिंदी२,००,००,०००

७ काश्मिरी १०,००,००० ८कोहिस्थानी ३६. ९ लहंडा ३३,००,०००

१०सिंधी३४,००,००० ११मराठी१८,००,००० १२बिहारी३,००,००,०००

१३उरीय९६,००,०००. १४बंगाली४,००,००,००० १५आसामी१३,००,०००

२ तांबडे लोकांच्या—

१कानडी१,००,००,०००. २तेलगू२,००,००,०००. ३तामीळ१,००,००,०००

( अनुकृत )

४ मल्यालम् ६०,००,००० ५ ब्राहुई ४८,००,०००

( अनुकृत )

३ काळे लोकांच्या—

( अनुकृत )

१ गोंडी ११,००,००० २ किरकोळ १७,००,०००

मोपल्यांनीं *जबरीनें बाटविलेले नंबुरी ब्राह्मण हे इतके संघटनाशून्य कर्मठ आहेत कीं ते स्वरक्षणास नालायख आहेत व त्रावणकोरांतील वैकोम येथील उच्च वर्णाचे लोक देशकालवर्तमान समजून परधर्मीयांच्या खांद्याशीं खांदा राष्ट्रदृष्टीनें लावण्यास योग्य होण्यास आपल्या समाजांतील थिय्या नामक अस्पृश्यांस तेथील उच्च वर्णांनींच वापरण्याच्या रस्त्यानें नुस्ती जावयाची मोकळीक देण्यासही बिलकुल तयार नाहींत. हीं व्यंगें आम्ही प्रामाणिकपणानें कबूल करितों. कारण हे आमच्या समतेष्ट समाजाच्या आंगरख्याच्या अस्तर्णीतील केवळ सामाजिक निखारे होत !

टीप—आपल्या आर्यांच्या अनुग्रहाचा संस्कार ख्रिस्ती व मुसलमान यांप्रमाणें वैयक्तिक नसे तर तो एकदम जातीजमातीचा असे म्हणून तो अन्न व लग्न ह्यांत फार सोईचा असे; कारण त्यांत समान कुलशीलांचीं जोडपीं सहज तयार होत.

अशा ह्या मिश्र समाजाची संघटना वर्णशास्त्र दृष्ट्या सांप्रत कांहीही असो, पण ज्या समाजांत ऋग्वेद अवतीर्ण किंवा निर्माण झाला, तो तांबड्या, काळ्या व पिवळ्या लोकांच्या समाजाहून भिन्न होता. कारण त्यांच्या नीती व धर्म यांसंबंधें कल्पना इतक्या अगदीं निराळ्या आढळतात कीं हे तांबडे, काळे व पिवळे लोक त्यांतील पांढऱ्या लोकांपेक्षां मागसलेले दिसतात. मागें हें सांगितलेलें आठवत असेल कीं वैदिक पांढऱ्या लोकांचा समाज पितृप्रधान व पुरुषप्रधान असेः म्हणजे त्यांच्या घरावर अंमल म्हटला म्हणजे त्यांतील गृहपती यजमानाचा असे. तो असा कीं त्या गृहपतीचा अंमल त्या घरांतल्या अविभक्त कुटुंबापैकीं प्रत्येक इसमावर अगदीं बहुतेक एकमुखी चाले. त्याची बहुधा एक बायको असे व कधीं कधीं अनेक बायका असत, त्या त्याच्या तहाहयात सहधर्मचारिणी असत. पण तांबड्या लोकांच्या समाज असा नव्हताः तो मातृप्रधान असे. मि. एल. डी. बार्नेट हा आपल्या हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत असें म्हणतो कीं " त्यांच्यांत वैवाहिक संबंध नसत व ज्या ठिकाणीं ते असत, त्या ठिकाणीं ते अत्यंत ढिले व सहज तोडितां येण्यासारिखे असत, व म्हणून त्यांची परंपरा फक्त स्त्रीवंशाकडून शोधून काढितां

*ह्यांत पूर्वोक्त मोपले दहा हजार व नंबुरी तीस हजार आहेत. पण मोपले अत्यंत जहाल व नंबुरी अत्यंत मवाळ आहेत. म्हणून मोपल्यांनीं नंबुरीस जरजर करून बाटविलें आहे. त्यास देवलस्मृतीप्रमाणें संघटना व परिवर्तन करणें अत्यंत आवश्यक आहे. हा उपाय बाटविण्यावर रामबाण आहे असें महाराष्ट्रियांचें अनुभवास आलें आहे. याचा उपयोग मराठ्यांनीं वसई येथें पोर्तुगिजांस जिंकल्यावर त्यांच्या पेशव्यांनीं ह्या जबरीनें धर्मांतरित अनेक स्त्रियांस परत हिंदू करून घेतलें व तेव्हांपासून पोर्तुगिजांचा हा बाटविण्याचा सुळसुळाट तिकडील निर्मळ तीर्थाकडील अगदीं बंद पडला ! अशीच गोष्ट सिंधांतील देवलबंदरीं मुसलमानांसंबंधें होऊन गेली आहे. सारांश, जशास तसें केल्यावांचून समाजांत समता व संघटना (जूट) उत्पन्न होत नाहीं व तदाभावीं समाजाचें अस्तित्व व संरक्षण होत नाही हें उघड ठरतें.

येत असे." व याप्रमाणें वंशव्यवस्था सांप्रत पहावयाची असेल तर ती मलबारांतील फक्त नायर लोकांमध्यें सध्यां अवशिष्ट आहे व ती निसर्गसिद्ध आहे म्हणून तिकडील लोकांस तबिद्दल अभिमान असणें साहजिक आहे, कारण एखाद्या मुलाची आई कोण हें चटकन सांगणें जितकें सुकर असतें, तितका त्याचा बाप सांगणें नेहमीं सुकर नसतें, म्हणून पितृप्रधान कुटुंबव्यवस्थेपेक्षां मातृप्रधान कुटुंबव्यवस्था ते जास्त सशास्त्र मानितात. धर्मासंबंधेंही ह्या पांढऱ्या व तांबड्या लोकांच्या समाजांमध्यें मोठा विरोध असे. ह्या दोन्ही समाजांत देव दोन्ही लिंगी म्हणजे पुल्लिंगी व स्त्रीलिंगी असोत, पण पांढऱ्या लोकांत पुल्लिंगी देवांचें प्राबल्य आहे व तांबड्या लोकांत प्राबल्य म्हटलें म्हणजे स्त्रीलिंगी देवांचे आहे. पांढऱ्या लोकांच्या धर्मांत सगळ्याच गोष्टी चांगल्या आहेत असें नाहीं.त्यांत आतां नसो पण पूर्वी क्वचित नरबळी व अनेक वेळां पशुबळी ह्याची हिंसा आढळते. पण इतर बाबतींत त्यांची यज्ञाची पद्धती नांवें ठेवण्यासारिखी नसे. ती चांगली प्रतिष्ठित व लोकमान्य समजली जात असे. पण मि. एल. डी. बार्नेट म्हणतो कीं ( तांबड्या लोकांचा ) "धर्म अज्ञानमूलक, तिरस्करणीय, बीभत्स, व रुधिरपूर्ण असे. ज्या ज्या ठिकाणीं ह्या धर्माचें वर्चस्व असे, त्या त्या ठिकाणीं कालीमातेचें पूजन, नरबळी, लिंगपूजन, व अविहित शरीरसंबंध [ शिनाळपणा ] यांचा चालता काळ असे." व ह्याप्रमाणें धागडधिंगा पहावयाचा असेल तर तो पुण्याकडील जेजुरीच्या मुरल्यांमध्यें व कर्नाटकांतील भाविणींत सध्यां अवशिष्ट आहे, व हल्लीं लिंगपूजार्चनही कांहीं समजुतदार लोकांत चालतें. पण जेणेंकरून हिंदू धर्म खालावला, तो परिणाम सर्वस्वी ह्या तांबड्या व काळ्या लोकांच्या धर्माचा नाहीं. तो त्याचा खराबा तंत्रविधीनें केला आहे, मग तिचे गोडवे जस्टिस मि. बिड्रॉफ आपल्या शक्तिपूजेपर ग्रंथांत गावोत ! कारण ते त्यांच्या शाक्तपंथाच्या संस्कृत ग्रंथांच्या केवळ अभ्यासाचे गौरवपर आहेत व ते आपल्या राष्ट्राच्या हिताहिताच्या दृष्टीनें गाइलेले सुरांत नाहींत ! ही शाक्तविद्या आपल्या हिंदुस्थानच्या ईशान्येस जे पिवळे लोक आहेत त्यांच्यांतील आहे व तिचा पगडा हिंदू धर्मावर बसल्यापासून तो निस्तेज व भयंकर होऊन पडला आहे. तापिनि उपनिषदें व यामल तंत्र यांत--आम्नाय फट, हुम्, हिम्, खोम्, रुम्, रोम्, रौम्, अम् वगैरे अगणित शब्द आढळतात. ते शब्द शुद्ध अभियुक्त संस्कृत सारस्वतांत आढळत नाहींत. यावरून प्रथम नसो पण पुढें गौरवर्णलोकांवर गौरवर्णेतर लोकांची वरचढ किती झाली होती हें उघड दिसून येतें.

तंत्रशास्त्राचा वैदिक धर्मावर परिणाम-"वेदकालानंतर ब्राम्हणें अस्तित्वांत आलीं त्यावेळीं मंत्रशक्ति आहे ही समजूत उत्पन्न झाली. म्हणून निरनिराळ्या कर्मांचीं भिन्न भिन्न फळें सांगण्यांत आलीं. याच पायावर तंत्रकारांनीं निरनिराळ्या मंत्रांची उभारणी केली. वैदिकांसही हे मंत्र पटले. यामुळें वैदिक कर्माचरणांत अनेक तांत्रिक मंत्रांचा व देवतांचा समावेश करण्यांत आला. संध्येंतील आसनविधि, मुद्रा, अर्घ्य तसाच होमकुण्डविधि यांचा उगम तंत्रापासून झाला आहे. महारुद्र

वगैरे जें वैदिक कर्म त्यांतही तांत्रिक भाग आहे, आणि बलिदान हेंही तांत्रिक आहे. न्यास, यंत्रपूजन, ऱ्हं, ऱ्हीं, ऱ्हां, रं, क्रीं, वं, सं, हं, क्लीं, क्रूं, क्रौं, स्वं, कं, चं टं, धं वगैरे बीजाचा उच्चार करून देवाच्या मूर्तीत जीव भरण्याचा प्राणप्रतिष्ठा-विधि, भस्म व ताईत भारणें हीं सर्व वैदिकांनीं तंत्रांतून घेतलीं. कालभैरव, कपाल-भैरव, चंडभैरव व इतर कित्येक मंत्रशास्त्राच्या देवतांची पूजा आर्यांच्या देवालयांत व देव्हाऱ्यांत होऊं लागली. आर्यांनीं याप्रमाणें तंत्रमार्गाचा स्वीकार करण्याचें एक कारण असें दिसतें कीं प्राचीन काळीं विश्वाच्या उत्पत्तीसंबंधें विचार कित्येक पुरुष व प्रकृती ह्यांच्या संबंधानें तर्क केलेले होते. गीतेंत देखील ह्याचा उल्लेख आहे. तंत्रकारांनीं पुरुष हा शिव व प्रकृति ही शक्ति असें प्रतिपादन केलें. वेदांतील रुद्राच्या वर्णनाबरोबर रुद्राणी, भवानी वगैरे कित्येक स्त्रीवाचक शब्द प्रचारांत आले. या शब्दांस साजेल व जुळेल अशा रीतीनें शक्तीचें महात्म्य वाढविण्यांत आलें. कालेंकरून या देवी संबंधाचा भाग तंत्रकारांनीं महाभारता-सारख्या अत्यंत पूज्य मानिलेल्या ग्रंथांत घुसडून देऊन श्रीकृष्ण, युधिष्ठिर यांनीं देखील शक्तीस पूज्य मानिल्याचें दर्शविलें"—ऋग्वेदीकृत आर्यांच्या सणांचा इतिहास—पा. २७२

याप्रमाणें ही श्रुतिगंगा हिमालयापलीकडील स्वर्गांतून ( सुमेरुखंडांतून ) निघून जंबुद्वीपांत उपनिषद्‌हिमनगावरून उड्या टाकीत आली व ती पुराणें व तंत्रें यांचे दऱ्याखोऱ्यांत भरलेले अज्ञानाचे गोटे व चिखल यांस आपल्या कर्म, ज्ञान, व्यवहार व भक्ती या चार हातांनीं लोटीत सख्या! ज्ञानरत्नाकरामध्यें नवीन अद्वैत भूमी व प्रस्तर तयार करण्यास नेऊं लागली !

या ग्रंथास आधारभूत ग्रंथांची—यादी—

१ ऋग्वेद. २ श्रुतिबोध. ३ ऐतरेय उपनिषद्. ४ तैतिरीय उपनिषद्. ५ गीकीची जीऑलजी. ७ एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिका. ८ टेन्ट लाईफ इन सिबिरिया. ९ सिबिरिया व उत्तरध्रुवसमुद्र. १० भागवत. ११ टेस्टिमनी ऑफ रॉक्स. १२ धि इन्टेलेक्चुअल डेव्हलप्मेन्ट ऑफ युरप. १३ आर्टिक होम. १४ मुमुक्षू. १५ धि व्हिसिसिटयूडस ऑफ आर्यन सिव्हिलझेशन. १६ संस्कृत टेक्टस. १७ ऍंटिक्विटीज आफ इंडिया. १८ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इति-हास. १९ वेदिक इंडेक्स ऑफ नेमस ऍंड सबजेक्टस—डॉ. मॅकडोनेल. २० एन्शन्ट इंडिया—रॅप्सन—प्रायमर. २२ सहविचार. २३ नासिक ग्याझिटियर. २४ इंडिया व्हॉट इट कॅन टीच अस ? वगैरे.



# अर्थ-मधुकर अथवा प्राचीन-भूप्रकाश.

## प्रकरण दुसरें.

### भाग पहिला.

#### उपक्रम

(लक्षणें:-पृथ्वीचा अनादी नकाशा व राशिचित्रपट, पृथ्वींतील खंडें, देश, शहरें, नौकानयन, व्यापार, वसाहती वगैरेचीं मूलतत्वें.-१ प्राप्तव्य-धनंजय, २ प्रापक-वैश्य-व्यापारी, ३ काळ-अनादी ते इ. स. ८०० वर्षें, स्थळ-त्रैलोक्य.)

"An Ideal is an idea and an idea is a thought. But an Ideal is something more than a thought-it is a fixed thought, a fixed idea. This fixed idea must be one that guides conduct that shapes life, before we call it an Ideal; for his ideal is that fixed thought to which man conforms his life."-*Mrs. Annie Besant-Ideal P. 5.*

अर्थ.-प्राप्तव्य-ध्येय ही कल्पना असते व कल्पना हा एक विचार असतो. ह्या कल्पनेस आपण प्राप्तव्य म्हणण्यापूर्वीं ही ठाम कल्पना आपल्या वर्तनास मार्गदर्शक व आपलें चरित्र बनविणारी असली पाहिजे. कारण ज्या ठाम विचाराप्रमाणें एखादा मनुष्य आपलें चरित्र ठेवितो त्यास प्राप्तव्य असें म्हणतात.

Let it be understood that the writer is not responsible for the conclusions reached in these studies. The theory itself must be held responsible for them. Given an ancient map: given a series of pedigries, which are found to be geografical: given a number of tales; which though fragmentary and incomplete hang on both to the map and the pedegries: and the only question is to which conclusions do they lead. So long as the agrument is kept perspicuous and the materials used honestly, let it come to what it may.-*W. S. Blacket.*

अर्थ.-हें समजलेलें असू द्या कीं ह्या अभ्यासक्रमांत जीं अनुमानें निघतील त्याबद्दलची जबाबदारी ह्या लेखकावर नाहीं. त्याबद्दल झाडून सर्व जबाबदारी प्रत्यक्ष उपपत्तीवर ठेविली पाहिजे. जुना नकाशा दिला; राष्ट्रांतील वंशावळ्या भूगोलास धरून असतील तेवढ्या-क्रमानें-दिल्या. सदरहू नकाशा व वंशावळ्या यांस चिकटून असणाऱ्या कथा कितीही तुटक व अपूर्ण असल्या तरी त्याही दिल्या तर त्यापासून काय अनुमानें निघतील एवढाच प्रश्न मागें राहतो. जोंपर्यंत साधकबाधक प्रमाणें स्पष्ट राखिलीं आहेत, व मिळालेल्या माहितीचा प्रामाणिकपणानें विनियोग करण्यांत येत आहे तोंपर्यंत त्यांचा परिणाम काय होईल ह्याचा विचार करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

मागील भागांत पहिल्या प्रकरणाच्या उपसंहाराचें काम अटोपलें. आतां या भागांत प्राचीन भूमीचे वर्णनाचा उपक्रम देण्याचा विचार आहे.

झाडून सर्व व विशेषतः पाश्चात्य लोकांची व त्यांच्या तालमेंत तयार झालेल्या आमच्या लोकांची वहिवाट असें मानून चालण्याची आहे कीं मनुष्य प्राणी हा एकदां बाल्यावस्थेंत होता. पुराणकर्ते आपले व्यासवाल्मीकी सोडून परदेशचे लोकांच्या व विशेषेंकरून युरोपियन ग्रन्थातील गूढ लेखांचा झोक हा आढळतो कीं ह्या भूगोलावरील वास करणाऱ्या त्यांच्या वेळच्या खानदान—बडे—लोकांचे पूर्वज हीनदीन छोटे लोक होते. त्यांची आकृती लहान होती, व त्यांचे गुणधर्मही नेणत्या बालकांसारखे होते. हे क्षुद्र प्राणी पक्षांचें चिवचिवणें, माकडांचें कुरूकुरू करणें, व गाईचें हंबरणें—ऐकून डुक्रुञ् करणें बोलावयास शिकले. ते शिंप्यांच्या दुकानांची संस्था स्थापित होण्यापूर्वीं होऊन गेले, व ते सौंदर्य व सुख यांची प्राप्ती व्हावी म्हणून हरबर्ट स्पेन्सरप्रमाणें डोक्यावर मोरांच्या पिसांचे मुकूट व झाडांच्या सालींची कौपीन व वल्कलें धारण करीत असत—नंतर वाघांप्रमाणें ते वेलींच्या जाळ्यांत राहतां राहतां रायांत कांच्यादगडांच्या आवारांमध्यें गोफणगुंडे बाळगून राहूं लागले. शेवटीं, त्यांमध्यें एक अपूर्व विभूती उत्पन्न झाली व तिनें पशुपक्ष्यांस झाडांचीं फळें खातांना पाहून त्यावरून त्यांस त्यांनीं चाखलेलीं फळें खावयास शिकविलें. त्यांतील दुसऱ्या एका विभूतीनें एक निराळीच शक्कल काढिली—त्यानें सगळ्यांपुढें अघाडी मारून हरणासारख्या जंगली पशूस धरून त्याचें कातडें काढिलें व तें साफसूफ करून त्याचें मृगाजीन व व्याघ्राजीन तयार केलें. कालगत्या त्यांतील प्रमंथानें वणवा लावण्यास कारण होणाऱ्या लाकडांतील लाकडाप्रमाणें लाकडावर लाकूड घासून व गारगोटीवर गारगोटी आपटून विस्तव पेटविला व आपल्या अकलेचा खरोखर मूर्तिमंत उजेड पाडिला. ह्या प्रमंथाच्या मोठ्या शोधानंतर दुसरे कोणी लोकांनीं अधिक उण्या चतुराईची तीन दगड मांडून स्थालीपाक करण्याची किंवा हविष्यान्न शिजविण्याची युक्ती काढिली. शेवटीं त्या चिमुकल्या लोकांपैकीं एकानें पक्षांचीं घरटीं पाहून व त्यांवरून पानें व काठ्या जमवून पर्णकुटी बांधण्याची कला काढिली व त्यांत ते काठ्यावाले शेळ्यामेंढ्या बाळगणारे धनगर व गोपाळ व अखेरीस दण्डधारी वशिष्ठगौतमासारखे ऋषी म्हणून राहूं लागले, व त्या ऋष्याश्रमापासून खेडीं, कसबे व शहरें यांतले भाले व तिरकामठे बाळगणारे पाटील, राजे व साम्राट या लोकनायकाचें अनुयायांची परंपरा सर्व देशभर जाळ्यांप्रमाणें पसरलेलीं घरें, गढ्या व किल्ले यांत सरंजामी पद्धतीनें राहूं लागली !

ह्या मनुष्याच्या बाल्यावस्थेच्या उपपत्तीविरुद्ध अशी एक विलक्षण गोष्ट आढळते कीं ह्या पृथ्वीच्या तलावर जे अत्यंत जुने इमारतींचे अवशिष्ट भाग आहेत, ते सगळ्यांत मोठे, अती टिकाऊ, व अत्यंत कुशलतेनें बांधिलेले आढतात. उदाहरणार्थ, आपलीं वैदिक व बौद्ध लोकांचीं जागोजाग दृष्टीस पडणारीं देवळें व दिपमाळी, लेणीं व स्तूप, असिरियांतील भुयारांतले वाडे, व मिश्र देशां-

तील ( ईजिप्त ) मनोऱ्यांचीं थडगीं पहा. मिश्र देशांतील चेप येथील पिरमिडाची तुलना मेक्सीकोंतील त्याहूनही मोठ्या चोलूल येथील पिरामिडांशीं करा. आणखीं, दक्षिण महासागरांतील तिहिती बेटांतील मोराई नामक मेरू पर्वताचें घडून बेमालूम बसविलेल्या चिऱ्यांचें चित्र अवलोकन करा. जुन्यापुराण्या लोकांनीं अनेक देशांत अनेक पुतळे घडून उभे केले आहेत. यांच्या संबंधें पाहतां हीच गोष्ट आढळते. त्यांत जे जुन्यांतील जुने आहेत, ते मोठे जगडव्याळ आहेत. उदाहरणार्थ, आपले दक्षिणेमध्यें कानड्यांत विजयानगरजवळील जैन संस्थेंत जिन देवाची मूर्ती आहे. ती ७५ फूट उंच आहे असें मागें जैनाच्या भरलेल्या एका यात्रेच्या वर्णनांत वाचल्याचें आठवतें. ग्रीस देशामध्यें ( अयोनिया ) आलिंपिक द्यौस्पितर [ ज्युपिटर ] याची मूर्ती आहे. तीही अशीच ७५ फूट उंच आहे असें म्हणतात.

रामायण, महाभारत वगैरे पूर्वोक्त अठरा पुराणें वाल्मीकी व व्यास आदीकरून कविवर्यांनीं रचिलीं आहेत. त्यांत आशिया, आफ्रिका, व अमेरिका या खंडत्रयाचें विवरण त्या काळास अनुसरून आहे. उदाहरणार्थ, त्यांत व्यासांनीं हिमालया-पलीकडील उत्तर आर्यावर्तांतलें आठवणारें त्रिविष्टप, गोबी, गंधमादन, मेरू, इंद्रस्थान वगैरेचें वर्णन भारतांत व वायुपुराणांत दिलेलें आहे. तें कालान्तरानें दुर्बोध होऊन पडल्यामुळें त्याबद्दल पाहिजे त्यास पाहिजे तें प्रतिपादन करण्यास फावलें आहे. तें इतकें कीं नुकत्याच होऊन गेलेल्या इंग्लीश-जर्मन युद्धांत जर्मनीनें विमानें, मोहनास्त्र, वायवास्त्र, वगैरे अस्त्रें इकडील संस्कृत पुराणांतील अगस्त्य संहितेंतील ( आमचा लेख-भारतीय विमानें-म्हणून उद्यमांत पहा ) चाणक्याचे अर्थशास्त्रांतील वगैरे वर्णनाबरहुकूम करीतोंपर्यंत त्यांत वर्णिलेलीं विमानें व अस्त्रें ज्याप्रमाणें अर्वाचीन पंडितंमन्य मॉरिससारखे शालोपयोगी इतिहासकार हे काल्पनिक ऊर्फ खोटें आहेत असें बिनधास्त म्हणत असत. त्याप्रमाणें त्यांत दिलेलें त्रिभुवनाचें वर्णन काल्पनीक ऊर्फ खोटें आहे असें बिन-धास्त म्हणत असत. त्यांतील एक भुवन जें आशिया व युरोप म्हणून आहे, त्यांत पूर्वोक्त पांढऱ्या व पिंवळ्या लोकांचें वर्णन आहे. तें अगदीं त्रोटक असून अत्यंत अव्यवस्थित आहे. त्यांतील दुसरें भुवन जें आफ्रिका यांत अत्यंत जुने-पुराणे व घट्टेकट्टे काळे असंख्यात लोक आहेत. त्यांचा इतिहास आजतागाईत आमच्या शिवपुराणकार व्यासाशिवाय कोणी लिहिलेला नाहीं. त्यांतील तिसरें भुवन जें अमेरिका ह्याचा मांगमूस पाश्चात्यांस नव्हता, तर त्याचा इतिहास व भूगोलवर्णन त्यांच्याशिवाय दुसरा कोण लिहूं शकणार ! असें झाडून सर्वांचें निरपवाद मत झालेलें आहे ! त्याचेंही वर्णन आमचें रामायण, भारत, भागवत वगैरे पुराणांत थोडें बहुत आहे. मुळींच नाहीं असें नाहीं. पण त्याची पर्वा कोण करितो ? चढतीपडती ही येथील प्रत्येक वस्तुमात्रास लागलेली आहे. त्याकडे दुर्लक्ष करून सुपांतल्यानें हंसून जात्यांतल्याचें दुःख द्विगुणीत करावें ? किंवा कींव करून तें कमी करण्यास झटावें बरें ? पण पवित्र सरस्वतिमंदिराच्या विद्या-

पीठावर मोठ्या दिमाखानें उभें राहून सत्तेच्या व पैशाच्या जोरावर एखादा सद-गृहस्थ पूर्वेकडील लोकांचे देव खोटे, त्यांचे धर्म खोटे, त्यांच्या धर्माचे ग्रंथ खोटे. त्यांचे आचार खोटे, त्यांचे विचार खोटे, त्यांचें सर्व कांहीं खोटें असें दिवसां-ढवळ्या चारचौघांत जीभ विटाळून म्हणूं लागला तर त्याची जीभ कोण धरूं शकेल ? कोणी नाहीं !

पण न्यायाची गोष्ट ऐकण्यासारखें ज्याचें डोकें ठिकाणावर असेल, त्यास सांगणें कीं त्या परमेश्वराला महान वस्तूचें जेवढें महत्व असेल, तेवढेंच त्यास लहान वस्तूचें आहे. त्यास नेपाळच्या किंवा म्हैसूरच्या जंगलांत इकडून तिकडे संचार करणाऱ्या मदोन्मत्त हत्तीचें महत्व जेवढें आहे तेवढेंच रानावनांतील फुलांवर भोंभों करीत फिरणाऱ्या एखाद्या हलक्या सलक्या फुलपाखराचेंही आहे, तेव्हां त्यासंबंधें नकट्या नाकानें कांदे सोलीत बसण्याचा अधिकार कोणाही मर्त्यास नाहीं. पण आपल्या अधिकारक्षेत्राबाहेरचे धंदे आंगावर घेण्यानें धाडस जे करीत असतील, त्यांस मोडकीं मंदिरें, देवळें, लेणी, स्तूप, दिपमाळा, जमिनींतील गडप झालेलीं शहरें, निर्जन अरण्यांतील मनोरे व गगनचुंबित मूर्ती जणूं ओरओरडून सांगत आहेत कीं 'जयानें ही सृष्टी निर्मियली सर्व। तयासि तो गर्व कामा नये.' त्या अनंताची सत्ता त्या सृष्टीवरून अद्याप कोणास कमी करितां आली नाहीं. ह्या सृष्टींतील झाडून सर्व लोक अगदीं सरस-कट गचाळ व पोरकट करून ठेविलेले आहेत असें नाहीं. त्यांतील अनेक लोक जसे हल्लीं आढतात तसे त्यांचे पूर्वज होतेच असें मानण्याचें कारण नाहीं. कारण त्यांचे जे इतिहास हल्लीं उपलब्ध आहेत ते देखील त्यांबद्दल निराळीच साक्ष देत आहेत.

पण हरयेक तत्वज्ञ व जिज्ञासू विद्वान कबूल करील कीं सगळ्या मनुष्य-जातीचा व त्या मनुष्य जातींतील मुख्य आमच्या प्राचीन आर्य जमातीचा इतिहास जसा काळजीपूर्वक शोधून काढावयास हवा तसा अजून शोधून तयार केलेला नाहीं. त्यावर अज्ञेयाचे ढग जशाचे तसे आजतागाईत कायम आहेत. पाश्चात्य लोकांत ग्रीस व इताली ह्या देशांच्या जुन्या इतिहासाला प्राचीन इतिहास म्हणण्याची वहिवाट आहे. पण त्यांत त्यांचें प्राचीनत्व कोठें वसत आहे हें त्यांचें त्यासच ठाऊक आहे. त्यांस सुव्यवस्थित इतिहास तरी म्हणण्याला त्यांत त्याची व्यवस्था कोठें आहे ? हेंही कळत नाहीं. कारण त्यांची कोणी व्यवस्था लावीन म्हटलें तर तसें करण्याची मुळींच सोय नाहीं. आमच्या प्राचीन इतिहासाला ज्यांकरितां नांवें ठेवितात, त्याच गोष्टी वरील पश्चात्य पंडितांनीं नांवाजलेल्या व आमच्या दक्षिणोत्तर आर्यावर्ताच्या मानानें अत्यंत अर्वाचीन इतिहासांत भरपूर आढळतात. होमर, हिरोडोटस व डिओडोरस यांच्या इतिहासाच्या ग्रंथांत वास्त-विक गोष्टींचें अवास्तव गोष्टींशीं आमच्या जुन्या रामायण व महाभारत या इतिहासा-प्रमाणेंच असें संमिश्रण झालेलें आढळतें कीं 'उडदामाजी काळेंगोरें । काय निवडावें निवडणारें' असें साफ म्हणावें लागतें, मग आमच्या त्याहूनही प्राचीन

संस्कृत सारस्वतास एवढें नांव ठेवावयास कशास हवें ? कारण तें बोलून चालून तसेंच अनादी आहे. कदाचित दुसऱ्याच्या घरगुती मालास सडका म्हणून त्यास खरोखरीच सडावयास लावून आपला त्या सारखाच सडका माल दुसऱ्यास विकत घ्यावयास लावण्याचा हल्लींच्या गोडबोल्या व्यापाऱ्यांसारखा अपूर्व व अजब कावा तर नसेल ना !

पण असें कोणी म्हणतील कीं जगाचे इतिहास व भूगोल शोधून काढून वाढविणें इष्ट आहे, पण त्यास लागणारें साहित्य कोठें आहे ? पण ही मोठी चूक आहे. संस्कृत, ग्रीक व रोमन सारस्वताचे अशोधित ग्रंथांचीं ओझ्यांच्या ओझीं पडलीं आहेत. प्राचीन काळीं जीं गाणीं, वंशावळ्या, व दंतकथा भट, भाट वगैरे लोकांनीं निर्माण केल्या, त्याचा वारसा आश्रमांतील ऋषी, मठांतील महंत, लेण्यांतील स्थविर, धामांतील जोगी, तीर्थांवरील भटभिक्षुक वगैरेंस परंपरया मिळत आला. ते आपल्या मुलांस व चेल्यांस एका प्रकारचें विशेष शिक्षण देऊन त्यांस सणावारीं देवळांत, मंदिरांत, तीर्थांवर, चावडीवर व दरबारांत त्यांच्या कथा व पुराणें तालसुरावर निरूपण करण्यास तरबेज करीत असत. त्या कथा व तीं पुराणें त्यांस तोंडपाठ करावीं लागत असत. पण जेव्हां अक्षरचित्रलिपी उत्पन्न झाली तेव्हां त्यांनीं विटा, दगड, झाडांचीं पानें, चर्मपत्रें, ताम्रपत्रें व कागद यांवर ज्ञानाचें भांडार नोंदून टाकण्यांत आपली शिकस्त केली. त्यांतील जुन्या गोष्टींच्या कपट्यान कपट्याचें धन डोळ्यांत तेल घालून नागोबासारिखें रक्षिलें आहे. कांहीं काळ गेल्यावर ते जमविलेले लेख इकडील मोठमोठ्या पोथ्या पुस्तकांत उतरून घेऊन त्यांवर तद्बोधक वेलबुट्टी व चित्रें रेखाटण्यांत आलीं आहेत.

त्या प्राचीन काळीं त्या जमविलेल्या कथा व पुराणें फक्त लेखणीनेंच लिहून काढून अजरामर करीत; एवढेंच नाहीं तर तीं कलमानेंही चितारूनही अजरामर करीत. असले कलमबहादर लोक ऐतिहासिक कथा व त्यांतील नायकांचीं चरित्रें यांचें रूपरेखन चित्रांनीं करीत. म्हणून या आपल्या मायभूमींत तर काय पण झाडून सर्व दुनियेभर त्रिखंडांत अगणित चित्रें लोकांच्या संग्रहीं पडलेलीं आहेत. प्रत्येक पोथीपुस्तकावर मोठमोठ्या दंतकथांच्या देखाव्यांचीं चित्रें काढून त्यांस शोभा आणिलेली आढळते. हें सांगितल्यास कोणास खोटें वाटेल कीं प्रत्येक धातूचे भांड्यावर तर काय पण चिनीमातीच्या भांड्यांवरही एखादी जगजाहीर ऐतिहासिक कथा चितारून काढण्याची संधी त्यांनीं वायां जाऊं दिलेली नाहीं. याप्रमाणेंच आवडते ताईत, व पेट्या यांवरील नक्षी चर्मपत्रावर घेऊन त्यास स्थूलस्वरूप देण्यांत आलें व ती नक्षी देवळें, मंदिरें व वाडे त्यांचे दर्शनीभाग अलंकृत करण्यास योजण्यांत आली.

त्यांतही एखादा हरीचा लाल असें म्हणणारा निघेल कीं प्राचीन इतिहास जर अशा चित्रांच्या व दंतकथांच्या रूपानेंच फक्त परंपरया आले असतील तर ते तसेच त्या स्थितींत राहूं दिलेले बरे ! पण एखादें काम कठीण असेल म्हणून तें करण्यास न धजावण्याचा हा काळ नव्हे. हल्लीं मनुष्य इतका चतुर व धूर्त होऊन बसला

आहे कीं त्याला कोणतीही गोष्ट अशक्य कोटींतील राहिली नाहीं. रसायनशास्त्रज्ञांनीं रसायनशालांस सृष्टींत कोणकोणतीं तत्वें आहेत? हें गूढ उलगडून टाकण्यास लाविलें आहे. छायाचित्रकारांनीं सूर्याकडून कलमबहाद्दराचें काम चोपून घेणें चालविलें आहे. पूर्वेकडील देशाची पश्चिमेकडील देशांशीं सांगड घालून जलस्थल व आकाश यांत संचार करणाऱ्या आगबोटी, आगगाड्य, विमानें वगैरे सारख्या वहनांच्या मालकांनीं स्थळ, व काळ यांचीं दूरपणाची ओरड कोणास राहूं दिली नाहीं. ग्रहांच्या गती तीव्र प्रभावाच्या दुर्बिणींनीं सूक्ष्म रीतीनें वर्तवून ज्योतिर्विदांनीं त्यांचीं वजनें काढून त्यांचीं वजनें काढून ठेविलीं आहेत. कोशाच्या सहाय्याशिवाय झाडून सर्व भाषा व बाणाकार लिपी यांचें वाचन तज्ञांनीं सुकर केलें आहे. तर त्यापेक्षां का हे सारस्वताचे शोध जास्त अवघड समजावयाचे?

हे सारस्वतांतील अशक्य वाटणारे शोध करण्यास फक्त इतिहासकारांचीच काय ती मती कुंठित होऊन पडावी काय? हिंदुस्थान, इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी ह्या देशांतील झाडून सर्व इतिहासज्ञ नालायखांच्या मालिकेंत गोविलें जावे काय? यच्चयावत विद्यापीठाधिपतींस असें कबूल करण्यास लागावें काय? कीं आपल्यामध्यें असा एकही मनुष्य नाहीं कीं जो आपल्या अप्रबुद्ध म्हटलेल्या पूर्वजांनीं आपल्या संततीकरितां ठेऊन दिलेलीं गूढ कोडीं व वचनें विशद करूं शकतो. न्यायपीठांतल्या खटल्यांतील कोड्यांपेक्षां पुराणांतील कोडीं जास्त दुर्बोध, गुंतागुंतीचीं व मन घोटाळविणारीं नसतात; पण इतिहासांतील प्रोफेसर म्हणवून घेणारांनीं खटल्यांतील शोध करणाऱ्या पोलिसापेक्षां आपल्यास नादान ठरवून घ्यावें काय?

एखाद्याला असें वाटेल कीं इतिहासाच्या रेखलेपणाचा प्रश्न उपस्थित करणेंच मुळीं अनवश्यक आहे. आपल्या ऋषिवर्यांनीं इतिहासाच्या ज्या कल्पना मागें ठेविल्या आहेत त्याच शिक्षणास पुऱ्या आहेत. अशी वस्तुस्थिती असेल तर जुन्या उपपत्तींत ढवळाढवळ करणें गैर ठरेल. अज्ञानांत सुख असेल तर ज्ञानी होणें हा मूर्खपणा ठरेल. पण हें अज्ञानाचें युग नाहीं, तें युग कधींच गेलें गतलें आहे. चोहोंकडे कै. नामदार गोखल्यांस इष्ट असलेलीं 'फ्रीस्कुलें' स्थापन होऊन 'फ्री लायब्रऱ्या' स्थापन होत आहेत. पाठशाळांतील कांहीं परीक्षांचें शिक्षण सामान्य शाळांत चालू झालें आहे, व विद्यापीठांतील लेक्चरें (व्याख्यानें) शहरांतून सुरू झालीं आहेत. ज्याला विचार करितां येत नाहीं अशा अविद्वान माणसास सरकारदरबारीं व कोर्टकचेऱ्यांत व लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत व स्टेटस काउन्सीलें व मुनिसिपल बोर्डस व लोकलबोर्डस यांमध्यें बहुतेक मज्जाव करण्यांत आला आहे. एचओजी हॉग म्हणजे डुकर हा पूर्वींच्या रूढीप्रमाणें भ्रष्ट करणारा म्हणून समजला जाणारा शब्द शेख हुसेन आपल्या अहंमद मुलास आपल्या बुटाच्या दुकानामागें बसून घोकूं देतो व ज्यास पोपो क्याटो पेटल हें कोठें व काय आहे? हें सांगतां येत नाहीं त्यास दहाबारा रुपयांची मास्तरची जागा मिळत नाहीं.




**पृथ्वीचा अनादी नकाशा**



**बाबिलोनियन लोकांचा नकाशा**
**(इ. स. पू. ८००)**

A 5060–Lakshmi Art, Bombay 8

इतिहासाच्या शोधास साधनांची अडचण रा. राजवाड्यांसारखी इच्छा आहे त्यास पडत नाहीं. तर त्यांस अडचण कशाची पडते ? म्हणून म्हणाल तर सांगणें कीं तें साहित्य ज्या कोड्यांच्या रूपांत आहे, त्यांच्या उलगड्यांची पडते. कारण अर्वाचीन लोकांस दिलखुलासा आवडतो, पण प्राचीन लोकांस दिलकुचराई आवडत असे. यास प्रमाण—॥ गुप्ता वीर्यवती विद्या ॥ निर्वीर्या च प्रकाशिता—योगतत्वांमृत—हल्लीं येथील शाळा नामदार परांजपे यांनीं अस्पृश्यांसुद्धां सर्व जातीच्या लोकांस खुल्या केलेल्या आहेत, व त्यांचें प्राथमिक शिक्षण घेण्यास प्रत्येक मुलामुलीस द्वार मोकळें करून ठेविलें आहे. प्राचीन काळीं आपले गुरुकुलांतील ऋषी रानावनांतील आपल्या एकान्तांतील आश्रमांत आपल्या छात्रवर्गासह राहत असत. ते आपल्या अन्तेवासी चेल्यास सज्ञान करीत असत. पण ते तदितरांसंबंधें तसली खटपट करीत नसत. त्यांचें शिक्षण दोन प्रकारचें असे. ते आपल्या आश्रमांतील लोकांस जें शिक्षण द्यावयाचें तें तें अंतरंगी म्हणून देत व बाहेरच्या लोकांस जें शिक्षण द्यावयाचें, तें ते बहिरंगी देत. कांहीं लाडक्या लोकांशिवायकरून इतरांस ते इतिहास कोड्यांच्या रूपानें शिकवीत व देवांस गौप्यगोपन आवडतें असें म्हणून ते त्यांचा अर्थ मोठ्या चतुराईनें छपवून ठेवीत. पुराणें हीं अशा ऐतिहासिक गूढ कोड्यांचा संग्रह आहे. असल्या इतिहासांत मोठ्या युक्तीनें कांहीं कल्पित कथा गोविलेल्या आहेत—म्हणजे त्या कथा असत्य आहेत असा अर्थ यांतील घ्यावयाचा नाहीं. तर त्यांचा अर्थ काय घ्यावयाचा म्हणून पुसाल तर सांगणें कीं त्या कथांत गूढ तत्त्वार्थ अशा चतुराईनें भरून ठेविला आहे कीं त्यांतील अभिप्रेतार्थ शोधून काढितांना मोठ्या मीमी म्हणविण्या बृहस्पतींचीही अक्कल गुंग होऊन जावी.

अलीकडील सारस्वताची व तशीच त्याच्या शिक्षणाची पद्धत आमूलाग्र बदलली आहे. प्राचीन काळीं रामायण, महाभारत आदिक ज्या संस्कृत पुराणांच मोठा बोलबाला अगदीं निरक्षर लहानथोरांतही निदान रामविजय व पांडवप्रताप यांच्या तरी रूपानें असे, त्यांचा तिटकारा अलीकडचे प्रोफेसर व शिक्षक करितात. ते स्वतः त्या पुराणांचा अभ्यास करीत नाहींत तर नाहींत, पण त्यांचा अभ्यास त्यांच्या शिष्यांनीं केला तर त्यांत त्यांचें काय बिघडतें ? पण मौज अशी कीं ते आपल्या विद्यार्थ्यांस तीं शिकण्याची संधीच राहूं देत नाहींत. त्यांस हा गूढ इतिहास शिकण्यापेक्षां कोणताही इतिहास न शिकणें बरें वाटतें, मग तो वस्तुतः आपल्या शिवाजी व बाजिराव ह्या मुत्सदी व योध्या गड्यांस कितीही स्वराष्ट्रोद्धारक म्हणून अनुभवास आला असो. म्हणून ते असल्या इतिहासांचीं पुस्तकें विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत अगदीं शिरूं देत नाहींत. ह्याचा परिणाम काय होतो ? म्हणून पुसाल तर सांगणें कीं ते मनुष्याच्या अनादी अमर्याद प्राचीन इतिहासाचा अगदीं आमूलाग्र नायनाट करून टाकितात. कारण असल्या गूढ कोड्यांशिवाय इतर कोणत्याही प्रकारें ह्या वेळच्या इतिहासाचें ज्ञान मिळविण्याचें एकही साधन आपल्या पूर्वजांनीं ठेविलें नसल्यामुळें त्यांच्या

वंशजांतील कोणास त्या महान भूत काळाचें ज्ञान करून घेण्याची इच्छा असेल तर ते त्याचा कायमचा हिरमोड करून टाकितात.

गूढ इतिहासाच्या शोधाचें हें स्तुत्य कृत्य कोणास करावयाचें असेल तर त्यांस त्या पूर्वोक्त पुराणांबद्दल जो कांहीं तिटकारा वाटत असेल तो झाडून सर्व टाकून दिला पाहिजे, व तीं पुराणें म्हणजे मूर्तिमंत शिमगा म्हणून न समजतां ते दुनियेचे हरवलेले इतिहास होत असें निखालस कबूल केलें पाहिजे. नंतर त्या पुराणांचा अभ्यास मनापासून व मान मोडून करून त्यांतील जें कोडें सांपडलें असेल त्याच्या तपशिलाचें वर्गीकरण व व्यवस्था केली पाहिजे, व त्यांत जे नायक असतील त्यांच्या मूलस्थलांचा पत्ता काढून त्यांतील गूढ वचनें, भूगोलवर्णनसंबंधीं कोडीं व प्राणिगुणधर्मासंबंधीं घोटाळे जे असतील त्यांचें स्पष्टीकरण करण्यास शिकलें पाहिजे. जुने दगडांवरील लेख, ताम्रपट, गैरमाहित बाणाकार लिपीसारख्या लिपींत लिहिलेले लेख, व अनेक हातांच्या व डोक्यांच्या मूर्ती यांस आपले स्वतःचे वृत्तान्त कथन करितां येत नाहींत. त्यांच्या इतिहासाचा उगम शोधून काढण्यास त्यांबरोबर त्यांच्या दन्तकथा मिळविलेल्या पाहिजेत. त्या दंतकथा त्या आकृतींच्या पडझडीस जोडिल्यानें व त्यासंबंधीं स्वाभाविक अनुमानें निघतील तीं काढिल्यानें प्राचीन काळच्या गूढ इतिहासांचा शोध लावितां येईल.

असा इतिहास जुळला कीं त्या नादान म्हटलेल्या पौराणिक इतिहासास महत्व चढेल. तें इतकें कीं तितकें महत्व आपल्या सारस्वतांतील दुसऱ्या कोणत्याही भागास नसेल. ह्या पौराणिक इतिहासांत जुने देश व साम्राज्यें यांची नांवें सांपडतील. त्यांत मोठमोठ्या साम्राज्याच्या उदयास्तास जे लोकनायक कारण झाले असतील ते पहावयास सांपडतील. ज्या युद्धांच्या योगानें त्रिभुवनांतील भूमीची नवीन वांटणी झाली, त्यांत ज्या राजांनीं व देवांनीं नांवलौकिक संपादन केला त्यांच्या स्थळांचे पत्ते त्यांतील नकाशांत कायम करितां येतील. त्यावरून निरनिराळ्या राष्ट्रांच्या निशाणावर अमुक जनावराचें वगैरे चिन्ह कां असतें हें ठरवितां येईल. त्या नोंदवहीवरून दूरदूरच्या देशचे निरनिराळ्या जातींचें लोक महासागरावरून एका देशांत येऊन त्यांची एक मोठी जमात कशी बनली ? हें समजेल.

पुराणांतील नायक व देव यांचें कधीं कधीं रूपान्तर झालें व तें जनावरें यांत करण्यांत आलें आहे. म्हणून त्यांच्या पुढील वंशजांनीं त्या नायकांस व देवांस एखादा सृष्ट चमत्कार व अंतिम ध्येयें याचें रूप देऊन ठेविलें तर त्यांत कांहीं गैर होईल असें नाही. पण ते मृताचे सजीव झाले तर ज्या देवाधिदेव इंद्राच्या पाठीमागें बायका व पोरें यांचें लटांबर लावून ठेविलें आहे त्याचें रूपान्तर गर्जना करणाऱ्या सविद्युन्मेघांत झालेलें पाहून त्यांस पोट धरधरून हसूं येईल !

हें कोणीही तावडतोब कबूल करील कीं जुन्या जगांतील नुस्तीं गूढ पुराणें घेऊन आपल्या विश्वाचा विश्वनीय इतिहास कोणीही रचीन म्हटलें तर तें काम त्याचे हातून तडीस जाणार नाहीं. ह्या गूढ कोड्यांबरोबर त्यांचा खुलासा करणारीं

चित्रें व नकाशे असत. ते त्यांच्या बरोबर वापरले पाहिजेत. उदाहरणार्थ, राशिचक्राचे नकाशे म्हटले म्हणजे ते ह्या व्यवस्थेपैकींच आहेत. पुराणांतील कोड्यांत जी परिभाषा वापरली आहे तीच त्या नकाशांत वापरून ठेविली असल्यामुळें एखाद्या दन्तकथेंतील ऐतिहासिक गोष्ट कोणत्या देशांत कोणत्या स्थळीं घडली हें त्यावरून सहज व अनायासें ठरवितां येतें. पुराणाबरोबर नकाशा नीट पसरून ठेविला नाहीं तर त्या पुराणांचा उपयोग ऐतिहासिक दृष्टीनें करणें अगदीं अशक्य होईल, पण त्याचें सहाय्य असलें तर कोणताही बुद्धिवान व मेहनती शोधक मानवजातीचा इतिहासाचा हा छडा लावूं शकेल.

---

# भाग दुसरा.

## पृथ्वीचा अनादी नकाशा.

### खंडाची ओळख.

—:*:—

"In 1-117-5 the sun is described as sleeping in the lap of *Nir-riti*" and dwelling in darkness; while in 1-164.-32 and 33, the sun is said to have travelled in the interior of heaven and earth and finally gone into *Nir-riti*, or as Prof. Max Muller renders it, 'the exodus in the west.' Now, in 10-114.-2, there are three *Nir-ritis* mentioned, evidently corresponding to the three earths and three heavens; and in 10-161-2, the lap of *Nir-riti* is identified with the region of death. Pururavas is again said (10-95-14) to have gone to the distant region (param parāvatam) and there made his bed on the lap of *Nir-riti*; while the Maruts are discribed as *mounting up* to the firmament from the bottomless *Nir-riti* in 7-58-1. All these passages taken together show that *Nir-riti*, or the land of dissolution and death, commenced in the west, that the sun lying in darkness travelled through the distant region (parāvat) and eventually rose in the east from the lap of *Nir-riti*, and the whole of this movement was placed not in the upper heaven, but on the other side of the vault through which the sun travelled before he entered into *Nir-riti*. In other words, the *Nir-riti* extended below the three earths is expressly mentioned in the Rig-Veda, the three *Nir-ritis* must be understood to mean the three regions below the earth corresponding to the threefold division of the earth or of the heaven above it. Zimmer is, therefore, correct in stating that the sun moved through the *rajas* below the earth during night and that the Vedic poets know of this nether rajas.-The Artic Home in the Vedas.-*Mr. B. G. Tilak-P. 261-62.*

अर्थः—१-११७-५ या ऋग्वेदाच्या ऋचेंत सूर्य निर्ऋतीच्या मांडीवर निजणारा व काळोखांत राहणारा आहे; म्हणून वर्णन आहे. व १-१६४-३२ व ३३ या ऋचांत सूर्यानें पृथ्वी व आकाश यांच्या मध्यंतरी प्रवास करून शेवटीं निर्ऋतींत अथवा गुरुवर्य मॅक्स म्यूलर याच्या अर्थाप्रमाणें पश्चिम दिशेस गमन केलें. आतां १०-११४-२ या ऋचेंत तीन निर्ऋतींचा उल्लेख आहे. अर्थात, तो तीन पृथ्वी व तीन आकाशें यांस अनुसरून आहे, व १०-१६१-२ या ऋचेंत निर्ऋतीची मांडी म्हणजे यमलोक असें म्हटलें आहे. आणखी पुरुरव्यानें ( १०-९५-१४ ) ( परम परावतम् ) दूरच्या प्रदेशांत जाऊन निर्ऋतीच्या मांडीवर शयन केलें असें म्हटलें आहे, व तो ७-५८-१ मध्यें अगाध निर्ऋतीपासून आकाशांत चढून जातो असें वर्णन आहे. हीं सर्व वाक्यें एकत्र करून विचार केला असतां असें दिसतें कीं निर्ऋती अथवा वियोगाचा व मृत्यूचा प्रदेश पश्चिमेस लागतो, सूर्य काळोखांत राहून दूरच्या प्रदेशांतून ( परावत ) प्रवास करितो व शेवटीं पूर्वेस निर्ऋतीच्या मांडीवरून उठून येतो व सूर्य निर्ऋतींत प्रवेश करण्यापूर्वीं ज्या प्रदेशांतून प्रवास करितो त्या प्रदेशाच्या ( कटाह ) दुसऱ्या बाजूस हीं सर्व हालचाल होते, ती वर आकाशांत होत नाहीं. ह्मणजे निर्ऋती तीन पृथ्वीखालीं पसरली आहे असें ऋग्वेदांत स्पष्ट म्हटलें आहे. तीन निर्ऋती म्हणजे पृथ्वीचे अथवा तीवरील आकाशाचे तीन विभागांस अनुसरून पृथ्वीखालील तीन प्रदेश होत. यावरून झिमरचें असें म्हणणें बरोबर दिसतें कीं सूर्य रात्रीं पृथ्वीखालील रजांतून प्रवास करितो व वैदिक कवींस त्या रजोलोकाची माहिती होती.

"Please how many years ago exactly did its owner live? M. Cartailhac, a great savant when lecturing upon the pre-historic drawings found in the French and Spanish caves replied "Perhaps not less than 6,000 years ago and not more than 250,000"–Anthropology–P. 24–*R. R. Marett.*

अर्थः—त्या चित्रांचा मालक नक्की किती वर्षांपूर्वीं घेऊन गेला ? एवढें कृपा करून सांगा–असें कोणी श्रोत्यानें म्हटलें असतां फ्रान्स व स्पेन ह्या देशांतील गुहांत सांपडलेल्या इतिहासाच्या पूर्वींच्या चित्रासंबंधें व्याख्यान देत असणाऱ्या एम कार्टेलहक नांवाच्या एका विद्वद्‍र्यानें उत्तर केलें कीं तो होऊन गेल्यास ६००० वर्षांपेक्षां कमी नाहींत व २,५०,००० वर्षांपेक्षां जास्त नाहींत–इतकीं वर्षें व्यतीत झालीं आहेत.

It is to be recollected that all ancient pictures speak. Before the discovery of letters, pictures had to do the duty of the modern press.–*W. S. Blacket.*

अर्थः—हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं प्राचीन सर्व चित्रें बोलतात. अक्षरांनीं विचार प्रदर्शित करण्याची कला उत्पन्न होण्यापूर्वीं अर्वाचीन छापखान्याचें काम चित्रांस करावें लागत असे.

" पृथ्वीच्या जुन्या नकाशांचा कालक्रम.–(१) बाबिलोनियन लोकांचा नकाशा इ. स. पू. ८००; (२) टालमीचा नकाशा इ. स. १५०; (३) हिअरफोर्डचा नकाशाः–इ. स. १३०७; (४) फ्रा मनरोचा नकाशा.–इ. स. १४५७; (५) मार्टिनचा नकाशाः–इ. स. १४९२, हॅमस्वर्थ हिस्टरी ऑफ धी वर्ल्ड–व्हा. १

मरोहरेश्च देवर्षे वर्षं हैमवतं तथा ॥ क्रमेणैव व्यतिक्रम्य भारतं वर्षमासदत् ॥ स देशान् विविधान् पश्यन् चीनाहूण निषेवितान् ॥ आर्यावर्त मिमं देशमाजगाम महामुनिः ॥—भारत. शां. अ. १२५.

भावार्थः—या श्लोकांत उत्तरेस मेरू, दक्षिणेस हरिवर्ष, त्याच्या दक्षिणेस हैमवत व शेवटीं भारत आलें आहे. तेव्हां मेरू सैबिरियांत होता असें मानिलें पाहिजे ( भा. उपसंहार–रा. ब. वैद्य–पा. ३६८.

मागील भागांत उपक्रमाचें विवरण आटोपलें तर आतां या भागांत आपले पुराणांत आढळणाऱ्या आपल्या पृथ्वीच्या अनादी नकाशाचा विचार कर्तव्य आहे.

नकाशेः–नांवासारखें रूप ज्याचें असतें असे नकाशे काढण्याची कला अगदीं आजकालची आहे. प्रत्यक्ष मापें घेऊन–ध्रुवाकडे लांब व वाटोळें अक्षांश व रेखांश यांसह काढिलेल्या हल्लींच्या नकाशांवरून प्राचीन लोकांचे नकाशे कसे असत ह्याची कल्पना बिलकूल करितां येणार नाहीं. जे नकाशे हिरोडोटस, स्टॅबो, व दुसरे लोक यांच्या नांवावर चालत आहेत. त्यांवरून जुन्या भूगोलवर्णनांत पृथ्वीचें रूप ज्या प्रकारचें मानिलें आहे त्याची कांहीं कल्पना पटण्यासारखी आहे. त्यांत अमेरिका खंड दाखविलेलें नाहीं. अर्वाचीन शास्त्रीय पद्धतीनें जे प्राचीन म्हटलेले नकाशे शाळांच्या उपयोगाकरितां तयार करण्यांत आले आहेत त्यांतीलही रूपरेखन जुन्या खंडांपलीकडे गेलेलें नाहीं. इंग्रजींतील अती जुन्यांतील जुना नकाशा म्हटला म्हणजे तो दहाव्या शतकांतील आहे, व तोही इतका घोटाळ्याचा आहे कीं त्यावरून त्याच्या रूपाचें ज्ञान बरोबर होत नाहीं.

जपानी लोकांचे नकाशे आहेत ते अगदीं साधे व आडाण–मतानें काढिलेले आहेत. म्हणजे त्यांत महासागराकरितां जागा राखिलेली नाहीं, व त्यांतील नद्या भलत्याच मोठ्या प्रमाणावर काढिलेल्या आहेत. पण त्यांवरून देशांची खूण पटणार नाहीं–इतके ते वाईट काढिलेले नाहींत. ह्या नकाशांत हा एक विशेष आढळतो कीं दक्षिणध्रुवाजवळ जी जमीन आहे म्हणून आजकाल शोध लागला आहे, त्या जमिनीचा किनारा त्यांत दाखविण्यांत आला आहे. वस्तुतः पाहतां झाडून सर्व दक्षिणमहासागरांतील समुद्राकिनारा त्यांत उत्तम प्रकारें रेखाटण्यांत आला आहे. तो असा कीं त्यावरून हल्लींच्या जगविश्रुत ब्रिटिश खलाशांपेक्षां जणू काय जपानी खलाशी जास्त दूरवर जाऊन आलेले होते असें ठरतें. ह्या नकाशांत एशिया व युरोप ह्या खंडांतील देशाप्रमाणें अमेरिकेचें रूपरेखन बरोबर करण्यांत आलें आहे.

जुन्यांतील अगदीं जुने नकाशे पहावयाचे असतील तर ते फक्त आपल्या हिंदुस्थानांत उपलब्ध आहेत. आपले ऋषी इतके बुद्धिवान व शहाणे होते कीं त्यांनीं

आपल्या पुराणांत भूगोलाचें वर्णन सूक्ष्म व सविस्तर देऊन ठेविलें आहे. पण त्यांत हल्लींच्या दृष्टीनें एक गोम आहे. ती ही कीं तें हल्लींच्या लोकांस न समजण्यासारिखे गूढ आहे व म्हणून त्याचा व्यवहारांत सध्या कांहीं उपयोग करून घेतां येत नाहीं. त्यांत दिलेलीं देशांचीं नांवें युरोपियनांच्या प्राचीन भूगोलवर्णांतील देशांच्या नांवापेक्षां इतकीं भिन्न आहेत कीं त्यामुळें त्यांवर पाश्चात्यांच्या शिक्षणांत तयार झालेल्या लोकांचा विश्वास बसत नाहीं. तो त्यांचा अविश्वास कधीं साधार असतो किंवा कधीं तो अगदीं निराधार असतो. पण हें मात्र अगदीं निश्चित आहे कीं आपल्या ऋषींनीं अनादी काळीं आपल्या पृथ्वीचे कांहीं त्या काळास साजेसे उत्तम नकाशे काढून ठेविले आहेत व ते आपल्याकडील एशियाटिक रीसर्चेस नामक नवीन शोधांस वाहिलेल्या पुस्तकांत शहानिशा करून प्रसिद्ध केले आहेत. प्राचीन जगासंबंधी शोध करावयाचा असल्यास त्यांतील एक नकाशा अप्रतिम आहे. म्हणून त्याची एक प्रत सापेक्ष अवलोकनाकरितां दिली आहे.

आपला जुना नकाशाः—सदरहू नकाशाच्या रूपावरून असें सिद्ध होतें कीं आपले हिंदू लोकांस नकाशे काढण्याच्या कलेचें ज्ञान हल्लींच्या पश्चात्यांच्या ज्ञानाच्या तोडीचे नसो, पण आपल्या सगळया पृथ्वीच्या ज्ञानासंबंधें विचार करितां आमचें ज्ञान त्यांच्यापेक्षां कितीतरी भरपूर व निःशेष होतें. ह्या नकाशाचा जुनेपणाविषयीं विचार कराल तर त्यांत दिलेल्या देशांच्या नांवावरून तो बरोबर पटतो. आपले जुन्या ग्रंथांत जुनें भूगोलसंबंधीं ज्ञान व जुनें इतिहासासंबंधीं ज्ञान कल्पनेबाहेर पुष्कळ आहे. पण तें इतकें गूढ आहे कीं तें पाश्चात्य विद्येनें वेडावलेल्या लोकांस सहज समजत नाहीं. ह्या नकाशांत एशिया व युरोप यांचें रूपरेखन कांहींसें दीर्घवर्तुलाकार केलें आहे व त्याभोवती महासागर आहेत.

ह्या नकाशांत जें काय अस्वाभाविक आहे, त्याचा विचार न करितां जो कोणी त्याचें सूक्ष्म अवलोकन करील त्याची अशी खात्री झाल्यांवांचून रहावयाची नाहीं कीं त्यांत अमेरिका सर्वांआधीं सुस्पष्ट रेखाटली आहे. प्राचीन खंडाभोवती महासागराचें वेष्टन दाखविलें आहे. ह्या आकारांत जरी असावा तसा रेखलेपणा आढळत नाहीं तरी त्यांत अमेरिकेचें अस्तित्व अगदीं ठळक आहे. ह्यांत दाखविलेल्या महासागराच्या पश्चिमेच्या भागास हल्लीं अटलांटिक महासागर असें म्हणतात व पूर्वेकडील भागास पासिफिक महासागर असें म्हणतात. त्यांत अपर अथवा *अपरिका हिचें नांव उघड दिलेलें आहे, व तें सदरील दीर्घवर्तुळांतच आहे; तेव्हां हें भूगोलवर्णन वस्तुस्थितीस धरून आहे हें प्रत्येकजण कबूल करील.

---

* भूगर्भशास्त्राप्रमाणें अपरिका व एशिया ह्या खंडाचा जोड लेमुरियाच्या योगानें झाला होता. त्याचा सांप्रत निःपात झाला असो, पण आपल्या एशियेचा मलबार किनारा व अपरिकेचा झांझिबार किनारा व ह्यावरील ब्रह्मदेशचा किनारा यांवरील आंबे वगैरे वनस्पती व हत्ती वगैरे जनावरें ( फ्लोरा व फौना ) यांत तद्दर्शक अत्यंत सादृश्य आहे तर आमचा वरील ऋषींचा नकाशा फारच चांगला आहे असें ठरतें.

सदरहू महासागराच्या पलीकडे दुसरी जमीन आहे व तिचा त्या महासागरास वेढा आहे. अलबत, ती जमीन अमेरिकेची आहे. हिरोडोटस वगैरे सापेक्षतः नवीन यवन ( अयोनियन–ग्रीक ) लोकांचे जुने नकाशे जसे काढिलेले आहेत तसाच ह्या नकाशांचा आकार ताटासारिखा आहे. त्यांत भूगोलाचें रूपरेखन उत्तम करतां येतें व तें तसें केलें आहे. पूर्वोक्त वेष्टणभूत ( गराड्याच्या ) अमेरिकेच्या जमीनींत पश्चिम भागीं एक खिंडार आहे. हें खिंडार तेथें मुळांत खरोखरी आहे. तें खिंडार क्यारिबियन समुद्र व मक्सिकोचा उपसागर यांचें आहे. तें उत्तरअमेरिका व दक्षिण अमेरिका यांच्यामध्यें असून त्यांतून जलमार्ग दोहोंकडेही जातो.

ह्या जमिनीस जें नांव दिलें आहे व त्याचें जें लक्षण दाखविलें आहे, त्यावरून ही जमीन हल्लींची अमेरिकाच होय अशी ओळख पटते. यांतील एका भागास सुवर्णभूमी अथवा सोन्याची जमीन असें नांव दिलें आहे. आपल्या देशाच्या भूगोल वर्णनांत हें सुवर्णद्वीप व श्वेतद्वीप यांचा संयोग झालेला आहे असें प्रतिपादन आहे. त्याप्रमाणें पाहतां ते एका खंडाचे दोन भाग म्हणून समज आहे. आपल्या मायभूमीच्या इतिहासांत श्वेतद्वीप हें फार महत्वाचे स्थळ आहे. कारण या श्वेतद्वीपवर विष्णूचें आधिपत्य आहे असें आपल्या पुराणांत दिलें आहे. तर हें श्वेतद्वीप म्हणजे अमेरिकाच घेतली पाहिजे. कारण पूर्वोक्त एशियाटिक रिसर्चिस नामक नवीन शोधांच्या पुस्तकाप्रमाणें श्वेतद्वीप अथवा पांढरें बेट हें पश्चिमेस आहे. त्याप्रमाणें आपण पश्चिमेस गेल्यास हें द्वीप आपल्यास लागतें व त्याकडे जाण्यास पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्राचीनकाळीं रस्ता होता. यावरून हें श्वेतद्वीप व सुवर्णद्वीप मिळून आपली हल्लींची अमेरिका ठरते.

ह्या जागेस आमचे लोक तमोभूमी, जलभूमी व विष्णुभूमी अशीं दुसरीं नांवें देतात. त्याप्रमाणें पाहतां ह्या अमेरिकेपैकीं उत्तर अमेरिकेंतील लोक आपल्या देवास ‘ ओशियानस ’ असें म्हणतात. हा ओशियानस आपल्या विष्णूप्रमाणें श्यामसुंदर जलदेव आहे. ती अमेरिकेची अधिदेवता आहे. तात्पर्य काय कीं सदरहू नकाशावरून होणारा बोध इतका खुलासेवार आहे कीं त्यावरून ही भूमी म्हणजे उत्तरअमेरिका होय याबद्दल कोणाचीही खात्री झाल्यावांचून राहावयाची नाहीं. कारण आमच्या इतिहासांतील उपरिनिर्दिष्ट नकाशांत सदरहू ओशियनसचा अथवा विष्णूचा लोक अमेरिकेच्या उत्तरभागीं ढळढळीत आहे असें स्पष्ट दाखविलें आहे.

पण त्या नकाशाचा आकार यथावत रेखीव नाहीं, म्हणून कोणी असें धरून चालणें रास्त नाहीं कीं तेणेंकरून त्याची किंमत कमी झाली आहे, किंवा त्यापासून होणारें ज्ञान भलतेंच गैर आहे. पूर्वोक्त प्राचीन, प्राचीनतर व प्राचीनतम नकाशे पहाल तर ते झाडून एकून एक असेच चुकीचे आहेत असें आढळेल. त्यांत सदरहू आमच्याच नकाशाची तुलना एशियेंतील तर काय पण युरोपांतील कोणत्याही जुन्या नाकाशाशीं केल्यास तो तोडीस तोड करण्यासारिखा सर्वोत्कृष्ट

आहे. तो इतका कीं तो पाश्चात्य देशांतील हरयेक नकाशापेक्षां हरयेक बाबतीमध्यें सरस आहे हें निःपक्षपाती मनुष्य तो पाहतांच कबूल करील.

त्यांतच हें आपल्या ध्यानांत येईल कीं हल्लीं अमेरिका म्हटलेल्या भूमीस दक्षिणेस दुसरें नांव लोकालोक पर्वतांची जमीन असें दिलेलें आहे. त्याचें कारण असें कीं आम्हां पूर्वेकडील लोकांचा असा पक्का झालेला समज आहे कीं त्या द्वीपांत दुर्लंघ्य पर्वत आहेत, व त्याप्रमाणें ते तेथें सध्याही खरोखरीचे आहेत. ते कोणते ? उत्तर अमेरिकेमध्यें रॉकी पर्वत आहेत व दक्षिण अमेरिकेमध्यें आंडिस पर्वत आहेत. त्यावरून पूर्वोक्त समज होण्यास सबळ कारण झालें आहे असें उघड दिसतें. ह्या लांबच लांब पर्वतांच्या ओळींवरून आपल्या लोकांची जी दुर्लंघ्यत्वाची कल्पना होऊन बसली, ती त्यांनीं आपल्या लोकालोक ह्या शब्दानें सुस्पष्ट व्यक्त केली आहे. कारण आमचे प्रवासी आमच्या ह्या हिंदुस्थान देशांतून जलस्थल मार्गांनीं पूर्वेकडे गेले काय किंवा पश्चिमेस गेले काय त्यांस हटकून हल्लींचें रॉकी व आंडीस हे पर्वत वाटेंत आड येत असत !

आतां हा नकाशा युरोपियनाच्या हातचा नाहीं—तो आर्ष म्हणजे ऋषिकृत आहे—म्हणून तो त्याज्य होय असें बिलकुल कोणासही समजण्याचें कारण नाहीं. पण त्यांत हें खरें आहे कीं ज्या सारस्वताचा उपयोग हल्लींच्या इतिहासास भर घालण्यास कोणी करीत नाहींत अशा आमच्या भारत, भागवत व वायू पुराणांतील माहितीस तो पुष्टी देणारा आहे म्हणून तो कवडीमोल समजण्याचें कारण बिलकुल नाहीं. उलट ही कींव करण्यासारखीच गोष्ट आहे कीं आजतागाईत या पुराणांचा आमचे लोकांनीं करावा तसा उपयोग करून घेतला नाहीं. कारण, त्यांत त्रिखंडांतून आपल्या या मायभूमींत म्हणजे हिंदुस्थानांत हिमालयजन्य पूर्वोक्त जलप्रलयांत उत्तर व दक्षिण गोलार्ध एक जुडल्यावर जे वेद व शतपथ ब्राह्मण यांत सांगितेले पंचजन सदुसष्ठ जमातींच्या रूपानें घरचे मुलगे घरीं आपत्तीच्या वेळीं येतात त्याप्रमाणें परत आले त्यांच्या ठावठिकाणांचा त्यांत सुगावा लागणारा आहे. म्हणून या पुस्तकांत सदरहू भारत, भागवत, विष्णू, वायू—वगैरे पुराणांचा लागेल तेथें मनसोक्त उपयोग करण्याचें ठरवून आह्मी त्यांच्या पडताळ्यास सोबतचे चार पृथ्वीचे सुंदर नकाशे श्रीयुत शेट *पुरुषोत्तम विश्राम मावजीभाई, वाळकेश्वर, पोस्ट मलबारहिल, मुंबई, यांच्या केवळ कृपाप्रसादानें देऊं शकलों आहों.

---

* **सुवर्णमाला**—जन्माष्टमी अंक ( १९२४ पहा ).—त्यावरून हें कोणाच्याही ध्यानीं येईल कीं आमचें हें पुस्तक व ही सुवर्णमाला यांतील हीं व पुढील चित्रें एक आहेत; कारण आम्ही सदर चित्रें व तद्‌बोद्धक माहिती आमच्या ह्या वेदांच्या काळाचा इतिहास आदिक ग्रंथांवरून वरील तत्प्रकाशक ललितकलाप्रेमी पुराणसारस्वतभक्तांस गुजराथींत व इंग्रजींत प्रसिद्ध करण्यास देत आहों व ते आम्हांस ह्या ग्रंथाकरितां त्यांच्या ब्लॉकवरून हीं चित्रें मेहेरबानीनें छापून देत आहेत. याबद्दल आम्ही त्यांचे कृतज्ञ होऊं तेवढें थोडेंच होय.—( पानें ५३ ते ६७ ).

रामायण, महाभारत व विष्णुपुराण ह्यांत आपल्या पृथ्वीचें वर्णन निरनिराळें आहे. तें पुढें वाचकांस सादर केलें आहे:—

रामायणः—हिंदुस्थानचे उत्तरेस पुढील पर्वत अनुक्रमानें दिले आहेत. हिमवंत, काल, सुदर्शन, देवसखा, कैलास, क्रौंच, व मैनाक. मैनाकाच्या उत्तरेस चंद्र, सूर्य व तारे यांनीं विरहित प्रदेश आहे. त्यांत तेजस्वी ऋषी राहतात. त्याच्या पलीकडे शैलोदा नदी व उत्तरकुरूचें स्वर्ग आहे. त्याच्या उत्तर सीमेवर महासागर आहे. ह्या महासागरांत सोमगिरी आहे. त्यावर महादेव शिव राहतो. हिंदुस्थानच्या पूर्वेस अनुक्रमानें पुढील स्थळें आहेत:-खारा महासागर, यवद्वीप ( जावा ) सुवर्णद्वीप, रूपकद्वीप, शिशिरपर्वत, तांबडा समुद्र, कूट शाल्मली देश त्यावर वैनतेय [ गरूड ] राहतो, क्षीरसागर, ऋषभपर्वत, गोड्या पाण्याचा समुद्र त्यांत वडवानल आहे व त्याच्या उत्तरेस जातरूप शिला अथवा सुवर्णपर्वत आहे. त्यावर धरणीधर शेष राहतो ), उदयगिरी, सुदर्शनलोक, व देवलोक, आपलें हिंदुस्थान व लंका यांच्या दक्षिणेस अनुक्रमें पुढील पांच पर्वत आहेत. पुष्पितक, सूर्यवंत, वैद्युत, कुंजर व ऋषभ. ह्या दोन पर्वतांच्यामध्यें वासुकी सर्पराजाची भोगावती नगरी आहे. आणखीं दक्षिणेस पुण्यवान पितरांचा देश आहे. व शेवटीं पितृलोक व यमलोक आहे. आपले हिंदुस्थानचे पश्चिमेस अनुक्रमें पुढील पर्वत आहेत. पारियात्, वज्र, चक्रवंत, वराह, मेरू अस्ताचल ( किष्किंधाकाण्ड. )

महाभारतः-जंबुद्वीपाच्या मध्यभागीं सुवर्णपर्वत मेरू आहे. त्याच्याजवळ जंबूवृक्ष आहे. त्याच्या मुळापासून एक नदी उत्तरेकडे वहात उत्तरकुरूच्या प्रदेशीं जाते. मेरूच्या उत्तरेस गंधमादन पर्वत आहे. व दक्षिणेस माल्यवंत पर्वत आहे. ह्याच्या शिखरावर संवर्तक अग्नी आहे. ह्या प्रदेशाजवळ व सभोंवार इलावृत वर्ष नांवाचा स्वर्लोक आहे. त्याचे चार विभाग आहेत. म्हणजे मेरूच्या उत्तरेस उत्तरकुरू, दक्षिणेस (छोटें) जंबुद्वीप, पश्चिमेस केतुमाल व पूर्वेस भद्राश्व. इलावृत वर्षाच्या उत्तरेस नील पर्वत आहे. ह्या पर्वताच्या उत्तरेस श्वेतवर्ष आहे. श्वेतवर्षाच्या उत्तरेस श्वेतपर्वत आहे. त्या पर्वताच्या उत्तरेस हैरण्यक वर्ष आहे. ह्याच्या उत्तरेस शृंगवंत पर्वत आहे. ह्याच्या उत्तरेस ऐरावत वर्ष आहे. ह्याच्या उत्तरेस क्षीरसागर आहे. इलावृत वर्षाच्या दक्षिण सीमेवर निषाध पर्वत आहे. ह्या पर्वताच्या दक्षिणेस हरिवर्ष देश आहे. ह्याच्या दक्षिणेस कैलास अथवा हेमकूट पर्वत आहे, व ह्याच्या दक्षिणेस हैमावत वर्ष देश आहे. ह्या देशाच्या दक्षिणेस हिमालय व भारतवर्ष ( हिंदुस्थान ) व ह्याच्या दक्षिण सीमेवर क्षार ( खारा ) समुद्र आहे. ( भीष्मपर्व ६-८ ).

विष्णुपुराणः—ह्यांत मेरूभोंवते चार पर्वत दिले आहेत. म्हणजे उत्तरेस सुपार्श्व, दक्षिणेस गंधमादन, पूर्वेस मंदर, व पश्चिमेस विपुल. ह्यांत ऐरावताच्या ठिकाणीं उत्तरकुरू दिला आहे. ह्यांत जैनांच्या नकाशाप्रमाणेंच नदीमालिका दिली आहे. इलावृत्ताचा चौकोनी प्रदेश मेरुभोंवता दिला आहे, व तो निषाद व नील

ह्यां मधील आठ पर्वतांच्या ओळीमध्यें दिला आहे. त्यांत चार प्रदेश दिले आहेत. उत्तरेस उत्तरकुरू, दक्षिणेस भारतवर्ष, पूर्वेस भद्राश्व, व पश्चिमेस केतुमाल-ह्यांच्या भोवती पर्वतांचा गराडा नाहीं ( २-२ )

रावबहादुर चि. वि. वैद्य ह्या विद्वद्वर्यांनीं आपल्या एपिक इंडिया आदिक ग्रंथांत रामायण व महाभारत यांवरून पुढील गोष्टी सिद्ध केल्या आहेत (१२-१२-१७)

"( १ ) पृथ्वीवर कित्येक द्वीपें होतीं व त्यांच्या भोवतीं महासागर होते.

( २ ) ज्या भूमीवर आपण राहतों त्यास जंबुद्वीप हें नांव होतें.

( ३ ) पृथ्वीच्या दक्षिणेस क्षारसमुद्र होता व उत्तरेस क्षीर समुद्र होता. तिच्या पूर्वेस व पश्चिमेस दुसरे समुद्र होते. त्यांचीं नांवें महाभारतकारास ठाऊक असतील पण तीं त्यानें कोठेंही दिलेलीं नाहींत.

( ४ ) पृथ्वीच्या मध्यभागीं सोन्याचा उंच मेरू पर्वत होता. ह्या मेरूपर्वताच्या दक्षिणेस पूर्वपश्चिम दिशांकडे जाणाऱ्या तीन पर्वतांच्या ओळी होत्या.—( १ ) हिमालय, ( २ ) काराकोरम अथवा कैलास, ( ३ ) आल्ताई अथवा निषाद-पर्वत—हिमालयाच्या दक्षिणेस भरतवर्ष अथवा हिंदुस्थान होतें. त्याच्या उत्तरेस हैमवत वर्ष होतें. त्यांत तिबेट व चीन होतें. कैलासपर्वतापलीकडे व आल्ताई अथवा निषाद पर्वताच्या अलीकडे हरिवर्ष, मोंगोलिया, व उत्तर तुर्कस्थान होतें.

( ५ ) मेरू, गंधमादन, व माल्यवान या पर्वतांनीं इलावृत वर्षाचे चार भाग झालेले होते. येथें जंबुद्वीप व जंबुवृक्षापासून निघणारी व उत्तरकुरूंत जाणारी जंबुनदी होती. पश्चिमेच्या बाजूस भद्राश्व व केतुमाल हे दोन देश होंते.

( ६ ) कैलास पर्वताच्या उत्तरेस मोठें वाळूचें मैदान व मोठें सरोवर होतें. त्या अर्थीं तें गोबीचें वाळवंट व आरल समुद्र होता. ह्या विधानाच्या पुष्टीस हें सांगण्यासारिखें आहे कीं महाप्रस्थानिक पर्वांत पांडव स्वर्गाकडे जात असतां ते एका मोठ्या वाळवंटांतून गेले असें म्हणतात, तें वाळवंट हेंच असलें पाहिजे.

( ७ ) हिंदुस्थानच्या उत्तरेस पुढील म्लेंच्छ लोक राहत होते—

यवनाश्चीन कांबोजा दारुणा म्लेंच्छजातयः ।

सकृद्ग्रहाः कुलत्थाश्च हूणा पारसिकैः सह ॥

तथैव रमणाश्चीनाः तथैव दशमालिकाः ॥ भीष्मपर्व-एपिक इंडिया-पा. २६८

( ८ ) हिरोडोटस यानें आपला इतिहास इ. पू. ४५० त लिहिला. त्या वेळीं हिंदूंस यवन लोक माहित होते—याबद्दल नवल वाटावयास नको; कारण हिंदू लोक असिरियन व खाल्डियन लोकांशीं त्यापूर्वीपासून व्यापारधंदा करीत असल्यामुळें त्यांस यवनांची माहिती असली पाहिजे "—( सदर—पान २७२ )

नागपूरचे रा. दप्तरी यांनीं आमच्या या विषयास पोषक आर्यांच्या अत्यंत प्राचीन इतिहासाचीं साधनें—या सहविचार आगष्ट १९२३ यांत—पुढीलप्रमाणें वायुपुराणांतून अवतरण रूपानें दिलीं आहेत:—

( १ ) मेरू—यासंबंधें उतारा असा आहे:—

नीलश्चनिषधश्चैव ताभ्यां हीनाश्च याऽपरे ।
श्वेतश्च हेमकूटश्च हिमवान् शृंगवांश्च यः ॥ २५ ॥
तेषां मध्ये जनपदास्तानि वर्षाणि सप्त वै ॥ २६ ॥
इदं हैमवतं वर्षं भारतं नाम विश्रुतम् ।
हेमकूटं परं तस्मात् नाम्ना किंपुरुषं स्मृतम् ॥ २८ ॥
नैषधं हेमकूटं तु हरिवर्षं तदुच्यते ।
हरिवर्षात्परं चैव मेरोश्च तादिलावृतं ॥ २९ ॥
इलावृतात्परं नीलं रम्यकं नाम विश्रुतं ।
रम्यात्परतरं श्वेतं विश्रुतं तद्धिरण्मयम् ॥
हिरण्मयात्परंचापि शृंगवांस्तु कुरु स्मृतम् ॥

अर्थः—निषध, शृंगवान, श्वेत, नील, हिमवान, व हेमकूट ह्या सहा पर्वतांमध्यें जे देश आहेत त्यांस वर्ष असें म्हणतात. हिमवान व हेमकूट यांमध्यें भारतवर्ष, ह्याच्या पलीकडे किंपुरुष वर्ष, हेमकूट व निषध पर्वतांमध्यें हरिवर्ष; हरिवर्षाच्या पलीकडे ( पूर्वेस ) मेरूच्या ठिकाणीं जें आहे, तें इलावृत वर्ष; रम्यकाच्या पलीकडे श्वेतपर्वताजवळ हिरण्यमयवर्ष; व हिरण्यमयापलीकडे शृंगवान पर्वताजवळ कुरुवर्ष आहे.

पोषक वचनें:—ह्यास पोषक पुढील संस्कृत अवतरण दिलें आहे:—

धनुः संस्थेच विज्ञेये द्वे वृत्ते दक्षिणोत्तरे ।
दीर्घाणि तत्र चत्वारि मध्यमं तादिलावृतम् ॥ ३१ ॥
अर्वाक्च निषधस्याथ वेद्यर्धं दक्षिणं स्मृतम्
परं नीलवतो यश्च वेद्यर्धं तु तदुत्तरं ॥ ३२ ॥
वेद्यर्धे दक्षिणे त्रीणि वर्षाणि त्रिणि चोत्तरे ।
तयोर्मध्ये तु विज्ञेयं मेरुमध्यमिलावृतम् ॥ ३३ ॥

अर्थः—दक्षिणेचें ( भारतवर्ष ) व उत्तरेचें ( कुरुवर्ष )–हीं वर्षें धनुष्याच्या आकाराचीं आहेत–चार वर्षें दीर्घ लांबट आकाराचीं आहेत, व इलावृत हें मध्यम आकाराचें म्हणजे लांबीरुंदींत सारखें आहे. निषधपर्वताच्या अलीकडे जें आहे तें दक्षिण वेद्यर्ध व नीलपर्वताच्या पलीकडे जें आहे तें उत्तर वेद्यर्ध होय. दक्षिण वेद्यर्धांत तीन वर्षें आहेत, व उत्तर वेद्यर्धांत तीन वर्षें आहेत, व दोन वेद्यर्धांमध्यें इलावृत असून त्याच्या मध्यभागीं मेरू आहे.

अव्यक्ता पृथ्वीपद्मं मेरुपर्वत कर्णिकं ।
चतुःपत्रं समुत्पन्नं ॥ ३७ ॥

अर्थः—अव्यक्तापासून मेरुपर्वत ज्याची कार्णिका ( मधील बीजकोश ) आहे असें पृथ्वीरूप पद्म उत्पन्न झालें. त्या पद्माला चार पानें आहेत.

पद्माकारा समुत्पन्ना पृथिवी सवनद्रुमा ॥ ४४ ॥
महाद्वीपास्तु विख्याताश्चत्वारः पत्रसंस्थिताः ।
ततः कार्णिक संस्थानो मेरुर्नाम महाबलः ॥ ४६ ॥
स तु मेरुः परिवृतो भुवनैर्भूतभावनैः ।
चत्वारो यस्य देशा वै नाना पार्श्वेष्ववधिष्टिताः ।
भद्राश्वो भरतश्चैव केतुमालश्च पश्चिमः ॥
उत्तराः कुरवश्चैव कृतपुण्यपरिश्रयाः॥ ५७ ॥

अर्थः—ही पृथ्वी पद्माकार आहे. चार महाद्वीपें ( भारत, केतुमाल, व भद्राश्व ) हीं पत्रांसारिखीं आहेत, व मेरू हा कार्णिकेसारिखा आहे. ह्या मेरूच्या चार बाजूंस भरत, पश्चिमेच्या बाजूस केतुमाल, उत्तरेकडच्या बाजूस कुरू व भद्राश्व असे चार देश आहेत.

ह्या वरील वर्णनावरून मेरू म्हणजे पामीरचा उंचवटा; इलावृत म्हणजे ह्याच्या भोवतालचा प्रदेश; हेमकूट म्हणजे सुलेमान पर्वत; निषध म्हणजे हिंदुकुश पर्वत; उत्तर कुरू म्हणजे हिंदुकुशाच्या उत्तरेस मध्य एशियामधील तुर्कस्तानचा प्रदेश; इत्यादि गोष्टी निःसंशय सिद्ध होतात. तसेंच भद्राश्व म्हणजे हिरण्मय, रम्यक व पुरुष वर्षें व केतुमाल हरिवर्षें होत.

देव व स्वर्ग.—मेरुपर्वतावर देव राहत व त्यास स्वर्ग म्हणत—

नाकपृष्ठं दिवं स्वर्गमिति यैः परिपठ्यते ।
वेदवेदांगविद्विद्भिः शब्दपर्यायवाचकैः ॥ ९४ ॥
तदेतत्सर्वदेवानामाधिवासे कृतात्मनाम् ।
देवलोको गिरौ तस्मिन् सर्व श्रुतिषुऽगीयते ॥ ९५ ॥

अर्थ.—वेदवेदांगवेत्ते ज्याला दिव, नाकपृष्ठ असें म्हणतात, तो म्हणजे देवांचें राहण्याचें ठिकाण—ह्या मेरुपर्वतावर आहे असें ह्यांत सांगितलें आहे. ह्या मेरुपर्वतावर राहणारे लोकांस देव व त्यास स्वर्ग म्हणतात.

टीपः—देव मेरुपर्वतावर रहात होते असा उल्लेख खुद्द वेदांत नाहीं—ह्या आमच्या मताप्रमाणेंच कै. शं. बा. दीक्षित यांचे मत आहे. ( भा. ज्यो. इतिहास पा. २२ ). हा आमचा मेरू व टिळकांचा मेरू हे भिन्न आहेत. आमचा मेरू सुमेरुखंडांतील ( समरकंद ) सुमेरू होय व टिळकांचा मेरू हा अर्थात उत्तरध्रुवावरील सापेक्षतः कुमेरू होय.

१ नवीन कुरुक्षेत्रः—ह्या क्षेत्राचें स्थळ असें दिलें आहे:—

ऋषयः संशितात्मानः सत्यव्रतपरायणाः ॥ * *
धर्मक्षेत्रे दीर्घसत्रं तु ईजिरे ।

नद्यास्तीरे दृषद्वत्याः पुण्यायाः शुचिरोधसः ।
दीक्षितास्ते यथाशास्त्रं नैमिषारण्यगोचरः ॥ वायुपुराण अ. १

अर्थः—सत्यव्रतपरायण ऋषी दृषद्वतीच्या कांठीं कुरुक्षेत्रांत जेथून नैमिषारण्य दिसत होतें अशा ठिकाणीं ( नैमिषारण्य गोचराः ) सत्र करीत होते.

टीपः—ह्यावरून कुरुक्षेत्र व नैमिषारण्य हीं दृषद्वतीच्या कांठीं जवळजवळ होतीं हें सिद्ध होतें.

---

# भाग तिसरा.

## राशिचक्राचा अनादी नकाशा.

### देशांची ओळख.

—:*:—

The Geography of the old world, lying hid in what, curiously enough, is called Poetical Astronomy, has led the enquirer to the heavenly bodies, rather than to the surface of the Globe.-*Mr. Blacket*

अर्थः—जुन्या जगाचें भूवर्णन चमत्कारिक रीतीनें काव्यमय ज्योतिषांत गडप होऊन बसल्यामुळें शोधक लोकांची मोठी फसगत होते. ती अशी कीं त्यांनीं त्याप्रमाणें एखादें स्थळ भूगोलाच्या पृष्ठभागीं शोधावयाचें, ते तें सोडून आकाशांतिल तारकापुंजांत तें शोधावयास प्रवृत्त होतात.

From very ancient times the circle which the suu appears to make in the heavens has been divided into twelve sections each of which is named after a constellation or group of stars, which appears in or near that part of the heavens. As the constellations were chiefly named after animals, the circle was called the Zodiac ( Gr. Zodian, a little animal ).

अर्थः—आपला सूर्य आकाशांत एक वर्तुल करितो, त्याचे प्राचीनकाळापासून बारा भाग पाडलेले आहेत व त्यांतील प्रत्येक भागास नांव आकाशांतील त्या भागांतल्या तारकापुंजावरून पडलें आहे. ह्या तारकापुंजांस नांवें, प्रामुख्येंकरून, प्राण्यांवरून पडलीं असल्यामुळें सदरहू वर्तुळास इंग्रजींत झोडियाक ( प्राणिचक्र ) असें नांव पडलें आहे.

“ अश्विनी, भरणी आणि कृत्तिकांच्या कांहीं तारा मिळून मेषाची [मेंढ्याची] आकृति होते असें कांहीं नाहीं. ” “ मेषादि संज्ञा प्रथम तारापुंजांच्या आकृति विशेषांवरून पडल्या की काय याविषयीं वाद आहे.”—भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास.-पा. १३८— कै. श. बा. दीक्षित.

“ नक्षत्रांचें ज्ञान व ग्रहांचें ज्ञान वैदिक लोकांस शकापूर्वी ५००० वर्षांच्या पूर्वींच झालें होतें. [ भा. ज्यो. इ. पा. १४५ ].

" भारतांत संक्रांतीचीं अयन, विपुव, षडशीति हीं नांवें आहेत. यावरून वेदांगज्योतिषकालींच किंवा त्यानंतर लौकरच ( शकापूर्वी १५०० वर्षें ) क्रान्तिवृत्ताचा द्वादशविभाग प्रचारांत आला होता. + + मेषादि संज्ञा शकापूर्वी ५०० सुमारास प्रचारांत आल्या. "–सदर–पा. १४७.

मागील भागांत आपल्या पृथ्वीवरील खंडांची ओळख करून देण्यांत आली. आतां ह्या भागांत नक्षत्रपुंजांवरून अथवा राशींवरून देशांची ओळख करून देण्याचा प्रयत्न आह्मांस कर्तव्य आहे.

नक्षत्रें:—आपल्या आकाशांत चोहोंकडे तारा विखुरलेल्या आढळतात. त्यास ऋग्वेदांत व अथर्ववेदांत नक्षत्रें, नभ, स्तृ वगैरे संज्ञा आल्या आहेत. त्यांतील कांहीं मंत्र येणेंप्रमाणें:—

अप त्ये तायवो यथा नक्षत्रा यन्त्यक्तुभिः ॥ सूराय विश्वचक्षुसे ॥

ऋ. सं. १-५०,२;अथ.सं.१३-२,१७;२०-४७,१४

अर्थ:—विश्वदर्शी सूर्य आल्याबरोबर चोरांप्रमाणें नक्षत्रें व रात्र हीं पळून जातात.

अथो नक्षत्राणामेषामुपस्थे सोम आहितः ॥

ऋ. सं. १०-८५,२; अथ.सं. १४-१,२

अर्थः—नक्षत्रांमध्यें सोम ठेविला आहे.

टीपः—ह्या सोमाच्या अथवा चंद्राच्या मार्गांत २७ नक्षत्रें आहेत. तीं लक्षांत ठेवावीं; कारण त्यांस उद्देशून अनेक काव्यप्रचुर आख्याइका पुढें यावयाच्या आहेत. त्या एरवीं नीट समजणार नाहींत.

तैतिरीय श्रुतीः—वैदिक सारस्वतांत तैतिरीय श्रुती ही अत्यंत महत्वाची आहे. तिच्या वाचनांत आम्हांस पूर्वोक्त २७ नक्षत्रांची माहिती साद्यंत मिळते; एवढेंच नाहीं तर सोमयागाचें अन्यत्र वर्णिलेलें साद्यंत स्वरूप निदर्शनास येतें. हें तर काय पण पाश्चात्यांस ज्यांची सांप्रत कोठें तोंडओळख होत आहे असे तृतीय नेत्र व चिंतामणी हे मेंदूतील निर्मुख पिण्ड यांची त्यांत अपूर्व माहिती आहे. म्हणून त्याचें वर्णन आम्ही अन्यत्र राजयोगचिंतामणी या पुस्तकांत सविस्तर स्वाराज्य संपादनार्थ केलें आहे. यावरून आमच्या आर्यावर्ताच्या त्या अन्यत्र अनेक अंगांनीं निश्चित केलेल्या ८६°½ अक्षांशावरील उत्तरकुरू नामक श्रौतभूमींतील आर्य लोक पुढील विद्यांत लोकोत्तर विद्वान होते हें सिद्ध होतें:—१ ज्योतिष; २ शारीर व ३ योग.

सर्व नक्षत्रें:—( १ ) तैतिरीय संहितेंतील पुढल्या अनुवाकांत झाडून सर्व नक्षत्रें आलीं आहेतः—

कृत्तिका नक्षत्रमग्निर्देवताग्नेरुचस्थ प्रजापतेर्धातुः सोमस्यर्चे त्वा रुचे त्वा द्युते त्वा भासे त्वा ज्योतिषे त्वा रोहिणी नक्षत्रं प्रजापतिर्देवता मृगशीर्षनक्षत्रँ सोमोदेवताद्रीनक्षत्र रुद्रोदेवता पुनर्वसूनक्षत्र मदितिर्देवता तिष्यो नक्षत्रं बृहस्पतिर्देवताश्रेषा नक्षत्रँ

सर्पादेवता मघा नक्षत्रं पितरोदेवता फल्गुनी नक्षत्रमर्यादा देवता फल्गुनी नक्षत्रं भगोदेवता हस्तो नक्षत्र सविता देवता चित्रा नक्षत्रमिंद्रो देवता स्वाती नक्षत्रं वायुर्देवता विशाखे नक्षत्रमिंद्राग्नी देवतानुराधा नक्षत्रं मित्रो देवता रोहिणी नक्षत्रमिंद्रोदेवता विचृतौ नक्षत्रं पितरो देवताषाढा नक्षत्रमायो देवताषाढा नक्षत्रं विश्वेदेव, देवता श्रोणा नक्षत्रं विष्णुर्देवता श्रविष्ठा नक्षत्रं वसवो देवता शतभिषङ् नक्षत्रमिंद्रो देवता प्रोष्ठपदा नक्षत्रमज एकपा देवता प्रोष्ठपदा नक्षत्रमहिर्बुध्नियो देवता रेवती नक्षत्रं पूषा देवताऽश्वयुजौ नक्षत्रमश्विनौ देवतापभरणी नक्षत्रं यमो देवता पूर्णापश्चाद्यतत्ते देवा अदधुः ॥ तै. सं. ४-४ १०

( २ ) अथर्व संहितेंत खालीं लिहिल्याप्रमाणें नक्षत्रें आलीं आहेतः—

चित्राणि साकं दिवि रोचनानि सरीसृपाणि भुवने जपानि ।
अष्टाविंशं सुमति मिच्छमानो अहानि, गीर्भिः सवर्यामि नाकम् ॥ १ ॥
सुहवं मेकृत्तिका रोहिणी चास्तु भद्रं मृगशिवः शमार्द्रा ।
पुनर्वसू सूनृता चारु नुष्यो भानुराश्लेषा अयनं मघामे ॥ २ ॥
पुण्यं पूर्वा फल्गुन्यौ चात्र हस्तश्चित्रा शिवा स्वातिः सुखो मे अस्तु ।
राधो विशाखे सुहवानुराधा जेष्ठा सुनक्षत्रमरिष्टं मूलम् ॥ ३ ॥
अन्नं पूर्वा रासन्तां मे आषाढा ऊर्जं ये द्युत्तर आ वहन्तु ।
अभिजिन्मे रासतां पुण्यमेव श्रवणः श्रयिष्ठाः कुर्वतां सुपुष्टिम् ॥ ४ ॥
आ मे महच्छतभिषग्वरीय आ मे द्वया प्रोष्ठपदा सुशर्म ।
आ रेवती चाश्वयुजौ भगं म भा मे रयिं भरण्य आ वहन्तु ॥ ५ ॥

अ. सं. १९–७

तैत्तिरीय संहितेतील नक्षत्रें:— १ कृतिका–देवता अग्नि; २ रोहिणी–देवता प्रजापती; ३ मृगशीर्ष देवता सोम; इन्वका–देवता सोम; ४ आर्द्रा–देवता रुद्र; बाहू–देवता रुद्र; ५ पुनर्वसु–देवता आदिती; ६ तिष्य ( पुष्य )–देवता बृहस्पती; ७ आश्रेषा–देवता सर्प; ८ मघा–देवता पितृ; ९ फल्गुनी–देवता अर्यमा पूर्व फल्गुनी–देवता अर्यमा, १० फल्गुनी–देवता भग; उत्तर फल्गुनी–देवता भग; ११ हस्त–देवता सविता; १२ चित्रा–देवता इंद्र, त्वष्टा; १३ स्वाती–देवता वायु; निष्टया–देवता वायु; १४ विशाखा–देवता इंद्राग्नी; १५ अनूराधा देवता मित्र; १६ रोहिणी–देवता इंद्र; जेष्ठा–देवता इंद्र; १७ विचृतौ-देवता पितृ मूल बर्हणी–देवता निर्ऋती; मूल–देवता प्रजापती; १८ आषाढा देवता आपः; पूर्वाषाढा–देवता आपः; १९ अषाढा–देवता विश्वेदेव; उत्तराषाढा–देवता विश्वेदेव; अभिजित–देवता ब्रम्ह; २० श्रोणा–देवता विष्णू; २१ श्रविष्ठा–देवता वसू; २२ शतभिषक्–देवता इंद्र; शतभिषक्–देवता वरुण; २३ प्रोष्ठपद–देवता अज एक पाद्; पूर्व प्रोष्ठपद–देवता अज एक पाद; २४ प्रोष्ठपद–देवता अहिर्बुध्नीय; उत्तर प्रोष्ठपद–देवता अहिर्बुध्निय; २५ रेवती–देवता पूष्य; २६ अश्वयूज्–देवता अश्विन्; २७ अपभरणी–देवता यम.

टीपः—( १ ) तैत्तिरीय संहितेंतील नक्षत्रांची संख्या २७ आहे. पण अथर्व संहितेंत ती २८ आहे व तींत देवता दिलेल्या नाहींत. शतपथ ब्राम्हणांत मुख्य नक्षत्रें २७ व उपनक्षत्रें २७ दिलीं आहेत ( १०–५,४५ ).

( २ ) शकापूर्वी ५००० वर्षांच्या सुमारास आर्यांस नक्षत्रांचें ज्ञान होतें असें कै. ज्योतिर्विद शं. बा. दीक्षित म्हणतात ( भा. ज्यो. इ. )

**क्रान्ति प्रदेश व त्याचे बारा भाग अथवा राशीः**—आपला सूर्यबापा तारकागणांतून आपल्या पृथ्वीमातेभोंवती ज्या वर्तुळाकार मार्गानें फिरतोसा दिसतो, त्यास क्रान्तिवृत्त असें म्हणतात. आपली पृथ्वीमाता आपल्या आसाभोंवती फिरत तेव्हां ती बिंदुशः विषुववृत्ताशीं समान्तर फिरते. पण ती आपल्या सुर्यबापाभोंवती फिरत असतां ती तशी समान्तर फिरत नाहीं. म्हणून वर दिल्याप्रमाणें आपला सुर्यबापा आपले पृथ्वीभोंवतीं फिरतोसा दिसतो. तो ह्या विषुववृत्तातून फिरतो असें दिसत नाहीं. त्यांचें हें क्रांतिवृत्त त्या विषुववृत्तांशीं सुमारें ४,००० वर्षांपूर्वीं २४ अंशांचा कोन करीत असे, असें आमच्या प्राचीन ज्योतिष ग्रंथांत सांगितलें आहे. पण तें हल्लीं (इ. स. १९२४) २३ अंश २७ कलांचा कोन विषुववृत्ताशीं करितें. कला म्हणजे अंशाचा ६० वा भाग. तर हा कोन २३½ अंशापेक्षां कमी आहे. ह्या दोन वृत्तांच्या जणूं बांगड्या ज्या दोन बिंदूंत एकमेकांस छेदितात. त्यांस संपात बिंदू असें म्हणतात. ह्यांतील क्रांन्तिवृत्त विषुववृत्ताचे अर्धे उत्तरेस व अर्धे दक्षिणेस असतें. ह्यावरून हें सांगावयास नकोच कीं सूर्य हा विषुववृत्तांतून फिरत नाहीं तर ह्या क्रान्तिवृत्तांतून फिरतो व तो रोजच्या आपल्या आसाभोंवतालच्या फेऱ्यांत थेट पूर्वेस न उगवतां सहा महिने विषुववृत्ताच्या दक्षिणेस व सहा महिने त्याच्या उत्तरेस उगवतो. याप्रमाणें पाहतां सूर्याच्या

---

**नक्षत्रांचीं देशी व युरोपियन नांवें, नंबर व प्रतः**—१ अश्विनी–नं. २, बीटा एरायटीज, प्र. २-७; भरणी–नं. ३, ४१ एरायटीज प्र. ३; कृत्तिका नं. ५, इटाटारी प्र. ३; रोहिणी नं. ५, आल्डिवरान प्र. १-१; मृग नं. ५, लांबडा ओरायन प्र. ४; आर्द्रा नं–ग्यामाजेमिनोरम प्र. १-९; पुनर्वसू नं. २ पोलाक्स प्र. १-२; पुष्य नं. ३ डेल्टाकांकी प्र. ४-५ आश्लेषा नं. ५ लीटारलियेनियस प्र. ३-४-; उत्तरा फाल्गुनी नं. २ डेनिबोला प्र. २.२; हस्त नं. ४ तर्जनी, डेल्टाकार्वी ३-१; चित्रानं–स्पायका प्र. १·२; स्वाती नं–आर्कटयूरस प्र.०-३, विशाखा नं. १ आल्फालिब्री प्र. २-९; अनुराधा नं. ३ डेल्टस्कर्पिआय प्र. १-८ जेष्ठा नं. २ अंटारिज प्रत १·३; मूळ नं. ८ लांबडा स्कार्पिआय प्र. १-८; पूर्वाषाढा नं. १ फाय सेजेटिरस प्र. ३·३; अभिजित नं. १ व्हीगा प्र. ०-१; श्रवण नं. २ आल्टेर प्र. ०-९; धनिष्ठा नं. ३ आल्फाडेल्फिनी प्र. ३- ९; शतभिषक नं–लांबडा अकेराय प्र. ३-९; पूर्वाभाद्रपदा नं. २ आलजेनिव प्र. २-९- रेवती नं २२ झीटापिरीयम प्र. ५-४; रेवती नं. ९ म्युपिशियन प्र. ४-५.

टीपः—हीं देशी व युरोपियन नांवें-वगैरे नक्षत्रांची पुरी ओळख वाचकांस करून देण्याकरितां मुद्दाम दिलीं आहेत.

ह्या विषुववृत्ताच्या दक्षिणेस जाण्याची परमावधी डिसेंबरच्या २१ व्या तारखेच्या सुमारास होते. त्या वेळीं त्याची दक्षिणक्रान्ती सुमारें २३ अंश व २७ कला असते. अर्थात तो सूर्य त्या दिवशीं पूर्वबिंदूच्या दक्षिणेस सुमारें २५ अंश असतो. या दिवशीं सायन गणिताप्रमाणें मकरसंक्रान्त जीस ह्मणतात ती होते व त्या दिवसापासून तो उत्तरेस जाऊं लागतो. असा जातांजातां तो मार्च २१ च्या सुमारास विषुववृत्तावर परत येतो व बरोबर पूर्वेस उगवतो. ह्या वेळच्या विषुव व क्रान्ती ह्या दोन वृत्तांच्या छेदनाच्या बिंदूस वसंतसंपात असें ह्मणतात. यावेळीं मेषसंक्रमण होतें. पुढें तो सूर्य उत्तरेस जाऊं लागतो व असा तो उत्तरेस जातां जातां त्याची परमावधी जूनच्या २१ तारखेच्या सुमारास होते, व तो पुन्हां दक्षिणेस जाऊं लागतो. यावेळीं त्याची उत्तरक्रान्ती २३ अंश २७ कला असते. म्हणजे तो त्या दिवशीं पूर्वबिंदूच्या उत्तरेस सुमारें २५ अंश असतो. या दिवशीं सायनगणिताप्रमाणें कर्कसंक्रमण होतें. पुन्हां सपटेंबरच्या २२ तारखेच्या सुमारास तो विषुववृत्तावर येऊन थेट पूर्वेस उगवतो. ह्या वेळच्या विषुव व क्रान्ती ह्यांच्या छेदनबिंदूस शरत्संपात असें म्हणतात. पुढें तो दक्षिणेस जातां जातां २१ डिसेंबरच्या सुमारास त्याची दक्षिणेस जाण्याची अगदीं कमाल होते. एवढ्या अवधींत एक वर्ष होतें व सूर्याचा दैनंदिन व वार्षिक कार्यक्रम पुन्हां दुसऱ्या वर्षाचा यथापूर्व चालूं लागतो.

ऋग्वेदाशिवाय इतर वैदिक ग्रंथांत वर्षाचे महिने १२ व ऋतू ५ किंवा ६ आले आहेत.

> द्वादशमासाः पंचर्तवो हेमंतशिशिरयोः समासेन । ऐ. ब्रा. १–१
> मुखं वा एतहतूनां । यद्वसंताः ॥ तै. ब्रा. १–१,–२,६,–७,
> तस्य ते ( संवत्सरास्य ) वसंतः शिरः । ग्रीष्मो दाक्षिणः पक्षः ।
> वर्षाः पुच्छं । शरदुत्तरपक्षः । हेमन्तो मध्यं ॥
> तै. ब्रा० ३–१०–४–१

ह्यांत संवत्सर हा एक पक्षी आहे असें कल्पून त्याचे अवयव असे पाडिले आहेतः—

मुख–वसंत.

उत्तरपक्ष–शरद. मध्य–हेमंत. ग्रीष्म–दाक्षिणपक्ष.

पुच्छ–वर्षा.

टीप–१ सूर्य डिसेंबरच्या २१ व्या तारखेस फार दाक्षिणेस असतो. ह्मणून तो उगवल्यापासून मावळेपर्यंत त्याचा फेरा लहान होऊन दिनमान कमी होतें व सूर्याचे किरण दोन प्रहरींही तिर्कस पडल्यामुळें कांहीं महिने थंडी फार पडते.

२ सूर्य जूनच्या २१ व्या तारखेस फार उत्तरेस असतो. ह्मणून तो उगवल्यापासून मावळेपर्यंत त्याचा फेरा मोठा होऊन दिनमान मोठें होतें व सूर्याचे किरण दुपारीं लंबरूप पडल्यामुळें कांहीं महिने उन्हाळा होतो. यांत सूर्य २३ $\frac{१}{२}$ कमी अक्षांशाच्या स्थळीं दोनदां डोक्यावर एप्रीलपासून पांच महिन्यांत येतो व उष्णता वाढून मोसमीचे वारे तेथें पाऊस घेऊन येतात. ( आमचें अवर्षण–प्रताप–प्रशसन पहा )

टीपः—( १ ) वेदांगज्योतिषाचा काल शकापूर्वी १५०० वर्षे हा होय. यावेळीं १२ सौरमास प्रचारांत होते. अर्थात यावेळीं क्रान्तिवृत्ताचे १२ भाग, त्या प्रत्येक भागाचे ३० अंश व त्या प्रत्येक अंशाच्या ६० कला असा काल-भाग उत्पन्न झाला होता व त्याप्रमाणें क्रान्तिवृत्ताचे अंश अथवा राशी, कला व विकला आपल्या हिंदू लोकांनीं कल्पिल्या असें दिसतें. यास प्रमाणें:—

(१) मासद्वये यदाप्येकराशिं संक्रमे तादित्यस्त त्राद्यो मलिम्लुचः शुद्धोन्यः । मै. सू.

(२) मीनमेष्योर्मेषवृषभयोर्वसंतः ॥ बौद्धायनसूत्र.

शिवाय, भारतांत व पाराशरसंहितेंत ब्रम्हराशी आला आहे ( भा. ज्यो. इ. पा. ५१० ).

( २ ) क्रान्तिवृत्ताच्या पूर्वोक्त १२ विभागांत षडशीती वगैरे १२ संज्ञा वेदांगज्योतिषाच्या काळापासून होत्याच, त्या संज्ञांच्या जागीं मेषादी संज्ञा मैत्रेय सूत्र, बौद्धायन सूत्र यांपासून आम्ही ओघानेंच चालू केल्या आहेत ह्यांत कांहीं संशय नाहीं.

**राशिचक्रः**—प्राचीन लोकांचें मत असें होतें कीं आपला सूर्यबापा हा आपल्या भूमिमातेभोवती फिरतो. त्याच्या वार्षिक गतीचें मापन करण्यास त्यांनीं आकाशांत पूर्वोक्त बारा नक्षत्रपुंज कल्पिले व त्यांस राशी हें नांव दिलें. ह्या नक्षत्रपुंजाच्या पट्टयाला राशिचक्र हें नांव आहे. ह्यांतील एका नक्षत्र-पुंजापासून दुसऱ्या नक्षत्रपुंजापर्यंत सूर्याचें जें गमन अथवा संक्रमण त्यास मास अथवा संक्रांत असें म्हणतात. ह्या ह्मणून सर्व राशिचक्राचे ३६० अंश कल्पिले असतां ह्यांतील प्रत्येक राशीमध्यें ३० अंश मोडतात व ह्या राशिचक्राची रुंदी १६ अंश आहे. ह्या पट्टयाच्या मधून सूर्याची कक्षा गेली आहे. त्या कक्षेस क्रान्तिवृत्त असें ह्मणतात. ह्या राशिचक्रांतील नक्षत्र पुंजांत सुमारें १२०८ तारे आहेत. या राशींचीं नांवें सव्वादोन नक्षत्रांस एक प्रमाणें अनुक्रमानें येणेंप्रमाणें:—

| संस्कृत व इंग्रजी. | नक्षत्रें. | ताऱ्यांची संख्या. |
|---|---|---|
| १ मेष ( रॅम ). | —अश्विनी, भरणी, कृत्तिका, १ पाद. ... | ...४२ |
| २ वृषभ (बुल). | —कृत्तिका ३ पाद, रोहिणी, मृगशीर्ष अर्धा | ...२०७ |
| ३ मिथुन (ट्विन्स). | —मृगशीर्ष अर्ध, आर्द्रा, पुनर्वसु ३ पाद. | ...८३ |
| ४ कर्क ( क्रॅब ). | —पुनर्वसु, १ पाद, पुष्य, आश्रेषा... ... | ...८५ |
| ५ सिंह ( लायन ). | —मघा, पूर्वा, उत्तरा १ पाद. ... ... | ...९३ |
| ६ कन्या ( व्हार्जिन ). | —उत्तरा ३ पाद, हस्त, चित्रा अर्ध | ...११७ |
| ७ तुला ( बॅलेन्स ). | —चित्रा अर्ध, स्वाती, विशाखा ३ पाद | ...६६ |
| ८ वृश्चिक ( स्कॉर्पियन ). | —विशाखा, १ पाद, अनुराधा, ज्येष्ठा | ६० |
| ९ धनु ( आर्चर ). | —मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा १ पाद | ...९४ |
| १० मकर ( गोट ? ). | —उत्तराषाढा ३ पाद, श्रवण, धनिष्ठाअर्ध | ६४ |
| ११ कुंभ ( वाटरबेअरर ). | —धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा ३ पाद | ११७ |
| १२ मीन ( फिश ). | —पूर्वाभाद्रपदा, १ पाद उत्तरभाद्रपदा, रेवती | ११६ |

# भाग चवथा.

## राशीचक्राचा अनादी नकाशा.

### देशांची ओळख.

The historical documents, which supply the materials for the investigation of the oldest antiquities have come down from the Bards and Muses of the earliest times, dressed in a garb of mystery, such as to baffle the pursuit of every body, except the keen witted bookworm, who has perseverence enough to stick to his books till age and blindness supervene.—*W. S. Blacket, P. 2.*

अर्थः—ज्या ऐतिहासिक लेखांवरून अत्यंत जुन्या पुराण्या गोष्टींचा शोध करण्याचें साधन प्राप्त होतें, ते लेख प्राचीन काळाचे कवी व भाट यांजकडून प्राप्त होतात. पण ते अशा गूढ स्वरूपांत असतात कीं ते प्रत्येकाचा जणूं पाठलाग चुकवितात. त्यास अपवाद असेल तर तो एवढाच आढळतो कीं वृद्धपणा व अंधपणा यांची आडकाठी येईपर्यंत ज्यांच्या ठायीं दृढोद्योग आपल्या पुस्तकांस चिकटून राहण्यासारख्या असतो अशा पुस्तकांतील तैलबुद्धीच्या कीटकांच्या तावडींतून मात्र ते निसटून जाऊं शकत नाहींत.

It was a part of the mystic system, to accompany the miths with a pictorial map. The Zodiac form a constituent part of the system. Having upon their face the same nomenclature as the myths, they serve satisfactorily to locate the histories comprised in the tradition The same P. 328.

अर्थः—ह्या गूढ कोड्यांबरोबर त्यांचा खुलासा करणारीं जीं चित्रें व नकाशे असत, ते त्यांबरोबर वापरले पाहिजेत. राशिचक्राचे नकाशे हे त्या व्यवस्थेपैकींच आहेत. पुराणांतील कोड्यांत जी परिभाषा वापरली असते, तीच त्या नकाशांत वापरून ठेविली असल्यामुळें एखाद्या दन्तकथेंतील ऐतिहासिक गोष्ट कोणत्या देशांतील कोणत्या स्थळीं घडली हें त्यावरून सहज व अनायासें ठरवितां येतें.

You suppose something to be true and work away to see whether in the light of that supposed truth, certain facts fit together better than they do on any other supposition.—Anthropology–P. 8–*R. R. Marett.*

अर्थः—कांहीं एक गोष्ट खरी माना व त्या मानीव गोष्टीप्रमाणें दुसऱ्या कल्पनेपेक्षां कांहीं गोष्टींचा मेळ जास्त चांगला बसतो कीं नाहीं हें पडताळून पहा.

मागील भागांत तारकापुंज अथवा राशिचक्र याचें विवरण करण्यांत आलें. त्याचा उपयोग सध्यां पाहतां आकाशांतील नक्षत्रपुंजांचा अनादी चित्रपट म्हणून

होत आहे. पण तो मूळारंभीं केवळ भूमीचा चित्रपट होता. आतां ह्या भागांत त्या चित्रपटाचा उपयोग जुने देश ओळखण्यास कसा होतो हें पहावयाचें आहे.

प्राचीन लोकांचा गूढ लेखांकडे बरेंच लक्ष पुरवून पृथ्वींतील जुन्या देशांतल्या पुराणसागरांत दमानें बुडी मारण्याचा हा प्रयत्न आहे. ह्यांत प्रत्येक राशीच्या चिन्हाचा स्वतंत्र विचार करूं. म्हणजे त्यांत विवक्षित राशीची खूण त्या खालील विवक्षित स्थळांस कशी लागते ह्याचा शहानिशा होईल.

शहानिशाः—ह्या राशिचक्राच्या पटाची बारीक तपासणी केली तर असें आढळतें कीं हा पौराणिक काळांतील पहिला देशदर्शक नकाशा होता. पण त्याचा पुढें ज्योतिषशास्त्राच्या कामांत उपयोग करण्यांत येऊं लागला. म्हणून त्या नकाशास सध्यां कोणी भौगोलिक नकाशा ह्या नांवानें ओळखित नाहींत हें खरें; पण त्यास तें नांव नसलें म्हणून काय झालें ? नांवानें वस्तूच्या गुणांत फरक पडत नाहीं. एखाद्याचें नांव दगडू असलें तरी तो दगडाचा नसतो व तें सोन्या असलें म्हणून तो सोन्याचा नसतो. ह्या नकाशाची रचना हल्लीं शाळांत चालणाऱ्या नकाशांहून भिन्न असते; पण तेणेंकरून त्याच्या उपयोगांत फरक पडत नाहीं. याबद्दल एवढेंच म्हणतां येईल कीं प्रत्येक काळाची ढब व तऱ्हा निरनिराळी असते. हें खरें कीं त्यांतील झाडून सर्व देश—मासे, पशू, पक्षी वगैरे प्राण्यांच्या रूपानें चितारले आहेत, पण त्यांवर त्यांचीं नांवें दिलेलीं असल्यामुळें त्यांत कांहीं एक वावगें होत नाहीं. तो पाहिजे तसा रेखलेला नकाशा आहे; व आपणास पुराणांचा अभ्यास कर्तव्य असल्यास त्यासारखें वाट दाखविण्याचें काम करणारें दुसरें साधन नाहीं. शिवाय या राशिविशिष्ट नकाशांत एक विशेष गुण आढळतो. तो हा कीं नकाशा चित्रालंकित असतो व तो प्रत्येक जुन्या देशांची विशेष चिन्हें व लक्षणें दाखवितो; जसें, हिंदुस्थानाबद्दल सिंह.

राशिचक्र हा प्रथम ज्ञात जुन्या देशाचा नकाशा होताः—ही उपपत्ती—सर्वांस मान्य होण्यासारिखी नाहीं. म्हणून ह्या उपपत्तीबद्दल साधक प्रमाणें दिलीं पाहिजेत. राशिचक्राचा नकाशा कोणी लिहिलाच नव्हता किंवा तो लिहिला गेला असून कालान्तरानें नष्ट झाला. त्याच्या उत्पत्तीचें मूळ हें अज्ञानाच्या मातींत गडप झालें आहे. त्याप्रमाणेंच त्याच्या वाढीच्या इतिहासाची गोष्ट आहे. खऱ्या इतिहासांत त्याचा मागमूस सांपडत नसल्यामुळें त्याचा शहानिशा आंतर व बाह्य प्रमाणांवरून करून घेतला पाहिजे.

असें मानणें सयुक्तिक दिसतें कीं प्राचीन ज्योतिषांस पृथ्वीचा एक चित्रमय नकाशा आढळला. त्यांत देशांची नांवें देऊन त्यांत त्या देशांतील जमिनींत विशेष आढळणाऱ्या वस्तू, त्याच्या इतिहासांतील महा पुरुषांचीं चमत्कारिक कृत्यें व त्यांतील राजाचीं चिन्हें दाखविलीं होतीं. त्या नकाशांतील चित्रांचा उपयोग त्या वेळच्या जोशांनीं खगोलांतील नक्षत्रांच्या वर्णनांत केला. तें कसेंही असो, पण हें कोणासही अमान्य करवणार नाहीं कीं त्यांनीं आकाशांतील तारकापुंजांची वांटणी हल्लीं आढळणाऱ्या राशींत केली असेल तर मासे, अस्वल, सिंह,

व राक्षस यांचीं रूपें धारण करणाऱ्या व चमकणाऱ्या तारकागुच्छाविषयीं त्यांच्या कल्पना मोठ्या विलक्षण दिसतात. एखादा मनुष्य वेधशाळेंत उभा राहिला व त्यानें ताऱ्यांचें गुच्छांचे वेध मान मोडून जाईतों चालविले तरी कल्पनासृष्टींत कितीही व कशाही भराऱ्या मारून त्यास त्रिकोणाशिवाय दुसरी कोणतीही आकृती तयार करतां येणार नाहीं.

## सिद्धान्त.

व्याख्याः—राशिचक्राचा चित्रपट हा प्रथम जुन्या ज्ञात देशांचा नकाशा होता व तो तसा होता तर आमचे लोक अनादी वैदिक काळीं तच्छुध्यर्थ पायांनीं व गलबतांनीं त्यावेळच्या सोईप्रमाणें त्रिखंडांतील क्रान्तिप्रदेशांत प्रथम पूर्वपश्चिम फिरत असले पाहिजेत.

प्रमाणेंः—( १ ) वैदिक-तैति. ब्राह्मण १९.२ मध्यें असें म्हटलें आहे कीं ॥ देवगृहा वै नक्षत्राणि । गृह्येव भवति ॥ यानि वा इमानि पृथिव्याश्चित्राणि ॥ तानि नक्षत्राणि ॥ म्हणजे नक्षत्रें देवांचीं घरें होत. हें जो जाणतो, तो गृही म्हणजे घरभारी होतो. हीं जीं पृथ्वीचीं चित्रें तीं नक्षत्रें होत.

यावरून ह्या लोकींचे पुण्यात्मे स्वर्गीं नक्षत्रें होतात—ही कल्पना ह्या वैदिक तैतिरीय ब्राह्मणाच्या काळीं रूढ होती असें दिसतें. याप्रमाणेंच पृथ्वीचीं म्हणजे पृथ्वीवरील वस्तूंचीं चित्रें तीं नक्षत्रें होत. ही व्युत्पत्ती पाहिली कीं पृथ्वींतील कांहीं वस्तूंच्या आकृतीवरून नक्षत्रपुंजांस अथवा राशींस नांवें पडलीं असावीं असें दिसतें. याप्रमाणें नक्षत्रपुंजांसंबंधें अनेक कथा पुराणांतरीं आहेत; जसें, १ ध्रुवाची कथा, २ मृगव्याधाची कथा, ३ कृत्तिकांची कथा, ४ हस्ताची कथा, ५ मूळाची कथा, ६ अश्विनींची कथा, ७ पुनर्वसूची कथा, ८ फाल्गुनीची कथा—वगैरे ( आमची भक्तीची प्रत्यक्ष मूर्ती पहा. त्यांत त्यांचा तपशील दिला आहे). यावरून ह्या पुराणोक्त कथांची उत्पत्ती आपल्या भूमितलावरील कांहीं घडलेल्या गोष्टींपासून होऊन त्यांची सध्यां योजना कांहीं खगोलांतील तारकापुंजांकडे किंवा राशींकडेच काय ती फक्त होत आहे तर हीं जीं पृथ्वीचीं चित्रें तीं नक्षत्रें होत हें निर्विवाद सिद्ध झालें.

( २ ) वेदांत पृथ्वी वाटोळी व अधांतरीं आहे म्हणून वर्णन पूर्वीं दिलें आहे. पण पुराणें वाचून सामान्य लोकांचे ग्रह काय होतात ? ती ताटासारिखी वाटोळी व सपाट आहे म्हणून. तसेंच त्याखालील पाताळ व वरील स्वर्ग यांची तीच स्थिती आहे म्हणून ( विष्णुपुराण पहा ). तर आतां काय करावयाचें ? ती ताटासारिखी सपाट व वाटोळी पृथ्वी एक मोर्तब आहे व तीवरील ताटासारखें सपाट व वाटोळें आकाश मेणाचें आहे असें कल्पूं, व तें पृथ्वीचें मोर्तब त्या मेणाच्या आकाशावर वर करून दाबूं. म्हणजे काय होईल ? त्या मेणाच्या आकाशावर त्या पृथ्वीच्या मोर्तबाचा हुबेहूब ठसा उमटेल, व अशा प्रकारें पृथ्वीवरील देशांच्या प्रतिमा आकाशावर उठतील, व ध्रुव अढळ पदीं गेला, रोहिणीनें आकाशांत आरोहण केलें वगैरे कथानकें अन्वर्थक ठरतील. अशा प्रकारें पृथ्वीचा

नकाशा आकाशांत वापरला तर जोशांचें काम होऊन ह्या मर्त्य लोकांतील अनेक पुण्यात्मे व वस्तू अमर होऊन नक्षत्रांच्या घरांत अक्षय्य वास करतील ! तर ह्या अडाणमताप्रमाणें पाहिलें तर पुराणांच्या अभ्यासांत उलट ह्या राशिचक्राच्या किंवा तारकापुंजांच्या नकाशास तत्सम पृथ्वीवरील देशांचा अनादी नकाशा होय असें मानिल्यावांचून गत्यंतर नाहीं हें सिद्ध होय.

( ३ ) आमच्या देशांत व बाबिलोनियांत पत्रिका तयार करितात. त्यास राशिचक्राचा अथवा नक्षत्रपुजांचा जसा नकाशा लागतो, तसा तो नकाशा ज्योतिषासही लागतो. तर जातक व ज्योतिष यांच्या कामीं त्याचा उपयोग करूं लागण्यापूर्वी तो तदितर वरच्या कामास—तो भूगोलावरील देश ओळखण्यास उपयोगी पडावा.—म्हणून तो अस्तित्वांत आलेला असला पाहिजे तर हीं जीं पृथ्वीचीं चित्रें तीं नक्षत्रें ठरतात. ( तै० ब्रा० ५—२ ). हीं वैदिक प्राचीनतम व बलवत्तम प्रमाणें आहेत असें निखालस ठरतें.

( ४ ) म्हणून एशियाटिक रीसर्चिसच्या सहाव्या खंडांतील ब्रह्मदेशांतली आठवी बदकाची रास शान अथवा सयामची व एकावन्नावी तिरोत्तराची रास चिनाची व तेविसावी ब्राम्हणाची रास हिंदुस्थानची निदर्शक आहे. तेव्हां राशिचक्राच्या पटांतील चित्रें भौगोलिक नकाशाचीं ठरतात. व—

( ५ ) ह्मणून सिसीलियन अतरस नामक ज्योतिर्विद यानें आपले ग्रंथांत असें आणखी यथार्थ ह्मटलें आहे कीं आकाशांतील राशींपैकीं कुंभ राशीच्या कुंभांत नील [ सं. नील- निळें, इं. नाईल ] नदीचें पाणी भरलेलें असतें. आतां कुंभरास हें नांव वरच्या एका कोष्टकाप्रमाणें—धनिष्ठा अर्धं, शततारका व पूर्वाभाद्रपदा ३ पाद—या दोन पूर्णांक एक चतुर्थांश नक्षत्रांच्या राशिचक्रांतील एका भागास आहे. तर त्या कुंभांत नील नदीचें पाणी भरलेलें असतें. ह्याचा व्यावहारिक अर्थ काय समजावयाचा ? त्या नक्षत्रपुंजांत पाणी भरलेलें असतें असें ह्मणावयाचें तर त्यास कुंभ ही संज्ञा असलीं तरी तो तारकापुंज म्हणजे कांहीं भांडें नाहीं. हें गौडबंगाल काय ? कुंभ राशीचक्रांतील हें चिन्ह आपल्या भूमिमातेच्या नकाशांतील होय असें मानल्याशिवाय ह्या गूढ कोड्याचा उलगडा होणें हें अत्यंत असंभाव्य कोटींतील आहे. कुंभ राशीसंबंधें हें जें अतरसचें ह्मणणें आहे तें वरील वेदवाक्यास अत्यंत पोषक आहे. पण तें त्या वेदवाक्याप्रमाणें झाडून सर्व नक्षत्रपुंजांस निरपवाद लावितां आलें पाहिजे: कारण या राशिचक्रांतील एक रास अशी जमिनीवरील व दुसरी अस्मानांतील मानणें युक्तीस अत्यंत विरोधी ठरेल, व एवढा वेळ ह्या साधक प्रमाणांचा उभारलेला डोलारा रेतीच्या मनोऱ्याप्रमाणें कोणत्याही एका पण्डिताच्या बोलाच्या निश्वासाच्या झुळकेबरोबर एकदम धडधडून खालीं पडेल ! त्यास सद्रहू राशिचक्रांतील प्रत्येक राशींतला तारकापुंज व त्या खालील राष्ट्र किंवा देश यांमध्यें निरपवाद नितान्त मेळ आहे अशी आपल्यास सिद्धता करितां आली पाहिजे. त्यांत त्या राशीचें, १ नांव, २ लक्षण व ३ स्थळ—या तिहींसंबंधें केसभर फरक असतां कामा नये. [ १ ] त्यांतील खुणेचें चित्र एखाद्या प्राण्याचें असेल

तर तें त्या देशांतील एखाद्या विशेष प्राण्याचें असलें पाहिजे व तो प्राणी त्या देशाचा अचूक निदर्शक असला पाहिजे, (२) त्यांतील चित्र माशाचें असेल तर तें एखाद्या समुद्रावर किंवा समुद्रकिनाऱ्यावर असलें पाहिजे व (३) त्या हरयेक उदाहरणांतील त्या खुणेचें स्थळ त्या सभोंवतालच्या देशांच्या सापेक्ष स्थळांस बिनचुक मिळतें असलें पाहिजे.

टीप:—हीं तिहेरीप्रमाणें म्हणजे बिनचुकपणाच्या कमालींतील कमालीची कसोटी झाली. पण आपण मागील भागांत हें पाहिलें आहेच कीं आपल्या पृथ्वीचा नकाशा हा राशिचक्राच्या पटाप्रमाणें वेढब व आडमाप काढिलेला आहे. म्हणून त्यांत गणित शुद्ध भेळ बसवितांना पुष्कळ दिलदारपणा ठेविला पाहिजे. एरवीं हें कार्य साधितां येणार नाहीं व तें असें होईल तेव्हां तें एखाद्या अपुऱ्या माहितीच्या देशासंबंधीं आहे असें समजून चाललें पाहिजे.

सिद्धता:—प्रत्येक राशीमध्यें २$\frac{१}{४}$ नक्षत्रें याप्रमाणें आपल्या ऋषींनीं वैदिक-काळीं ( श. पू. ५००० ) शोधून काढिलेल्या २७ नक्षत्रांच्या मैत्रेयसूत्र व बौद्धायनसूत्र यांच्या काळीं ( श. पू. ५०० ) १२ राशींचें नवें नामकरण केलें हें वर दाखविण्यांत आलें आहे. ह्या बारा राशींस आरब प्रभृती पश्चिमेकडील लोकांत भिन्न अर्थाचीं नांवें नाहींत. ह्या सूर्याच्या मार्गदर्शक १२ राशीं-शिवाय आणखीं ६।७ राशी आमच्या पूर्वजांनीं कल्पिल्या होत्या. त्यांतील बहुतेक तारा व पाश्चिमात्यांनीं अलीकडे कल्पिलेल्या अनेक राशी यांतील पाहिल्या प्रतीच्या ठळक तारा ह्यांचा उल्लेख आमच्या प्राचीन ग्रंथांत आढळतो ( कै. शं. बा. दीक्षित ).

आतां पृथ्वींतील प्रदेशावरून आकाशांतील तारकापुंजांस नांवें पडलीं. ह्या सिद्धान्तास पहिला आधार आपणास अनादी वेदांतील तैतिरीय संहितेंत मिळाला. पण त्याचा उपयोग कसा व कोठून करण्यास आरंभ करावयाचा ? ह्यास सूचक आधार मिळाला पाहिजे. ह्मणून आपण झाडून सर्व तारकामण्डळाचे तीन भाग पाडूं–( १ ) राशिचक्र, ( २ ) उत्तरेकडील नक्षत्र-मण्डळ, व ( ३ ) दक्षिणेकडील नक्षत्रमण्डळ. नंतर राशिचक्रापैकीं सिंहरास ही आपल्या हिंदुस्थानची आहे असें कल्पून त्या कल्पनेचा मेळ इतर राशिस्थानाशीं पडतो कीं नाहीं हें पाहूं. असें केल्यानें तिच्या उजव्या व डाव्या हाताकडील दुसऱ्या कांहीं राशींचा त्या खालील ज्ञात स्थळाशीं मेळ जमला तर आपली योजना बरोबर समजूं, नाहीं तर ती चूक समजूं.

सिंह:—ह्या राशींत मघा, पूर्वा व उत्तरा हीं नक्षत्रें आहेत. ह्यांच्या मधील पुष्कळ तारे विलक्षण चतुष्कोणाकृतीनें आहेत. हा सिंह, चिनांतील कन्या राशी-कडे कोणी जाऊं नये म्हणून इराणांतील मिथून राशीकडे जणू उड्या घेत चालला आहे. पण त्यास माघून गांधारांतील ( अफगाणिस्थान व बलुचिस्थान ), कर्कराशीनें अडविलें आहे. म्हणून त्याची धांव पुढें जावयाची थांबली आहे, ह्या सिंहराशीखालीं हिंदुस्थान आहे. कारण ह्या देशांतील लोक सर्वांआधीं अप-

तिम पराक्रमी झाले होते. म्हणून त्यास पुरुषसिंह ही मोठ्या मानाची पदवी असे, जसें, नृसिंह, रणजितसिंह. ग्रीष्म ऋतूंत ही रास आपल्या अद्वितीय सूर्यतापानें झाडून सर्व प्राणिमात्रास तळतळून सोडित्ये. म्हणून या राशीस सिंह हें नामाभिधान प्राप्त झालेलें दिसतें. शिवाय हिंदुस्थान अफ्रिकेस जोडलेलें होतें तेव्हांपासून येथें पुष्कळ सिंह होते ह्याचाही बोध सदरहू रास करीत असावी असें दिसतें. त्याप्रमाणें जुनागड संस्थानांत हल्लीं सिंह आहेत व गुजराथच्या बाजूच्या बेटांत सिंह, गेंडे वगैरेंचे अवशेष सांपडतात ( आमचें भूगर्भदर्पण पहा )

कन्या–ही रास सिंहराशीच्या उजव्या बाजूस आहे. ह्या राशींत-उत्तरा, हस्त व चित्रा ही २$\frac{1}{4}$ नक्षत्रें आहेत. हिनें पुष्कळ जागा व्यापिली आहे. हिच्यामध्यें एक तारा आहे. तो फारच तेजस्वी आहे. ही आकृती धान्य कापणाऱ्या मुलीप्रमाणें दिसते. त्याच प्रमाणें तिच्या डाव्या हातांत साळीची लोंब आहे, व ह्या हातावर एक पहिल्या प्रतीचा तारा आहे. तो फारच तेजस्वी आहे. बृहदृक्ष ( सप्तर्षी-खाटलेबाजलें–कुणब्याचें ) ह्मणून ह्या राशिचक्राबाहेर एक तारकापुंज आहे. त्यापासून एक कर्णरेषा काढिली तर ती ह्या तारकापुंजांतून जाते. ह्या राशीखालीं पिंवळ्या लोकांचा चीन देश येतो. म्हणजे ही रास उत्तरगोलार्धांतील एशियाखंडांपैकीं शेवटची होय. ह्या देशांतील मोठ्या प्रदेशावर शेती पसरली असून त्यांत भातशेतीची कापणी करणाऱ्या मुलींची मोठी चहादारी आहे. ही गोष्ट स्त्रीदाक्षिण्यांत तत्पर सिंहास मान्य आहे. पण ही गोष्ट सिंहाच्या उजव्या आंगच्या असिरियांतील मिथुनास मान्य नाहीं. म्हणून त्यावर सिंह उडी घालणार होता. पण त्यास अफगणिस्थान व बलुचिस्थान यांतील वांकडा कर्क (खेंकडा) आड आला. तो म्हणूं लागला कीं, हे सिंहा, तुझी उडी असिरियांतील मिथुनावर गेल्याबरोबर मी तुझ्या हिंदुस्थानातील तर काय पण चिनांतील शेतीभातीच्या जमिनींत बिळें करून तिची नासधूस करून टाकीन, व म्हणून सिंहानें आपला पाय मागें घेतला व तो कर्काच्या पाळथीवर राहिला. तेणेंकरून सूर्यतापानें पिकलेलीं साळीचीं लोंबटें व कणसें झाडून सर्व काढून घेण्याची संधी त्या कन्येला साधितां आली आहे.

कर्कः—ही रास सिंह व मिथून ह्या दोन राशींमध्यें आहे. ह्या नक्षत्रपुंजांत–पुनर्वसू, पुष्य व आश्लेषा हीं मुख्य नक्षत्रें आहेत. ह्यांत फारसे दुसरे तारे नाहींत व त्यांचा प्रकाशही कोठें सांगण्यासारिखा नाहीं. पण ह्या राशीचा मुख्य गुण कर्कासारखा म्हणजे खेकड्यासारखा वाकडा असणें हा होय, मग परिणामीं त्याचा स्वतःच घात होत असला तरी त्याकडे पहावयाचें नाहीं. ह्याचें प्रत्यंतर–हिंदुस्थानांतील कौरवपांडवरूप सिंहांस गांधार ( कंदाहार–अफगणिस्थान व बलुचीस्थान देशांतील शकूनिच्या अक्षरूप फाशांच्या जुगाररूप ) कर्कानें उत्तम आणून दिलें. गांधार उर्फ कंदाहार हा देश कर्कराशिखालीं आहे. ह्या राशींत सूर्य आल्याबरोबर त्याची गती इकडील खेकड्याप्रमाणें वक्र होते. येथील कर्कटींचे म्हणजे खरबुजें, टरबुजें, कांकड्यांचे वगैरे वेल चोहोंकडे कर्कांप्रमाणें वांकडे फिरलेले असतात.

मिथुन.—ह्या राशींत मृगशीर्ष, आर्द्रा व पुनर्वसू हीं नक्षत्रें आहेत. ह्यांतील तारे थोड्या अंतरावर असून चतुष्कोणाकृतीनें आहेत. ह्या नक्षत्रपुंजांची आकृती जुळ्याप्रमाणें आहे. त्यापैकीं एकाच्या हातांत सोटा आहे व दुसऱ्याच्या हातांत बरची आहे. ही रास पूर्वोक्त बृहदृक्षाच्या [ सप्तर्षी ] शेवटापासून पंचवीस अंश लांब आहे. हीस अग्रहायण हें दुसरें नांव आहे. यावरून पश्चिमेकडील देशांत इकडून ओरायन हें नांव गेलें आहे. हें सांगितल्याबरोबर कोणासही लोकमान्य टिळकांच्या ओरायन या पुस्तकाची व तें होण्यास कारण होणाऱ्या मृगव्याधाच्या गोष्टीची आठवण होईल. ती ही कीं प्रजापतीनें आपल्या 'कन्येचा' अभिलाष केला. ती द्यू होय असें कोणी म्हणतात, ती उषा होय असें कोणी म्हणतात. ती रोहित झाली. तिच्या जवळ तो ऋष्य होऊन गेला. त्याला देवांनीं पाहिलें व प्रजापती अकृत करितो असें ते म्हणूं लागले, व त्याला मारील अशा पुरुषाचा ते शोध करूं लागले. पण त्यांस त्यांच्यांत असा कोणी सांपडला नाहीं. तेव्हां त्यांनीं आपल्या अती घोर तनू एकत्र केल्या व एक देव तयार केला. त्याचें नांव भूतवत होय—हें जो जाणतो त्याच्या जन्माचें सार्थक झालें असें समजावें. त्याला देव म्हणाले कीं ह्या प्रजापतीनें अकृत कर्म केलें आहे—म्हणून यास तूं बाणानें विद्ध कर. तो म्हणाला जी आज्ञा. पण त्यानें तसें करण्यापूर्वीं एक वर मागितला. त्यांनीं त्यास होकार दिला असतां त्यानें आपल्याकडे पशूंचें आधिपत्य मागितलें. तेव्हांपासून त्याचें पशुमान हें नांव पडलें. जो हें जाणतो, तो पशुमान होतो. तेव्हां त्या पशुमानानें त्यास विद्ध केलें. प्रजापती विद्ध झाल्याबरोबर तो वर गेला. त्या प्रजापतीस मृग म्हणतात व त्यास विद्ध करणाऱ्याला मृगव्याध व त्या रोहित कन्येस रोहिणी असें म्हणतात. त्यानें तीन कांड्यांचा बाण मारिला होता, तोच त्रिकाण्ड बाण हल्लीं आकाशांत आहे. यास प्रमाणः—

प्रजापतिर्वै स्वां दुहितरमभ्यध्यायद्दिव मित्यन्ये तामृश्यो भूत्वा रोहितं भूतामभ्यैत् तं देवा अपश्यन्नकृतं वै प्रजापतिः करोतीति ते तमैच्छन्य एतमारिष्यत्येतमन्योन्यस्मिन्नाविदंस्तेषां या एव घोरतमास्तन्व आसंस्ता एकधा समभरंस्ता संभृता एष देवोभवत्तदस्यै तद्भूतवन्नाम भवति वै स योस्यैतदेवन्नाम वेद तं देवा अब्रुवन्नयं वै प्रजापतिरकृतमकरिमं विध्येति स तथेत्यब्रवीत्स वै वो वरं वृणा इति वृणीष्वेति स एतमेववरम वृणीत पशूनामाधिपत्यं तदस्यैतत्पशुमान्नाम पशुमान् भवति योस्यैतदेवं नाम वेद तमभ्यायत्याविध्यत्स विद्ध ऊर्ध्व उदप्रपत तमेतं मृग इत्याचक्षते परऽएव मृगव्याधः सऽएव स या रोहित् सा रोहिणी यो एवेषुस्त्रिकांडासो एवेषु त्रिकांडा तद्वा इदं प्रजापतेरेतस्सिक्तमधावत्तत् सरोभवत् ॥ ऐ.ब्रा. १३-१.

यावरूनच—मृगानुसारिणं साक्षात्पश्यामीव पिनाकिनम्—ही कालिदासास उपमा ( शाकुंतला. १) सुचलली दिसते.

ह्या राशीखालीं इराण हा देश आहे. त्यांत ही अकृत गोष्ट घडूं लागली तेव्हां त्या राशींतील मृगावर झडप घालण्याचा पवित्रा हिंदुस्थानांतील सिंहानें पाय जुळवून केला. इतक्यांत पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कर्कानें वैर साधण्याची

तयारी केली. मिथुन राशींतील मृगनक्षत्राच्या सुमुहुर्तावर सूर्य व पृथ्वी याच्या विवाहांतील विजेचा लखलखाट व मेघांचा गडगडाट यांसह वर्षारूप पुण्याहवाचनास प्रारंभ केव्हां होईल म्हणून ग्रीष्म ऋतूच्या तापानें तापलेला जीवगण व वनस्पतिगण चातकासारिखी वाट पहात बसलेला असतो, तेव्हां त्याची कांहीं निराळी *ओळख देण्याचें कारण नाहीं.

वृषभः—ह्या राशींत—कृत्तिका, रोहिणी व मृगशीर्ष—हे तीन नक्षत्रपुंज आहेत. ह्या राशीची आकृती बैलासारिखी मानिली आहे. ही भली मोठी आहे. हिला दोन शिंगें, चार पाय, डोकें, मान, व थोडा पाठीचा भाग आहे. ह्याच्या एका शिंगाचें टोंक सारथी राशीच्या उजव्या पायाला लागलें आहे. ह्याच्या खांद्याजवळ ययातीचा पाय आहे. हीमध्यें मोठमोठे तेजस्वी तारे आहेत. ते दुर्बिणीवांचून दिसतात. ह्यांतील मृगनक्षत्रापासून पूर्वी सांगितल्याप्रमाणें पावसाळ्यास प्रारंभ होतो. त्याच्या भरीला आणखी सांगणें कीं ह्या मृगाच्या जवळील रोहिणी कीं जिच्या पायीं मागें सांगितलेलें मृगानें अकृत कर्म केलें, तिच्यापासूनही कधीं कधीं येथें त्या पावसाळ्यास प्रारंभ होतो. ह्या राशीखालीं, प्रामुख्येंकरून, असिरिया देश आहे. त्याच्या दक्षिणभागीं वसाहत आपल्या ह्या मायभूमींतील ठाणें जिल्ह्यांतल्या शूर्पारक अथवा सोपारें येथून बणिकजन अथवा फिनिशन लोकांनीं केली होती. त्यास पुरावा असा आहे:—

1 I will reveal the concealed story
2 The city Surrippak, God's city
3 Ana, Bel, Ninip, Lord of Hades,
4 Surrapakite, son of Ubartutu,
5 Made a great ship, for thee,
6 Hea, my lord, I will perform it,
7 It was 14 measures, with roof and alters,
8 Panizu, the pilot.
9 Silver, gold, seeds and beasts,
10 A flood, Shamas made.
11 I entered the ship,
12 Buzzarsaderibi the pilot,
13 Vul, thundered in the storm,
14 Nebo and Saru went in front.
15 The destroyer Nargol, overturned
16 Ninip went in front, swept the Earth,
17 The Gods feared the tempest and sought refuge
18 Then ascended to the heaven of Anu
19 Istar spake &c.

अर्थः—१ मी गुप्त गोष्टीची फोड करीन. २ सुरिप्पक देवांचें शहर. ३ अन, बेल, निनिप, पितृलोकाचा पती, सुर्पकाईट, उबरतुतूचा पुत्र. ५ तुजकरितां

* शिव व शक्ती हीं वेदांत सूर्य व पृथ्वी यांच्या रूपाचीं मानिलीं आहेत.

मोठें गलबत बांधिलें. ६ महाराज, मी तें करीन. ७ तें छावणी व स्थंडिलासह(१४) मापें होतें. ८ पनिझू वाटाड्या. ९ रूपें, सोनें, बीं, आणि जनावरें १० पूर शमसनें केला. ११ मी गलबतांत शिरलों. बुझुरसदीरिबी वाटाड्या. १३ वूलनें तुफानांत गर्जना केली. १४ नेवो व सरू पुढें गेलीं. १५ विनाशक नारगोळ उपडें झालें. १६ निनिप पुढें गेला पृथ्वी झाडिली. १७ देव वादळाला भ्याले व आसऱ्याची जागा पाहूं लागले. १८ नंतर अनूच्या राज्यांत गेले. १९ इस्तर बोलला इत्यादि हीं तुटक वाक्यें असिरियामधल्या एका तळघरांतील एका वाड्यांत सांपडलेल्या एका चिऱ्यांवरील ( इष्टका-विटा ) आहेत. ह्यांचा अर्थ संगतवार बरोबर लागत नाहीं. पण त्यांतील कांहीं वाक्यें मोठीं बोधपूर्ण आहेत. मी गुप्त गोष्ट सांगतों असें लेखक म्हणतो. ह्यांतील गुह्य कोणतें म्हणाल तर सांगणें कीं सुरिप्पक म्हणून देवाचें शहर होतें. हें मुंबई इलाख्यांतील ठाणें जिल्ह्यापैकीं शूर्पारक ऊर्फ सध्याचें बी. बी. सी. आय-रेल्वेवरील सोपारें नामक इतिहासप्रसिद्ध मुंबईसारखें प्राचीन बंदर दिसतें. ह्यांतील जमीन खणली असतां जागोजाग प्राचीन वस्तूंचे अवशेष सांपडतात, व ते त्या बंदराच्या महत्वाच्या इतिहासाकडे प्रेक्षकाचे लक्ष वेधितात. ह्या शहरांत पूर्ण नांवाच्या बणिकजनांच्या उदयापासून बौद्ध धर्माचें प्राबल्य झालें. त्यापूर्वीं तेथें कोणता धर्म चालत असे याबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. पण भारत शान्ति. अ. ४९ वरून ॥ ततः शूर्पारकं देशं सागरस्तस्य निर्ममे । सहसा जामदग्न्यस्य सोपारान्तमहीतलम् ॥ ९७ ॥ प्रमाणें शूर्पारक ऊर्फ सोपारें हें जमदग्निपुत्र परशुराम याजकरितां समुद्रानें निर्माण केलेला देश व शहर होतें तर तेथें आपला हिंदू धर्म त्याच्या कांहीं प्राचीन रूपानें वास करीत असला पाहिजे हें उघड दिसतें, व त्याप्रमाणें वरील लेखाच्या तिसऱ्या ओळींत निनिप हा शब्द नंदीबैलाचा वाचक आहे. त्यावरून येथील शैव धर्माच्या अस्तित्वाचा संशय येतो. त्याप्रमाणें अन, बेल व निनिप हे द्रविड शब्द वडील, बैल व नंदी या अर्थांचे आले आहेत हे पितृलोकाधिपती होते. त्यांस स्मरून शुर्पारक ऊर्फ सोपारें येथील राहणाऱ्या उबरततूपुत्र यानें तुजकरितां एक मोठें गलबत बांधिलें. ( ४, ५ ) महाराज, तें किती लांब होतें म्हणून पुसाल तर सांगणें कीं तें छावणी व स्थंडिलें यांसह ( १४ ) मापें होतें ( ६, ७, ). त्यावर पानिझू हा वाटाड्या होता ( ८ ). त्यांत-रुपें, सोनें, बीं व जनावरें होतीं. ( ९ ) शमानें ऊर्फ शर्व म्हणजे शंकर यानें पूर उत्पन्न केला. ( १० ) मी गलबतांत शिरलों. त्याचा वझासदिरिबी वाटाड्या होता. ( १२ ) वूल (!) वादळांत गर्जना करीत होता. ( हा त्या काफल्याचा नाखवा ऊर्फ नौकाध्यक्ष तर नव्हताना ! ) ( १३ ) नेवो व सरू हीं गलबतें आघाडीस होतीं ( १४ ) ठाणें जिल्ह्यांतील नारगोळ येथील म्हणून *नारगोळ म्हणविणारें विनाशक (!)

* नासिक येथील लेणें नंबर १० यांत शिलालेख आहे. त्याप्रमाणें उषवदातानें नारगोळ येथील ३२,००० नारळी सोपारें येथील चरक ब्राह्मणांच्या संस्थेस अग्रहार म्हणून दिल्या असें दिसतें.

गलबत वादळांत उपडें झालें. यावर तोफखाना होता कीं काय नकळे. इकडील मराठ्यांची गलबतें शिवाजीपर्यंत अशींच होतीं, ( १५ ) निनिप ऊर्फ नंदी ( नांवाचें गलबतसें वाटतें. ) पुढें गेलें व त्यानें पृथ्वीला झाडिलें ( तें झपाट्यानें जमिनीपर्यंत गेलें ) ( १६ ) देव वादळाला भिऊन आसरा पाहूं लागलें ( १७ ) व ( तो कोठें लागेना ह्मणून ) ते अनूच्या स्वर्गांत गेले, ( अनू हा ययातीचा पुत्र. ह्यानें पित्याची आज्ञा मान्य केली नाहीं. म्हणून त्यास हिंदुस्थानांतील साम्राटपद मिळालें नव्हतें. हा प्रथम वेदधर्मानुयायी असून पुढें म्लेच्छ झालेला होता. चार वर्णांची संस्था पहा ) ( १९ ) इस्तर असें बोलला—

तात्पर्य, हें सोपारें येथील बणिक्जन सोनें, रुपें, धान्य व जनावरें यांनीं भरलेलीं गलबतें घेऊन एका तुफानांत अनूच्या स्वर्गसमान असिरियांतील बाबिलोनियांत उतरले व त्यांनीं तेथें वसाहत केली असें दिसतें ! व त्यांनीं त्या आपल्या वसाहतीच्या देशांत आपला पितृदेश जो सोपारें येथल्या शैवधर्माचा निदर्शक नंदी आपले निशाणावर चढविला असावा ! कारण त्यांस देशोदेशीं मालटाल नेण्यास आपल्या चारणवंजाऱ्यांप्रमाणें गलबतांपेक्षांही जास्त गरज बैलांच्या तांड्यांची लागत असली पाहिजे. ह्या वाण्यांचा धर्म यावरून शैव दिसतो. त्यांस त्या धर्माच्या जागीं पुढें पैशाच्या धर्माचें वेड लागलें ! त्यांस आई पैसा, बाप पैसा, मुलगा पैसा वगैरे सर्व कांहीं पैसारूप होऊन बसलें. असे ते नीतिभ्रष्ट झाले. त्यांस तेथील रोहिणींजवळ प्रजापतीनें अकृत वर्तन चालविलें तेव्हां हिंदुस्थानांतील सिंहानें गर्जना करून त्याची कानउघाडणी केली असतांही त्यांनीं त्याचा प्रतिकार केला नाहीं. ह्मणून तेथून रोहिणीस आकाशांत जावें लागलें व तेथेंही प्रजापतीनें तिचा पाठलाग केला तेव्हां व्याधानें पूर्वोक्त त्रिकाण्ड बाणानें युद्ध करून रोहिणीचें रक्षण केलें ! त्यावरून मृगव्याधास पशुमान ही पदवी प्राप्त झाली, तशी त्या सगळ्या राशीस त्या असिरियांतील वणिक्जनांच्या ऊर्फ फिनिशियन लोकांच्या चारणवणजाऱ्यांच्या धंद्यांतील नंदीबैलाच्या जगजाहीर व विशाळ निशाणावरून वृषभ म्हणजे बैलोबा ही पदवी देण्यांत आली. कारण ह्या वृषभ राशीवरून त्यांस मृगव्याधाच्या कथेची वेळोवेळीं ह्या देशांतील व्यापाऱ्यांनीं पैशाच्या पायीं पुनरपी कधींही असें नीतिभ्रष्ट होऊन आपल्या जातभाईची इजत घालवूं नये. एवढेंच नव्हे तर आपल्यावर चढाई करून आलेल्या शत्रूचा नायनाट करण्यास आपले झाडून सर्व जातभाई लढाईत पटापट मरून जात असतां त्यांतील वाण्यांनीं पैशापायीं त्या शत्रूस निःशेष वश होऊन त्यास *दाणागोटा हत्यारें-पात्यारें पुरविण्याचें आत्मघातकी नीच कर्महीं करूं नये !

* गेल्या आंग्लो जर्मन युद्धांत कांहीं त्या त्या देशांतील व्यापाऱ्यांनीं असले नीतिभ्रष्टतेचे प्रकार राजरोस केलें हें जगजाहीर आहे. त्या वेळीं इतरांप्रमाणें त्यांस ह्या बाबतींत कह्यांत ठेवण्याचें कठीण गेलें, कारण त्यांच्या व्यापारी नीतीमध्यें युद्धोपयोगी जिन्नस देवघेवींत वर्ज करणें कोठेंही मंजुर केलेलें नव्हतें. किंवा तें मान्य करण्यास ते राजी नव्हते असें उघड दिसतें.

मेषः—ह्या राशीमध्यें अश्विनी, भरणी व कृत्तिका हीं दोन पूर्णांक एक चतुर्थांश नक्षत्रें मोडतात. हिच्या पाठीवर ईशान्येस एक भुंगा आहे, व त्याच्या वरतीच एक त्रिकोण आहे. हिची आकृती मेंढ्याची आहे. हा मेंढा आपले तीन पाय पोटाखालीं घालून बसला आहे, व त्यानें आपला चौथा पाय पुढें पसरला आहे. ही रास वृषभराशीच्या अगदीं जवळ आहे. ती देवयानीच्या राशीपासून १० अंशावर आहे. ह्या राशीखालीं भूमध्यसमुद्राची पूर्व बाजू आहे. येथील लोक पूर्वींइतके अप्रबुद्ध होते कीं त्यांस हिंदू सिंहानें आपल्या देशांतून येऊन त्यांची हिताची बाजू दाखविली तरी त्याचें ज्ञान त्यांस बिलकूल होईना. ते मेमे करीतच रहात, व कसायांच्या सुऱ्यांखालीं चरचर चिरले जाऊन प्राणास मुकत. ही रास सूर्याकडून पुढील पावसाळ्याच्या तरतुदीकरितां पाण्याची वाफ करवून आकाशांत भरण्यास प्रारंभ करिते. ह्यांत पुष्कळ शेळ्यामेंढ्यांचे कळप त्यावेळीं असावे. ह्या ठिकाणापासून मेषादी राशींस प्रारभ कां होतो ह्याचें कारण [१] येथून एशिया खंडास प्रारंभ होतो हें कदाचित असावें, किंवा [२] येथून हिंदूंच्या वसाहती, दळणवळण व ज्योतिषांतील विचारांचा विनिमय यास प्रारंभ झाला असावा. बाकी येथें कोणतेंही ज्योतिषांत प्रवीण राष्ट्र विद्यमान होतें असें दिसत नाहीं; मात्र आमच्या देवाधर्माचे अथर्ववेदी लोक येथें असिरियांत होते.

येथें मेषापासून कन्येपर्यंत एशियाखंडांतील राशिचक्रामधल्या उत्तरेकडच्या सहा राशींचें वर्णन आटोपलें. यापुढील आफ्रिका जरी जुन्या ज्ञात महाद्वीपांपैकीं एक आहे तरी त्यांतील देशांची व तेथील लोकांची माहिती त्या बाहेरच्या हिंदू लोकांशिवाय इतर लोकास फारशी नव्हती. ह्याचें प्रत्यंतर आमच्या मिश्र देशांतील शोध ह्या पुढील लेखावरून वाचकांस बरेंच पटेल. शिवाय अफ्रिकेंतील मूळचे लोक हल्लीं ही जंगली स्थितींत आहेत, मग त्याची प्राचीन काळची स्थिती काय पुसता ? म्हणून आफ्रिकाखंडांतल्या ज्या तीन राशी–आहेत, त्यांच्या खालील देशांचें वर्णन तेथील सृष्टीच्या विशेष लक्षणांपेक्षां तेथील लोकांच्या खाण्यापिण्याचा वगैरे विशेष गरजांप्रमाणें विशेष आहे, व तें नेमकेंहीं एका जातीचें नाहीं.–तें साधारणतः त्या सर्व खंडास लागू आहे. ह्या खंडांत अन्नपाण्याची बहुतेक सर्वत्र आर्ती आहे. म्हणून ह्या खंडांतील राशींखालच्या प्रदेशांत त्या आर्तीचें वर्णन हें त्या राशीचें विशेष लक्षण म्हणून दाखवावें लागलें आहे.

मीन.–ह्या राशींत पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा व रेवती हीं तीन नक्षत्रें आहेत. ह्या राशींत दोन मत्स्य असून ते दोरीच्या दोन टोंकाला बांधिलेले आहेत व ती दोरी गुंतून अस्ताव्यस्त पडली आहे. ह्यापैकीं एक मासा ययातीच्या मुख्य ताऱ्याच्या दक्षिणेस व दुसरा पूर्वेस आहे. ह्यावरून ह्या राशीखालील प्रदेश म्हटला म्हणजे गिनीभोवतालचा अफ्रिकेचा सर्व समुद्रकिनारा धरिला पाहिजे. कारण येथील मुख्य खाद्य मासे आहेत. ही रास सूर्यास जलद चालावयास लावून दिवस लहान करिते.

मकरः—ह्या राशींत उत्तराषाढा, श्रवण व धनिष्ठा-हीं नक्षत्रें आहेत. हिची आकृती त्याचा मत्स्याची व अर्धी बोकडाची आहे. हिचें डोकें, पुढले पाय व शरिराचा मागला भाग व शेपूट हीं माशाचीं आहेत. हा स्वस्थ बसून अमरिकेंतील धनाकडे किंवा धनूकडे पहात आहे. या राशीखालीं भूमध्य समुद्राचें पश्चिम मुख आहे. हीही आफ्रिकेंतील चोहोंकडील अन्नाची टंचाई दाखविते. येथे खाण्यास बोकड व मासे याशिवाय कांहीं नाहीं. ही रास सूर्यास जलद चालवून दिवस लहान करिते.

कुंभ—ह्या राशींत धनिष्ठा, शततारका ( शताभिषक् ) व पूर्वाभाद्रपदा ही नक्षत्रें आहेत. हिची आकृती मनुष्याची असून त्याच्या हातांत एक घडा आहे. ही रास आफ्रिकेंत सार्वत्रिक आढळणारी पाण्याची आप्ती तर दाखवितेच पण ह्या राशीस कुंभ हें नांव मिळण्याचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे अतरस याच्या लेखांत आलेला पूर्वोक्त सजल नील ( सं. नील-निळी-नाईल ) नदी भोंवतालचा उत्तर आफ्रिकेचा प्रदेश होय हेंही दाखविते ही रास सूर्यास जलद चालवयास लावून दिवस लहान करिते व नील नदीचें पाणी आकाशांत प्रथम भरूं लागते. येथें आमच्या लोकांच्या मोठ्या वसाहती होत्या.

टीपः-( १ ) हें ह्या कुंभराशीपासून आकाशांत भरावयास लागलेलें पाणी सूर्य मृगनक्षत्रीं आल्यापासून नियतकालिक मोसमाच्या वाऱ्याबरोबर ढगाच्या रूपानें वहात येऊन हिंदुस्थानांस पावसाचे रूपानें पडण्यास कारण होतें. असें सर्वांच्या परिचयाप्रमाणें खरें ठरतें तर हिंदुस्थानची रास पूर्वीं सिंह धरिली होती ती बरोबर आहे असें येथें प्रत्यंतरास निःशेष येऊन चुकलें-हा एक सिद्धांत ठरला.

( २ ) येथें आफ्रिकेंतल्या व जुन्या ह्मटलेल्या महाद्विपांतल्या सगळ्या राशिचक्रापैकीं नऊ राशींचें वर्णन संपलें.

---

# भाग पांचवा.

## राशिचक्राचा अनादी नकाशा.

### देशांची ओळख.

The aboriginal dragon race must have been visited by Asiatic people, who, by mixing with the natives, had become savage and had turned red. The Typhonion and dragon race in Mexico must have spread itself into South America, and conquered the upper waters of the Amazon.—*W. S. Blacket*—*P. 134.*

अर्थ.—एशिया खंडांतील लोक मूळच्या शेषाच्या जातीकडे जात येत असले पाहिजेत. ते त्या देशच्या लोकांत मिश्र होऊन रानटी व लाल झाले++मेक्सिकोंतील तुफान व शेष जातीचे लोक उत्तरेकडून दक्षिण अमेरिकेंत पसरले असले पाहिजेत व त्यांनीं आमाझोन नदीचा वरचा पाण्याचा भाग जिंकिला असला पाहिजे.

One detestable feature of the Aztec superstition was cannibalism, though, in truth the Maxicans were not cannibals in the common acceptation of the term. They did not feast on human flesh mearly to gratify a brutish passion; but in obedience to their religion. Their repasts were made of the victims, whose blood had been found out on the alter of sacrifice.–The same P. 128.

मागील भागांत राशिचक्राचा अनादी नकाशा–देशांची ओळख–हें तीन चतुर्थांश भागाचें विवरण आटोपलें. आतां या भागांत त्याच्या बाकीच्या भागाचें विवरण कर्तव्य आहे. मागील विवरण जुन्या महाद्वीपांतील राशिचक्राचें होतें व हें नव्या म्हटलेल्या द्वीपांतील राशिचक्राचें आहे.

एशिया, युरोप व अफ्रिका या खंडांत जुन्या महाद्वीपांतील राशिचक्राचा जेवढा भाग मोडतो ! तेवढ्यांत एकंदर नऊ राशी अंतर्भूत होतात, त्याचें साधलें तितकें पुरें वर्णन करण्याचा प्रयत्न आम्ही करून दाखविला. त्यावरून हें कोणीही कबूल करील कीं नुसत्या निरनिराळ्या अनेक राशींवरून त्या खालच्या निरनिराळ्या प्रकारें निरनिराळ्या वेळीं अधिक उण्या सुधारत राहिलेल्या आफ्रिका, युरोप व एशिया या खंडांतील अबाद व बेबाद जुन्या पुराण्या देशांचा पत्ता लावण्याचें जें काम आम्ही हातीं घेतलें आहे, तें सोपें आहे असें नाहीं. पण चीनपासून गिनीपर्यंत नऊ राशींखालील देशांचा पत्ता लावतांना जो शहानिशा करण्यांत आला आहे, त्यांतील ऐतिहासिक भागाचें निरीक्षण त्याचा रेखलेपणा पाहण्याकरितां एखादा मार्मिक व सुज्ञ वाचक करील, त्यास त्यांत नांवें ठेवण्यास जागा मिळेल असें वाटत नाहीं; कारण तो करितांना शक्य तितकीं साधकबाधक प्रमाणें तोलून पाहण्यांत कोणतीही कसूर आम्ही आमच्याकडून केलेली नाहीं. तो हें ताबडतोब कबूल करील कीं एशिया खंडातील देश राशिचक्रांतील राशींशीं फारच मिळते आहेत व आफ्रिकेंतील बरेच मिळते आहेत. पण ह्यांत त्यास एक गोम आढळेल. ती ही कीं कन्येपासून कुंभापर्यंतच्या राशींचा विचार झाला, त्याप्रमाणें बाकीच्या तीन राशींचा विचार अजून झालेला नाहीं. तो कसा करणार ? कन्येपासून मकरापर्यंतच्या राशीखालील झाडून सर्व देश ज्ञात महाद्वीपांत रोज राबत्याचे दळणवळणांतील अलीकडे होते, तसा बाकीच्या तुला, वृश्चिक व धन किंवा धनू या राशींखालील देशांचा पत्ता कोठें जाऊन लावणार ? असें कोणी पुसल्यास त्यांस सांगणें कीं त्याची काळजी आपणास करावयास नको. त्या तिन्ही राशींखालील देश त्या पाश्चात्यांनीं अज्ञात म्हटलेल्या महाद्वीपांत खात्रीनें सांपडतील. तें अज्ञात महाद्वीप म्हटलें म्हणजे सगळें अमेरिका खंड होय. ह्या अमेरिका खंडास पाश्चात्य लोक अज्ञात महाद्वीप म्हणतात तरी तें प्राचीन हिंदू लोकांस खचीत माहित होतें. कारण, त्यांतील देशाचीं नांवें व त्यांचें वर्णन यांच्याप्रमाणें अगदीं सुस्पष्ट दिलेलें आहे; एवढेंच नाहीं तर त्यांचें रूपरेखनही चित्रपटांत त्या अनादी प्राचीन वेळच्या समजुती-

प्रमाणें बरें केलेलें आहे; हें तर काय पण त्या चित्रांस राशिचक्रांतही नेऊन
बसविलेलें आहे व त्यांचीं चित्रें राशीचक्राच्या पटांत काढून ठेविलेलीं आहेत.

चित्रपटः—हे राशीचक्राचे चित्रपट तीन उपलब्ध आहेतः—[ १ ] आपला
हिंदूंचा, [ २ ] कॉप्टिक, व [ ३ ] टालमीचा. हिंदूंचा चित्रपट हा ऋषिकृत
अर्थात, अत्यंत जुना आहे व तो त्यांच्या अनादी पृथ्वीच्या नकाशाप्रमाणें अत्यंत
उपयुक्त आहे व ‘ साध्या वस्तू ह्या विकसित वस्तूंना मूलाधारभूत असतात ’
हा सिद्धान्त सर्वमान्य असेल तर हिंदूंचा राशीचक्राचा चित्रपट हा काप्टिक व
टॉलमिक चित्रपटांना मूलाधारभूत समजला पाहिजे; कारण ते चित्रपट आपल्या
ऋषिप्रणीत चित्रपटाच्या केवळ सुधारलेल्या आवृत्त्या दिसतात. म्हणून त्यांचा
उपयोग हिंदूंच्या राशीचक्राच्या चित्रपटांतल्या स्थळांतील संशय दूर करण्यास व
त्यांत ते उपयोगी पडले नाहींत तर निदान त्यांचें स्पष्टीकरण करण्यास फार
होणार आहे. कारण ह्या तिन्ही चित्रपटांत क्रान्तिप्रदेशांतील राशींचीं नांवें
अगदीं पुरीं एका अर्थाचीं आहेत. कॉप्टिक हा अस्सल मेसरी ऊर्फ इजिशियन
लोकांचा चित्रपट होय व त्या मेसरी लोकांत आपल्या हिंदूंच्या वस्तीची मिसळ
होती व टॉलमीचा चित्रपट हा अर्धवट मेसरी भूगोलवेत्त्यांचा चित्रपट होय.

१ धन अथवा धनूः—ह्या राशींत—मूळ, पूर्वाषाढा व उत्तराषाढा—हे नक्षत्र-
पुंज—आहेत. हिची आकृती अर्धी मनुष्याची व अर्धी घोड्याची आहे. त्याच्या
हातांत धनुष्य [ धनू ] असून त्यावर बाण चढवून तो तो सोडण्याच्या बेतांत
आहे. ह्याचें डोकें वृश्चिकाच्या नांगीसमोर आहे. कॉप्टिक व टॉलमिक चित्रपटांत
ह्या राशीचीं जीं चित्रें आहेत, तीं अगदीं थेट अशींच आहेत. पण काप्टिक
चित्रपटांत ह्या चित्राच्या मागच्या बाजूस हाताचें एक चित्र जास्त आहे, व त्यास
नांव अरुरस हें भिन्नार्थक आहे, व टॉलमीच्या चित्रपटांत त्याचें नांव धनुर्धर
हें अन्वर्थक आहे. पाश्चात्य अभियुक्त ग्रंथांत ह्या राशीचें कथानक चिरत या
नांवानें असें दिलें आहेः—हा अर्धा मनुष्य व अर्धा घोडा होता. तो फिलिरा
व शनी यांचा पुत्र. त्याची बायको जी ह्मणून होती, तीस सांपडूं नये ह्मणून तो
घोडा ( किंवा घोडेस्वार ) झाला होता.तो गायन, वैद्यक व धनुर्विद्या ह्यांत निष्णात
होता, व त्यानें त्या विद्या मनुष्यांस शिकविल्या. एकिलीज, एस्क्युलेपियस,
हरक्युलीज [ शौरी ] वगैरे त्या काळच्या योद्ध्यांचा तो गुरू होता. एकदां हर-
क्युलीज हा त्याच्या सारख्या प्राण्याचा ( घोड्याचा ) पाठलाग करीत असतां
त्याचा विषारी बाण चुकून त्या गुरूच्या घोड्यास लागला. हरक्युलीज लगेच
त्याच्या मदतीस गेला. पण त्यास झालेली जखम असाध्य असून अत्यंत वेदनायुक्त
होती. ह्मणून चिरत यानें वेदोक्त द्यौस्पितरास[जुपिटर—इंद्र] आपलें अमरत्व काढून
टाकण्यास विनंती केली व त्या देवानें ती विनंती मान्य करून त्यास सॅजिटेरियस
ह्मणजे धनुर्धर ही पदवी देऊन त्यास नक्षत्रपुंजांत नेऊन ठेविलें. ” दुसऱ्या एका
ठिकाणीं तो गरुडासारखा ( इगल ) नैस नामक एका वैष्णव स्त्रीपासून उत्पन्न
झाला होता असें दिलें आहे. असें ह्मणतात कीं ह्यास नौकानयन फार आवडत

असे. त्याच्या उजव्या हाताशीं अरगो ही नांव असे. ह्या राशिखालीं मध्य अमेरिका येते. तेव्हां तो अर्धवट काळातांबडा मनुष्य असून तेथील उफाल्याच्या वनस्पती व फुलझाडें ह्यांत गडप झालेल्या असंख्यात शहरांशीं त्याचा कांहीं तरी संबंध असावा असें मानणें गैरवाजवी होणार नाहीं. ह्या राशीस आपल्या हिंदूंच्या चित्रपटांत नुस्तें धन असें ह्मणतात व त्याप्रमाणें त्याची एक आख्याइका आहे. ती पुढें देण्यात येईल.

वृश्चिक—ह्या राशींत–विशाखा, अनुराधा व जेष्ठा–हीं नक्षत्रें आहेत. ह्या पुंजांत मोठमोठे चकचकित तारे आहेत. हिची आकृती विंचवासारखी आहे. ह्या विंचवाच्या नांगीला खऱ्या विंचवाचे नांगीप्रमाणें पेरीं आहेत व त्याच्या तोंडाकडे दोहों बाजूला चिमटे आहेत. हिची दृष्टी तुळेकडे आहे. ह्या राशीखालीं दक्षिण अमेरिकेंतील ओरिनोको व ऍमेझोन हे विस्तीर्ण प्रदेश आहेत. यांत विंचू, सर्प, मगरी वगैरे राक्षसी प्राण्यांचा अगदीं सुळसुळाट आहे. तो इतका कीं स्पानियर्ड लोकांनीं तेथें वसाहत करण्यापूर्वीं त्यांना त्यांचा क्रूरपणानें उच्छेद करावा लागला. टालमीच्या चित्रपटांत ह्या प्रदेशांत वृश्चिक राशीचें स्थळ दिलें आहे, पणकाल्टिक चित्रपटांत ह्या वृश्चिकाच्या चित्रावर आणखीं तुफानाचें राज्य असा शेरा आहे. ह्या शद्वाचा इतिहास तपाशीत असतां ह्या प्रदेशांत तुपी नामक इंडियनांची वस्ती आढळते. हे तुपी लोक एशिया खंडाच्या पूर्वभागांतील बौद्ध मठवासी लोकांतून प्रथम उत्तर अमेरिकेंत येऊन पुढें दक्षिण अमरिकेंत ह्या दोन नदीथड्यांवर पसरले व त्यांनीं तेथील लोकांस जिंकिलें, व त्यांस विस्तवाचा उपयोग व शेतीची विद्या शिकविली. त्यांतील धर्मोपदेशकांस (प्रचारक) युवा [ बॉईस ] असें म्हणत असत. ते चित हा जडांत शिरला आहे असें समजत. त्यांत पापकथन, प्रायश्चित्त, जपमाला वगैरे प्रकार असत. ते देवास तूप म्हणत. तूप हा स्तूप ह्या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. यावरून हे तूप लोक स्तूपपूजक बौद्ध वा वैदिक असावे—असें वाटतें. कारण, ह्या कल्पनेच्या पुष्टीस त्यांच्या भाषेंत मनुष्याला मेना, बापाला पपा, आईला ममा वगैरे अपभ्रष्ट संस्कृत शब्द आहेत. ह्यांत ब्रह्मदेश, सयाम वगैरे बौद्धधर्मी देशांप्रमाणें तेथील बायका प्रबळ होत्या असें दिसतें. टालमिक राशिचक्राच्या चित्रपटांत नरतुरंग हा एका वृकास भोसकतो असें चित्र आहे. त्याप्रमाणें त्या आपल्या भाल्यांनीं तेथील राक्षसांस भोंकशीत आहेत असें आढळतें. आमेझोनच्या राणीच्या निशाणावर विंचवाचें चित्र असतें.

( ३ ) तुलाः–ह्या राशींत-चित्रा, स्वाती व विशाखा- हीं नक्षत्रें आहेत. हींत तारे फारसे नाहींत. पण तींत जे तारे आहेत, तेणेंकरून ही आकृती स्पष्ट दिसते. हिची आकृती तराजूसारखी तिन्हीही चित्रपटांत आहे. पण काल्टिक चित्रपटांत ही रास वृश्चिक राशीच्या पूर्वेस आहे, व टालमीच्या चित्रपटांत ही वृश्चिक राशीच्या थोडी वर व पूर्वेस ग्रानडावर आहे. टालमीच्या चित्रपटांत आमच्या चित्रपटाप्रमाणें हीस फक्त तराजू या अर्थाचें नांव आहे. पण काल्टिक चित्रपटांत हीवर सैतानाचें राज्य असा शेरा आहे. त्या शेऱ्यांतील ओवघा ह्या शब्दाचा अर्थ

सैतान असा होतो. शिवाय असें ह्मणतात कीं ही तराजू मूळ चित्रांतील पूर्वोक्त कन्येच्या हातांत होती व ती वृश्चिक राशीच्या नांगीच्या घड्यांच्या जवळ आली व तिनें तेथें प्रळय मांडिला. ती एकाद्या हल्लींच्या उडत्या धुळासारखी आहे. तिनें दक्षिण महासागरांत नौकानयनाच्या साधनानें किंवा जुन्या खुष्कीच्या मार्गानें ( आमचें भूगर्भदर्पण पहा ) एशिया व अमेरिका ह्या खंडांची सांगड घातली. यावरून तुला राशीखालीं ग्रानडाचा प्रदेश आहे हें सिद्ध होतें.

अपूर्व व्यापक कथानक.—पूर्वीं सांगितल्याप्रमाणें धनाकडे लक्ष ठेवणाऱ्या मकर राशीकडून मासे, बोकड व पाणी ह्यांवर कसाबसा निर्वाह करणारा व घोड्यावर बसणारा एक काळा, तांबडा मिश्र जातीचा राजपुतान्यांतील मारवाड्या-सारखा अर्थलोलुप मनुष्य मध्य अमरिकेंत गलबतानें किंवा खुष्कीनें (भाग ३ पहा) आला व त्यानें आसपासच्या लोकांवर अत्यंत जुलूम करून पुष्कळ धन मिळविलें. तें इतकें कीं त्यानें ब्राझिल मधील ज्या लोकांपासून तें मिळविलें, त्या वृश्चिकाकार पताका धारण करणाऱ्या तुपी लोकांची नजर त्याच्या धन तोलून घेण्याच्या तराजू-कडे सारखी लागून राहिली होती, व ते त्यास दंश करून मारण्यास सारखे टप-लेले होते. पण त्याच्या धनुर्विद्येंतील व अश्वविद्येंतील निष्णाततेमुळें त्या बर्चीवाल्या लोकांचा कांहीं निभाव लागेना ! पण त्या धनुर्धरास एक नवीन फिकीर उत्पन्न झाली. त्याजवळ असें अमूप धन जमल्याबरोबर तो अनुरूप सहचारिणीचा चोंहों-कडे शोध करूं लागला. शोध करितां करितां त्यास अनुरूप अशी एक कन्या चिनांत आढळली. पण तिची विवाह करण्याची अट मोठी विलक्षण होती. ती अशी कीं जोंपर्यंत तुजकडून ग्रानडाच्या तराजूनें मला रोज धन तोलून मिळत आहे तोंपर्यंत मी तुजजवळ राहीन ! ती अट त्या धनशेटानें कबूल केली. पण ती पुरी करितां करितां त्याच्या नाकीं नऊ येऊं लागले ! त्यानें लागणारें धन मिळविण्याकरितां—न भूतो न भविष्यति—असा जुलूम वृश्चिकांवर चालविला ! वृश्चिक त्यांस दंश करून मारण्यास पदोपदीं पाहूं लागले ! पण तो त्यांच्या नांग्याच पटापट मोडून टाकूं लागला !! तो कांहीं केल्या कोणास आटोपेना ! व तो हिंदुस्थानांतील सिंहाप्रमाणें जिकडे तिकडे तोऱ्यानें फिरूं लागला ! असें होतां होतां त्याची चालचलणूक गांधारांतील ( अफगाणिस्थान व बलुचिस्थान ) कर्का-प्रमाणें अगदीं दुनियेनिराळी वाकडी झाली ! तो नीतिभ्रष्ट झाला ! त्यास दारु-बाजी व बाहेरख्याली आवडूं लागली ! त्यांच्या नादांत तो इराणांतील रोहिणी मागून धावणाऱ्या मृगाप्रमाणें अकृत वेडेचार करूं लागला ! त्यास कोणी अमुक अकृत कर्म केलेंस का ? म्हणून पुसलें तर तो असिरियांतील नंदीबैलाप्रमाणें मान हालवूं लागला ! पुढें त्याच्या अकृत कर्मांचा कळस असा झाला कीं तो भूमध्य-समुद्रकांठच्या मेमे करणाऱ्या मेषाप्रमाणें स्त्रीपुरुषविरहित जातिभेद ठेवीनासा झाला ! म्हणजे त्यानें आपल्या अकृत कर्मांनीं सर्वांस—त्राहि भगवान्—करून सोडिलें ! तेव्हां त्याच्या शाळेंत तयार झालेल्या हरक्युलीजनें ( शौरी ) एक विषारी बाण शिकार करीत असतां एका घोड्यावर म्हणून सोडिला.

पण तो घोडा नसून हा घनशेट घोडेस्वार निघाला ! त्याबरोबर तो विव्हळत पडला असतां त्या शिष्यानें पश्चात्तापपूर्वक क्षमा मागून त्याचा स्वदेश जो अफ्रिका ह्यांतील मीन व मकर राशींतील मासे व बोकड यांचें अन्न व कुंभ राशींतील जल आणून त्याच्या तोंडांत सविनय घातलें ! पण त्या घनशेटास असाध्य वेदनाप्रचुर जखम झाली होती ! हें जाणून त्यानें नम्रतापूर्वक प्रार्थना केली असतां द्यौस्पितरानें ( जुपिटर-इंद्र ) त्याचें अमरत्व काढून घेऊन त्या विषदिग्ध बाणाच्या असाध्य व दुःखद जखमेच्या वेदनांतून त्यास सोडविलें व सत्ता, वसू, वनिता व वारुणी यांच्या नादीं लागून अकृत कर्म कोणी इतःपर करूं नये म्हणून एशिया खंडावर मेष राशींत व अमेरिकेवर घन राशींत त्याचीं स्मारकें सर्वांच्या नजरेस पडतील अशीं अढळ पदीं ह्या राशीरूपानें करून बसविलीं व त्याखालीं पाहील त्यास पाहतां यावें म्हणून पुढील संस्कृत पंक्ती लिहून ठेविली.—

एकैकमपि विनाशाय । किमतत्र चतुष्टयम् ॥

निष्कर्ष.—ह्या आर्ष *राशिचक्राच्या चित्रपटावरून-असें सिद्ध झालें कीं जीवाणूंपासून नर्मदा व गोदा यांत उत्क्रान्त झालेल्या मनुष्यांची वसाहत भूमध्य-वृत्ताच्या दोन्ही बाजूस क्रान्तिप्रदेशांत झाली असली पाहिजे; कारण सूर्याच्या उष्णतेनें पृथ्वीचा तोच भाग ऐतरेय उपनिषदाप्रमाणें पाण्यांतून उघडा पडून मनुष्याचा वसतिक्षम झाला असला पाहिजे व त्या क्रांतिप्रदेशांत वसंत वास करीत होता तों ते लोक पूर्वपश्चिम हिंदुस्थान, ईजिप्त, मेक्सिको वगैरे देशांत फिरत व वसाहत करून होते म्हणून त्यांचा पूर्वोक्त २७ नक्षत्रांचा शोध व भूगोलावरील देशांबरहुकूम राशिचक्राचा चित्रपट आपल्या ऋषींस करितां आला-तेव्हां हें निर्विवाद सिद्ध झालें कीं राशिचक्राचा चित्रपट हा प्रथम जुन्या

* हल्लीं या राशिचक्रांतील राशींवरून फलज्योतिषी गत व भावी गोष्टींचीं भाकितें करण्याचा प्रयत्न करितात. पण त्यांवर भरंवसा ठेवण्यासारिखें हें शास्त्र परिपूर्ण दशेस येऊन पोहोचलें आहे असें खुद्द आमच्या प्रत्ययास कोठेंही आलें नाहीं; एवढेंच नाहीं तर तें आमच्या एका फलज्योतिषावर फाजील भरंवसा ठेवणाऱ्या मुलास त्याच्या दीर्घायुषी म्हणून भाकित केलेल्या क्षयग्रस्त बायकोच्या बाबतींत ही बिलकुल प्रत्ययास आलें नाहीं. म्हणून आमचा त्यावर विश्वास पुढील सुभाषिताइत-काच आहे:—

गणिका गणिकौ समानधर्मौ निजपंचागदर्शका वुभौ ।
जनमानसमोहकारिणौ तौ विधिना वित्तहरौ विनिर्मितौ ॥
प्रमोदे खेदे वाण्युपनमति पुंसां [illegible] ।
मयैवं प्रागेवामिहितामिति मिथ्या कथयति ॥
जनानिष्टाकलन परिहारैकनिरताम् ।
असौ मेषादीनां परिगणनयैव भ्रमयति ॥

ज्ञात देशांचा नकाशा होता व तो तसा होता असें ठरतें म्हणून आमचे लोक अनादी वैदिक काळीं तच्छुध्यर्थ पायांनीं व गलबतांनीं त्यावेळच्या सोईप्रमाणें त्रिखंडांत प्रथम पूर्वपश्चिम फिरत असले पाहिजेत, मग ते स्थलपरत्वें व हवापरत्वें हल्लीं पांढरे, तांबडे, पिवळे, काळे व फिके—पंचजन—होऊन बसले असें कोणाचें मत असो वा नसो !

पुढें सदरहू वसंत ऋतूची बदली कालवशात उत्तरदक्षिण झाली तशा अन्नपाण्याच्या सोईप्रमाणें व उष्णतेच्या वृद्धीप्रमाणें आमच्या वसाहती त्या क्रान्तिप्रदेशापासून उत्तरेकडे व दक्षिणेकडे म्हणजे त्या त्या दिशांकडील ध्रुवांकडे—वसत गेल्या असल्या पाहिजेत; कारण क्रान्तिप्रदेशाचे भाग सूर्याच्या लंबरूप किरणांनीं त्याच्या उत्तरेचे व दक्षिणेचे पाण्यांतून उघडे पडलेले प्रदेशांपेक्षां जास्त उष्ण व मनुष्याच्या वस्तीस कमी लायख झाले असले पाहिजेत, व त्या क्रान्तिप्रदेशाबाहेरील पृथ्वीचे ते भाग त्यापुढें सूर्याच्या उष्णतेनें उघडे पडून मनुष्याच्या वसतिक्षम झाले असले पाहिजेत, व त्याप्रमाणें आपल्या अनादी राशिचक्राच्या सुधारलेल्या आवृत्या जे काप्टिक व टालमिक चित्रपट हे सदरहू विधानाचें समर्थन करितात; एवढेंच नाहीं तर सर्व वेदही आपल्या मौनानें त्याचें समर्थन करितात; कारण त्यांत कोठेंही मेरुपर्वत, जंबुद्वीपादी सप्तद्वीपात्मक पृथ्वीचें वर्णन बिलकुल आढळत नाहीं ( भा. ज्यो. इ. पान २२ पहा ).

---

## भाग सहावा.

### तारकापुंज व देशांची ओळख.

People do not like mythology, it is unsafe, yet it cannot be dispensed with in the study of human antiquities. No satisfactory elucidation of terra incognita of old geography, can ever be gained without it.—*W. S. Blacket.*

अर्थ—लोकांना पुराणें आवडत नाहींत. कारण तीं विश्वसनीय नसतात. पण मनुष्याच्या प्राचीन इतिहासाचा अभ्यास चालू केल्यास त्यांचेवांचून चालत नाहीं. त्यांच्या अभावीं प्राचीन भूवर्णनापैकीं कोणत्याही अज्ञात देशाचा पत्ता बरोबर लावणें अगदीं त्रिकालीं अशक्य होय.

आदित्यविश्ववसवस्तुषिता भास्वरानिलाः ॥
महाराजिक साध्याश्च रुद्राश्च गणदेवताः ॥ अमरकोश.—

अर्थ.—आदित्य, विश्व, वसू, तुषित, भास्वर, अनिल, महाराजिक, साध्य, व रुद्र—हे राजकीय संस्थांच्या अध्यक्षांशिवाय—गणाध्यक्ष असत.

ब्रम्हज्ञः सत्यसंधः परधनतरुणी निस्पृहकर्ममर्म—

ज्ञाता दातार्तपाता गणितबहुकला शिल्पवित्सूत्रधारः ॥ कश्यपसंहिता.—

अर्थ.—अनुभविक व पोक्त वयाचा, सत्यास धरून तडजोड करणारा विरक्त, मर्मज्ञ, दानशूर, आर्तत्राता गणित शिल्प, आदिक अनेककलाभिज्ञ, व लोकांचा पुढारी असे गुणी लोकांच्या यादींतून प्रौढ–स्त्रीपुरुष–स्थानिक देवळांतील देवापुढें हांड्यांत त्यांच्या नांवाच्या चिठ्यांची गलत सोडतीप्रमाणें करून राजकार्यार्थ नेणत्या मुलाकडून राजसभेंतील प्रतिनिधी निवडत असत. ( याबद्दल दक्षिणेंत देवळांचे भिंतीवर शिलालेख आहेत. )

शिष्टाभावे सामान्यात्प्रतिनिधिः ॥

तद्धर्मास्याद् ॥ अप्रतिसिद्धश्च ॥ आपस्तंब–श्रौत–सूत्रम् ॥

अर्थ.—इष्ट शिष्ट मिळत नसल्यास सामान्य लोकांतून त्यासारखा प्रतिनिधी निवडावा, पण तो निषिद्ध म्हणजे नांवें ठेवलेला नसावा.

शासनकारको, मितार्थो, विमृष्टार्थश्चेति—

प्रतिनिधयः ॥ औशनस सूत्र ॥

अर्थ.—तो प्रतिनिधी शासनकारक म्हणजे सांगकाम्या (नॉमिनेटेड–सरकार-नियुक्त ) मितार्थ म्हणजे शहाणा व सुज्ञ नोकर म्हणजे जो (हुकूम–ऑफिसर ) विमृष्टार्थ म्हणजे सर्वज्ञ व शहाणा ( इलेक्टेड–लोकनियुक्त–कुलमुखत्यार– ) असतो. ( रावसाहेब कृ. वझे )

मृगया द्यूतं पानमिति चतुवर्गः कामजः ॥

वाक्पारुष्यं अर्थदूषणं दण्डपारुष्यं त्रिवर्गःकोपजः ॥

अर्थ.—प्रतिनिधी शिकारी, जुगारी, कैफी, शिवराळ, हाताळ, मारकुटा व रांडबाज नसावा; कारण हीं व्यसनें त्यास हितकर गोष्टी समजूं देत नाहींत.

यो ब्राम्हणो,ऽद्यप्रभृतीह कश्चिन्मोहात्सुरां पास्यति मंदबुद्धिः ।

अपेत ब्रम्हा ब्रम्हहा चैव सः स्यादस्मिन्लोके गर्हितः स्यात्परेच ॥६२॥

मयाचेमां पवित्रधर्मोक्तसीमां मर्यादां वै स्थापितां सर्व लोके ॥

संतो विप्राः शुश्रुवांसो गुरूणां देवा दैत्या श्चोपश्रृण्वंतु सर्वे ॥६३॥मत्स्य० ३५

अर्थ—जो ब्राह्मण आजपासून या पृथ्वीतलावर मंदबुद्धी होत्साता सुरा पिईल तो धर्मभ्रष्ट व ब्रम्हघ्न होऊन या व दुसऱ्या लोकीं निंद्य ठरेल ॥ ६२ ॥ मी जी ही विप्रधर्माची मर्यादा व सीमा स्थापन केली आहे ती साधू, विप्र, गुरू, शिष्य, देव व दैत्य हे झाडून सर्व ऐकोत ॥ ६३ ॥

अभी य ऋक्षा निहितास उच्चा नक्तं ददृश्ये कुह चिद्दिवेयुः॥ ऋ.१-२४-१०

अर्थ.—हे जे ऋक्ष म्हणजे अस्वलें आकाशाच्या उच्च प्रदेशीं ठेविलेलीं रात्रीं दिसतात, तीं दिवसास कोठें तरी जातात.

मागील भागांत राशिचक्रांतील राशीखालीं कोणते देश प्राचीन काळीं होते हें नक्की ठरविण्यांत आलें. आतां या भागांत त्यानंतर क्रान्तिप्रदेशाबाहेर उत्तरेकडील व दक्षिणेकडील मानवजातीच्या नवीन झालेल्या ज्या वसाहतींवरून कांहीं तारकापुंजांस नवीन नांवें मिळालीं. त्यांचा शहानिशा कर्तव्य आहे. कारण अनादी वेदामध्यें मेरूपर्वत व जंबुद्वीपादिक सप्तद्वीपावसुंधरेचें वर्णन कोठेंही आलेलें नाहीं, पण पुढें शतपथ ब्राम्हण २–१–३ मध्यें पुढील वचन आहे:—वसंतो ग्रीष्मो वर्षाः। ते देवाः ऋतवः शरद्धेमन्तः शिशिरस्ते पितरो—स ( सूर्यः ) यत्रोदगावर्तते। देवेषुतर्हि भवति। यत्र दक्षिणा वर्तते *पितृषु तर्हि भवति ॥ वसंत, ग्रीष्म, व वर्षा हे देवांचे ऋतू व शरद, हेमन्त व शिशिर हे पितरांचे ऋतू होत. जेथें सूर्य उत्तरेस आवर्ततो ( वळतो ) तेथें तो देवांत असतो व जेथें तो दक्षिणेस आवर्ततो ( वळतो ) तेथें तो त्यांच्या पितरांत असतो. या वचनावरून स्थानाबरहुकूम निर्णय करण्याच्या उपपत्तीप्रमाणें आमचे पूर्वज त्या दक्षिणेकडील पितृलोकांतून उत्तरेकडील देवलोकांत म्हणजे त्रिविष्टप, मेरू, ऐरावत व उत्तर कुरूकडे ( सुमेरुखंडांत ) विंध्यकाळापासून हिमालय काळापर्यंत शतपथ ब्राम्हण रचलें जाण्याच्या पूर्वीं म्हणजे शकापूर्वीं ३५०० वर्षांच्या अगोदर पोटापाण्याच्या सोईप्रमाणें पसरून देव म्हणजे मोठे पराक्रमी पुरुष झालेले दिसतात.

आतां ह्या वसाहतींच्या स्थळांचा शहानिशा करण्यास साहित्य काय लागेल ? त्यास प्रामुख्येंकरून पूर्वोक्त तिन्ही चित्रपट व त्यांतील तारकापुंजांचीं कथानकें लागतील. ह्या तारकापुंजाचे समजुतीच्या सोईकरितां दोन भाग पाडूं:— ( १ ) उत्तरेकडील तारकामण्डळ; ( २ ) दक्षिणेकडील तारकामण्डळ.

## ( १ ) उत्तरेकडील तारकामण्डळ.

१ बृहदृक्ष ऊर्फ सप्त ऋषी.—सप्तर्षीं नु ह स्म वै पुरक्षा इत्याचक्षते [ शत. ब्रा. २–१–२–४ ]—प्राचीन काळीं सप्त ऋषींस ऋक्ष ( आस्वल ) असें म्हणत असत. ह्या तारकापुंजांत सात तारे स्पष्ट दिसतात. त्यापैकीं चार तारे समान्तर बाजू चौकोनांत असून ते आस्वलाचें मधलें शरीर दाखवितात. बाकीचे तीन तारे एकापुढें एक वांकडे आहेत. ह्या ताऱ्यांपासून पुष्कळ अंतरावर दोन मोठे तारे आहेत. ते त्या आस्वलाचें पुच्छ दाखवितात ह्या ताऱ्यांपासून पुष्कळ अंतरावर दोन मोठे तारे आहेत. ते त्या आस्वलाचा ऊर दाखवितात. ह्या दोन ताऱ्यांमधून एक सरळ रेषा काढली तर ती नेहमीं उत्तर ध्रुवाजवळ जाते. म्हणून यांस ध्रुवदर्शक तारे असें म्हणतात. राशिचक्रांतील राशी मागील भागांत दाखविल्याप्रमाणें त्या खालच्या ठरविलेल्या देशांवर आणून बसविल्या तर ह्या आस्व-

---

* या शब्दाचा अर्थ वाडवडिलांच्या भूमींत असा अर्थ लावणें आम्हांस सयुक्तिक दिसतें. कारण; सापेक्षतः दक्षिण हा देवांचा पितृदेश आहे किंवा मूलस्थान आहे—असें आपल्यास इतरत्र आढळलें आहे.

लाचा तारकापुंज नेमका रशियावर येतो. म्हणून हल्लींचें रशियाचें निशाण आस्व-लाच्या चिन्हाचें आहे. यावरून तें निशाणावरील चिन्ह पूर्वागत दंतकथेस धरून असावें; एवढेंच नाहीं तर ह्या देशाचें रशिया हें नांवही पूर्वोक्त ऋषी किंवा हा ऋक्ष या दोहोंपैकीं एका नांवावरून साधलें असावें असें दिसतें; कारण यांत ऋक्ष म्हणजे आस्वलें फार आहेत. याप्रमाणेंच मागें कधींतरी जलप्रलयापूर्वीं कदाचित तेथें ऋषीही उत्तरआर्यावर्तांतून रहावयास गेले असावे.

२ लघू ऋक्ष व उत्तरध्रुव मत्स्य.—लघू ऋक्ष.—ह्या तारकापुंजाची आकृती बहुतेक बृहदृक्षाप्रमाणेंच आहे. हा पुंज त्याशीं समान्तर पण थोडासा तिर्कस आहे. ह्याच्या पुच्छाच्या शेवटाशीं उत्तरध्रुव तारा आहे. उत्तरध्रुव मत्स्य.—ह्या मत्स्याचें पुच्छ—बृहदृक्ष व लघू ऋक्ष—यांच्या मधून गेलें आहे, व त्याचा शेवट ध्रुवतारा व मागील ध्रुवदर्शक तारा यांच्या मध्यें आहे. ह्याला लघू ऋक्षाच्या पुढें उलटसुलट तीन वेढे पडले आहेत. ह्यामुळें याचा लघू ऋक्षाला तीन बाजूंनीं गराडा पडला आहे. ह्याच्या डोक्यावर भले मोठे चार तारे आहेत. कथानक.—ध्रुव नामक उत्तानपाद राजाचा सुनीती राणीपासून झालेला पुत्र व स्वायंभू मनूचा पौत्र होता. उत्तानपादाची प्रीती ध्रुवाची आई जी सुनीती हिजवर नसे, त्याप्रमाणें ह्या ध्रुवावरही नसे. एकदां ध्रुवाचा सावत्र भाऊ जो उत्तम तो उत्तानपाद राजाच्या मांडीवर बसला असतां ध्रुवही त्याचे मांडीवर बसण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यावेळीं त्याची सावत्र आई जी सुरुची हिनें त्यास ढकलून दिलें. तेव्हां तो आई जी सुनीती हिजकडे गेला व त्यानें झालेली हकीगत तीस सांगितली. तें ऐकून सुनीती त्यास म्हणाली, कीं परमेश्वराचें आराधन केल्यावांचून तुला ऐश्वर्य कसें प्राप्त होईल ? तेव्हां त्यानें एकान्तांत जाऊन नारदमुनीच्या उपदेशा-प्रमाणें श्रद्धापूर्वक भगवंताचें ध्यान केलें असतां थोड्या वेळांत भगवान त्याच्या सन्निध प्रत्यक्ष प्रगट झाले, व म्हणाले कीं ज्यास ग्रह व नक्षत्रें प्रदक्षिणा घालि-तात असें माझें अचल स्थान तुला दिलें आहे. पण तूं राज्याच्या हेतूनें माझी आराधना केली आहेस, त्या अर्थीं तूं प्रथम आपल्या पित्यामागें राज्य कर, व मग तूं त्या स्थानीं ये. त्याप्रमाणें त्यानें अनेक वर्षें सुखानें राज्य केलें. तें इतकें कीं त्याची प्रजा त्यास पिता म्हणत असे. नंतर त्यानें आपलें राज्य आपले पुत्रास देऊन पुन्हां एकान्तवास पत्करिला व अनेक वर्षें तप करून तो देहपात झाल्या-वर तो भगवंताच्या वराप्रमाणें अढळपदीं गेला. त्या पदास ध्रुवमण्डळ अशी संज्ञा आहे. ती त्याच्या नांवावरून जगांत चालत आहे. याप्रमाणें विचार करितां ह्या खगोलगत तारकापुंजाखालीं त्याबरहुकूम भूगोलगत अढळ ध्रुवप्रदेश आहे.

३ भूतप.—बृहदृक्षाच्या मागल्या अंगास त्याच्या शेपटीकडल्या दोन ताऱ्यां-मधून एक रेषा नेली तर ती ह्या तारकापुंजावर येते. ह्याची आकृती मनुष्यासा-रिखी आहे. ह्याच्या उजव्या हातांत एक सोटा व डाव्या हातांत दोन शिकारी कुत्रे आहेत. तो आपला हात बृहदृक्षाच्या पुच्छाजवळ ठेवून त्यावर जणूं चाल करीत आहे असें वाटतें. ह्या तारकापुंजाखालीं चिनांतील होहांगोहो नदीभोव-

तालचा प्रदेश येतो. ह्याच्या एकंदर परिस्थितीचा विचार करितां ह्यांत पारधींची जनावरें व पारधी लोक रहात असावें असें दिसतें.

( ४ ) हंस व स्वरमण्डळ.—यांतील हंस हा तारकापुंज उत्तरध्रुव मत्स्याच्या खांद्याजवळ आहे, व त्याच्या पश्चिमेस स्वरमण्डळ म्हणून दुसरा तारकापुंज आहे. या हंसाची आकृती उडत्या हंसासारिखी आहे. त्याचे पंख पसरलेले व पाय आखूडन घेतलेले आहेत. स्वरमण्डळ हा तारकापुंज मुरली सारखा आहे. ह्या तारकापुंजाखालीं इंग्लंड आहे.

( ५ ) उच्चैःश्रवा.—हा तारकापुंज देवयानीचे डोक्यावर आहे. ह्याची पुढली आकृती घोड्यासारिखी आहे. ह्याच्या खांद्यावर पंख आहेत. ह्याची मान व डोकें घोड्यासारखें दिसतें. हा सूर्याचा अश्व [ मत्स्य. अ. २४९ ]. ह्या तारकापुंजाखालीं अयोनिया [ यवनदेश—ग्रीस ] आहे.

( भा. स्कं. ४ अ. १०—१२, व मत्स्य अ. ४ ),

६ देवयानी.—ध्रुवतारा व ध्रुवदर्शक तारा यांच्या मधून एक रेषा नीट काढिली तर ती देवयानी जवळच्या चार ताऱ्यांजवळ येऊन पोहोचते. त्या चार ताऱ्यांपैकीं जो तारा पूर्वेस आहे तो देवयानीच्या मस्तकावर येतो, व बाकीचे तीन तारे उच्चैःश्रव्याच्याचे मस्तकावर येतात व मधल्या ताऱ्याची आकृती देवयानीच्या कंबरपट्यावर आहे व शेवटला तिसरा तारा तिच्या पायावर आहे. ही आकृती स्त्रीची असून कंबरेपर्यंत उघडी आहे. हिचे हात पसरलेले आहेत व ते साखळीनें बांधून घोड्यास अडकविले आहेत. कथानक.—वारुणी भृगूचा पुत्र जो शुक्र याची ही कन्या. हिचें जन्म इंद्राची कन्या जयन्ती हिच्या उदरीं झालें. ही बाळपणापासून तपस्विनी, विद्यासंपन्न, व पित्याची फार लाडकी होती. देवगुरू बृहस्पतीचा पुत्र जो कच हा ह्या दानवगुरू शुक्राचार्याकडे मृतसंजीवनी नामक गुप्त विद्या शिकण्याच्या हेतूनें येऊन अध्ययन करीत राहिला होता. [ मृत संजीवनी विद्या म्हणजे प्रातिनिधिक सत्तेची राज्यव्यवस्था. ह्या राज्यव्यवस्थेचा विशेष हा कीं हिचा अंमल ज्या व्यवस्थेवर असतो तींतील एखादा लोकनियुक्त इसम मेला गेला तरी त्याची रिकामी जागा भरून काढण्यास उत्तम उमेदवार निवडून काढण्यास लगेच तयार असतो). त्या कचावर त्या देवयानीचें प्रेम बसलें. तें इतकें कीं तो दैत्यदानवांच्या हातून अनेक वेळां अनेक प्रकारें मरण प्राप्त झालें. कारण त्याची मृतसंजीवनी विद्या शिकण्यास येण्याची गोष्ट त्या दैत्यदानवांस खपली नाहीं. पण त्यास कायमचें मरण येईना ! कारण त्यास शुक्राचार्य आपल्या दुहितेच्या वात्सल्यास्तव आपल्या मृतसंजीवनी विद्येनें वारंवार जिवंत करीत असत. शेवटीं त्या दैत्यदानवांनीं एक निर्वाणीचा उपाय केला. तो असा कीं त्यांनीं कचास मारून व जाळून त्याची राख केली व ती मद्यांत मिळवून तें मद्य शुक्राचार्यांस आग्रहानें पाजिलें. त्यामुळें असें झालें कीं कच नेहमींप्रमाणें गुरुकुलसंस्थेंतील व्यवस्थेप्रमाणें कच कंदमुळें, दर्भसमिधा वगैरे आणण्यास गेलेल्या इतर मुलांबरोबर वेळीं घरीं आला नाहीं. हें पाहून देवयानीस कांहीं केल्या चैन

पडेना. तिनें आपल्या पित्यास त्यास शोधून आणण्यास विनंती केली. तेव्हां आचार्यांनीं दिव्यदृष्टीनें शोध करून तीस सांगितलें कीं त्याची राख हल्लीं माझ्या पोटांत मजला दैत्यदानवांनीं आग्रहानें पाजिलेल्या मद्याबरोबर जाऊन पडली आहे. तर मी तुजला पाहिजे असल्यास कच जिवंत होणार नाहीं व तुला कच हवा असल्यास मी जिवंत राहाणार नाहीं ! याप्रमाणें पित्याचें वाक्य ऐकून देवयानीस मोठा विचार पडला. पण ती मोठी बुद्धिवान असल्यामुळें तिनें पित्यास सांगितलें कीं आपण उभयतांहि मला पाहिजे असून दोघेही जिवंत राहण्यास एक युक्ती आहे. ती अशी कीं प्रथमतः आपण संजीवनी मंत्र जपून कचास उदरांत सजीव करावें, नंतर त्यास संजीवनी विद्येचा उपदेश करावा, पुढें तो आपलें उदर विदारण करून बाहेर आला असतां, आपण मृत झालां आहां असें पाहून त्याच विद्येनें तो आपणास सजीव करील. ही युक्ती शुक्राचार्यांस मान्य होऊन त्यांनीं तत्काळ संजीवनी मंत्र जपून कचास उदरांत सजीव केलें व म्हणाले, कचा, आज माझी गुह्य विद्या मी तुजकारितां प्रकाशित करितों तर बाहेर येऊन तूं मला सजीव कर. असें बोलून त्यांनीं त्यास संजीवनी विद्येचा उपदेश केला. तेणेंकरून तो ज्या उद्देशानें त्या दैत्यगुरूकडे आला होता, तो सिद्धीस गेल्यामुळें त्यास अत्यंत हर्ष झाला व तो तात्काळ आचार्यांचें उदर विदारण करून बाहेर आला व त्यानें लगेच त्याच विद्येनें आचार्यांस सजीव केलें. तात्पर्य, दैत्यदानव यांनीं त्यास केलेला अपकार त्यास अनपेक्षितरीतीनें उपकारक झाला व मृतसंजीवनी विद्या त्या कचामार्फत दैत्यदानवांस अपकारक होणार होती ! पण या सर्व क्रियेंत कच व देवयानी हीं एकोदर भावंडें झालीं हें अपूर्व झालें ! ! म्हणून ही सबब कचास देवयानीशीं शरीरसंबंध न करण्यास पुढें सहज करितां येऊन तिची लग्नाची सूचना हाणून पाडतां आली !!! [ शिवाय या बनावापासून(घटना) एक मोठी फायद्याची गोष्ट सर्व हिंदुस्थानास अनाथासें अशी लाधली कीं शुक्राचार्यांनीं अवतरणोक्त मद्यपान निषेधाचा फायदा आमच्या आर्यधर्मांच्या स्मृतिग्रंथांत [ कायदे ] कायमचा संग्रहीत करून टाकिला ! व देवांच्या राज्यव्यवस्थेमध्यें मृतप्राणदायी प्रातिनिधिक संस्थेचा अंमल सुरू झाला व तेणेंकरून देव तेव्हांपासून दैत्यदानवांस अजिंक्य होऊन बसले; एवढेंच नाहीं तर त्यांनीं त्या दैत्यदानवांस उलट जिंकलें ! ! कारण, दारूच्या मदांत एखाद्याची गुप्तरहस्यें फुटतात म्हणून त्याविरुद्ध गोष्ट देवांच्या आचारांत वेदकाळापासून उतरलेली होती. हे देव व हे गुप्तविद्येचे भोक्ते म्हणून-दाखविणाऱ्या ऋग्वेदाच्या एका ऋचेवरून अन्यत्र आपले नजरेस पडलें आहे. याप्रमाणें कचानें देवयानीचा अंगीकार केला नाहीं. कारण त्यांस शत्रूच्या गुरूची मुलगी घरांत घेतल्याप्रमाणें होणार होतें. त्याच्या एकोदरपणाच्या सबबीनें तिचें समाधान झालें नाहीं. तिनें त्याला असा शाप दिला कीं तूं कपटानें संपादिलेली मृतसंजीवनी विद्या तुला बिलकुल फलप्रद होणार नाहीं ! तेव्हां कचानें तिला असा शाप दिला कीं तुला कोणीहि ब्राम्हण वरणार नाहीं ! ! ( ही संजीवनीविद्या मला फलप्रद झाली

नाहीं तर ती माझा पिता देवगुरू बृहस्पती ह्यास फलप्रद होईल व त्याप्रमाणें ती त्यांस झाली. ) ह्या गोष्टींतील एक कच मारल्यावर दुसरा त्याचें काम करण्यास देवगुरूंनीं पाताळमंत्रीपणानें तत्सम दुसरें कच दैत्यगुरूच्या गुरुकुलांत अन्तेवासित्व करण्यास ठेविलेले असावे, व ते मोठ्या ग्राहकबुद्धीचे असावे. त्यांनीं सदरीं अवतरणांत दिल्याप्रमाणें मृतप्राणदायी संजीवनी ( किंवा आमचे मित्र रावसाहेब वझे यांच्या मार्मिक मताप्रमाणें प्रतिनिधिक संस्था ) हिचें ज्ञान कणशः आत्म-निरपेक्ष जमा करून देवगुरूस अर्पण केलें असलें पाहिजे--असें आमचें मत आहे.]

टीपः—( १ ) इंद्राच्या राजसभेंत १००० प्रतिनिधी असत.

( २ ) प्रतिनिधींचें वय ३५ ते ७० वर्षें असे.

कच निघून गेल्यावर एकदां वृषपर्व्या दानवराजाची कन्या शर्मिष्ठा आपल्या सख्यांसह वनविहारास गेली असतां देवयानी तिजसमागमें आपल्या सख्यांसह-वर्तमान गेली. तेथें पाहिजे तशी क्रीडा केल्यावर त्या सर्व जणी आपआपलीं वस्त्रें सोडून ठेवून एका सरोवरांत स्नानास उतरल्या व यथेच्छ जलक्रीडा झाल्यावर त्या बाहेर आल्या व त्या वस्त्रें परिधान करूं लागल्या. त्यांत शर्मिष्ठेनें चुकून देवया-नीचें वस्त्र परिधान केलें. त्यांत इतर सर्व जणींच्या मागून देवयानी आली व पहात्ये तों आपणास शर्मिष्ठेचें वस्त्र परिधानार्थ राहिलें आहे. त्यावरून त्या परमा-भिमानी देवयानीस मोठा क्रोध आला व ती शर्मिष्ठेस निर्भर्त्सनापूर्वक म्हणूं लागली कीं माझा पिता जो शुक्राचार्य याच्याच बळावर झाडून सर्व तुम्ही दैत्यदानव येथें सुखी राहिले आहां व समूळ रसातळास गेलां नाहीं म्हणून तो तुझ्या पित्यासही मान्य आहे. त्याची कन्या मी आहें. म्हणून मी त्याप्रमाणें तुलाही मान्य असतां तूं माझें वस्त्र परिधान केलेंस हा मोठा प्रमाद व अन्याय केलास. तें ऐकून शर्मि-ष्ठेनें—झालेली गोष्ट चुकून झाली असे लीनतेनें म्हणावयाचें सोडून—म्हटलें कीं मी दात्याची कन्या आहें व तूं याचकाची कन्या आहेस, म्हणून तुजमध्यें व मजमध्यें महदंतर असतां तुझें वस्त्र परिधान केल्यानें मलाच हीनत्व आलें आहे. असें असतां तुला आपला श्रेष्ठपणा वर्णन करण्यास लज्जा कशी वाटत नाहीं ! सारांश असें बोलण्यावरून बोलणें वाढतां वाढतां शर्मिष्ठा इतक्या निकरावर आली कीं तिनें तिला तिचें वस्त्र न देतां व आपलें वस्त्र तिला नेसूं न देतां तिला नागवीच्या नागवी एका कूपांत लोटून देऊन आपल्या सख्यांसह स्वगृहीं गमन करिती झाली ! ! इकडे देवयानीच्या सख्या वेड्यासारख्या त्या कूपाभोंवतीं आरडत ओर-डत फिरत राहिल्या !!! त्यांस तीस मदत करण्यास तिच्याजवळ जातां येईना !!! इतक्यांत देवयानीचें नशीब बलवत्तर म्हणून तीस कांहीं आधार मिळून ती पाण्यावर तरंगत राहिली तेव्हां त्या तीस बाहेर काढण्याकरितां आपली शिकस्त करीत राहिल्या. पण त्यांचा कांहीं उपाय चालेना !!! तेव्हां ती प्रसंगावधानी देवयानी आंतून त्यांस तुह्मी सत्वर नगरांत जाऊन शर्मिष्ठेनें माझी केलेली दुःखावस्था माझ्या पित्यास निवेदन करा, म्हणजे तो मला बाहेर काढण्यास अचूक उपाय करूं शकेल. त्या-वरून सख्या नगरांत गेल्या !! इतक्यांत कर्मधर्मसंयोगेंकरून नहुषपुत्र ययाती राजा

मृगया करीत तिकडे आला असतां, त्यानें जवळच्या कूपांतून निघणारा आर्तस्वर ऐकून त्या समीप आगमन केलें व पाहतोंतों आंत एक अत्यंत लावण्यसंपन्न व नवयौवना युवती पाण्यांत जीव रक्षणार्थ धडपड करीत आहे!!! तो तिस लगेच काढण्याचा प्रयत्न करणार तों धैर्यशाली देवयानीनें त्या पुरुषास पाहून म्हटलें कीं मला आधीं परिधानार्थ आंत एक वस्त्र टाका. तें टाकिल्यावर तिनें आपलें अंग झाकिलें न झांकिलें तोंच ययाती राजानें तीस पुसलें कीं तूं कोणाची ? कोण ? व यांत कशी पडलीस ? त्यावर तिनें सांगितलें कीं मी दैत्यगुरु शुक्राचार्य यांची कन्या, देवयानी आहें. मला वृषपर्वा दानवाची कन्या शर्मिष्ठा हिनें यांत लोटून दिलें. नंतर तिनें विचारल्यावरून त्यानेंही आपलें नांव, गांव व कूळ सांगितलें. तें ऐकून देवयानीनें त्यास समयोचित व समर्पक असें सूचित केलें कीं हा संबंध कर्मधर्मसंयोगानें घडून आला आहे, ब्रह्मर्षी व राजर्षी यांमध्यें शरीरसंबंध पुष्कळ झालेले आहेत तर शंका न धरितां माझें पाणीग्रहण करून त्वां मला बाहेर काढण्यास अनमान करूं नये. त्यावरून आर्तत्राणशील ययाती राजानें देवयानीच्या हस्ताचें ग्रहण करून तिला बाहेर काढिलें व तिचा निरोप घेऊन नगरांत गेला. इकडे देवयानीच्या सख्यांनीं झालेली सर्व हकीगत शुक्राचार्यांस सांगितली. त्याबरोबर तो आचार्य धांवपळ करीत त्या कूपाजवळ येऊन पोहोंचतोतों आपली लाडकी देवयानी त्या कूपाच्या कांठीं सुखरूप वर येऊन कुडकुडत बसली आहे!!!! देव तारी त्यास कोण मारी ? नंतर देवयानीनें अथपासून इतीपर्यंत म्हणजे ययाती राजानें आपणास पाणीग्रहण करून काढिलें येथपर्यंत साद्यंत वर्तमान सांगितलें व ह्मटलें कीं 'या मदोन्मत्त दानवांजवळ अजीजी करीत राहणें आपणास योग्य नाहीं. इतकें असून आपण तसे राहण्यास इच्छितच असाल तर आपण नगरांत जावें, मला तिकडे येणें नाहीं!' शुक्राचार्यांनें तिची बहुतांप्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण ती त्याचें ह्मणणें बिलकूल ऐकेना. तेव्हां निरुपाय होऊन शुक्राचार्य तेथेंच राहिला. हें वर्तमान वृषपर्व्यास कळतांच तो ताबडतोब तेथें आला व त्यानें बहुत प्रकारें शुक्राचार्यांची विनवणी केली कीं आपण नगरांत चलावें, आपण आमचा त्याग करून गेल्यास आम्ही कोणाच्या बळावर देवांशीं टक्कर मारावी ? त्यावर शुक्राचांर्यानें उत्तर केलें कीं यांत माझी समजुत करून काय उपयोग ? तूं माझ्या देवयानीची समजुत कर व तसें करून ती नगरांत आली तरच मी नगरांत येईन, एरवीं मी नगरांत पाय घालणार नाहीं. त्यावरून वृषपर्व्यानें देवयानीची प्रार्थना केली कीं शर्मिष्ठेच्या अपराधाची क्षमा करून नगरांत चल ! तेव्हां ती गर्विष्ठ देवयानी म्हणाली कीं 'माझा पिता मला जेथें विवाह करून देईल तेथें मजबरोबर तुझ्या कन्येनें कित्येक दासींसह माझी दासी होऊन माझें दास्यत्व करण्यास यावें—हें माझें म्हणणें तुला मान्य असेल तर तूं तिला येथें बोलावून आणून माझ्या समक्ष पुसावें व तिनें तें मान्य केल्यास मी नगरांत येईन.' त्याप्रमाणें वृषपर्व्यानें शर्मिष्ठेस तेथें बोलावून तिला देवयानीचें म्हणणें कळविलें. तेव्हां शर्मिष्ठेनें शर्मिदें

होऊन देवयानीचें मानहानिकर बोलणें मान्य केलें ! एवढेंच नाहीं तर पुढें देवयानी तीस तोऱ्यानें म्हणाली कीं, ‘ आतां कशी दात्याची कन्या याचकाच्या कन्येचें दास्यत्व करील ? ’ त्यावर शर्मिष्ठाही असें चतुरतेनें व दूरदर्शीपणानें म्हणाली कीं, ‘ एकाकरितां सर्व कुल नाश पावूं देणें योग्य नाहीं हें जसें न्याय्य आहे, तसें मज एकलीकरितां सर्व दानवांचा नाश होऊं देणें योग्य नाहीं हें न्याय्य आहे म्हणून मला त्यांच्या सर्वांच्या जिवाकरितां दास्यत्व पतकरणें मान्य केलेंच पाहिजे, ’ त्यावरून संतोषित होऊन देवयानी पित्यासह नगरांत गेली व तिचा विवाह ययातीशीं ठरल्याप्रमाणें झाला असतां, शर्मिष्ठा बोलल्याप्रमाणें देवयानीसमागमें बिनतक्रार दासी होऊन गेली.

अशी ह्या तारकापुंजाची हकीगत आहे. ही रास वृषभ राशीपासून दहा अंशावर आहे तर या राशीखालीं भूमध्य समुद्राच्या पूर्वबाजूवरचे एशिया खंडातील देश असले पाहिजेत. त्यांची नांवें:—

७ ययाती:—देवयानीच्या मुख्य तीन ताऱ्यांमधून पंधरा अंशापर्यंत लांब रेषा नेली तर ती ययाती तारकापुंजाच्या मस्तकावर येऊन ठेपते. याच्या उत्तरेकडेस सुमारें सहा अंशावर त्यांतील मुख्य तारा ययाती आहे. कथानक—हें आठवत असेलच कीं शुक्राचार्यानें ययाती राजास बोलावून आणून त्यास देवयानी विवाहविधीनें दिली व नंतर कांहीं काळपर्यंत त्यास आपणाजवळ ठेवून घेतलें. पुढें ययाती देवयानीसह स्वदेशीं जाऊं लागला, तेव्हां त्यास शुक्राचार्य म्हणाला, राजा, माझी प्रियकन्या जी ही मी तुला दिली आहे, तिच्या समागमें वृषपर्व्यांची कन्या शर्मिष्ठाही आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें दासी होऊन येत आहे. तर तूं तिजकडे अन्यथा बुद्धीनें अवलोकन करूं नयेस. जर करशील तर विदुषी व तपस्विनी जी माझी कन्या देवयानी तिचा तूं अपमान केल्यामुळें अंशतः माझाच अपमान केलास असें होऊन नसत्या अनर्थास पात्र होशील. यावर त्यानें आपले आज्ञेप्रमाणें चालेन असें कबूल करून शर्मिष्ठा दासीसहित देवयानीस घेऊन तो स्वनगरास गेला. पुढें हा नीतिपूर्वक राज्य करीत व देवयानीसह आनंदानें राहत असतां, त्यांस यदू व तुर्वसू असे तिजपासून सुंदर पुत्र झाले. त्यावरून देवयानी हर्षयुक्त असतां तिला नकळत तिकडे शर्मिष्ठेसही ययातीपासून अनू, द्रुह्यू, व पुरू असें तीन पुत्र झाले. एकदां असें झालें कीं देवयानी फिरत फिरत जेथें शर्मिष्ठा रहात होती तेथें जाऊन पाहत्येतों तिच्या आंगणांत एकाखालीं एक लहान असे तिघे पुत्र खेळत आहेत, तेव्हां तिनें शर्मिष्ठेस हे कोणाचे पुत्र ? म्हणून विचारलें. त्यावरून शर्मिष्ठा अंतःकरणांत अगदीं भयभीत झाली होती. तरी बाहेरून मोठ्या धैर्यानें हे माझेच पुत्र आहेत असें देवयानीस खाडकन् उत्तर दिलें. तें ऐकून देवयानीनें पुसलें कीं हे तूं कोणापासून संपादन केलेस ? शर्मिष्ठा न डगमगतां म्हणाली मी ऋतुमती असतां, येथें कोणी एक ऋषी प्राप्त झाला होता. त्यास प्रसन्न करून मी हे संपादन केले. हें तिचें बोलणें देवयानीस बरोबर पटलें. कारण ययाती राजापासून हिला कधींकाळीं पुत्र होतील असा संशय घेण्यास देवयानीस जागा नव्हती. कारण ती त्यास

सत्यप्रतिज्ञ समजत असे. ह्या तिच्या पक्या समजुतीनें ती अगदीं पुरी फसली व तिनें तिच्या मुलांस कांहीं खाऊ देऊन व शर्मिष्ठेचें अभिनंदन करून स्वगृहीं परत आली.

असें हें सुंदर कथानक आहे. हा तारकापुंज देवयानीपासून पंधरा अंशावर होता. तर ह्या राशीखालील देश पश्चिम सैबिरियामध्यें असले पाहिजेत. कारण याचा बाप नहुष यानें त्यांतल्या ऐरावत वर्षांतील इंद्रास जिंकून त्याचें राजपद कांहीं दिवस बळकाविलें होतें. याप्रमाणेंच ययातीचा मुलगा अनू ह्याचे राज्याचा उल्लेख मागें दिलेल्या असिरियांतील विटेवरील लेखांत आला आहे व ययाती बाहेर जाऊन म्लेंच्छ झाला होता असें सुस्पष्ट वर्णन पुराणांत आहे तर देवयानी व ययाती ह्यांचीं वसतिस्थान उत्तर आर्यावर्तांत किंवा उत्तर एशियेंत ठरतात. ( पूर्वीं दिलेला आपल्या ऋषींचा अनादी नकाशा पहा. )

८ शर्मिष्ठाः—हा तारकापुंज बृहदक्षाच्या अगदीं समोर आहे. ह्याचे पाय त्याचे डोक्याकडे आहेत, ह्याची आकृती स्त्रीची आहे. ती स्त्री मलमल नेसली असून खुर्चीवर बसली आहे. तिनें उजवा हात मुकुटावर ठेवून डाव्या हातांत ताडाची झावळी घेतली आहे. कथानकः—पूर्वोक्त भोळी व साधी देवयानी कांहीं विकल्प मनांत न आणितां स्वगृहीं आली होती. बरेच दिवस लोटल्यास तिजला शर्मिष्ठेच्या मुलांस पाहण्याची इच्छा झाली व ती ययातीराजासह फिरत फिरत शर्मिष्ठेच्या घरीं आली. पण आतां कसें होईल ? म्हणून राजास मोठें भय उत्पन्न झालें. इतक्यांत ज्या कार्याला तो भ्याला होता तेंच झालें. देवयानीसह राजाला आलेला पाहून शर्मिष्ठेच्या पुत्रांनीं मातेस म्हटलें कीं—' हा पहा, बाबा आला. ' ते शद्ब ऐकून देवयानीस संशय उत्पन्न झाला. पण यांतील खरा प्रकार कळावा म्हणून देवयानीनें त्या मुलांस आंजारून गोंजारून प्रेमानें पुसलें कीं—' बाळांनो, तुमचा पिता कोण ? व तो कोठें आहे ? ' असें ती पुसत असतां आपलें नांव न सांगावें म्हणून राजा त्या मुलांस नेत्रांनीं खूण करीत होता. पण ती त्या मुलांस न समजून त्यांनीं फटकन् उत्तरें दिलीं कीं—' आमचा पिता हा ' व असें म्हणून त्यांनीं राजाकडे निखालस बोटें एकदम केलीं. तेव्हां त्या गर्विष्ठ पण भावड्या देवयानीची बालंबाल खात्री झाली कीं, राजा वचनाचा घड नाहीं; कारण हे पुत्र राजापासूनच शर्मिष्ठेस झाले आहेत ! मग त्या शीघ्रकोपी देवयानीचा क्रोध काय विचारावा ? तिनें लगेच शर्मिष्ठेस आपणासमोर बोलावून पुसलें कीं ' कायगे, हे पुत्र ऋषीपासून तूं संपादन केलेस म्हणून मला सांगून तूं मला सजविलेंस तर तो ऋषी हाच किंवा दुसरा ? हें मला सांग. ' त्यावर शर्मिष्ठेनें नम्रतेनेंच उत्तर केलें कीं ' हे देवयानी, तूं ऋषिकन्या असल्यामुळें तुझें पाणिग्रहण करण्यास ऋषीवांचून दुसरा कोण समर्थ आहे ! यास्तव मी समजत आहें कीं हा ऋषी आहे, तेव्हां मी ऋषीपासून पुत्र संपादिले म्हणून तुला जें मी सांगितलें तें असत्य नाहीं, तें अगदीं शब्दशः खरें आहे. ' असें तिचें भाषण ऐकून ती दुःखित झालेली देवयानी तिला किंवा राजाला एकही

शब्द न बोलतां आपल्या पित्याकडे सरळ जाण्यास निघाली. तें पाहून सदर अपराध क्षमा करण्याबद्दल त्या मनास टोचणी लागलेल्या राजानें त्या क्रोधाविष्ट देवयानीच्या गयावया करून विनवण्या केल्या. पण तिनें तें ऐकलें नाहीं, व ती शुक्राचार्यांकडे तडक गेली. तेव्हां निरुपाय होऊन तो दीन ययातीही तिच्या पाठोपाठ गेला. त्या देवयानीनें जातां क्षणींच ययातीचें विश्वासघाताचें कृत्य पित्यास निवेदन केलें. त्याबरोबर शुक्राचार्यांस अनिवार क्रोध आला व ययातीस देवयानीच्या मागें अधोमुख उभा राहिलेला पाहून त्यास म्हणाला, ' घातक्या, बोलला होतास काय ? व केलेंस काय ! असो. झालें तें झालें. ज्याअर्थीं तुजकडून तारुण्यमदानें माझ्या कन्येचा विश्वासघात झाला आहे, त्या अर्थीं तुला, जरा ग्रस्त करो ! व चमत्कार हा कीं त्यानें असें म्हटल्याबरोबर तो राजा जरेनें जर्जर झाला ! असा म्हातारा होऊन जातांच त्या ययातीनें आपल्या श्वशुर शुक्राचार्यांची अशी प्रार्थना केली कीं, माझी देवयानीविषयीं विषयभोगाची वासना अजून तृप्त झाली नसून मला जरेनें ग्रस्त करून टाकिलें तेव्हां यांस कांहीं तरी तरणोपाय सांगावा. ' तेव्हां शुक्राचार्य म्हणाला, ' असें आहे तर तूं आपलें म्हातारपण आपल्या एखाद्या पुत्रास देऊन त्याचें तरुणपण तूं घ्यावेंस. व आपली वासना पूर्ण करून घ्यावीस. ' त्यावर ययातीनें विनंती केली कीं ' माझ्या झाडून सर्व पुत्रांपैकीं जो पुत्र माझें म्हातारपण घेण्यास तयार असेल तोच माझ्या सार्वभौमपदाचा मालक व्हावा अशी माझी इच्छा आहे, त्यास आपलें अनुमोदन असावें. ' त्यास शुक्राचार्यांची मंजुरी मिळतांच ययाती राजा देवयानीस घेऊन हौसेनें व उल्हासानें स्वनगरीं गेला. परत आल्यावर त्यानें कांहीं कालेंकरून मुलगे सज्ञान झाले असे पाहून सर्वांस आपणासमोर बोलावून आणून सर्वांत वडील जो यदू त्यापासून अनुक्रमें प्रत्येकास ' माझें म्हातारपण घेऊन आपलें तरुणपण द्या ' म्हणून आज्ञा केली, पण ती पहिल्या चौघा पुत्रांनीं अमान्य केली. हें पाहून कनिष्ठ पण विचारवंत पुरूनें पाहिलें कीं मीही आपल्या चार वडील भावांप्रमाणें करीन तर आपल्या पित्यानें आतां कोणाची आस करावी ? तर काय होईल तें होवो असा कायम ठराव करून त्यानें आपलें तरुणपण आपल्या बापास दिलें व त्याचें जरठपण आपण घेतलें. त्या पुत्राच्या तारुण्यानें अन्वित होऊन ययातीनें देवयानीबरोबर यथेच्छ संसारसुख भोगून वैराग्ययुक्त होत्साता पुरूचें तारुण्य पुरूस सार्वभौमपदासह व यदू, द्रुह्यू व अनू यांस केवळ सामान्य राज्यें समर्पून व पुरूजवळून आपली जरा घेऊन देवयानीसह तपश्चर्येकरितां अरण्यांत गेला. तेथें तपानें देह शुष्क करून त्यानें देह ठेविला व स्वर्गास गेला. ( भारत, आदिपर्व, अ. ८४–९३; मत्स्य. अ. २४–३६ ).

असें हें मनोरम कथानक आहे. ह्या कथानकाचा विषय झालेला शर्मिष्ठेचा तारकापुंज बृहदृक्षाच्या समोर आहे व बृहदृक्षाखालीं राशिया आहे तर त्या राशिया समोरच कोठें तरी उत्तर आर्यावर्तांत शर्मिष्ठा हें आपल्या पृथ्वीवर असिरियांतील अनूच्या राज्याजवळ दानव वसतिस्थान असावें.

९ वृषपर्वाः—हा तारकपुंज शर्मिष्ठा व लघूऋक्ष यांच्यामध्यें आहे. ह्याचे पाय ध्रुवाकडे आहेत. ही आकृती भव्य राजाप्रमाणें आहे. ह्याच्या डोक्यावर मुकुट आहे. त्याच्या उजव्या हातांत राजवेत्र आहे व त्यानें आपला डावा हात लांब केला आहे. ही आकृती शर्मिष्ठेपेक्षां मोठी असून तिच्या खुर्चीच्या मागें आहे, व त्यानें आपलें तोंड तिजकडे केलें आहे. कथानक.—हा कश्यपापासून दनूस झाला होता. त्यास शर्मिष्ठा व चंद्रा अशा दोन कन्या होत्या. या दोन कन्यांपैकीं एक शर्मिष्ठा ययाती राजाकडे देवयानीसमागमें स्वकुलरक्षणार्थ दास्यत्व स्वीकारून कशी गेली होती ! व तिनें तेथें काय प्रकार केला ? हें मागील कथानकावरून अवगत झालेंच आहे. ह्या सगळ्या कथानकांवरून देव व दानव यांतील स्पर्धा, लढे, डावपेंच, शरीरसंबंध, चढती, बढती, जमातीचें प्राबल्य, प्रजावात्सल्य, पितृभक्ती, स्त्रियांची विद्वत्ता, चढेलपणा, हट्टीपणा, फुगीरपणा, कुलाभिमान, व दासीप्रेम, विद्यार्थ्यांची आत्मनिरपेक्षता, अद्भुत-सामर्थ्य, मनमिळाऊपणा, धूर्तपणा, व प्रसंगावधान, राजाचा आर्तत्राणधर्म, अविश्वसनीयता, व विषयासक्ती व सर्व जगाची अनिच्छ, सेच्छ व परेच्छ प्रारब्धाधीनत्व वगैरे अनेक छायाचित्रें नजरेस पडतील; एवढेंच नाहीं तर प्राचीन भूवर्णनाच्या दृष्टीनें दुनियेंतील देशांची जी माहिती आपल्यास दुष्कर झाली ती कदाचित् दुसऱ्यास पुढें सुकर होईल.

ह्या सुंदर कथानकांतील शर्मिष्ठा अनूच्या असिरियाजवळ व बृहदृक्ष ध्रुवप्रदेशाजवळ होतें तर वृषपर्व्याचें राज्य त्यांमध्यें म्हणजे काश्यप ऋषीच्या नांवावरून कास्पियन नांव पडलेल्या समुद्राजवळ असलेल्या व पुरू, यदू ह्यांचा वंश हल्लीं हिंदुस्थानांत पौरव (पोरस) व सध्यां यादव (जाधव) म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांची जमात इकडे जलप्रलयानंतर अन्यत्र सांगितलेल्या सदुसष्ट जमातींबरोबर जलप्रलयानंतर आली आहे. त्यांत पांढरे, तांबडे, काळे, पिवळे व फिके लोक होते. ते उत्तरेकडून व दक्षिणेकडून हिमालयसंभवानंतर उत्तर व दक्षिण गोलार्धांतून दक्षिण आर्यावर्तांत एकवटले. कच, त्याचे वडील बृहस्पती व त्या बृहस्पतीचे यजमान इंद्र हे पांढरे देव आर्य—होते, पण शर्मिष्ठा, तिचे वडील वृषपर्वा व शुक्र व कदाचित त्याची कन्या देवयानी हीं तांबडी दानव—अनार्य—दिसतात. कारण वृषपर्व्याचा वंशवृक्ष तपासितां शर्मिष्ठा व वृषपर्वा ह्यांचा संबंध प्रत्यक्ष दनू व कश्यप याशीं जाऊन पोहोंचतो व शुक्र व देवयानी यांचा पूर्वसंबंध तपासतां तो पुलोमा त्याची आई व शतपर्वा त्याची एक पत्नी आर्येतर दिसतात, मग देवयानीची आई जी जयंती ही इंद्रआर्यदेवाची प्रत्यक्ष कन्या का असेना. कारण जयन्ती व शुक्र यांचा विवाह म्हणजे एक राजकारणांतील लग्न दिसतें. त्यावेळच्या पुरंदर इंद्रानें आपली मुलगी जयन्ती दानवांच्या प्रतिस्पर्धेचा त्वेष नरम पाडण्याकरितां शुक्रास तो त्यांचा केवळ आचार्य म्हणून दिलेली दिसते. या वेळीं धर्मांतर वैयक्तिक होत नसे तर सामाजिक होत असे, म्हणजे जमातीच्या जमाती एक संस्कृती सोडून दुसऱ्या संस्कृती घेत, उदाहरणार्थ,

शुक्राचार्यांचे दानव हे बृहस्पतीचे देवासारखे देवपण दारू सोडून मिळवूं पहात होते व त्यांत गुणकर्मविभागशः ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे भेद पडत होते व त्यांत बृहस्पतीप्रमाणें शुक्र हा ब्राह्मण आचार्य व वृषपर्वा हा क्षत्रिय राजा होता. कारण या वेळीं देव व दानव हा वर्णभेद दिसतो व तो जातिभेद दिसत नाहीं व त्या वर्णभेदांत हल्लींच्या जातिभेदाप्रमाणें अभेद्यता दिसत नाहीं—म्हणजे देव व दानव तर काय पण ब्राह्मण व क्षत्रिय यांचे शरीरसंबंध ययाती व देवयानी यांप्रमाणें सुकर होते, व देवही आपली संघटना दानवांतील संजीवनीविद्या अथवा प्रातिनिधिक सत्ता यांचा नूतन संस्कार न घेण्यासारखे नवविद्वेषी होते असें बिलकुल दिसत नाहीं व त्यांचे आचार्य बृहस्पती हे आपल्या पोटचा मुलगा कच ह्यास तदर्थ प्रत्यक्ष शत्रूच्या गुरूच्या घरीं अंतेवासी म्हणून आत्मनिरपेक्ष ठेवण्यास उद्युक्त झालेले होते व त्या मुलनें ती विद्या जिवापाड श्रम करून म्हणजे अनेक वेळां आपली राखरांघोळी होईतों मरून जाऊन आपल्या वर्णार्थ आणिली व याप्रमाणेंच शर्मिष्ठेनेंही आपल्या वर्णाच्या किंवा कुलाच्या रक्षणार्थ देवयानीची दासी होऊन जाण्यांत कसा आत्मयज्ञ केला आहे, तो विचार करण्यासारखाच आहे. पण ती कपटी व देवयानी भाबडी दिसते, मग ती केवढीही विदुषी असो व ती अशी विदुषी होती म्हणून तिजवर जिवापाड संकटें आलीं असतां प्रसंगावधान धरून तिचें प्रत्येक संकटाचें निवारण करून ययातीचें पट्टराणीपद मिळविलें पण तेथें शर्मिष्ठेचें कपट व राजाचा विश्वासघातकीपणा तिच्या स्वाभिमानास अत्यंत जाचक झाला असतां तिनें सगळें साम्राज्यपद शर्मिष्ठेच्या पुरुपुत्राकडे गेलें तरी तिच्याशीं साम करून आपल्या वयोमानाप्रमाणें आत्मोद्धारार्थ ययातीस अरण्यांत तपश्चर्येस नेलें आहे ! त्यास वृषपर्वा उलट नसे, पण आपल्या नातवाचे हक्क बुडाले असतांही त्यास शुक्राचार्यांनीं कोणत्याही प्रकारची हरकत घेतली नाहीं ! यांतील प्रत्येक पात्र बृहस्पती, कच, देवयानी, शुक्र, शर्मिष्ठा व ययाती कोणत्या ना कोणत्या तरी गुणाकरितां नुसतें स्तुत्य नव्हे, तर मोठें अनुकरणीय आहे. म्हणून त्यांचे झेंडे आपल्या उत्तर आर्यावर्तांतून नेऊन उत्तरेकडील नव्या राशींत व ग्रहमालेंत सगळ्यांस रोज आकाशाच्या उत्तरमार्गीं त्याच्या भौगोलिक मूळाबरहुकूम रोवून ठेविले आहेत—असें ठरतें. या कचाच्या आत्मनिरपेक्ष विद्याहरणाच्या गोष्टीवरून आपल्या जुन्या लोकांच्या विद्याहरणार्थ त्रिखंडांतील आत्मनिरपेक्ष प्रवासांची आठवण होते:—(१) वृद्ध गर्ग म्हणून अती प्राचीन ज्योतिषावर ग्रंथ लिहिणारा होऊन गेला आहे. त्यानें अमेरिकेंतील ( पाताळ ) शेषास प्रसन्न करून आपली विद्या पूर्ण केली असें विष्णुपुराणांत आहे तर तो राशिचक्राचें आपलें अपुरें ज्ञान पुरें करण्याकरितां त्या पाताळांतील शेष नामक ज्योतिषाकडे गेलेला दिसतो. (२) शाकल्य ब्रह्मसिद्धान्त अ० १ यांत पुढील वाक्य आहे.—

भूमिकक्षाद्द्वादशांशे । लंकायाः प्राक्च शाल्मले ॥
मयाय प्रथमे प्रश्ने । सौरवाक्यमिदं भवेत् ॥

यावरून इकडील कोणी तरी पुरुष ज्योतिषाच्या विचारांचा विनियम करण्या-

करितां पूर्वेकडील कोणा मयाकडे गेलेला दिसतो. मय यवन अमेरिकेंत राहणारें होते हें अन्यत्र सिद्ध केलें आहे, तर तो अमेरिकेंतच–गेला असला पाहिजे. ( लॉस्ट हिस्टरीज ऑफ अमेरिकेंत–युक्याजचा इतिहास पहा ). (३) कोणी दुसरा गर्ग म्हणतो कीं या यवनांत हें शास्त्र चांगलें आहे पण तो त्यांपासून काय शिकला? हें त्यांत दिलें नाहीं. [ भा. ज्यो. इ. पा. ५१८ ]

यांप्रमाणें आपले आर्यावर्तांत त्रैलोक्यांतील आर्येतरांची भरती व दळणवळण यांचें दिग्दर्शन केलें. पण त्याची सिद्धता करण्यास आपलेजवळ कांहीं मूर्तिमंत पुरावा आहे काय? होय, आहे. आपल्या दक्षिणेंत शेष हें नांव तेथील लोकवस्तींत अगदीं रूढ आहे तसें तें उत्तरेस नाहीं. जशा उत्तरेभर कश्यपसंहितेबरहुकूम बांधलेल्या इमारती चोहोंकडे आढळतात, त्याप्रमाणें दक्षिणभर मयसंहितेबरहुकूम बांधलेल्या इमारती चोहोंकडे आढतात. हे शिल्पशास्त्राचे ग्रंथ आपल्या देशांत हल्लीं उपलब्ध आहेत. ते ह्या अनुमानास अत्यंत पोषक आहेत. वरील आर्याप्रमाणें ह्या विशिष्ट व बहुसंख्याक आर्येतरांतही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, ही चातुर्वर्ण्याची संस्था आढळते. मग त्यांतील भेद कसा हुडकून काढावा? हल्लीं जसे आमचे कांहीं लोक बूटपाटलूण घालून मोठे इष्टुर फाकडे साहेब बनले, तरी त्यांचें रंगरूप निरखून व खरवडून पाहिल्यास त्यांचें मूळ सहज ओळखतां येतें तशीच गोष्ट ह्या आर्येतरांची आहे. त्यांनीं जरी पांढरे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या जातींची हुबेहुब नक्कल तर काय पण त्यांवर कमालीच्या कर्मठपणाची कडीही केली तरी त्यांच्या रंगरूपाकडे बारीक नजर फेंकली तर ते तांबडे लोकांचे वंशज आहेत अशी निखालस खूण पटल्यावांचून कधींच राहत नाहीं. त्यांत सध्यां कांहीं न्यून असेल तर तें एवढेंच आढळतें कीं ज्याप्रमाणें पांढरे लोकांत कांहीं भेळ झाल्यामुळें व कांहीं उष्ण हवेचा परिणाम झाल्यामुळें त्यांचा पांढरा रंग आढळत नाहीं, त्याप्रमाणें त्या तांबड्या लोकांच्या वंशजांत कांहीं बाहेरील भेळ झाल्यामुळें व कांहीं उष्ण हवेचा परिणाम झाल्यामुळें त्यांचा रंग निव्वळ तांबडा राहिला नाहीं. पांढऱ्या लोकांत हीं भेळ होण्यास आर्यावर्ताच्या पूर्वपश्चिमभागीं पूर्वीं पूर्वपश्चिम फिरणारे तांबडे व पिंवळे लोक उत्तरगोलार्धांत होते व तांबड्या लोकांत भेळ होण्यास त्याच्या पूर्वपश्चिम भागीं पूर्वीं पूर्वपश्चिम फिरणारे काळे व पांढरे लोक दक्षिणगोलार्धांत होते. पण हें कबूल केलेंच पाहिजे कीं हे तांबुस लोक त्या पांढुरक्या लोकांपेक्षां सध्यां वेदाध्ययन, संस्कृतज्ञता, आचार, विचार, व कर्मठपणा यांत सरस आढळतात. ज्याप्रमाणें आपले हिंदुस्थानांतील मूळ मुसलमानांपेक्षां व ख्रिस्ती लोकांपेक्षां धर्मांतरित ( बाट्ये ) मुसलमान व ख्रिस्ती कडवे आढळतात, त्याप्रमाणें सदरहू पांढुरक्या लोकांपेक्षां सदरहू तांबूस लोकांत आर्यपणाचीं कांहीं लक्षणें मोठीं तीव्र आढळतात, म्हणजे हे तांबुस लोक कडकडीत कर्मठ, वैदिक व नवविद्वेषी आहेत तसे पांढुरके लोक कडकडीत कर्मठ, वैदिक व नवविद्वेषी नाहींत. म्हणून हे तांबूस लोकच सगळ्या हिंदुस्थानांत

एवढे खरे वेदमूर्ती आहेत कीं पदपाठी, घनपाठी वैदिक यज्ञयागार्थ पाहिजे तर ते त्यांतच कृपाचार्य, शेषाद्री म्हणून आढळतात !

टीप.—यासंबंधें विचार करतांना ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं हिमालयप्रसवापूर्वी उत्तरगोलार्ध व दक्षिणगोलार्ध हे भूमध्यसमुद्राच्या हिमालया-खालील खाचेनें स्वतंत्र असून त्यांचा पूर्वपश्चिम संबंध अखंड होता; जसें हिंदुस्थान हें आस्ट्रेलिया, दक्षिण अमेरिका, दक्षिण आफ्रिका यांशीं जोडलेलें होतें. तें असें कीं त्यांचा परस्पर संबंध खुष्कीनें पूर्वपश्चिम अखंड चाले ( पुढील भाग पहा.) म्हणून तांबड्या व काळ्या लोकांची वस्ती दक्षिण हिंदुस्थानांत जास्त जोरानें झालेली आहे, व हे दोन गोलार्ध मोडून हिंदुस्थानचें प्रथम जंबुद्वीप व नंतर द्वीपकल्प झाल्यावर ते प्रथम त्यांत अडकले व नंतर ते गोऱ्यांच्या सहवासानें सुधारण्याच्या पंथास लागले.



## भाग सातवा.



### तारकापुंज व देशांची ओळख.

चार पांच तऱ्हेची जलद गती असणाऱ्या पृथ्वीवर आपण आहों. ( १ ) पृथ्वी दर तासास १००० मैलांच्या वार्षिक वेगानें स्वतःभोंवतीं फिरत आहे. यामुळेंच रात्र व दिवस असे बारा बारा तासांचे दोन भाग झाले आहेत. याशिवाय ६६००० मैलांच्या वेगानें पृथ्वी सूर्याभोंवतीं भ्रमण करीत आहे व यामुळेंच वर्षाचे ऋतू बनले आहेत. ( ३ ) सूर्य व सूर्याचें संबंध गोतावळ तासास ४ ते ५ हजार मैलांच्या वेगानें शौरी–हरिकुलेश–हर्क्युलीज–तारकापुंजाकडे धांव घेत आहे. या शौरी–हरिकुलेश–याच्या सृष्टीप्रमाणें अकाशांत हजारों सृष्टींचें विश्व झालें आहे व तें ऊर्णनाभी अक्षर ब्रम्हापासूनउत्पन्न झालें आहे व तें त्याच्या भोंवतीं फिरतें. यास प्रमाणः—यथोर्णनाभिः सृजते गृण्हते च । यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति । यथा सतः पुरुषात् केशलोमानि । तथा क्षरात् संभवतीह विश्वम् । मुण्डकोपनिषद् ॥

"The North American Indian of modern times, when first found in the vast woods and prairies, was a savage. He had no habitation except the meanest and the least substantial erection in which a family can live: call it a lodge or 'wigman. He was addicted to no mechanical arts, by which civilized life is distinguished. He spent his time in the hunting grounds, roaming through the wide expanse of hill and dale, in the track of wild animals. He was wholly uneducated. His pleasures consisted in wild dances of the camp fire. He was habituated to the utmost cruel customs of torture,–receiving the lash and gash with indomitable courage. The scalping knife, the tomahuawk, and the war whoop were his pride and his delight.

Yet he had characteristics irreconciliable with savagery. He was a fine and noble speciman of a man. Intelligence sparkled in his eye. He was chaste, sober, honest and religious. No warrior trained to the arts of civilzed warfare, could plan or execute a hostile attack upon a foe, with more adroitness than he. His skill in tracing the foot prints of man or beast, seemed more than human. He dressed in habiliments grandy and fantastic, it is true, but by no means destitute of picturesque offect. Thus affirmed, he stalked, throughout the long vistas of his native woods,–a man." × × No Indian ever betrayed me–struck me below –or stole from me a shilling's worth of my property, that I am awere of.''

"The presence of such qualities as these in the red man, marks him out, not as the member of an aboriginal race, but as a deteriorated decendant of men of noble blood. He is not a savage-he is a degenerate gentleman. This is exactly his position in mythology. He is a giant in strength and a Mongolian in courtesy. He is wound round by Serpents, but he strangles them, He is represented half goat. half man, to retain the remembrance of his ethnological portion as a junction of the two races red and white." *W. S. Blacket–P. 185–6*.

अर्थः—विस्तीर्ण अरण्यें व कुरणें यांत प्रथम आढळलेले अर्वाचीन उत्तर अमेरिकेंतील इंडियन हे जंगली होते. त्यांला राहण्यास घर नसे. पण नाहींनच म्हणावयास त्यांचें एक अत्यंत भिकार व अत्यंत दुबळें खोपट असे व त्यांत त्याचे कुटुंब राहत असे, मग त्या घरास तुम्ही कणगा म्हणा किंवा टोपला म्हणा. सुधारलेल्या लोकांत ज्या यांत्रिक कला, विशेषेंकरून, आढळतात, त्यांपैकीं एकीचाही त्यास नाद नसे. तो आपला काळ शिकारीचे जागीं घालवी. तो डोंगरकडे व दरीखोरीं यांच्या अफाट पसाऱ्यांत जंगली जनावरांचे मार्ग काढित फिरत असे. त्यास विद्येचा संस्कार बिलकुल नसे. त्यांची करमणुक म्हटली म्हणजे तळांतील आगटीभोवतालचे नाच ही असे. अत्यंत छळकारक व क्रूर वहिवाटी त्यांच्या आंगवळणी पडून गेल्या होत्या.—म्हणजे तो फटकेखटके अढळ धैर्यानें सोशीत असे. माथ्याची कातडी काढणारे सुरे, टुमहाक व लढाईंतील कडें यांचा वापर करण्यांत त्यांस मोठा अभिमान व आनंद वाटे.

पण त्याच्या ठायीं जंगलीपणाशीं न जुळणारे विशेष गुण असत. तो हिंमतीमर्दांचा एक सुंदर व उमदा मासला होता. त्याच्या डोळ्यांत बुद्धिमत्तेचें विलक्षण तेज चमकत असे. तो एकपत्नीव्रती, अमद्यपी, प्रामाणिक व धर्मनिष्ठ असे. तो शत्रूवरील घातकी हल्याचा बेत करून तो ज्या हातखंडेपणानें तडीस नेत असे त्यापेक्षां अधिक हातखंडेपणानें सुधारलेल्या युद्धकलेंत तरबेज झालेल्या कोणत्याही योद्ध्यास तें काम करितां येत नाहीं. मनुष्य किंवा जनावर याच्या पायाच्या खुणा पाहून माग लावण्याची त्याची करामत अतिमानुष असे. तो चित्रविचित्र व भपकेबाज पोषाख करीत असे हें खरें, पण त्याचा परिणाम चमत्कारिक होत

नसे असें समजूं नये. याप्रमाणें पेहेराव करून तो जवानमर्दाप्रमाणें आपल्या स्वदेशच्या अरण्याच्या लांबलचक देखाव्यांतून ऐटीनें फिरत असे. * * कोणत्याही इंडियनानें माझा विश्वासघात केला नाहीं, मला ठोसा लगावला नाहीं अथवा माझ्या समजुतीप्रमाणें मजजवळून माझ्या मालमत्तेपैकीं एका शिलिंगाचीही मत्ता चोरली नाहीं.

तांबड्या लोकांत असले गुण आहेत तर तो मूळचा जंगली लोकांचा वंशज ठरत नाहीं तर उलट, कुलीन मनुष्यांचा बिघडलेला वंशज आहे. तो जंगली मनुष्य नाहीं तर तो ऱ्हास पावलेला गृहस्थ आहे. पुराणामध्यें त्याची ही तंतोतत स्थिती आहे. तो शक्तीनें राक्षसासारखा व आदरातिथ्यासंबंधें मोंगोलिडनासारखा आहे. त्याला सर्पाचें वेष्टण आहे पण तो त्यांची मान धरून मारून टाकणारा आहे. त्याची उत्पत्ती पांढऱ्या व तांबड्या लोकांच्या जातींच्या मीश्रणानें झाली आहे. ह्या त्याच्या जातिशास्त्रोक्त स्थितीची स्मृती कायम रहावी म्हणून त्याचीं चित्रें अर्धा बोकड व अर्धा मनुष्य कल्पून काढिलेलीं आढळतात.

(Uranus, the first king of the Atlantic Isle) collects the people into confraternities and teaches them to build cities. To what extent he succeeded must be estimated by the enormus multitude of earth works that lie scattered over the United states.—The Same.

अर्थ—अललांटिक द्वीपाचा पहिला राजा जो वरुण ह्यानें लोकांच्या जमाती करून त्यांत शहरें बांधण्यास शिकविलें. युनायटेड स्टेटसभर पसरलेलीं जी अगणित मातीचीं कामें आहेत, त्यांवरून त्यास त्या कामीं किती यश आलें ह्याचा अंदाज केला पाहिजे.

मकईचें बियाणें हिंदुस्थानांत प्रथम मेक्सिकोंतून इकडे तांबडे लोकांबरोबर आलें म्हणून त्यास हिंदुस्थानांत मकई हें नांव चालतें.

मागील भागांत जुन्या महाद्वीपांतील क्रांतिप्रदेशाबाहेरील तारकापुंजावरून देशांची ओळख पाडून दाखविली. आतां या भागांत उत्तर अमेरिकेंतील तसल्याच +तारकापुंजावरून तिकडील देशांची ओळख करून घ्यावयाची आहे.

---

+ ह्या पुढील तारकापुंजांची माहिती वाचतांना एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं ह्यांतील माहिती कांहीं वैदिक व कांहीं बौद्ध अशी संमिश्र आहे; कारण येथें बौद्धधर्माच्या स्थापनेपासून वैदिक व बौद्ध धर्माच्या अमदांन्या समकालीन चालल्या होत्या, व बौद्ध धर्मास अशोक राजापासून राजाश्रय मिळाला तरी तो पुढें अनेक प्रकारें भ्रष्ट झाल्यामुळें श्रीशंकराचार्योंच्या वेळीं त्याचें उच्चाटण वैदिक धर्मानें केलें आहे ! म्हणून यांतील मजकूर कांहीं विसंगत, विसंवादी व भ्रमितचित्ताचा, प्रथम दर्शनीं, वाटण्याचा संभव आहे तरी तो तसा न मानितां तो प्रथम कडू वाटला तरी तो पुढें गोड वाटणारा आहे; यास्तव वाचकांनीं याचा अभ्यास, कंटाळा बिलकुल न करितां नेटानें झटून करावा अशी आमची इच्छा आहे.

*१ शौरी.—शौरिः शूरजनेश्वरः ॥ हरिकुलेश–शूरजनेश ( हर्क्युलीज )—हा तारकापुंज उत्तरगोलार्धांत आहे. ह्याची लांबी सुमारें ५० अंश आहे, व रुंदी ४५ अंश आहे. ह्यामध्यें पहिल्या व दुसऱ्या प्रतीचे तारे नाहींत, पण तिसऱ्या प्रतीचे तारे आठ आहेत व चौथ्या प्रतीचे तारे वीस आहेत व लहान लहान तारे पुष्कळच आहेत. ह्या तारकापुंजाचें इंग्रजी नांव हर्क्युलीज अथवा हरिकुलेश असें आहे. ह्या नांवावर आम्ही त्या तारकापुंजाखालील भौगोलिक देशाचें निराकरण केलें आहे. या तारकापुंजाखालीं अमेरिकेंतील कानड्यापैकीं उत्तरेकडील डुंग्यांचीं संस्थानें आहेत असें दिसतें. कारण तेथें हरिकुलेशाचें चरित्र असें प्रचलित आहे. तो दिसण्यांत राक्षसासारखा मोठा विशाळ होता. तो बहुतेक उघडानागडा असे. तो मोठा लढवय्या होता. त्याच्या ठिकाणीं जे गुण होते, ते पूर्वोक्त कोणत्याही खंडांतील लोकांस मोठे भूषणावह व उपयोगी होण्यासारिखे होते. त्या भागांत ज्या तांबड्या लोकांच्या वसाहती पुढें आलेल्या स्पानियर्ड लोकांस आढळल्या त्या लोकांचें वर्तन व पराक्रम व हरिकुलेश याचें वर्तन व पराक्रम ह्यांमध्यें मोठें साम्य आहे. त्यासंबंधीं आख्यायीका अशी आहे:—ह्याच्या बापाचें नांव द्यौस्पितर ( ज्युपिटर ) व आईचें नांव अलकमेना, व भावाचें नांव इफिक्लीस. याचा वंशवृक्ष असाः—मूळपुरुष वरुण, त्या वरुणाचा मुलगा शनी, शनीचा मुलगा द्यौस्पितर व द्यौस्पितराचा मुलगा हरिकुलेश. अशी वंशावळी पाश्चात्य लोकांत प्रसिद्ध आहे.

टीपः—यावरून आम्हांस एकदम एक अपूर्व कल्पना सुचली—कीं आपल्या सूर्याची माला सदरहू हरिकुलेश नांवाच्या तारकापुंजाकडे हळुहळू जात आहे. ( मार्स्डेन कृत सि. जाग्राफी पा० ३०३ पहा ). त्या तारकापुंजांत ब्रह्महृदय नांवाचा एक तारा आहे. तेव्हां हल्लींच्या दुर्बीणवाल्या ज्योतिषांनीं जो शोध नवीन म्हणून पाश्चात्य ज्योतिःशास्त्राच्या ग्रंथांत नमूद करून ठेविला आहे तो त्या आपल्या बिनदुर्बिणवाल्या म्हटलेल्या ज्योतिषांनीं ब्रह्महृदय या शब्दानें पूर्वींच सुचविला आहे. तो असा कीं आपली सूर्याची माला सदरहू ब्रम्हहृदयाकडे म्हणजे शौरीकडे हळूहळू गमन करीत आहे. कारण ब्रह्म ह्या शब्दाचा संस्कृत भाषेमध्यें रूढ अर्थ वस्तुमात्राचें केंद्र असा होतो व तें केंद्रही असे तसे नव्हे तर मनुष्याचे शरीराशीं जसा त्याचे हृदयाचा संबंध आहे तसाच आपल्या सूर्यमालेचा त्या ब्रम्हाशीं आहे म्हणून त्यास ब्रम्हहृदय अशी संज्ञा सार्थ आहे. असा हा ग्रहमा-

---

* कै. ज्योतिर्विद शंकर बा. दीक्षित यांनीं पुढील मोघम विधान संस्कृत व इंग्रजी परिभाषेचा मेळ न पाडितां केल्यामुळें आम्हांस घोटाळ्यांत पाडिलें आहे–" पाश्चात्य ज्योतिषांनीं आकाशांतील तारकापुंजांच्या १०९ राशी कल्पिल्या आहेत. त्यांपैकीं ४८ प्राचीन आहेत. पाश्चात्यांनीं कल्पिलेल्या नव्या राशींस संस्कृत संज्ञा कै. बाळशास्त्री जांभेकर यांनीं नवीन दिल्या आहेत. " यामुळें कांहीं चूक झाल्यास ती आम्हांस तज्ज्ञ वाचकांनीं कळवावी.

लेस आपल्या भोंवती फिरावयास लावणारा हरिकुलेश अथवा शौरी आहे; तर मेक्सिकोजवळील भूमिगत वेटिओकॉन अथवा वैकुण्ठ अथवा विष्णुलोक तत्सम-वर-असल्यास तो सदरहू हरिकुलेशपैकीं ब्रम्हहृदय तार्‍यांत नेऊन बसविणें यत्किंचितही अयुक्तिक ठरणार नाहीं. ( आमचें अवताराष्टक अथवा पंचजन विचार पहा ). हा हरिकुलेश आठ महिन्यांचा झाला न झाला तोंच त्याला पाहून जूनो-देवता इतकी मत्सरग्रस्त झाली कीं तिनें त्याच्या नाशार्थ दोन सर्प पाठविले. त्यांस पाहून तो भ्याला नाहीं. त्यानें त्यांस एकेकास हातांत धरून ढेकणासारखें चिरडून टाकलें. पण त्याचा भाऊ जो इफिक्लिस यानें आपल्या भयंकर आरोळ्यांनीं घरांतील प्रत्येक माणसास भयभीत करून सोडिलें. अशीं ह्या योद्धयांची चित्रमय चरित्रें कानडा व युनायटेड् स्टेटसच्या प्राचीन काळच्या मूळच्या रहिवाश्यांमध्यें नजरेस पडतात. तर मग त्यांचे इतिहास कोठें आहेत ? वडाचे झाड जसें त्याच्या राई एवढ्या बींमध्यें असतें तसे त्याचे इतिहास पाश्चात्य लोकांच्या मुलांच्या चित्रबोधांत चित्ररूपानें जाऊन बसले आहेत. मनुस्मृतिप्रमाणें पाहतां मनुष्याचें बीं जसें हिरण्यगर्भाच्या अंड्यांत आहे असें दिलें आहे, त्याप्रमाणें उत्तर अमेरिकेंतील तांबड्या लोकांच्या कथेप्रमाणें त्यांचें बीं हरिकुलेशाच्या अण्ड्यांत होतें असें म्हटलें आहे. हा दुनियेचा प्राण होय, मग, त्यास कोणी कांहींही म्हणो. ह्या अण्ड्याचें किंवा प्राणांचें वर्णन शब्दांच्या भाषेंत कांहींतरी करण्यापेक्षां तें चित्रांच्या भाषेंत केल्यास तें जास्त सुस्पष्ट होतें. उत्तर अमेरिकेच्या चित्रांत सदरहू अण्डें एका सर्पाच्या वेटाळ्यांत गुंडाळलेलें आहे, व निरनिराळ्या प्रकारचे प्राणी त्या अण्ड्यांत दिसतात, व त्यावर एका असंस्कृत व अशिक्षित रानदांडग्या अमेरिकन इंडियनाचा पाय आहे. म्हणजे अर्थात त्याचा त्यावर अंमल आहे. हिंदूंच्या प्राणाच्या जुन्या चित्रांतही वरच्याप्रमाणेंच एक अण्डें असून त्यास पहिल्या चित्राप्रमाणेंच सर्पाचें वेष्टण आहे. पण मागील चित्रांतील जनावरांच्या जागीं त्या अण्ड्याभोंवती राशिचक्राचें वेष्टण आहे. हें वेष्टण पुष्कळ सुधारणेचें दर्शक आहे. झाडून सर्व दुनियेभर जातकशास्त्रोक्त ग्रह निरनिराळ्या राशीस येऊन प्राणिमात्रावर अंमल कसा करितात ? हें तें दाखवितें. ह्या अण्ड्यावर पाय मागील चित्रांत एका जंगल्याचा होता तसा या चित्रांत त्यावर पाय एका ज्योतिर्विदाचा आहे, व त्याचा पोषाख सुसंस्कृत पुरुषासारखा आहे. पहिलें चित्र उत्तर अमेरिकेंतील मूळच्या माणसाची स्थिती दाखवितें व दुसरें चित्र माणसांत येणार्‍या व सुधारत जाणार्‍या मनुष्याची स्थिती दाखवितें.

अशा या हरिकुलेशाच्या ( किंवा हिरण्यगर्भाच्या ) पहिल्या बायकोचें नांव हीव व दुसर्‍या बायकोचें नांव एचिडना असें होतें. पहिली बायको एशियेंतील व दुसरी अमेरिकेंतील होती. एचिडना ही अर्धी मनुष्यासारखी व अर्धी सर्पासारखी होती. यावरून ती मिश्र जातीची दिसते. ह्या स्त्रीपासून त्यास तुफान, श्वान वगैरे संतती झाली. ( हिरोडोटस नामक इतिहासकर्त्याच्या मताप्रमाणें त्यास तिजपासून पुढील तीन मुलें झालीं; अग्याथिर्सस, गिलोनस, व सिथा )

यावरून तेथें हरिकुलेशाच्या पूर्वींची वस्ती म्हटली म्हणजे एचिडना नामक मिश्र जातीची होती–असें दिसतें. तर त्याची ती वसाहत आपल्या पूर्वोक्त वेदोक्त वरुण देवानें केली असून त्या वसाहत करणाऱ्या मिश्र जातीचे लोकांनीं पूर्वीं सांगितलेलीं डुंग्यांची शहरें बांधिलीं असावीं असें ठरतें. कारण तिकडे अशी दंतकथा आहे कीं वरुण हा इकडे तिकडे भटकणाऱ्या उडाणटप्पू लोकांच्या पाहिला राजा होता. त्यानें त्यांस गांवांत व शहरांत राहण्यास व शेती करण्यास शिकविलें. त्याच्या ताब्यांत पृथ्वीच्या उत्तरेचा व पश्चिमेचा भाग होता. तो मोठा ज्योतिषी होता. त्यानें सौर वर्ष व चांद्रमास हे सूर्य व चंद्र यांच्या गतीवरून ठरविले व दिवसाचे घटकांत भाग पाडले. त्यास भाकितें चांगलीं करितां येत असत. म्हणून तो निवर्तल्यावर त्याच्या गुणांवरून त्यास देवाप्रमाणें मानूं लागले. याप्रमाणेंच त्या नामांकित वंशांत उत्पन्न झालेल्या त्या हरिकुलेशाच्या नांवावरून तो निवर्तल्यावर आपल्या डोक्यावरील तारकापुंजास त्याचें शौर्य स्मरून शौरी अथवा हरिकुलेश ( हर्क्युलीज ) हें नांव उत्तर अमेरिकेमधील क्यानडा देशामधल्या डुंग्यांच्या शहरांत राहणाऱ्या तांबड्या लोकांनीं दिलेलें दिसतें.

भुजंगधारीः—हा तारकपुंज विषुववृत्तावर आहे. ह्याची लांबी सुमारें ३० अंश आहे, व रुंदी १० अंश आहे. ह्यांत दुसऱ्या प्रतीचे दोन, तिसऱ्या प्रतीचे पांच व चौथ्या प्रतीचे बारा तारे आहेत, व लहान लहान पुष्कळ तारे आहेत. ह्या तारकपुंजाचें इंग्रजी नांव ओफिउकस अथवा सर्पेन्टेरियस असें आढळतें. टालमीच्या नकाशाप्रमाणें ह्या भुजंगधारीचा पसारा साऱ्या युनायटेड स्टेटसभर असून तो रॉकी पर्वताला जाऊन भिडला आहे. त्याच्या हातांत जो सर्प आहे, तो सदरहू पर्वताच्या पश्चिमेस पश्चिम किनाऱ्यावर लोंबत आहे व उत्तर मेक्सिकोच्या ज्या भागांत शहरें, देवळें व मनोरे ( पिरमीड ) यांची पडझड आढळते, त्या भागांतही तो लोंबत आहे. ह्या भुजंगधारीस काव्यमय ज्योतिषांत हरिकुलेशाच्या कथानकांत सांगितल्याप्रमाणें इफिक्लीस असें दुसरें नांव आहे. ह्यास आणखीं एस्क्युलेपियस, क्याडमस व ओफियन अशीं नांवें आहेत. ह्याच्या अमलांत मेक्सिको देश होता.

ह्या मेक्सिकोचें दुसरें नांव अनाहुआक असें होतें. येथील प्राचीन लोक मोठे पाणीदार, प्रतिष्ठित, धीट व उद्योगी होते. पण ते धर्मभोळे व क्रूर होते. ह्यांच्या एका राजाच्या परिस्थितीचें वर्णन असें आहेः—मान्टीझूयामा नामक राजाच्या वाड्यांभोवती मनोहर बागा होत्या. त्या बागांत प्रत्येक प्रकारचें सुंदर फूल, प्रत्येक प्रकारची सुंदर वनस्पती, व प्रत्येक औषधी वनस्पती होती. त्यांच्या राज्यांत तशींच चांगलीं जंगलें होतीं. त्यांस कोट होते. त्यांत प्रत्येक प्रकारचें शिकारीचें जनावर आणून सोडिलेलें होतें. त्यांत तो राजा मृगये करितां वारंवार जात असे. एका राजवाड्यांत प्रत्येक प्रकारचें अपकारक व उपकारक हत्यार होतें. तीं हत्यारें घडण्यास व दुसरीं कामें करण्यास लोहार, सोनार, चित्रकार वगैरे पुष्कळ कसबी कारागिर ठेविलेले होते. एका सगळ्या प्रांतभर नर्तन शिक्षक होते. त्यांचें काम त्यांची

करमणूक करण्याचें असे. ह्यांच्या देवळाचें वर्णन असें आहे:—ते आपल्या देवळास टिकाली असें म्हणत असत. तीं देवळें जिकडे तिकडे पुष्कळ असत. तीं मुख्य शहरांत शेकडों असत. तीं विटांचीं किंवा दगडांची बांधून त्यांत मध्यभागीं माती भरीत. तीं कांहींशीं मिसर ( मिश्र ) देशांतील प्राचीन मनोऱ्यांसारखीं ( पिरामिड ) असत. त्यांतील पुष्कळांचा पाया १०० चौरस फूट असे व त्यांची उंची १०० फुटांपेक्षांही जास्त असे. त्यांस चार पांच मजले असत. त्यांतील मजल्याचा घेर खालच्या मजल्यापेक्षां लहान असे. त्यावर चढण्यास पायऱ्या असत. त्या बाहेरच्या बाजूस मनोऱ्याशीं कोन करून असत. हा रस्ता पहिल्या मजल्याच्या गच्चीवर किंवा सज्जावर जात असे. ती गच्ची किंवा तो सज्जा दुसऱ्या मजल्याच्या तळाशीं असे ती गच्ची किंवा तो सज्जा त्या इमारतीभोंवती जाऊन दुसऱ्या दादरास मिळे. तो दादर पूर्वींच्या जिन्याप्रमाणेंच मनोऱ्याशीं कोन करून अगदीं त्या जिन्यावरून तशाच दुसऱ्या गच्चीवर किंवा जिन्याशीं जात असे. म्हणून त्या देवळाच्या तळापासून शिखराशीं जाईपर्यंत प्रत्येकास त्या देवळास पुष्कळ प्रदक्षिणा घालाव्या लागत. त्या देवळाचें शिखर सपाट असे, व त्यावर खांबाप्रमाणें दोन मनोरे चाळीस पन्नास फूट उंच असत, व त्यांतील देव्हाऱ्यांत तेथील अग्निदेवतांच्या मूर्ती असत. ह्या मनोऱ्यांपुढें नृसिंह अवताराच्या पुढील हिरण्यकशिपूच्या बळी घेण्याच्या उमाऱ्याप्रमाणें एक बळी देण्याचा भयंकर दगड असे व पारशांच्या देवळांतील अग्यारींतल्या रात्रंदिवस जळणाऱ्या अग्नीसारखा अग्नी जळत ठेवण्यास दोन उंच मनोऱ्यांवर दोन अग्निकुंडें असत. त्या दगडावर बळी देण्याचें जें काम चाले, तें इतकें भयंकर होतें कीं त्याचें वर्णन करण्यास आमची लेखणी चालत नाहीं. म्हणून त्या वर्णनाचा हवाला आम्ही आमच्या अवतार या पुस्तकांतील नृसिंह अवतारातील दोन चित्रांवर देऊन टाकितों.

**नरबळी.**—एका बादशहाच्या वेळीं तेथील राजाची संपत्ती व सत्ता इतकी वाढली होती कीं त्यानें तेथील राष्ट्राच्या संरक्षक देवतेप्रीत्यर्थ त्या देशांतील पूर्वींच्या एकूण एक देवळापेक्षां भव्य देऊळ बांधण्याचा संकल्प करून पुष्कळ साहित्य जमविलें व त्याचें बांधकाम चालू केलें. इतक्यांत त्यास त्याच्या मृत्यूचा अडथळा आला. पण तें काम त्याच्या पाठीमागून येणाऱ्या राजानें झटून चार वर्षांत आटोपलें. पुढें त्या देवळाची वास्तू झाली तेव्हां त्या राजानें ७२,३४४ नरबळी दिले—असें म्हणतात. ह्या अझटेकच्या धर्मभोळेपणाचें एक तिटकारा करण्यासारखें लक्षण म्हटलें म्हणजे तेथील लोक नराच्या मांसाचें भक्षण करीत हें होतें असें दिसतें. पण वस्तुतः पाहतां हे मेक्सिकन लोक नरमांसभक्षक नव्हते. आपली पशूसारखी नरमांसभक्षणाची लालसा तृप्त करण्याकरितां ते नराचें मांस भक्षण करीत नसत. तर ते धर्मानुज्ञेप्रमाणें तें भक्षण करीत असत. ज्या बळीचें रक्त वरील अग्निकुंडांत ओतिलें असेल त्याच्याच मांसाचें भक्षण ते प्रसाद म्हणून करीत असत.

सुधारणाः—ज्या अमेरिकेच्या भागांत ह्या भुजंगधारीचा पसारा आहे, त्या· संबंधें अशा अनेक गोष्टी सांगण्यासारिख्या आहेत. ह्या प्रदेशांतील सुधारणा हरि· कुलेशाच्या सुधारणेपेक्षां सरस होती–असें दिसतें. ह्या भागांत जीं मातीचीं कामें आहेत, तीं जास्त भक्कम व जास्त नकशीदार आहेत. ह्यांत अलेघानी पर्वत व नदी आहे. ज्या अल्ली लोकांनीं तेथील मातीचीं कामें केलीं असें म्हणतात त्यांचें हें मूळ आहे. त्याप्रमाणेंच येथें चिरोकी व चिकशा नांवाचे बरेच गुणी लोक राहत असत. ह्या प्रदेशावर ओलियस व त्याची राणी युरिनोम् यांचें राज्य होतें. युरिनोम ही विष्णू व लक्ष्मी ह्यांची मुलगी. ह्या विष्णूस अमेरिकेमध्यें ओशियानस व लक्ष्मीला टेथिस असें म्हणतात. युरिनोम व टेथिस यांनीं मिळून व्हल्कन नामक त्वष्टयाला ऑलिंपियस येथून काढून दिलें. पुढें त्यांचीही पडतीची वेळ आली तेव्हां त्यांस शनीनें ऑलिंपस पर्वतावरील युद्धांत हरवून त्यास देशांतून हांकून दिलें, व त्यांचें साम्राज्य बळकाविलें.

हा ऑलिंपस पर्वत ग्रीस देशांतील नव्हे. हा अलेघानी पर्वताचा एक भाग आहे. ओफियन हा तेथील तांबडा मनुष्य नव्हे. हा टिटान जातीचा पुरुष होता. हे टिटान लोक अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर राहत असत. सर्प हे तेथील मौल अथवा मूळचे रहिवासी. ह्यांचे राज्यांत अलेघानी पर्वताचा कांहीं भाग, स्टिकस अथवा टेकसस या नांवाचें अखात, अचेरान अथवा मिसिसिपी नदी, व अलेमी नांवाचा डोंगर होता. ह्यांत दक्षिणेकडील डुंग्यांचीं शहरें होतीं.

शनैश्वर–शनी–सॅटर्नः–हा उत्तरेच्या डुंग्यांच्या शहरांचा बादशाह होता. ही वरुण व गौ ( टेरा ) यांचा मुलगा. ह्याचे वडील झाडून सर्व मुलांशीं मोठे कडकपणानें व कैदखोरपणानें वागत असत. हें त्याच्या बायकोस आवडत नसे. शनी हा मोठा कावेबाज होता. ती आई व हा मुलगा हीं एक झालीं. त्याच्या आईनें आपले पोटांतून नानाप्रकारच्या धातू काढून शनीस भला एक मोठा कोयता करून दिला. नंतर एके दिवशीं वरुण आपल्या मी नामक स्त्रियेच्या समागमें असतां शनी तो कोयता घेऊन तेथें गेला व त्या हत्याराच्या सहाय्यानें आणखीं संतती पैदा करून तीस क्रूरपणानें वागविणें व त्यास पाताळांत कोंडून ठेवणें ह्याचें मूळच अजिबात छेदून टाकिलें ! ( म्हणूनच आपले लोकां· मध्यें तिकडील आलेल्या लोकांबरोबर शनिमहात्म्य व सूर्यापोटीं शनैश्वर ही म्हण आहे !) देवांच्या नीतीचें ध्येय मनुष्याच्या नीतीपेक्षां उंची नसतें. शनीला त्याची आई जी पृथ्वी ( गो ) हिनें उत्तेजन दिल्यावरून त्यानें आपला बाप जो सूर्य ( वरुण यास जंगलीपणानें ठार केलें; एवढेंच नाहीं तर त्यानें आपली सदर माता जी गो हिशीं लग्न लाविलें—पी. एन. बोस–पा. २१४ ) पुढें त्याचा बंधमुक्त भाऊ टिटान याचे संमतीनें तो उत्तरेकडील डुंग्यांच्या शहरांचा राजा झाला. शनी आपले मुलगे जन्मले कीं खाऊन टाकीत असे. याचें कोणी असें कारण सांगतात. आपण जसे आपल्या बापाशीं बेमान झालों तसे ते न जाणो आपल्याशीं बेमानपणानें वागतील म्हणून तो त्यांस खाऊन टाकण्याची मोठी खबरदारी घेत

असे. पण त्याचें हें क्रूर कृत्य त्या गोस आवडत नसे. म्हणून ती त्याच्याशीं कपटानें वागूं लागली. तिला द्यौस्पितर ( ज्युपीटर ), नेपचून व यम ( प्लूटो ) हीं तीन मुलें झालीं असतां ह्या मुलांच्या ऐवजीं तिनें बाळंत्यांत दगड घालून त्यास खावयास दिले व त्यानें ते प्रत्येक वेळीं कडाकड खाल्ले ! ( एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिका व्हा. १७. पे. १५५ ). शेवटीं शनीवरही साडेसातीचा फेरा आला. पण ही गोष्ट त्याचा भाऊ टिटान ह्यास कर्णोपकरणी कळली तेव्हां त्यानें शनीवर स्वारी करून त्यास पदच्युत केलें व त्यानें शनी, गो ( ऱ्ही दुसरें पृथ्वीचें नांव ) व द्यौस्पितर यांस बंदिखान्यांत ठेविलें. ( हें पुराण समजण्यास बिकट आहे. आमच्या वेदोक्त वरुणानें आपले*एशियांतील मूळ राज्यांतले लोक अमेरिकेंतील डुंग्याच्या शहरांत खुष्कीनें नेऊन वसाहत केली होती. शनीनें त्या त्याच्या वसाहती फोडून त्यांतील लोकांची वसाहत त्या खालील पाताळांतल्या प्रदेशांत नवीन वसाहती केल्या. तो शनी व त्याच्या वसाहतींतील लोक तेथील मूळच्या लोकांच्या संगतीनें कीं काय नकळे रानटी नरमांसभक्षक झाले. म्हणून टिटाननें त्यांजवर स्वारी केली व त्यांस डुंग्याच्या शहरांतून युरोपखंडांत हाकून दिलें ). ह्या कामीं टिटानला मदत अचेरान अथवा मिसिसिपी येथील राक्षसांनीं अथवा जंगली लोकांनीं केली. उलटपक्षीं, द्यौस्पितरास सहाय्य स्टिक्स अथवा टेकसच्या उपसागराच्या किनाऱ्यावरील लोकांनीं केलें. पण हें युद्ध द्यौस्पितरास हितकर झालें नाहीं. त्यास तो देश सोडून क्रीट येथें जावें लागलें. त्याचे पाठीमागून भुजंगधारी व त्याचे भाऊ तिकडे गेले. ( सारांश, असे हे अमेरिकेंतील वरुणाचे वंशज कांहीं सुखानें व कांहीं दुःखानें वरील अमेरिकेंतल्या डुंग्याच्या शहरांतून निघून एशिया, युरोप व आफ्रिका खंडांत नवी वसाहत करण्यास जाऊन तेथें देव म्हणजे राजे होऊन बसलेले आहेत ! व ह्यांतील मुख्य नायक जो भुजंगधारी ऊर्फ सर्पेंटेरियस याच्या स्मरणार्थ सदरहू डुंग्यांच्या शहरांवरील तारकापुंजास भुजंगधारी हें नामाभिधान प्राप्त झालें आहे !).

लुब्धक—यौ ते श्वानौ यमरक्षितारौ चतुरक्षौ पथिरक्षी नृचक्षसौ–( ऋ. सं. १०–१४–११ ) रस्त्याचे रक्षण करणारे चार डोळ्यांचे यमदूत दोन

---

* प्राचीन काळीं हल्लींच्या बेहरिंगचे सामुद्रधुनीच्या ठिकाणीं बेहरिंगची संयोगभूमी एशिया व अमेरिका यांमध्यें होती; एवढेंच नाहीं तर एशिया व अमेरिका हीं खंडें एकमेकांस चिकटलेलीं होतीं व त्याप्रमाणें ८० फूट उंचीच्या दिनासौरसचे अवशेष व अंडीं ह्या दोन्ही खंडाच्या उत्तर भागीं सारखीं आढळतात व तीं एक कोटी वर्षांचीं जुनीं आहेत. यास प्रमाण:—

(1) In the early age of mammals America and Asia made one continent.

(2) 70 sculls of the deniosour, the ancester of the great horned densour have supplied incontrovertible credence that Mongolia and Rocky mountains once were connected by land.—Science nears thuth of first man: Modern Review October, 1924 P. 4 B.

जे हे कुत्रे आकाशांत आहेत ॥ द्वावुदपततां ॥ तौ दिव्यौ श्वानावभवताम् ॥ ( तै. ब्रा. १-१-२ ) दोन वर गेले ते दिव्य श्वान झाले. ( ह्यांस इंग्रजींत क्यानिस मेजर व क्यानिस मायनर असें म्हणतात. ] हा नक्षत्रपुंज क्रान्तिप्रदेशाच्या अगदीं जवळ आहे, व त्याच्यामध्यें एक अचल तारा आहे. त्यास आडाणी लोक कुत्र्याचा तारा असें म्हणतात. त्याप्रमाणें ह्याची आकृती कुत्र्याप्रमाणें असून तो आपले पुढले दोन पाय वर करून मागल्या दोन पायांवर बसलेला आहे, व तो भरत नांवाच्या तारकापुंजाकडे टवकारून पाहत आहे. व त्याच्या तोंडावर सदरील अचल तारा आहे. ह्या तारकापुंजास इंग्रजींत सर्वेरस असें नांव आहे. ह्या सर्वेरस शद्वाचा अर्थ कुत्रा असा आहे. पण हा अर्थ आपल्या लुब्धक ह्या शद्वाचा नाहीं. त्याचा अर्थ व्याघ असा आहे. पण धात्वर्थावरून लुब्धक याचा अर्थही श्वान होऊं शकतो, व त्याप्रमाणें माहिती पुढील दुसऱ्या तिकडील कथानकांत उपलब्ध झाली. पूर्वोक्त नेपचूनला अमेरिकेचा जो भाग मिळाला होता, तो सोडून तो जेव्हां परदेशीं जावयास निघाला तेव्हां त्याच्या वाटेंत एक अडचण येऊन उभी राहिली. ती ही कीं तो प्रथम दक्षिण अमेरिकेंत चालला तेव्हां त्याचे रस्त्यावर एक मोठा राक्षसी कुत्रा वाट अडवून बसलेला होता. त्याचें कथानक असें आहेः—लुब्धक अथवा सरवेरस म्हणून यमाचा ऊर्फ प्लूटोचा एक कुत्रा होता. पूर्वोक्त एचिडनाचा शरीरसंबंध तुफानाशीं होऊन तो उत्पन्न झाला होता—पुराणाप्रमाणें त्यास अनेक डोकीं होतीं—जिवंत माणसांनीं यम लोकीं जाऊं नये म्हणून पहारा करण्याकरितां त्यास त्याच्या प्रवेश मार्गावर द्वारपाळ करून ठेविलें होतें. जे शूरवीर त्या यमाच्या राज्यांत आपल्या आयुर्दायांत जातात, त्यांस त्या भुंकणाऱ्या कुत्र्याला पिंडाची दस्तुरी द्यावी लागते. आरफिसला तिकडे जाणें जरूर झालें तेव्हां त्यानें आपलें स्वरमण्डळ वाजवून त्यास झोंप आणिली व हरिकुलेशाला ( शौरी ) तिकडे जाणें जरूर झालें तेव्हां त्यानें त्यास त्या नरकद्वारावरून त्याची तंगडी धरून एकीकडे काढिलें. " हा तारकापुंज अगदीं बरोबर क्यारिबियन समुद्रावर येतो. हा समुद्र टेकसस उपसागराच्या प्रवेशमार्गाजवळ आहे. सर्वेरस हा शब्द, क्यारिबियन समुद्र व त्या पश्चिम समुद्रांत राहणारे क्यारीब लोक ह्यांत उच्चारसादृश्य आहे. ज्या बेटास हल्लीं सेन्ट डोमिंगो असें म्हणतात त्यास मूळचें नांव हैती असें होतें. सर्वेरस व क्यारीब यांमध्यें जसें उच्चारसादृश्य आहे, तसें हैती व अधोलोकवाचक इंग्रजी हेड शब्द यांत उच्चारसादृश्य आहे, तसेंच त्याचें उच्चारसादृश्य मालवणी हेटकरी शब्दांतील हेट शब्दांशीं आहे. शिवाय तेथील लोकांचे आचार विचार व रूढी यांवरून सदरहू अनुमानास चांगली पुष्टी मिळते. तेथें क्यारीब लोकांचें एक देऊळ आहे. तें एका प्रकारचें एक विवर आहे. त्यापुढें एक मिरवणूक निघते. तींत पुजारी व इतर जन वाद्यें वाजवून नाचत असतात. त्या गुहेवर पहारा दोन राक्षसी चित्रांचा असतो. त्यांतील जी मुख्य मूर्ती आहे, तिला पांच डोकीं असून तिच्या हातांत एक त्रिशूळ आहे. तीस ते लोक झेमीस म्हणून

संबोधितात. हा झेमिस व आपला यम या शब्दांमध्यें जें उच्चारसादृश्य आहे तें मननीय आहे. ह्या झेमीस शब्दावरून यवन ( ग्रीक ) व मेसरी ( इजिप्शियन ) सर्वेरस ह्या शब्दाची उत्पत्ती झाली आहे असें दिसतें. ह्या सर्वेरस शब्दासारखा एक शरण शब्द आहे. त्याचें कथानक असें आहे:-"शरण हा एक नरकांतील देव आहे. तो हरेबस व नॉक्स यांचा पुत्र. तो पिण्डांचा कर घेऊन मृतांच्या आत्म्यास स्टिक्स व अचेरान ह्या नद्यांवरून पार नेऊन यमलोकीं पोहोचविण्याचें काम करितो. ज्यांस अंत्य संस्कार होत नाहींत त्यांस शंभर वर्षें फिरून ह्या किनाऱ्यावर बसण्याची परवानगी मिळत नाहीं. एखाद्या जिवंत मनुष्यास स्टिजियन सरोवरावरून जावयाचें असेल तर त्यास परवान्यादाखल सिबिलकडून शरणास दाखण्यास सोनेरी खांदी आणावी लागते. शरण यास एकदां एक वर्षाची कैद भोगावी लागली; कारण त्यानें हरिकुलेशास ( शौरी ) असल्या परवान्याशिवाय त्या नावेंतून नेण्याचा जुलमाचा रामराम करावा लागला होता. शरण हा एक घट्टाकट्टा मोठा म्हातारा मनुष्य आहे. त्याचा चेहेरा विद्रूप आहे. त्याची दाढी लांब व पांढरी आहे. त्याचे डोळे मोठे वेध घेणारे आहेत." ह्या कथानकापैकीं अचेरान ह्या नदीस तिकडे मिसिसीपी नदी असें नांव आहे. ह्या नदीस आपले गरुडआदिक पुराणांत वैतरणा हें नांव आहे. पूर्वोक्त देवदानवांच्या युद्धांत ह्या अचेरान नदीनें तहानेलेल्या दानवांस पाणी पाजलें म्हणून तीस यमलोकांत घातलें--अशी एक कथा आहे. टेकससचा उपसागर व मिसिसिपी नदी ह्यांवर नावाड्याचें काम करणारा वरील शरण एवढाच नावाडी आहे असें नाहीं. तिकडील स्टिजियनपक्षीही तें काम करितात. ते आपल्या गरुडाप्रमाणें तिकडील नौका व नौकानयन यांचे निदर्शक आहेत. ते अटलांटिक ऊर्फ अमेरिकन द्वीपांत दर्यावर्द्यांचें काम करीत असत. ती आटलास नांवाचा प्रसिद्ध राजा व ज्योतिषी व इलेक्ट्रा राणी यांची संतती होती. तर त्याचें मूलस्थान क्विचेच्या साम्राज्याची राजधानी उतटलम ( अतालय ) हें असलें पाहिजे व तेथें गलबतें बांधून क्विचे व युक्याटन येथील आटलासचे वंशज आफ्रिका, युरोप व एशिया खंडांत त्यांतील जलमार्गांनें येत असावे असें दिसतें. पण अटलांटिक ऊर्फ अमेरिकेच्या पुराण्या इतिहासावरून असें दिसतें कीं सदरहू लोकांमध्यें कांहीं अनपेक्षित घोटाळा उडून ते झाडून सर्व तेथून पळून गेले. जांभळे पोषाख घालून वादन व सुगंध यांचा उपभोग घेत दहा राजे एका सभास्थानीं विराजमान झाले होते. त्यांतील द्यौस्पितर हा उभा राहून कांहीं संभाषण करण्याच्या बेतांत होता. इतक्यांत अकाळविकाळ तुफान नामक ज्वालामुखी त्यांवर तुटून पडली व यच्चयावत देव भ्याड कुत्र्यांप्रमाणें शेपूट घालून सूं पळत सुटले. त्या भयभीत झालेल्या देवांचें धैर्य सुटलें. त्यांनीं पळत जाऊन निरनिराळीं रूपें धरिलीं. त्यांतील कांहीं मेष, हंस, गौ, अज, मार्जार व मत्स्य बनले. शेवटीं देवेन्द्रानें थोडा दम धरून आपलें वज्र सोडिलें व त्या ज्वालामुखी तुफानास एटना पर्वताखालीं नेऊन दडपलें. ( काव्यमय ज्योतिषाप्रमाणें विचार करितां हे

रूपान्तर झालेले मेष पूर्वेकडील देशांत गेले असले पाहिजेत. हंस हे गॉलमध्यें व जर्मनीमध्यें गेले असले पाहिजेत. गौ स्पेनांत गेल्या असल्या पाहिजेत व अज ईजिप्तमध्यें गेले असले पाहिजेत. ही गोष्ट प्लेटो नामक तत्ववेत्ता यानें साध्या व सुध्या शद्बांनीं सांगितली आहे. त्यानें त्यांत कांहीं गूढ प्रकार ठेविला नाहीं. तो म्हणतो कीं सुमारें ९००० वर्षांपूर्वीं जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीपलीकडून [ हरिकुलेशाच्या खांबापलीकडून ] अटलांटिक द्वीपांतून कांहीं राजे मोठमोठ्या लढवय्या लोकांचीं सैन्यें घेऊन आले व त्यांनीं युरोप व आफ्रिका खंडांचे झाडून सर्व पश्चिम किनारे जिंकले व तेथें हरयेक पूर्वींच्या प्रकारांत क्रान्ती करून टाकिली. पूर्वीं एशियेंतून जे वृषभ अमेरिकेंत जाऊन नाग बनले होते ते नाग त्या द्वीपांतून परत जुन्या द्वीपांत असिरिया येथें येऊन पुन्हां वृषभ बनले. अशा प्रकारचा हा अमेरिकेंतून जुन्या द्वीपांतील देवांचा पळ मनुष्याच्या इतिहासांतील अती मोठी गोष्ट होऊन गेली आहे. मेक्सिको व पेरू ह्या देशांतील मोठमोठीं देवळें व मनोरे, युनायटेड स्टेटसच्या प्रदेशभर पसरलेले १५०० डुंगे व थुला-किचे व युक्याटन येथील उजाड झालेलीं शहरें तेथें पूर्वीं राहणाऱ्या लोकांचें सामर्थ्य व वैभव व अकलहुशारी यांची साक्ष देतात. तेथील लोकांनीं तें आपलें समुद्रापलीकडील मूलस्थान लढाईपेक्षां द्रव्यलोभ यांनीं प्रेरित होऊन सोडिलें व निद्रिस्त व वृथोद्योगी लोकांच्या देशांमध्यें गलबतांनीं येऊन उतरले व त्या देशांमध्यें अखंड शोध करीत राहून अपूर्व व अद्भुत शास्त्रें व कला निर्माण केल्या. अशा या लोकांच्या पराक्रमाचें स्मारक म्हणून त्यावरील तारकापुंजास लुब्धक अथवा सर्वेरस (सिरियस) हें नांव मिळालें आहे. तर लुब्धक ह्या तारका-पुंजाखालीं क्यारिब नांवाच्या नरमांसभक्षक लोकांचा देश आहे हें उघड झालें. ह्या लुब्धकाचें लक्षण–मृगमीन सज्जनानां तृणजल संतोषविहित वृत्तीनां लुब्धकधीवर पिशुना निष्कारण वैरिणो जगति ॥ भ. २०६१

टीपः—१ हें कथानक आमच्या गरुडपुराणांतील कथानकाशीं तोलून पाहील त्यास त्यांतील संविधानक त्या पुराणास अंशतः प्रमाणभूत आहे असें आढळेल.

२ याप्रमाणेंच आमचे एशियेंतील लोक अमेरिकेंत पूर्वेस वसाहतीस वरुणरा-जाबरोबर जाऊन शनीच्या राज्यांत नरमांसभक्षक होण्याइतके रानटी झाले व तुफान ज्वालामुखीच्या [ लॅास्ट हिस्टरीज आफ अमेरिकाप्रमाणें ] तडाक्यांत सांपडून प्लेटोपूर्वीं सुमारें ९००० वर्षांच्या सुमारास एशिया, युरोप व आफ्रिका ह्या खंडांत घुसले, त्याअर्थीं ही त्यांची धावपळ दहाबारा हजार वर्षांच्या पूर्वीं झालेल्या हिमालयसंभवजन्य जलप्रलयाच्या वेळची दिसते; कारण आमच्या नष्ट झालेल्या इतिहासाप्रमाणें हा काळ आमच्या उत्तर व दक्षिण आर्यावर्तातील लोकांच्या वाडविच्छातीसुद्धां धावपळीचा आहे, व त्यांचीही धावपळ पश्चिमेकडून पूर्वेकडे आपले हिंदुस्थान द्वीपकल्पांत झाली आहे. [ शतपथ ब्राह्मण पहा ], ती ह्याचवेळीं म्हणजे भूगर्भातील हिमालयाच्या युगाचे दोन चरण होऊन गेले असतां झाली आहे [ डा. क्रोलची २५००० वर्षांची उपपत्ती पहा. ]

याशिवाय, १ गवय, २ सारथी, ३ शाङ्र्गपाणी, ४ श्रृंगाश्व, ५ लघुलुब्धक ६ भरत, व ७ तिमिंगल अशा आणखीं सात तारकापुंजांचें वर्णन आमचेजवळ तयार आहे, पण त्या तारकापुंजासंबंधीं भूमिगत व इतिहासगत माहिती आमचे जवळ तयार नाहीं. म्हणून त्यासंबंधें सर्वस्वी मौन धरून राहणें भाग आहे, पण या तारकापुंजांसंबंधें ज्योतिषदृष्ट्या कांहीं विशेष प्रकार सांगावयाचा तर तो एवढाच सांगतां येण्यासारखा आहे कीं ह्या तारकापुंजापैकीं लघुलुब्धक व शार्ङ्गपाणी ह्या दोनच तारकापुंजांत पहिल्या प्रतीचे तारे आहेत.

यांतील जातींचे स्पष्टीकरण अमेरिकेच्या नष्टेतिहासाच्या कर्त्यानें असें दिलें आहे:—

(१) अल्ली अथवा हेला—ह्या नांवाच्या अलेघानी पर्वतांत व त्या नांवाच्या नदीच्या कांहीं राहणाऱ्या लोकांनीं तेथें ढुंगे बांधण्याचें काम केलें आहे.

(२) * शावणी.—हें नांव शनीच्या वंशजांचें आहे. ह्यासच कोणी सतनस असें म्हणतात. ह्याचें वर्गीकरण पुराणांत पान बरोबर करितात.

(३) हरिकुलेश.—हें नांव इरोकिश जातीच्या लोकांत आढळतें.

(४) *विष्णू अथवा ओशियानस.—हें नांव मिसिसिपी नदीच्या पश्चिमेकडील वैष्णव अथवा ओशियानाईड व पावनी अथवा फावणी लोकांच्या जातींत आढळतें.

(५) फुरीज.—हें नांव मिसूरी जातीच्या लोकांत आहे.

(६) *शेष व टिटान.—हीं नांवें अमेरिकेच्या अगदीं पश्चिमेकडील राहणाऱ्या शेषोन व टिटोन ह्या जातीच्या लोकांत आढळतात.

(७) आपोलो.—हें नांव अपेलियन जातींत नजरेस पडतें.

आटलास.—हें नांव उत्तर व दक्षिण अमेरिकेंतील संयोगीभूमींतल्या अटलाननाईड, अटलन किंवा ओतलामा जातींत दृष्टीस पडतें. ( आमचे जवळ ह्यांच्या वसाहतींचे नकाशे आहेत. पण ते खर्चाच्या भीतीनें देतां येत नाहींत.



* हीं नांवें आपले परिचयांतील आहेत.

# भाग आठवा.

## तारकापुंज व देशांची ओळख.

"All the lands capable of cultivation were distributed into three shares: one share was consecrated to the sun, and its product was applied to the support of religious rites: the second belonged to the Incas, and was devoted to the support of government, and the third, being the largest share, was reserved for the maintenance of the people. No person had a right of exclusive property in the portions allotted to him: he possessed it only for a year, at the expiration of which, a new distribution was made, according to the rank, number, and exigences of each family. All these lands were cultivated by the joint industry of the community, and the people were summoned by the proper officer to the fields and performed their common task, while songs and musical instruments cheered them to their labour. In consequence of this mode of distributiou, selfish principles were restrained and extinguished and each individual felt this connection with those around him and the state thus constituted might he considered as one great family, in which the union of the members was so complete and the exchange of good offices so preceptible as to create stronger attachment than subsisted under any form of society established in America"—Ree's Cyclopœdia.

The obscurity which hangs over the historical antiquities of North America, is intensified when South America becomes the subject of research. That vast insular continent, watered by some of the greatest rivers on the face of the earth–teeming with tropical vegetation–and in possession of mines of the choicest metals that are coveted by man, is a blank in history. In that circumstance it differs nothing from North America: but that portion of the hemisphere has had its annals told by at least, three creditable historians–obscure and fragmentary, it may be, but not beyond the penitration of study. Unfortunately, no similar documents can be produced for the elucidation of South American History. It is left wholly to the inferential teaching of allegorical literature. Yet that literature is full of suggestiveness and creates a suspicion, that South America, has, in ages past, been known to the Ancients.—*W. S. Blacket–P. 250.*

मागिल भागांत उत्तरेकडील तारकापुंजांवरून त्या खालील देशांची ओळख करून देण्यांत आली. आतां ह्या भागांत दक्षिणेकडील तारकामण्डळांतल्या तारकापुंजावरून त्या खालील देशाची ओळख करून देण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

## दक्षिणेकडील तारकामंडळ.

उत्तर अमेरिकेचा प्राचीन इतिहास अज्ञानाच्या अंधकारांत गडप होऊन बसलेला आहे. पण दक्षिण अमेरिकेच्या इतिहासाचा आपण शोध करूं लागतों तेव्हां त्यावरील अंधकार अधिक घनदाट आहे असें प्रतितीस येतें. दक्षिण अमेरिका हें विस्तीर्ण द्वीप आहे. त्या द्वीपांतून पृथ्वीच्या पृष्ठभागावरील कांहीं अत्यंत मोठ्या नद्या वाहतात, त्यांत उष्ण कटिबंधांतील वनस्पतींची अगदीं रेलचेल आहे, व ज्या सुवर्णादी उत्तम धातूंचा मनुष्यास दुर्धर लोभ असतो त्या धातूंच्या खाणी त्यांत मुबलक आहेत. पण इतिहासदृष्टया विचार करितां ह्या द्वीपासंबंधी माहितीचीं पुस्तकें अगदीं कोरीं करकरीत आहेत. ह्या परिस्थिती-संबंधें उत्तर अमेरिकेची स्थिती व दक्षिण अमेरिकेची स्थिती यांमध्यें बिलकुल फरक नाहीं. पण त्या गोलार्धाचा इतिहास तीन भरंवसालायक इतिहासकारांनीं सांगितला आहे, मग तो इतिहास कितीही अप्रसिद्ध गोष्टींचा व तुटक असो. पण तो इतिहास अभ्यासापलीकडील स्थितींत नाहीं—म्हणजे त्याचा अभ्यास करील त्यास तो करितां येण्यासारिखा नाहीं असें नाहीं. पण दक्षिण अमेरिके-संबंधें एक दुर्दैवाचा प्रकार असा आहे कीं तिच्या इतिहासाच्या स्पष्टीकरणार्थ तसले लेख मिळणें असंभाव्य आहे. तिचा इतिहास जमवावयाचा तर त्यास भिस्त तिच्यासंबंधीं ज्या दृष्टान्तरूप कथा प्रचलित आहेत त्यांतील अनुमानांवर सर्वस्वी ठेवण्यावांचून गत्यंतर नाहीं. पण त्यासंबंधीं सारस्वत अर्थपूर्ण आहे व त्यावरून असा संशय उत्पन्न होतो कीं प्राचीनकाळीं दक्षिण अमेरिका आपल्या हिंदुस्थानांतील प्राचीन लोकांस माहित होती; कारण हा प्रदेश दक्षिण गोलार्धां-तील आस्ट्रेलिया, हिंदुस्थान व आफ्रिका यांस लागून होता.

परोक्ष कथांवरून प्रत्यक्ष ऐतिहासिक अनुमानें काढावयाचीं तर त्यास पूर्वोक्त कापटिक व टालमिक तारकापुंजाच्या चित्रपटांचाच उपयोग करावा लागणार आहे. पण त्यांच्या केलेल्या उपयोगावरून त्यासंबंधें ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं त्यांत जीं चित्रें काढलेलीं आहेत, त्यांच्या स्थानाचा निश्चय करणें फार कठीण आहे. कारण हें स्मरलें पाहिजे कीं अर्वाचीन राशिचक्र हें वर्तुलाकार काढिलेलें असतें. पण त्याचे जुने चित्रपट ताटाच्या आकाराचे असत. अशा प्रकारें आकृतींत फरक पडल्यामुळें झाडून सर्व बाबतींत अनिश्चितता उत्पन्न होते. ती इतकी कीं तारकापुंजांच्या चिन्हांची स्थळें त्या-संबंधी जुन्यापुराण्या कथांवरून ठरवावीं लागतात. असें केल्यास असें होतें कीं त्या तारकापुंजांच्या चिन्हांची बहुतेक स्थळें आमोझोन नदीच्या वरील जलाभोंवतीं जुडलेलीं दिसतात व त्या प्रदेशांसंबंधी आम्हांस आतां जी माहिती आहे, तिशीं त्याचा पुरा मेळ पडतो.

हें पाहून अशी मोठी मौज वाटते कीं पृथ्वीच्या ज्या भागाचा * इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं व पृथ्वीचा जो भाग तिच्या इतर भागापासून यच्चयावत युगांत अगदीं तुटक आहे म्हणून दृढ समज पाश्चात्यांचा आहे, त्या भागांत इमारती बांधण्याचीं हत्यारें व अग्निकुंडें आढळतात. दक्षिण अमेरिकेमध्यें इमारती बांधण्याचीं हत्यारें सांपडतील अशी अपेक्षा क्वचित कोणी करील. पण प्रवासी लोक असें सांगतात कीं आंडीस पर्वताच्या उतरणी व त्यांच्या जवळचे भाग यांत अशीं मोठीं बांधकामें आहेत कीं त्यांवर ताण जुन्या जगांतील एकाही कामास करितां येणार नाहीं, व त्याशीं बरोबरी मात्र अगदींच थोड्या कामांस करितां येण्यासारखी आहे. त्यांत हीही मोठी कौतुक करण्यासारखी गोष्ट आहे कीं दक्षिणअमेरिकेंतल्या लोकांमध्यें धर्मविचारही आढळतात. यावरून असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं येथील इतिहास लिहून ठेवण्याची कधीं कोणी तसदी घेतल्याचें दिसत नाहीं तरी ह्या द्वीपांत इतिहास असून त्याचा परिणाम दुनियेच्या दुसऱ्या भागांवर झाला असला पाहिजे.

हा विचार उत्पन्न होण्याचें कारण असें कीं सदरहू तारकापुंजांच्या खुणांमध्यें एक चिन्ह गलबताचें असून त्यास सुकाणू लाविलेलें आढळतें. सुकाणू हें नौकानयनाच्या शास्त्रांत तेथील लोकांचें पाऊल पुष्कळ पुढें पडलें होतें असें दाखवितें. पेरू देशांतील एका कामांत तिकडील गलबताचें एक चित्र काढिलेलें आहे. त्यास एक सुकाणूं लाविलेलें आहे त्याची तुलना जुन्या जगांतील तारवांच्या सुकाणाशीं व त्याच्या स्थळाशीं केली असतां जुन्या जगांतील नाविक ज्या ज्या देशांत सफरी करीत असत त्यांच्या नांवनिशीच्या यादींत दक्षिण अमेरिका मोडत असली पाहिजे—असा उघड संशय उत्पन्न होतो.

**नरतुरंग, वृक, स्वस्तिक व दक्षिण मक्षिका.**—नरतुरंग, वृक व स्वस्तिक हे तारकापुंज परस्पर इतके सन्निध आहेत कीं ते जरी भिन्न मानण्याचा प्रघात आहे तरी ते वस्तुतः एका पुंजासारिखे दिसतात. हा सगळा पुंज वृश्चिक राशीच्या अगदीं जवळ असून तूळ रास व धन रास यांपासून सारख्या अंतरावर आहे—चित्रपटामध्यें नरतुरंग हा मनुष्य व घोडा मिळून झालेला आहे—अशी कल्पना आहे. हा जणूं उजवे हातांत भाला घेऊन वृकास मारण्यास धांवत आहे, व तो तो भाला त्याच्या नरडींत खोचीत आहे- असा दाखविलेला आहे. वृश्चिक रास अगदीं ह्याचा समोर आहे. वृकाचें मस्तक वृश्चिकाचे नांगीस लागलें आहे. ह्याच्या मागल्या पायावर स्वस्तिक आहे व त्याच्या पायाखालीं दक्षिण मक्षिका आहे. नरतुरंग

---

* मॉडर्न रिव्ह्यू फेब्रुवारी १९२४ पहा. त्यांतील लॉगलॉस्ट रेसिस या सदरांत मेक्सिकोंतील सहा सुधारणा, दक्षिण अमेरिकेंतील पाटागोनियांकडील राक्षस, ईजिप्तमधील देवळें व समुद्रांतील प्राचीन धक्के यांच्या अवशेषाचीं चित्रें प्रत्यक्ष पाहण्यास दिलीं आहेत. त्यांवरून काय दिसतें ? मनुष्याची अनादी सुधारणा क्रान्तिप्रदेशांत दुसऱ्या प्रदेशाच्या आधीं होऊन गेली आहे असें जें आम्हीं अनुमानिलें आहे तें अगदीं खरें ठरतें.

ह्यास सेन्टारस असें नांव आहे. जीं पौराणिक चित्रें उपलब्ध आहेत, त्यांत ह्या नरतुरंगाचें चित्र मोठें भव्य आहे. दुनियेंतील मूर्तिपूजक व मठवासी लोकांमध्यें हीं फार आढळतात. पौराणिक काळाची आठवण रहावी म्हणून जीं चित्रें काढून ठेविलेलीं आहेत, त्यांतील रथास असल्या नरतुरंगाचें चित्र असतें ( बालाजीच्या रथाचीं वाहनें पहा). चिनी व इतर मातीच्या भांड्यांवरही नरतुरंगाचीं चित्रें मुबलक नजरेस पडतात. पण हीं जीं चित्रें आढळतात, तीं मात्र फार प्राचीन काळचीं आहेत असें समजूं नये. कारण त्यांत ज्या कळाकुसरी व जें कसब आढळतें तें फारच मोठें असल्यामुळें त्यांची कल्पना बरीच अर्वाचीन असावी असें वाटतें. ज्या देशांत नर व तुरंग एकत्र करून त्याचें एक चित्र काढण्याची योजना झाली, तेथील ह्या चित्रांची कल्पना तयार झालेली नाहीं. भांडीं व चित्रें यांतील नरतुरंग यांच्या घाटाची घडण असिरिया व बाबिलोनिया या देशांत झाली असावी असें वाटतें. कारण तेथील मुधारांच्या भिंतीवर रथ व सारथी यांचीं चित्रें आपल्या हिंदुस्थाना-प्रमाणेंच आढळतात. ज्या देशांत श्रीमान व चैनी राजेरजवाडे होते, त्या देशांत असलीं चित्रें निघणें शक्य आहे. आपल्या या मायभूमींतील गरुडाचें चित्र अशा प्रकारेंच प्रचारांत आलें आहे—असें समजावें. मिसर देशांतील स्पिंकसचें चित्रही एका प्रकारच्या नरतुरंगाचें होय. पण नरतुरंगाची पहिली कल्पना पेरू व चिली ह्या दक्षिण अमेरिकेंतील देशांमध्यें प्रादुर्भूत झाली असली पाहिजे. कारण नर-तुरंगाचीं चित्रें तिकडे चितारकामांत काढितात. हें कबूल केलें पाहिजे कीं हें चित्र राक्षसासारखें आहे. पण त्याचें मूळ समजण्यास त्याचें पृथक्करण केलें पाहिजे. तें चित्र अर्धा मनुष्य व अर्धा घोडा यांचें बनविलेलें आहे. पौराणिक काळांतील सर्व मिश्र चित्रें वर्णांच्या संकराचीं निदर्शक आहेत. नरतुरंग हें तशाच प्रकारचें चित्र आहे. तें दोन जातींचें मिश्रण दाखवितें.

पाश्चात्य लोक असें म्हणतात कीं दक्षिण अमेरिकेंत मूळचे घोडे किंवा बैल नव्हते. स्पॅनियर्डांनीं अमेरिका शोधून काढिली तेव्हां तींत घोडे नव्हते असें म्हण-णारे तेच लोक आहेत. पण त्यांचें म्हणणें सर्वांस मान्य नाहीं. एक प्रवासी उघड असें म्हणतो कीं तिकडे पांपस येथें जें मी अश्वविद्येतील कुशलतेचें काम प्रत्यक्ष पाहिलें त्यावरून त्याचें असें मत झालें कीं अश्वविद्या तेथें अनादी कालापासून चालत आली असली पाहिजे. पण दक्षिण अमेरिकेंत घोडे होते किंवा नव्हते ? हें सिद्ध करीत बसण्याची आह्मांस जरूरी नाहीं. ह्या विषयाचा थोडा अभ्यास केला कीं हें उघड होतें कीं, नरतुरंग हा सदरहू तारकापुंजाचा प्राचीन आकार नव्हे. काल्पटिक तारकापुंजाच्या चित्रपटांतल्या ह्या चित्रांत घोड्याच्या ऐवजीं एक पक्षी आहे, व हें सहज समजेल कीं हा पक्षी त्या नरतुरंगाचें मुळचें चित्र होय. पण त्या पक्षास नरतुरंगाचें स्वरूप नकला करणाऱ्यांच्या खोडकरपणानें व चुकांनीं प्राप्त झालें आहे. चित्रासंबंधींच्या गोष्टी व इतिहास असतात. नरतुरंगाच्या अगदीं जुन्या आकारांत एक मनुष्य असून त्याच्या हातांत उभ्या सिंहाच्या तंगड्या आहेत. त्याच्या पुढील आकारांत त्याचे खालील अवयव सिंहाचे आहेत, ह्मणजे त्यांत नृसिंहाची आकृती

आहे. नरतुरंग ही त्यांतील अर्वाचीन आकृती होय. कारण नरतुरंगाचें मूळचें नांव सेन्टार हें आहे. ह्या शब्दावरून कोणत्याही भाषेंत कांहीं अर्थबोध होत नाहीं, व त्याचें पृथक्करणही करितां येत नाहीं. मॉंट फाडकान नामक एका पुरुषानें खऱ्या सेन्टारचें चित्र दिलें आहे. त्यांत एक नरपक्षी आहे, व त्याचे विशाळ पंख एक नकासगीर एका हत्यारानें खोदीत आहे. यावरून त्या आकृतीचें स्वरूप सुस्पष्ट दिसतें. हें चित्र पेरू देशासच लागू पडतें—ह्याचें समर्थन करणारी एक चमत्कारिक आख्यायिका तिकडे नेहमींच्या वहिवाटींतील वर्णनांत आढळते. ती ही कीं पेरू देशाच्या राजाला इन्का असें म्हणतात. त्याच्या राजवाड्यांत रामाचा उत्सव होतो. त्यांत एक मोठी मिरवणूक निघते. त्यांतील पुष्कळ लोक एका मोठ्या पक्षाचे पंख लावितात. ह्या रूढीसंबंधें तपास करितां असें कळलें कीं जे लोक हे पंख लावितात, ते आपण सदरहू पक्षापासून उत्पन्न झालों असें म्हणणारे आहेत. हे पंख कोणत्या पक्षाचे लाविले होते म्हणून पुसाल तर सांगणें कीं ते पंख कुंतुर पक्षांचे होते. ह्या पक्षांस फ्रेन्च भाषेंत कुंतूरच म्हणतात पण त्यास इंग्रजी भाषेंत कांडोर म्हणतात. हे पक्षी आंडिस पर्वतावर आहेत. त्यांच्या पंखांचा विस्तार १५ फूट असतो. हा कुन्तुर पक्षी व सेन्टार हे एकच आहेत. ( कुंतुर ह्या आडनांवाचे लोक आपल्याकडील कानडी लोकांत आहेत )

सेन्टारच्या प्रदेशाचीं जीं चिन्हें तारकापुंजांच्या चित्रपटांत काढिलीं आहेत, तीं निरानिराळ्या चित्रपटांत निरनिराळीं आहेत. कापटिक चित्रपटांत जेथें पक्षी काढिला आहे, तेथें टालमिक चित्रपटांत नरतुरंग काढिला आहे. पण त्याची जातपात काय ? हें शोधून काढणें तारकापुंजांच्या चित्रपटाच्या सहाय्याशिवाय अशक्य आहे. त्या चित्रपटांपैकीं कन्येच्या चित्राला पंख आहेत. कन्या ही चीन, सयाम, व कांबोज या हिंदू धर्माचा प्रभाव दिसणाऱ्या देशावरील रास आहे, त्याअर्थीं असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं कीं त्या देशांतील ज्या विभूतीनें तेथील लोकसमाजावर उपकार केले होते व ज्यांच्या रस्त्यांचीं स्मारकें त्यावर अयुथिया ( अयोध्या ) वगैरे शहरें हल्लींच्या नकाशावरही आढळतात, त्यांचें स्मरण पेरू देशांतील त्या सूर्याच्या देवळांतील मिरवणुकींतील सपक्ष नरांस असावें. ते सपक्ष नर अयोध्येकडून त्या अयुथियावरून अद्वैत वेदान्त शिकविण्यास पंखासारख्या अवजारांच्या गलबतांत बसून आलेल्या धर्मोपदेशकाचे वंशज असावे. ह्या सपक्ष प्रेषितांनीं पूर्वोक्त मेक्सिको व ह्या पेरू देशांत येऊन ज्या काय गोष्टी तेथील लोकसमाजांत चालू केल्या, त्यांची साक्ष त्या दोन्हीही देशांतील धर्मांचीं मतें सुस्पष्ट देतात. सूर्योपासना हा इन्काच्या दरबारचा धर्म होता. सोन्याच्या केलेल्या सूर्यापुढें एक अग्निकुंड होतें. इनकाच्या भोंवतीं त्याच्या कुटुंबाचा ( भायातांचा ) परिवार जमला असतां तो एका भांड्यांत द्राक्षासव भरून तें त्या सूर्यास समर्पण करीत असे. त्या सूर्याचें देऊळ मोठें होतें त्या देवळाभोंवतीं जी मिरवणूक निघे तींत सदरहू भायात नर पंख लावूनअसत.

प्राचीन काळीं एशियेमध्यें धर्माचे जे जे प्रकार आर्यावर्तभर प्रचलित होते, त्यांपैकीं दोन प्रकार इनकाच्या दरबारी चालू होते.–( १ ) अग्निपूजन व( २ ) आश्रम. ह्यांच्या अग्निपूजनांतील अग्नी आपलें हिंदुस्थान व इराण यांतील गृह्याग्नीप्रमाणें निरंतर राखून ठेवावा लागत असे. म्हणून हें कौतुक करण्यासारखें आहे कीं टालमीच्या तारकापुंजांच्या चित्रपटांत नरतुरंगाच्या तारकापुंजाखालीं एक तारकापुंज अग्निकुंडाचा व दुसरा स्वस्तिकाचा आहे. स्वस्तिक हें आपल्या वैदिकांचें पवित्र चिन्ह आहे व तें पुढें खिस्त्यांनीं आपल्या धर्मांत क्रूसाच्या रूपानें घेतलें आहे. ह्या देशांतील आश्रम आपल्या हिंदुस्थानांतील गुरुकुलांतील आश्रमांच्या धर्तीवर असत. त्या आश्रमांत चार मोठीं टोलेजंग जेवणें होत असत.

प्राचीन पेरूच्या राज्यघटनेंतील मोठी विलक्षण व लोकोत्तर गोष्ट म्हटली म्हणजे ही आहे कीं पूर्वोक्त धर्माचा प्रभाव आपल्या ह्या मायभूमीप्रमाणेंच तेथील स्मृतिविशारद ( कायदेबाज ) व बुद्धिमान लोकांवर असे. झाडून सर्व मुलकी राजतंत्र धर्ममूलक होतें. इनका हा तेथील स्मृतिकार असे; एवढेंच नाहीं तर तो तेथील धर्माधिकारीही असे. म्हणून असा परिणाम होत असे कीं कोणी कोणताही गुन्हा केला तरी त्यास देहान्त प्रायश्चिताशिवाय दुसरी शिक्षा देण्याची सोय नव्हती. कारण ते गुन्हे म्हणजे मनुष्यकृत पिनडकोडासारख्या कायद्याचें उल्लंघन म्हणून समजलें जात नसत तर ते म्हणजे परमेश्वराचा धडधडीत अपमान म्हणून मानला जात असे.

वरील प्रेषित इनका नरपुंगवानीं पेरू देशांतील कोंडून पडलेल्या लोकांस '॥ लटपट पंजरमे पडे। नहि सूमसे ग्यान। पढो प्रभाते श्रीभगवान् ॥' असा 'अद्वैतमुक्तिसिद्धान्त' शिकविला. त्याप्रमाणें इकडील यमधर्मांनीं त्यांस नीतिनिष्ठाही शिकविली. म्हणून ज्या ज्या ग्रंथकारांनीं इनकाच्या ( ईक्ष्वाकूच्या ) राज्य घटनेंतील सामाजिक व राजकीय संस्थांचा इतिहास लिहिला आहे, त्यांनीं त्यांनीं त्याच्या सामाजिक व राजकीय संस्था स्तुत्य व अनुकरणीय आहेत म्हणून म्हटलें आहे. त्यांस नमुनेदार कायदे असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. ह्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ शिरोलेखगत अवतरणाचें भाषांतर पुढें दिलें आहे तें पहिल्यास आमच्या प्रतिपादनाची सत्यता बरोबर प्रतितीस येईल:—

" लागवड करितां येण्यासारिख्या राज्यांतील झाडून सर्व जमिनीचे तीन विभाग पाडिलेले होते. त्यांपैकीं एक विभाग सूर्यास अर्पण केलेला होता, व त्याचे उत्पन्नाचा विनियोग धर्माचे संस्कार चालविण्याचे कामीं होत असे. दुसऱ्या भागावर स्वामित्व इनकाचें ( इक्ष्वाकूचें ) असे, व त्याचा खर्च राजतंत्र चालविण्यांत होत असे व तिसरा भाग सर्वांत मोठा असे, तो लोकांच्या निर्वाहाकरितां राखून ठेविलेला असे. प्रत्येक मनुष्यास जो भाग वाहण्यास मिळत असे, त्यावर त्या मनुष्याचा निरवधी स्वामित्वाचा हक्क नसे. त्या भागावर त्याचा ताबा फक्त एक वर्षपर्यंत असे. ती मुदत सरल्यावर तेथील समा-

जाच्या प्रत्येक कुलाचा दर्जा, त्यांतील मनुष्यांची संख्या व त्याची प्रत्येकास गरज यांच्या मानानें त्या जमिनीची फेर फाळणी करीत असत. ह्या सर्व जमिनीची लागवड समाजाच्या समाईक उद्योगानें करण्यांत येत असे. एक योग्य अधिकारी नेमलेला असे. तो लोकांस शेतावर बोलावणें करीत असे. ते आल्यावर त्यांच्या हुरूप उत्पन्न करण्याकरितां आपल्या कोकणांतील ' *भलेरीदादाप्रमाणें ' गायन व वादन सुरू होत असे व तें चाललें असतां त्यांच्या हातून काम घेण्यांत येत असे. जमिनीच्या वांटणीची ही पद्धत अमलांत असल्यामुळें समाजांतील आपल-पोटेपणाच्या तत्वाचें नियमन व उच्छेद होत असे, व प्रत्येक व्यक्तीस आपला संबंध आपल्या भोवतालच्या लोकांशीं आहे असें वाटे व अशा प्रकारें घटना पाव-लेलें संस्थान किंवा राज्य एका कुटुंबाप्रमाणें असे, व त्यांतील घटकावयवाची संघ-टना (जूट) इतकी पुरी व परस्परांवरील प्रेमाचा विनिमय इतका सुस्पष्ट व ढळढळीत असे कीं अमेरिकेंत स्थापिलेल्या समाजाच्या इतर कोणत्याही प्रकारांतल्या-पेक्षां त्यांत जास्त स्नेहांकितपणा उत्पन्न होत असे. " हें वाचून आपल्यास आपल्या अनादी स्नेहांकित ग्रामसंस्थांची व मनू व याज्ञवल्क्य यांच्या स्मृतींची आठवण होऊन त्यांतील स्नेहवर्धक सहकारिता अलीकडल्या कायद्यांतील स्नेहविघातक व्यक्तिस्वतंत्रता व व्यक्तिस्पर्धा यांपेक्षां स्तुत्य व अनुकरणीय वाटणार नाहीं हें उघ-डच आहे. पण त्यांचें हें कौतुक दुणावण्यासारिखें असें तत्व सांगितल्यास तें खोटें वाटण्याचा संभव आहे कीं ज्याप्रमाणें आपल्या ह्या मायभूमींतील अग्न्युपासना व आश्रम यांच्या संस्था पेरूत गेल्याचा पुरावा वर सादर केला आहे व आणखीं पुरावा आपले कविकुलगुरू वाल्मीकी ऋषीच्या रामायणांतून पुढें स्वतंत्र भागांत देणार आहों, त्याप्रमाणें वरील स्तुत्य व्यवस्था नीतीच्या पायावर लावून देणारा तिकडील यमधर्म ( पारशांचा यिम ) मिनास होऊन गेलेला आढळतो. तो आमचा एखादा मनूही असण्याचा संभव आहे; कारण ज्या लोकांनीं इकडील धर्म नेऊन तिकडील लोकांस शिकविला, त्यांस तिकडे येथील एखाद्या मनूचे कायदेही नेऊन शिकविणें अशक्य होतें असें दिसत नाहीं. पण तसें नसेल तर पेरूतील वस्तुस्थिती जर आम्हां हिंदूंच्या त्या आदिपुरुषांच्या कायद्याप्रमाणें आढळते तर मिनास म्हणून जो कोणी यमधर्म तेथें होऊन गेला, तो आपल्या मनूच्या हिंदुस्थानांतून बाहेर गेलेल्या लोकांबरोबर गेलेल्या सांप्रदायांस अनुसरून वागणारा असलाच पाहिजे. पण त्या पश्चिमेकडील लोकांस असा अभिमान चढलेला आहे कीं जेवढें कांहीं म्हणून शहाणपणाचें असतें तेवढें सर्व कांहीं फक्त एका युरोपांतल्या टीचभर ओसाड जागेंत पिकतें. बहुरत्ना वसुंधरा अशी बोल-ण्यांत रेलचेल असली तरी हृदयांत युरोपाबाहेरील सर्व दुनिया दुधखुळी आहे

*कोकणांत ढोलकें वाजवून त्यावर ॥ भलेरी दादा । भलेरी । दादा । दादा दादा भलेरी ॥ असें गाणें म्हणत भाताची लावणी पावसाळ्यांत करितात तेव्हां, तें कंटाळवाणें व चिखलांत पाय सडवडणारें काम कसें भराभर होतें ? हें तिकडील कोणास सांगावयास नकोच.

असा त्यांचा ठाम ग्रह झालेला आहे. म्हणून पेरू देश स्पानियर्ड लोकांनीं शोधून काढिल्यावर त्यांनीं त्यांच्या वस्तुस्थितीच्या वर्णनाचीं भेंडाळीं युरोपांतील विद्वान लोकांच्या मेजावर विचाराकरितां नेऊन टाकिलीं तेव्हां ते अगदीं बुचकळ्यांत पडले ! युरोपांतील सामाजिक व राजकीय संस्थांपेक्षां सरस अशा संस्था दक्षिण अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर पाहून त्यांना कसेंसेंच वाटलें ! तिकडील तत्त्वज्ञानी व राजकारणी पुरुष यांनीं विचारमग्न होऊन आपले तोंडून आश्चर्यानें बोटेंच घातलीं ! युरोपाबाहेर असली सुधारणा होती व आहे असें मानणें त्यांच्या जिवावर आलें ! पण काळ अनंत असतां व अवकाशही अनंत असतां ह्या पृथ्वीतलावर जे देश व समाज व्यापारधंद्यांत व विद्याकलांत अग्रगण्य होऊन गाजत आहेत, तेच पूर्वींपासून तसेच असले पाहिजेत असें मानून राहणें वस्तुस्थितीस धरून आहे काय ? देश व काल यांच्या महिम्याप्रमाणें प्रत्येक जड पदार्थाचा गुरुत्वमध्य बदलतो, त्याप्रमाणें देश व काल याच्या महिम्याप्रमाणें चिदाचाही गुरुत्वमध्य बदलतो. तर या नियमाप्रमाणें सुधारणेंचे महाकेंद्रही स्थलांतर पावत असलें पाहिजे असें मानणें अप्रयोजक व अविश्वनीय होय असें मानणें कां अयुक्तिक समजावें बरें ? हल्लीं ब्रिटिश लोक साता समुद्रापलीकडे जाऊन अपूर्व व अद्भुत वसाहती स्थापित आहेत त्याप्रमाणें आम्हीं आर्य लोकांनीं साता समुद्रापलीकडे आगबोटी व आगगाड्या यांचें सहाय्य नसतांही जाऊन खुद्द दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यावर जाऊन अपूर्व व अद्भुत वसाहती पेरू वगैरे ठिकाणीं स्थापिल्या असें मानणें सर्वस्वी झुट कां समजावयाचें ? त्यांनीं सध्या जलपर्यटण वर्ज्य केलें म्हणून कीं काय ? मग ब्रिटिश लोक तरी त्या आमच्या सद्दीच्या वेळीं कोठें अमेरिकेंत किंवा हिंदुस्थानांत जात येत होते ? तरवार धरणें हें ज्याचें ब्रीद तो रजपूत, मराठा किंवा मुसलमान हल्लीं हत्यारें घरीं ठेवावयाची परवानगी नसल्यामुळें अगदीं मूर्तिमंत महावीर जैनदेव किंवा तीर्थंकार होऊन ॥ अहिंसा परमोधर्मः ॥ या महामंत्राचा रात्रंदिवस जप करीत बसला तरी त्यांच्या पूर्वजांनीं तरवार धरून खाटकाप्रमाणें माणसांची एकसहा खटाखट कत्तल करण्याचें काम कधींच केलें नव्हतें असें मानणें बरोबर आहे काय ?

टालमिक तारकापुंजांच्या चित्रपटांत नरतुरंगाच्या चित्रपटाखालीं पेरू व चिली हे अर्वाचीन प्रांत येतात-एवढी मोठी त्या तारकापुंजाची आकृती आहे; कारण असें म्हणतात कीं इनकाचें ( इक्ष्वाकूचें ) राज्य एवढें मोठें म्हणजे १५०० मैल क्षेत्रफळाचें होतें.

अभियुक्त कोशामध्यें एतद्विषयक युरोपांतील वगैरे अनेक कथा आहेत. त्यांतील पुढील कथा अगदीं आटोपसर आहेः—

एनियसच्या गलबतांच्या काफिल्यांत एक गलबत होतें. त्यावर सेन्टारचें म्हणजे नरतुरंगाचें चित्र होतें. हें गलबत दोन्ही चित्रपटांत अमेरिकेच्या किनाऱ्यावर वरवा करून उभें आहे. तें आर्गो गलबत, त्यावरील सेन्टारचें चित्र व

त्यास लाविलेलीं अनेक वल्हीं, या सगळ्या सरंजामानिशीं ओशियानाइडस म्हणजे वैष्णव यांस नरतुरंगानें पाठीवर बसवून सरळ नेणें ह्याचा जम बरोबर बसतो; मग ही गोष्ट एनिडमधून घेतली असल्यामुळें तें गलबत भूमध्यसमुद्रांतीलच होतें असें म्हणण्याचा आग्रह युरोपियन लोक कितीही धरोत ( नौका शब्द पुढें पहा ).



## भाग नववा.

### तारकापुंज व देशांची ओळख.



Pluto, a king of the infernal regions, according to Pagans, archdevil, governor, general of inflamable countries, superintendent of forced labour in the dark Empire.—Demonology.

Pluto was the son of Saturn and Opus. He received as his lot the kingdom of hell and whatever lies nnder the earth, as such he became the god of the infernal regions, of death and funerals &c.—Mythic history.

Romulus divided the lands he conquered, one part was preserved for religions uses,–to erect temples and to consecrate alters: the other was appropriated to the expenses of the state, and the third part was equally distributed among his subjects, who were divided into three classes or tribes.–Romalus was ranked by the Romans among twelve great Gods.

The serpent and the wolf are in the Zodiacal map. The first delineates Mexico,–say, the western shores of America, and the wolf pourtrays the upper waters of the Amazon–call it for want of a better name Peru—*W. S. Blacket,–Lost Histories of America—P. 95.*

जांबाचें वियाणें पेरू देशांतून हिंदुस्थानांत आलें म्हणून त्या फळास इकडे पेरू हें नांव आहे, व मिरचांस इंग्रजी चिली हा शब्द त्याच्या चिली मूळभूमीवरून पडला आहे असें दिसतें.

मागील भागांत नरतुरंग. वृक, स्वास्तिक व दक्षिण मक्षिका या तारकापुंजांचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत यम, शिखावल, बक, कारंडव, नौका, इविस व काक या तारकापुंजांचें विवरण कर्तव्य आहे.

**यम, शिखावल, बक व कारंडवः**—हे तारकापुंज इतके जवळजवळ आहेत कीं एका तारकापुंजास जेवढी जागा लागते तेवढ्या जागेंत हे झाडून सर्व तारकापुंज मावले आहेत. हे तारकापुंज धनराशीच्या पायाखालीं आहेत, व ते नरतुरंग व मीन ह्या दोन राशींच्या मध्यें–आहेत.एखादा भिल्ल हातीं बाण धरून उभा राहतो तशी

ह्या यमाची आकृती आहे. शिखावल हा त्याचे पाय झाकून उभा आहे, व बक याची आकृती मोठी असून तो यमाच्या मागें उभा आहे, व त्याची चोच अगदीं बाणासारखी आहे. कारंडव हा बकाच्या खालीं व मोराच्या समोर उभा आहे. ह्याची चोच मोराच्या छातीजवळ जवळ आली असून ती यमाच्या पायाजवळ आली आहे. कापटिक तारकापुंजाच्या चित्रपटामध्यें दक्षिण अमेरिकेच्या मध्यभागीं एक मनुष्याकृती आहे. या आकृतीस टायरेनिकोरम हें नांव असून त्या आकृतीवर दानवस्थळ असा शेरा आहे. यावरून असें अनुमान करणें जरूर आहे कीं प्राचीन मेसरीलोक ह्या भूमीस दैत्यांची जागा असें समजत असत. युरोपियन लोकांच्या पुराणांतील इतिहासांत दानवाधिपतीस प्लूटो असें म्हणतात. " प्लूटो हा शनी व ओपस ह्यांचा मुलगा. त्याच्या वांट्यास नरकाचें राज्य आलें. पृथ्वीखालीं जें काय असेल त्याचा तो मालक झाला. याप्रमाणें हा पाताळाचा प्रदेश—मृत्यू व अंत्यविधी यांचा मालक होऊन बसला. मारसेलसच्या एका उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं " ह्याशिवाय आणखीं तीन प्रदेश होते. त्यापैकीं एक प्लूटोचा ( यमाचा ), एक अमनचा व त्या दोन प्रदेशांमधील एक पोसिडनचा होता. यावरून प्लूटो म्हणजे यम ह्याचें राज्य दक्षिण अमेरिकेंत आलें. अटलांटिक द्वीपाचे तीन भाग झाले. त्यांतील उत्तर अमेरिका आमनची, मध्य अमेरिका पोसिडनची तर दक्षिण अमेरिका, अर्थात, प्लूटोच्या वांट्यास आली. हा योगायोग मोठा चमत्कारिक जमून आला आहे. म्हणजे मेसरी लोकांनीं ज्या प्रदेशाला दानवाचें स्थान म्हटलें आहे त्या प्रदेशांत नेमका प्लूटो येतो. पण हा योगायोग पुढील गोष्टीचा विचार केला असतां जास्तच जमतो. प्लूटो हा ला प्लाटाचा अधिपती होता म्हणून त्यास ला प्लाटा असें म्हणतात. पण कोणी असें ह्मणेल कीं ला प्लाटा हें नांव ला प्लाटा ह्या नदीच्या नांवावरून पडलें आहे. तर त्यास आमची हरकत बिलकुल नाहीं. कारण देशाच्या नांवाची परिभाषा आपल्या गंगथडीप्रमाणें नद्यांच्या नांवांत फार दिवस टिकून राहते.

स्पानियर्ड लोकांस पेरू देश सांपडल्यावर त्यांस तेथील मूर्ती राक्षसांसारख्या विशाळ आढळल्या. त्यांचें वर्णन वाचून त्या कशा होत्या हें समजतें. एक मूर्ती हिलाब्री येथें होती. ती दगडी असून १८ फूट उंच होती. तिच्या बाजूस दोन राक्षस होते. त्या दोघांच्या डोक्यापासून पायांपर्यंत सर्पांचें वळसे सर्वत्र होते. त्यांच्या पायांजवळ कोणी रांग्ये व सरपटणारे प्राणी होते. धर्मभयानें प्रेरित होऊन स्पानिश पाद्री लोकांनीं त्यांचा एकदम विध्वंस केला—कारण त्यांचा समज असा होता कीं त्या दानवांच्या मूर्ती आहेत, व दानव म्हणजे कांहीं तरी भयंकर व दुष्ट दैत्य होत. पण ह्या शद्वाचा मूळ अर्थ असा नाहीं. तमोयुगामध्यें त्याच्या ज्या विद्रूप मूर्ती व चित्रें तयार करण्यांत आलीं व जीं पुराणांत कथानकें लिहिण्यांत आलीं, त्यांच्या योगानें त्या शद्वाचा अर्थ साफ बदलून गेला. कापटिक तारकापुंजाच्या चित्रपटांत त्या शद्वाचा जो अर्थ आहे तो समजून घ्यावयाचा असेल तर विष्णूच्या कूर्म अवताराचीं आपल्या हिंदूंचीं व जपान्यांची चित्रें पुढें

अवतार-विचारांत दिलीं आहेत त्यांचे अध्ययन इतिहासांतील सापेक्ष दृष्टीनें केलें पाहिजे. त्यावरून वाचकांची बालंबाल खात्री होऊन चुकेल कीं त्यांतील देव व दानव हे दोघेही नौकानयनाच्या कामांत सारखेच गुंतलेले होते. तेव्हां कापटिक तारकापुंजांतील दानव हे दक्षिण अमेरिकेंतील मूळचे जंगली लोक असावेत असें ठरत नाहीं, तर ते त्या देशांतील लोकांस सुधारणारे होते, व त्यांच्या जवळ गलबतें होतीं व ते एशिया व अमेरिका ह्या दोन खंडांतील लोकांच्या मिश्रणापासून झाले होते.

पण त्यांचा अधिपती जो प्लूटो (यम) याच्याविषयीं एक कथानक असें आहे. " पेगन ( मूर्तिपूजक ) लोकांच्या मताप्रमाणें फ्लूटो हा पाताळांतील प्रदेशाचा राजा होता. तो बडा सैतान होता. तो ज्वालामुखी प्रदेशामधला सेनानायक व अज्ञानावृत साम्राज्यांतील वेठीस धरलेल्या लोकांचा मुकादम होता. " ही कथा दक्षिण अमेरिकेच्या प्रदेशास बरोबर लागते. कारण झाडून सर्व दुनियेंत पाहूं गेलें असतां दक्षिण अमेरिकेसारखा दुसरा ज्वालामुखींनीं युक्त असा दुसरा प्रदेश नाहीं, व पेरू देशांत आढळणारीं सार्वजनिक कामें अशीं भव्य आहेत कीं तीं तेथील लोकांस वेठीस धरल्यावांचून तडीस जावयासारखीं नाहींत.

मस्टर नांवाचा एक ग्रंथकार म्हणतो कीं पाटागोनियन लोक देवाला सेटाघाथ म्हणतात. नास्टिक ओफाईटच्या नकाशांत त्यांस टायेवाथ असें म्हटलें आहे, व तौलानिक दृष्टीनें यच्चयावत् धर्मांचा अभ्यास केला असतां टायेवाथ हा शब्द तिबेट व तार्तरी या देशांत उत्पन्न झालेला दिसतो, व प्रवासी लोक सांगतात कीं पाटागोनियन लोकांची आंगकाठी फारच मोठी असते व भूतानच्या पूर्व बाजूचे लोक उंचीत आठ फुटांपेक्षां कमी नसतात. तर हे पाटागोनियन लोक ग्रांड लामाचा बौद्ध धर्म घेऊन अटलांटिक अथवा अमेरिका द्वीपांत एशियांतून आलेल्या लोकांचे वंशज आहेत, व आंडिस पर्वताजवळ जीं मोठीं देवळें व रस्ते आहेत, ते यानींच आपल्या कल्पकतेनें बांधिले असें ठरतें.

पेरू देशांत मोठी वस्ती म्हटली म्हणजे क्विचुआ जातीच्या लोकांची आहे. टिटिकाका सरोवरासभोंवार ऐमर लोकांचें राष्ट्र आहे. त्यांत मुख्य राहणारी जात म्हटली म्हणजे लुपकस ही होय. लाटीन भाषेंत वृकवाचक लुपास हा शब्द आहे. ह्या ल्यूपस शब्दाचें व वरील मुख्य जातीचें नांव जें लुयकस ह्यांत उच्चार सादृश्य आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. युरोपांतील इताली देशांतल्या रोमन बादशाहीचे संस्थापक जे रॉम्युलस व रीमस हे ह्या पेरू देशाकडील दिसतात. कारण त्यांचें संगोपन एका लांडगीनें केलें अशी दन्तकथा आहे. हे कोणास असंभाव्य वाटो, पण ह्या प्रतिपादनाच्या समर्थनपर आम्हांस एक दोन चांगलीं सबळ प्रमाणें सांपडलीं आहेत. नायबूहर नामक एक विद्वान टीकाकार म्हणतो कीं रीमस व रॉम्युलस यांचा आजोबा पेरू देशाचा एनियस ऊर्फ इनका ( ईक्ष्वाकू ) होता. कारण रॉम्युलसच्या इतालींतील सामाजिक व राजकीय संस्था पेरूच्या इनकाच्या

पूर्वोक्त सामाजिक व राजकीय संस्थांप्रमाणें अगदीं हुबेहूब होत्या. त्या अशा.— " रॉम्युलसनें जिंकलेल्या प्रदेशाचे असे विभाग पाडिले—एक भाग धर्माच्या उपयोगाकरितां—देवळें बांधून त्यांतील अग्निकुंडाचे संस्कार चालविण्याकरितां काढून ठेवण्यांत आला होता—दुसरा भाग सरकारच्या खर्चाकरितां काढून ठेवण्यांत आला होता—व तिसरा भाग त्याच्या प्रजाजनांमध्यें सारखा विभागण्यांत आला होता, व त्या लोकांच्या तीन जाती पाडण्यांत आल्या होत्या. रॉम्युलसची गणना त्यांच्या बारा मुख्य देवांत करण्यांत आली होती. रॉम्युलसचे प्रजाजन जे रोमन लोक ह्यांचे कपडेलत्ते, आचारविचार, वगैरे पूर्वोक्त तुफान नामक अमेरिकन लोकांप्रमाणें अगदीं हुबेहूब होते. याप्रमाणें हीही एक चमत्कारिक गोष्ट आहे कीं मि. हाकसच्या पुराण्या दंतकथांत रीमससारख्या नांवाच्या पेरूंतील रिमाक देवाच्या मूर्तीचें वर्णन आहे. " ही मूर्ती मनुष्यासारिखी असून तिचें देवालय भव्य आहे व त्यांतील पूजारी शकून पाहणारे आहेत. " ह्या देवाचें पूजन दक्षिण अमेरिकेंतल्या मॅकडालनेपर्यंत चालत होतें. तर ह्या देवाचें पूजनअर्चन मोठ्या प्रमाणावर चालत असलें पाहिजे. फार तर काय पण ह्या रोमन लोकांची गरुडध्वजाही उत्पत्तींत अमेरिकन आहे असा आम्हांस मोठा संशय आहे. ( यावरून ह्या रोमन राज्याचें मूळ पेरू देशांत होतें असें उघड दिसतें व पेरू देशाचें मूळ आपले हिंदुस्थानांत आढळतें, व त्याप्रमाणें आपल्या पुराणांत वृकोदर यमाची कथा अशी आहे-" हा विवस्वान नामक आदित्यापासून संज्ञा स्त्रीच्या ठायीं वैवस्वत मनूच्या मागून युग्मरूपानें जन्मला. ह्या जुळ्यापैकीं जो पुत्र होता, तो यम, व जी पुत्री होती, ती यमी. ह्यांची ऋग्वेदांत प्रसिद्धी आहे. इतकें हें युग्म अती प्राचीन आहे. हा विवस्वानाचा पुत्र होता म्हणून यासही कोठें कोठें वैवस्वत असें म्हटलेलें आढळतें. हा पातकी जनांस शासन करणारा आहे. म्हणून यास दण्डधर, काल, कृतान्त इ. नांवें आहेत, तसाच तो पुण्यवान जनांस अत्यंत सौम्य असल्यामुळें त्यास धर्मराज असें नांव आहे. आपल्या मायभूमींतील द्विज ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) म्हणून जेवढे आहेत, तेवढे झाडून सर्व प्रत्येक वर्षी श्रावणांतील श्रावणीच्यावेळीं ह्या यमाचा जप असा करितात.—यमो निहन्ता पितृधर्मराजो । वैवस्वतो दण्डधरश्च कालः ॥ भूताऽधिपो दत्तकृतानुसारी । कृतान्तमेतद्दशभिर्जपन्ति ॥

याप्रमाणेंच अमरकोशांत यास अशीं नांवें आहेतः—" धर्मराजः पितृपतिः समवर्ती परेतराट् । कृतान्तो यमुनाभ्राता शमनो यमराड् यमः । कालो दण्डधरः श्राद्ध देवो वैवस्वतोऽन्तकाः ॥ हीं नांवें देण्याचें कारण त्या नांवात जो गर्भितार्थ आहे त्यावरून त्याच्या गुणधर्मांचें यथार्थ ज्ञान व्हावें एवढेंच आहे; जसें, तो वृकोदर आहे म्हणजे लांडग्यासारखें पोट आहे ज्याचें असा आहे, तो चालू मन्वंतरांतील दक्षिण दिक्पाल आहे. तो पाताळांत यमपुरींत राहतो. ह्याच्या दिवाणाचें नांव कश्मल. तो या यमधर्माकडे पुण्यवान लोकांस विमानांत घालून मानसन्मानानें आणितो व पापी लोकांस नरकांतील सोळा स्थळांपैकीं त्याच्या

योग्यतेच्या नरकांत फरफटत ओढीत नेतो. त्याचा चित्रगुप्त म्हणून एक फडणीस आहे. यमाच्या दक्षिण दिक्पालकत्वावरून दक्षिण दिशेस याम्या हें नांव संस्कृत भाषेंत प्रचलित आहे. " हें आपलें हिंदुलोकांचें कथानक युरोपांतील असल्याच कथानकापेक्षां जास्त स्थाननियामक आहे. यम हा पाताळांत दक्षिणेस राहतो. ग्रीकच्या मिथ्रिडेटसप्रमाणें दक्षिण अमेरिकेंत यमिया या नांवाचा एक प्रांत आहे. त्यानें त्याचें वर्णन करीत असतां त्याची मर्यादा मैनास, ओमगुआ, व ऐसुरीस यांशीं नेऊन भिडविली आहे. यावरून यम या विभूतीचें प्लूटो यांशीं अत्यंत साम्य आहे; एवढेंच नाहीं तर तिचें त्यांशीं जातिदृष्ट्या व स्थलदृष्ट्या अत्यंत सादृश्य आहे. शिवाय हेंही लक्षांत ठेवण्यासारिखें आहे कीं तो यम नौकानयनविशारद आहे. त्याचीं स्वगतिक यानें किंवा वहनें, विमानें किंवा गलबतें आहेत. तेव्हां त्याचें दुसऱ्या देशांशीं जल, स्थल व आकाश यांच्या मार्गांनीं दळणवळण आहे. याप्रमाणें जपानी लोकांचाही एक असाच नरकाधिपती आहे. त्याचें नांव यम ह्या नांवासारखेंच जेम्मा म्हणून आहे. त्याचे दोन मदतनीस आहेत. त्यांपैकीं एक जो आहे तो लोकांच्या गुन्ह्यांची नोंद ठेवितो, व दुसरा जो आहे तो ती नोंद वाचून दाखवितो. त्याचें एक देवालय आहे, तें चीन देशांत मकाव नामक प्रसिद्ध शहरीं आहे. त्याच्या यात्रेस फार लोक जातात. याप्रमाणेंच जांबवाचक पेरू शब्दाचा इतिहास, या बाबतींत मोठा मननीय आहे. त्याचें स्मरण राहावें म्हणून त्यास सर्वत्र आपल्या देशांत पेरू असें म्हणतात. तसेंच मिरच्यावाचक इंग्रजींतील चिली शद्ब व चिंचवाचक इंग्रजींतील टॅमेरिंड शद्ब स्पॅनिश आहेत; कारण स्पॅनियर्ड लोकांनीं हे पदार्थ इंग्लंडांत इंग्रजांस अवगत केले आहेत. पण ते पदार्थ ह्या आपल्या देशांत जलप्रलयांत आपले दक्षिणगोलार्धाचें जंबुद्वीपकल्प होऊन पडण्यापूर्वींच इकडे अडकून पडलेल्या चिली व पेरू येथील लोकांनीं आणून सोडिलेले आहेत. ( ह्यावरून अमेरिकेंतील चिली, पेरू, वृक, यामिया देश तर काय पण तेथील लोकांच्या वसाहतींनीं पुढें भरलेले ग्रीस व इताली हे देश आपल्या हिंदुस्थानच्या संस्कृतीचे फाटे आहेत असें सिद्ध होतें. मागील भागांतील वृक व ह्या भागांतील यम यांच्या कथानकांचे पदर एकमेकांत असे गुंतले आहेत कीं त्यांतील अमुक पदर वृकाचा व अमुक पदर यमाचा असा ओळखणें अगदीं दुरापास्त आहे. हे दोन्ही भाग लक्षपूर्वक वाचील त्याच्या ध्यानांत हें आल्यावाचून राहणार नाहीं. पण हें त्यांस कळविणें भाग आहे कीं ज्योतिषशास्त्र पाहूं जातां वृक व यम हे तारापुंज अगदीं निराळे आहेत असें वर्णन आहे.

टीप—१ यांतील कथानक गरुडपुराणाशीं तोलून पाहील त्यास त्याचें संविधानक या यमाच्या कथानकावरून अंशतः घेतलें आहे असें आढळेल.

२ तसेंच चिली, पेरू, वृक, यमिया वगैरे दक्षिण अमेरिकेंतील देशांचें दळणवळण जल व स्थल यांच्या मार्गांनीं जलप्रलयापूर्वीं व नंतर होतें हें सिद्ध होतें.

नौकाः—देवीं नावं स्वरित्रा मनागसमस्रवंती मारु हेमा स्वस्तये ( ऋ. १०-६३-१० )-हिरण्मयी नौरचद्धिरण्यं बंधना दिवी.-( अथ. सं. ५.४.४ )-यांत आकाशांतील सुवर्णनौकेचा उल्लेख आला आहे. ( यास इंग्रजींत नेव्हिस असें नांव आहे ) हा तारकापुंज नरतुरंगाच्या अगदीं मागें आहे. याची आकृती प्राचीन नौकेप्रमाणें आहे. तिला डोलकाठी व अवजारें आहेत. हिचा तळचा भाग दक्षिणध्रुवाच्या जवळ आहे, व हिची डोलकाठी शृंगाश्वाच्या मागच्या पायाकडे झुकती आहे. ह्या तारकपुंजास इंग्रजींत आरगो असें म्हणतात. हें मोठें सुंदर व चांगल्या सरंजामाचें गलबत आहे. त्याच्या डोलकाठीस एक मच्छयंत्र खिळयानें कायम बसविलें आहे. हें गलबत व याचे उपयोग याच्यासंबंधें फार गैरसमज आहे. हें आपल्या एशियाखंडाच्या जुन्या इतिहासांत फार महत्वाचें आहे. त्यावरून एशियांतील पुष्कळ वसाहती अमेरिकेंत झाल्या व अमेरिकेंतील वसाहती दुसऱ्या खंडांत झाल्या असें दिसून येतें; कारण ती नौका दोन्ही तारकापुंजांच्या चित्रपटांत नरतुरंगाच्या मागल्या बाजूस काढिली आहे तर ती ओशियानाईड अथवा वैष्णव यांस आपल्या पाठीवर घेऊन दुनियेच्या सर्व भागांत नेआण करणारी असली पाहिजे. युरोपांतील अभियुक्त कोशांत ती नौका भूमध्यसमुद्रांत होती असें म्हटलें आहे, पण ती गोष्ट खरी असावी असें दिसत नाहीं, कारण वरील चित्रपटांत ती पासिफिक महासागरांत नसली तरी ती इरिथ्रियन समुद्रांत दाखविली आहे. ( याप्रमाणें दोन्ही गोलार्धांतील लोकांच्या रक्ताचें एकमेकांशीं मिश्रण झालें असें न मानिलें तर जुन्या द्वीपकल्पांतील प्राचीन काळापासून अर्वाचीन काळापर्यंत ज्या दंतकथा प्रचलित आहेत, त्या खोटया म्हणाव्या लागतील. त्या ह्या कीं ह्या दोन्ही द्वीपांतील लोकांचीं दर्यावरून पर्यटणें व हालचाली झाल्या आहेत-म्हणजे पूर्वीं दाखविल्याप्रमाणें उत्तर अमेरिकेंतील व मध्य अमेरिकेंतील ओशियानाईडस ऊर्फ वैष्णव आटलांटिक महासागरावरून गेले व त्यांनीं लिबिया व युरोप जिंकला; एवढेंच नाहीं तर दक्षिण अमेरिकेंतील इनकाच्या (ईश्वाकूच्या) वगैरे दरबारांतले पेरुव्हियन वगैरे लोक पासिफिक महासागर ओलांडून इरिथ्रियन समुद्रांतून एशिया, आफ्रिका व युरोप या खंडांत पसरले असले पाहिजेत. यावरून जें सिद्ध झालें तें असें.—

| | |
|---|---|
| १ तुफान.......तुपी अमेरिकन | २ वृक.........लुपका |
| ३ नरतुरंग......कुंतुर, कांडोर | ४ इतियस......इनका ( इक्ष्वाकू ) |
| ५ सिरापिस.....क्यारीब | ६ प्लुटो.........ला प्लाटा. |
| ७ यम.........यमिया ( प्रांत ) | ८ जेम्मा.........यमिया ( प्रांत ) |
| ९ रीमस.......रिमॅक ( मूर्ती ) | १० स्वस्तिक.......क्रूस. |

हीं अनुमानें कांहीं लोकांस अमान्य होऊन ते नाकें मुरडतील हें आम्हांस ठाऊक आहे. म्हणून त्यांची खात्री करण्याकरितां पासिफिक महासागरावरील ह्या लोकांच्या पर्यटनाच्या कांहीं खाणाखुणा तिकडील बेटांत अवशिष्ट आहेत कीं नाहींत? याचा तपास करणें आम्हांस उचित दिसतें. ह्या द्वीपसमुहांतील लोकांमधल्या

कांहीं दंतकथा किंवा इमारतीचे भाग यांवरून तिकडे आल्या गेलेल्या लोकांच्या इतिहासाची जमवाजमव करून घेतल्याशिवाय असला तपास करणें अगदीं अशक्य आहे. म्हणून या दक्षिणमहासागरांतील बेटांमध्यें ज्या कांहीं अर्वाचीन लोकांनीं प्रवास केले आहेत त्यांच्या प्रवासांच्या वर्णनाचीं पुस्तकें चाळण्यावांचून त्यास दुसरा मार्ग नाहीं.

इबिसः—हा एक लहानसा तारकापुंज आहे. त्यास हें नांव कापाटिक तारकापुंजांच्या चित्रपटांत आहे. त्यास अपुस हें नांव टालमिक तारकापुंजांच्या चित्रपटांत आहे. हीं नांवें एका समुद्रवासी पक्षाचीं आहेत. ह्या तारकापुंजाचें स्थळ मागील तारकापुंजाप्रमाणें निश्चित नाहीं. तें निश्चित करण्यास काय करावें ? प्राचीन काळचे लोकांमध्यें कोणीही समुद्र व सागर यांचे नकाशे काढून ठेवण्याचा प्रयत्न केलेला नाहीं, त्या अर्थीं त्या तारकापुंजाखालील स्थान तिकडील एखाद्या बेटांत सांपडतें कीं काय ? हें पाहिलें पाहिजे. मिसर देशाच्या पुराणांत इबिस हें टाथ नामक देवाचें चिन्ह आहे. तर ह्या खुणेस धरून त्याच्या स्थळाचा पत्ता लावितां येईल असें वाटतें. टाथ ह्या देवास मनुष्याचें डोकें नाहीं. त्यास इबिसचें डोकें आहे. ह्यानें लेखन, ज्योतिष व गायन ह्या विद्या काढिल्या. ह्याचें काम आपल्या चित्रगुताप्रमाणें मृत मनुष्यांनीं केलेल्या कर्मांची नोंद ठेऊन ती पूर्वोक्त पाताळांतल्या उसिरिस अथवा यम यास सुनावणी करण्याचें आहे. हा पृथ्वीवरील चोहोंकडच्या वातावणाचा अधिपती आहे. तो पूह नामक चंद्राचा मंत्री आहे. ह्या वर्णनावरून इबिसच्या स्थळाचा पत्ता लागणें शक्य नाहीं. कारण तें सगळें संशयात्मकच आहे. तर यास काय करावें ? दक्षिणमहासागरामध्यें ज्या बेटास आजतागाईत टाथ हें नांव चालत आहे, असें एक बेट आहे. तें कोणतें म्हणाल तर सांगणें कीं तर तें ताहिती होय. दक्षिण अमेरिकेपासून ह्या बेटाचें जें स्थळ आहे, तें इबिस ह्या तारकापुंजास योग्य दिसतें. ब्रिटिश म्यूझियममध्यें ( अजबखाना ) तहितीचें एक चित्र आहे. तें हुबेहुब टाथ देवाच्या चिन्हासारखें आहे. तर इबिसासारख्या डोक्याच्या देवाशीं ह्या बेटाचा कसा काय संबंध जुळलेला आहे ? हें पाहिलें पाहिजे. मि. ब्लेकेट म्हणतो कीं लंडन मिशिनरी सोसायटीच्या ग्रंथांत ह्या तहिती बेटास तहिती नौ असें म्हटलें आहे. ही गोष्ट आपल्या शोधास महत्वाची आहे. कारण टाथ ह्याचा बाप जो आगत यास जसें तौ हें नांव आहे, तसें तें मेक्सिको व मध्यअमेरिका नहोवा अथवा टोलटेक जातीच्या लोकांस आहे. शिवाय, त्यांत पूर्वोक्त ओवेरा येथील मोराईचें चांगलें कोरलेलें चित्र आहे. हा मनोरा आबडधोबड धोंड्यांचा नाहीं, तर घडीव धोंड्यांचा आहे. ह्याचा विस्तारही कौतुक करण्यासारिखा आहे. हा २७० फूट लांब, ९४ फूट रुंद, व ५१ फूट उंच आहे. हें उघड आहे कीं ही एवढी इमारत जंगली लोकांच्या हातून उठण्यासारखी नाहीं. मेरू पर्वत हें देवांचें निवासस्थान आहे असें आपले वैदिक लोक मानितात, व ती बुद्धाची समाधी होय असें आपले बौद्ध लोक मानितात,

व जागोजागचे मनोरे सदरहू मेरू पर्वताच्या प्रतिमा आहेत ( एशियाटिक रीसर्चिस ) तर अमेरिका खंडांत आपल्या एशिया खंडांतील आपल्या हिंदू लोकांपैकीं वैदिक, बौद्ध वगैरे लोकांनीं येऊन जागोजाग वसाहती केल्या होत्या म्हणून दाखविलें आहे, त्याचे हें कदाचित बाहेरचें नाकें असावें—असें वाटतें. तर आतां ह्या बेटांतील लोकांच्या रीतिरिवाजाचें वर्णन करणें जरूर आहे. येथिल लोक पंचमहाभूतांची पूजा करीत असत. त्यांच्यांत भट असत. ते त्या भूतांस बालकांचे बळी देत असत. ( त्यांची ही रीत आपल्या येशुख्रिस्त नामक प्रियपुत्रास बळी देणाऱ्या मिशनरींच्या देवासारिखीच दिसते. ) ते कलाकुशल, व्यापारी व नौकानयनज्ञ असत. त्यांचीं घरें ३०० फूट लांब असत. त्यांच्यांत लग्नें हा धर्मांचा संस्कार गणला जाई. त्यांचीं गलबतें असत. तीं तिकडील इतर लोकांच्या गलबतांसारिखीं नसत. त्यांच्या गलबतांवर डोलकाठ्या व तिकोनी अवजारें असत. त्यांच्यांत लढाई उद्भवली तर ते अनेक गलबतें जोडून त्याचें एक रणक्षेत्र तयार करीत असत. ते ज्योतिषज्ञ असत. त्यांस आमचे वैदिक लोकांप्रमाणें सर्व नक्षत्रांचीं नांवें ठाऊक होतीं. त्यांस त्यांचा अस्तोदय समजत असे. ते सूर्यचंद्राच्या स्थितीप्रमाणें गलबतें चालविण्याचें काम करीत असत. ते प्रत्येक दिवसाचे पाश्चात्यांप्रमाणें १२ भाग पाडीत असत. त्यांच्या वर्षांत तेरा चांद्रमास असत. ते कदमांनीं ( पावलांनीं ) मोजमाप करीत व हिशेब बारा फाड्यांवर करीत. ते अमरत्व मानीत असत. ते देवळें बांधीत असत. पण त्यांत देवाच्या मूर्ती नसत. ते उघडेनागवे फिरत नसत. ते पोशाख करीत. यावरून हे लोक तेथें मिशनरी जाण्यापूर्वींच फार सुधारलेले होते असें सिद्ध होतें, मग ते पूर्वीं दाखविल्याप्रमाणें आर्यावर्तातील वैदिक असोत किंवा बौद्ध असोत किंवा अमेरिकन वैष्णव असोत. पूर्वीं वर्णिल्याप्रमाणें त्यांचीं गलबतें होतीं व त्याच्या महासागरावरील सफरी होत होत्या तर प्राचीन काळीं सदरहू लोक त्यांच्या भोवतालचा पासिफिक महासागर ओलांडणारे होते असें सुस्पष्ट होतें. अशी सुधारणेची छाया पडलेलें असें तिकडे एकच बेट होतें असें नाहीं. तिकडील एका बेटास अलीकडे मिशनऱ्यांनीं ईस्टर म्हणून नांव दिलें आहे. त्यांत कांहीं कोरकामाचे नमुने सांपडले आहेत. त्यांत कांहीं मूर्ती व मिसर देशाचें नौ चिन्ह होतें. मि. ब्लॅकेट म्हणतो कीं तें पाहण्यास ब्रिटिश म्यूझियममध्यें ठेविलेलें आहे. तिकडील फिजी बेटें, कीं जेथें आमचे लोकांस हल्लीं उसाचें मळे लावण्यास नेलें आहे, तेथें पूर्वींची मेक्सिकोंतील अझटेक लोकांची वस्ती झालेली आहे असें उघड दिसतें. त्यांत देवळें आहेत. ती तेथील पूर्वोक्त टिकालीसारिखीं हुबेहूब आहेत. ही ओळख बरोबर झाली असल्यास तेथील लोक जंगली लोकांतील पुरे जंगली आढळले तर नवल नव्हे. कारण मेक्सिकोंत टिकाली नामक देवळांत पुढील नृसिंह अवताराच्या चित्रांत तेथील लोक नरबळी कसे देत असत हें दाखविलें आहे, त्याप्रमाणें ह्या फिजी बेटांत क्रूरपणें नरबळी देण्याची वहिवाट सर्वत्र आढळते. इ. स. १७७७ त क्यापटन कुक टोंगाटाबू बेटांत गेला होता. तेव्हां त्यास तेथील एका मोठ्या दलदलींत

एक चमत्कारिक बांधाचा रस्ता ( सेतू ) आढळला. तो पोवळ्यांच्या दगडांचा बांधिलेला होता, व त्याच्या मध्यभागीं एक रंगण होतें. हें काम फार प्राचीन होतें. त्या बेटांत सांप्रत जी लोकसमाजाची स्थिती आढळते, तीपेक्षां तेथील लोकांची सामाजिक स्थिती सरस असल्याशिवाय असला सेतू बांधण्याचें काम त्यांचे हातून होणें शक्य नाहीं. दुसरा एक प्रवासी असें म्हणतो कीं मला तेथील एका मनुष्यानें एक नकाशा दाखविला. त्या नकाशावर त्या झाडून सर्व बेटांच्या समुहांतील नौका चालविण्याचे रस्ते दाखविलेले होते.

काळः—ह्या तारकापुंजाखालीं आस्ट्रेलिया, टासमानिया, न्यूझीलंड वगैरे बेटें आहेत. येथें प्राचीन शहराचे अवशिष्ट भाग फारसे आढळत नाहींत. येथील लोक हल्लीं दुरवस्थेंत आहेत, पण त्या लोकांमध्यें ज्या दन्तकथा प्रचलित आहेत, त्यावरून असें दिसतें कीं ह्या अप्रसिद्ध बेटांचा बाहेरच्या जगताशीं निकट संबंध पूर्वीं असे. आपल्या ऋग्वेदामध्यें प्रमंथ याची अशी आख्याइका आहे, तीप्रमाणें येथील कोणी एक पुरुष आकाशांत गेला व त्यानें तेथून अग्नी खालीं आणिला. अशी आख्याइका इकडे रूढ आहे. दुसऱ्या एका आख्याइकेंत असें सांगितलें आहे कीं " एक मोठा जलप्रलय झाला. तेव्हां त्याचें पाणी उंच झाडें व डोंगर यांच्या वर चढलें असतां तेथील कांहीं लोक बुडून मेले व कांहीं त्या वेळच्या मोठ्या झंझावातांत सांपडून इतरत्र नेले गेले. ह्या महा प्रलयानंतर तेथील झाडून सर्व माणसें तारकारूप बनलीं. त्यांत त्यांचे मुख्य देव पंगिल, तीर व तिरेर व वंग नांवाचा कावळा आहे, ह्या पंगिलास वेटबुड व बाबिंजर हीं मुलें होतीं. तीं पृथ्वीवर राहिलीं. त्या पहिल्या भाऊबहिणीच्या जोडप्यापासून सध्यां आढळणारीं पृथ्वीवरील माणसें उत्पन्न झालीं. याप्रमाणेंच तेथें क्यांगारू व ओपोसम ह्यांच्या पहिल्या जोडप्यापासून त्या जातीची तेथें वृद्धी झाली. ज्यास टालमीच्या तारकापुंजाच्या चित्रपटाची माहिती आहे व जो सदरहू चित्रपट प्राचीन-भू-प्रकाशक आहे असें मानणारा आहे, त्याशिवाय इतरांस ह्या दन्तकथेंत कांहीं मननीय भाग आढळणार नाहीं. पण तदितरांस हें निखालस मान्य होईल कीं काकाचा तारकापुंज व आस्ट्रेलिया बेट यांचें स्थळ अगदीं एक आहे, व तो तारकापुंज बहुशिरा नामक तारकापुंजाच्या शेपटाजवळ आहे. ह्यांतील चमत्काराची गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं ह्या मूळच्या लोकांचें एक मत आपल्या जुन्या महाद्वीपांतील ज्योतिषज्ञांप्रमाणें अगदीं हुबेहूब आहे. तें हें कीं जलप्रलयापूर्वीचे लोक तारे बनले व त्यांत वंग हा काक तारासमूह बनला. यावरून आकाशांतील झाडून सर्व ताराकापुंज प्राचीन देश दाखविणारे आहेत व खटपट करील त्यांस त्यावरून त्यास दन्तकथारूप इतिहासाचा पत्ता लागण्यासारिखा आहे, व त्यास आस्ट्रेलियासारखें अज्ञात द्वीप व त्यांतील आडमुठे लोक हेही अपवादक म्हणून सोडून देण्यासारिखे नाहींत—हें निःशेष सिद्ध झालें.

निष्कर्षः—या ठिकाणीं कापटिक व टालमिक तारकापुंजाच्या चित्रपटाचें काम सरलें. पण ह्यांत एक प्रश्न उघड उलगडल्यावांचून असा राहिला कीं ह्या

चित्रपटांस मूलभूत जें ज्योतिषशास्त्र तें मूळचें कोणाचें ? आम्हां हिंदूंचें किंवा इतरांचें ? ह्याचें उत्तर मागील चित्रपटांच्या उपयोगांत अंशतः आलेंच आहे. म्हणजे मूलतत्वें हीं जर विकसित पदार्थांच्या पूर्वींचीं–फुलाच्या कळीप्रमाणें–मानावयाचीं असतील तर राशिचक्राच्या चित्रपटासुद्धां ज्योतिष व फलज्योतिष यांच्या मूलतत्वांची स्वतंत्र उत्पत्ती आपल्या दक्षिणोत्तर आर्यावर्तांत झाली आहे. ह्याचा पुरावा आपल्या हिंदुस्थानांतील अनेक ज्योतिषांच्या ग्रंथांवरून मिळेल. पण ज्यास एवढी फुरसत नसेल त्यानें कै. ज्योतिर्विद शं. बा. दीक्षित यांचें भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास पहावा. हेंही ज्यास होत नसेल त्यानें आमची एतद्विषयक भक्तीची प्रत्यक्ष मूर्ती अथवा अंतरालांतील अनंताची आराधना ( खंडें दोन ) हा ग्रंथ पहावा–अशी शिफारस आहे.

भा. वनपर्व अ. २०० तील–' षडशीति मुखेषु '–या शद्वावरून क्रान्तिवृत्ताचे १२ विभाग भारतकालीं म्हणजे कलीच्या आरंभीं ३००० वर्षांपूर्वीं झाले होते असें ठरतें तर त्यास नुसतीं नांवें देणें हें काम हिंदू ज्योतिषांस अशक्य होतें असें दिसत नाहीं, व त्याप्रमाणें आपल्याजवळ राशींना शुद्ध संस्कृत नांवें आहेत, व तीं त्यांनीं प्रत्येक राशीखालील एशियाखंडाच्या प्रारंभापासून जागोजाग फिरून प्रत्येक स्थलाच्या वैशिष्ट्याप्रमाणें दिलीं आहेत; कारण त्यांच्याप्रमाणें त्या काळीं नौकानयन, व्यापार व वसाहती करणारे निपुण लोक त्रैलोक्यांत दुसरे नव्हते. यास प्रमाणें–पूर्वीं कांहीं ओघानें दिलीं आहेत. त्यांशिवाय आणखीं आमच्या पुढील नौकानयन, व्यापार व वसाहती ह्या स्वतंत्र भागांत तीन ठिकाणीं पहा. नौकानयननिपुणतेशिवाय ज्योतिषनैपुण्य प्राप्त होत नाहीं; एवढेंच नव्हे तर व्यापार व वसाहतीही करितां येत नाहींत, व त्याप्रमाणें मैत्रेयसूत्रांत राशिशद्ब व बौद्धायन सूत्रांत राशींचीं नांवें आहेत. आतां आपल्या राशींच्या अर्थाचीं नांवें कापटिक व टालमिक तारकापूंजांच्या चित्रपटांत आढळतात–हें खरें. तर त्याचें कारण असें कीं आमचे आर्यलोक मिसर देशांत प्रत्यक्ष जाऊन त्यांत मिसळले आहेत हें त्यास आमचे लोकांनीं त्यास लाविलेला मिसर हा इतिहासगर्भ शब्द सांगतो तर त्यांनीं त्यांत राहत असतां तीं नांवें तेथील कापटिक लोकांस शिकविलीं व तींच त्यांपुढें पुष्कळ दिवसांनीं टालमीनें उचललीं असलीं पाहिजेत असें मानण्यांत कोणत्याही प्रकारचा अयुक्तिकपणा नाहीं व ही गोष्ट तिकडील दंतकथांस धरून आहे. कारण ( १ ) साधें हें अलंकारिकाचें जनक असतें व याप्रमाणें आपलीं राशिचक्राचीं चित्रें साधीं आहेत. ती कापटी व टालमी यांच्या राशिचक्राच्या चित्रपटांप्रमाणें वाढवलेलीं नाहींत. ( २ ) लांडसीर हा त्राजनच्या कारकीर्दींतील एक प्रसिद्ध ग्रंथकार जो लुसियानस याच्या ग्रंथांतील पुढील वाक्य देतोः–

"Astronomy came originally from Ethiopia."

अर्थः—ज्योतिषशास्त्र प्रथमतः इथिओपियांतून इकडे आलें.

पुढें त्यानें आणखीं एक महत्वाची गोष्ट सांगितली आहे. ती अशी कीं एका तत्त्वज्ञानें द्यौस्पितरास ( जुपिटरास ) असें स्पष्ट सांगितलें आहे कीं—

"From the Brahmans she repaired straight to Ethiopia and thence to Egypt, whose poets and prophets she instructed and then betook herself to Babylon, to instruct the Chaldians."

अर्थः—तें शास्त्र ब्राह्मणांपासून इथिओपियांत गेलें व तेथून तें मिसर देशांत गेलें. तेथें तें शास्त्र तेथील कवी व भविष्यवादी शिकले. नंतर तें शास्त्र खाल्डियांतील राजोपाध्यांनीं शिकावें म्हणून तें पुढें बाबिलोन येथें गेलें.

एवढेंच नाहीं तर आपल्या पूर्वोक्त मनूच्या स्मृतिग्रंथाचा पराक्रम पहा.—

"Man inspired Egyptian, Hebrew, Greek and Roman legislation and his spirit still permeats the whole economy of our European laws."—

अर्थः—मनूपासून इजिप्शियन, हिब्रू, ग्रीक ( यवन ) व रोमन कायद्यांस अंतःस्फूर्ती मिळाली व त्याचें सार आमच्या युरोपियन लोकांच्या कायद्यांच्या सगळ्या नियंत्रित व्यवहारामध्यें अजून पुरें भरलें आहे.

—:*:—

## भाग दहावा.

### तारकापुंज व देशांची ओळख.

वसंतो ग्रीष्मो वर्षाः । ते देवा ऋतवः शरद्धेमन्तः शिशिरस्ते पितरो—स ( सूर्यः ) यत्रो दगावर्तते । देवेषु तर्हि भवति...यत्र दक्षिणावर्तते पितृषु तर्हि भवति ॥ शत. ब्रा. २. १. ३.

अर्थः—वसंत, ग्रीष्म, व वर्षा हे देवांचे ऋतू, शरद, व हेमंत शिशिर हे पितरांचे ऋतू. तो सूर्य जेथें उत्तरेस वळतो व असतो, तेथें तो देवांमध्यें असतो, व जेथें तो दक्षिणेस वळतो व असतो, तेथें तो ( त्यांच्या ) पितरांमध्यें असतो. ( त्यावरून आमचे गरीब पितर मूळचे दक्षिणेकडील होते, ते उत्तरेस जाऊन गबर देव बनले, व त्यांचा सहा ऋतूंचा आर्यावर्त विंध्याद्रीपासून उत्तरकुरूपर्यंत पसरला होता.

पश्य में तपसो वीर्यं स्वार्जितस्य नरेश्वर
एष त्वां स्वशरीरेण नमामि स्वर्गमोजसा ॥ १३
दुष्प्रापं स्वशरीरेण स्वर्गं गच्छ नरेश्वर ।
स्वार्जितं किंचिदप्यास्ति मया हि तपसा फलम् ॥१४
राजस्त्वं तेजसा तस्य सशरीरो दिवं व्रज
उक्तवाक्ये मुनौ तस्मिन् सशरीरो नरेश्वर ॥ १५

दिवं जगाम काकुस्थ मुनीनां पश्यतां तदा
स्वर्गलोकं गतं दृष्ट्वा त्रिशंकुं पाकशासनः ॥ १६
सहसर्वैः सुरगणैरिदं वचनमब्रवीत् ।
त्रिशंको गच्छ भूयस्त्वं नासि स्वर्गकृतालयः ॥ १७
गुरुशाप हतो मूढ पतभूमि मवाक् शिराः ।
एवमुक्तो महेंद्रेण त्रिशंकुरपत त्पुनः ॥ १८
विक्रोशमानस्त्राहीति विश्वामित्रम् तपोधनम् ।
तच्छ्रुत्वा वचनं तस्य क्रोशमानस्य कौशिकः ॥ १९
रोषमादरहत्तीव्रं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् ।
ऋषिमध्ये स तेजस्वी प्रजापति रिवापरः ॥ २०
सृजन्दक्षिण मार्गस्थान्सप्तर्षिनपरान्पुनः ।
नक्षत्रवंशमपरमसृत्क्रोधमूर्च्छितः । २१
दक्षिणां दिशमास्थाय ऋषिमध्ये महायशाः ।
सृष्ट्वा नक्षत्रवंशं च क्रोधेन कलुषीकृतः ॥ २२
अन्यामिन्द्रं करिष्यामि लोको वा स्यादनिन्द्रकः ।
दैवतान्यपि सक्रोधात्स्रष्टुं समुपचक्रमे ॥ ॥ २३
ततः परं संभ्रान्ता सर्षिसंघा सुरासुराः ।
विश्वामित्रं महात्मान मूचुः सानुनयं वचः ॥ २४
अयं राजा महाभाग गुरुशापपरिक्षतः ।
सशरीरो दिवं यातुं नार्हत्येव तपोधन ॥ २५
तेषां तद्वचनं श्रुत्वा देवानां मुनिपुंगवः ।
अब्रवी त्सुमहद्वाक्यं कौशिकः सर्व देवताः ॥ २६
सशरीरस्यभद्रं च त्रिशंको रस्य भूपतेः ॥
आरोहणं प्रतिज्ञातं (?) कर्तुमुत्सहे ॥ २७
स्वर्गोस्तु सशरीरस्य त्रिशंकोरस्य शाश्वतः ।
नक्षत्राणि च सर्वाणि मामकानि ध्रुवाण्यथ ॥ २८
यावल्लोका धरिष्यन्ति तिष्ठत्वेतानि सर्वशः ।
यत्कृतानि सुराः सर्वे तदनुज्ञातुमर्हथ ॥ २९
एवमुक्ताः सुराः सर्वे प्रत्युचुर्मुनिपुंगवम् ।
एवं भवतु भद्रं ते तिष्ठन्त्वेतानि सर्वशः ॥ ३०
गगने तान्यनेकानि वैश्वानरपथाद्बहिः ।
नक्षत्राणि मुनिः श्रेष्ठ तेषु ज्योतिषु जाज्वल्लन् ।

आवाक्शिरा स्त्रिशंकुश्च तिष्ठत्वयरसंनिभः ।
अनुयास्यन्ति चैतानि ज्योतींषि नृपसत्तमम् ॥३२
कृतार्थं कीर्तिमन्तं च स्वर्गलोकगतं यथा ।
विश्वामित्रस्तु धर्मात्मा सर्व देव रभिष्ठुतः । ३३
ऋषिमध्ये महातेजा बाढमित्येव देवताः ।
ततो देवा महात्मानो ऋषयश्च तपोधनाः ।
जग्मुर्यथागतं सर्वे यज्ञस्यान्ते नरोत्तम ॥ ३४
वाल्मीकीय श्रीमद्रामायणे बालकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६०

मागील भागांत यम, शिखावल, बक, कारंडव, नौका, इबिस व काक ह्या तारकापुंजांचें विवरण झालें, व कापटिक व टालमिक चित्रपटांतील एकुणएक तारकापुंजांचा विचार आटोपला. पण त्या तारकापुंजांपैकीं स्वस्तिक, नरतुरंग व नौका ह्या तीन तारकापुंजांसंबधें आपल्या वाल्मीकी रामायणांत दिलेलें वर्णन अगदीं भिन्न व मनोहर असल्यामुळें त्याचा विचार या भागांत स्वतंत्रपणें करण्याचें योजिलें आहे. आपल्या वाल्मीकी ऋषींनीं वरील स्वस्तिक, नरतुरंग व नौका ह्या तारकापुंजांत जे तारे आहेत, त्यांची निराळ्या प्रकारची फाळणी करून त्रिशंकू व सप्तर्षी असे दोन तारकापुंज आपले विश्वामित्र ऋषींनीं क्षत्रिय व ब्राह्मण यांतील स्पर्धेंत इरेस पडून कसे नवीन निर्माण केले ? याबद्दल बोधपर कथानक दिलें आहे. त्याच्या आधारें पुढील त्रिशंकू व सप्तर्षी हें वर्गीकरण आहे.

त्रिशंकू व सप्तर्षीः—स्वस्तिक या तारकापुंजांत चार चांगल्या तेजस्वी तारा आहेत. त्या मे व जून महिन्यांत आवशीस व जानेवारींत मध्यान्हीं पहाटेस अगदीं दक्षिणेकडे क्षितिजापासून ८° ½ अंश वर दिसतात. त्यांत अगदीं खालचीं पहिल्या प्रतीची तारा आहे. या तारांच्या डाव्या हातास नरतुरंगांतल्या दोन पहिल्या प्रतीच्या तारा दिसतात. त्या क्षितिजापासून १० अंश मात्र वर दिसतात. याशिवाय या पुंजांत आणखीं तीन लहान तारा आहेत. या तुरंगाच्या मागल्या बाजूस नौका या तारकापुंजांतील तारा आहेत, पण त्यांत कोणतीही तारा सांगण्यासारिखी मोठी नाहीं हें मागें दिलेल्या वर्णनावरून वाचक स्मरत असतीलच. याचें नवीन वर्गीकरण.— स्वस्तिक या तारकापुंजांतील चार तारांपैकीं खालची जी तारा आहे, ती सर्वांत तेजस्वी दिसते. तो त्रिशंकू होय. त्यावर ज्या तीन तारा आहेत त्या त्या त्रिशंकूचे तीन शंकू होत. याप्रमाणेंच वर सांगितलेल्या नरतुरंगांतल्या दोन पहिल्या प्रतीच्या तारा व दुसऱ्या तीन सामान्य तारा व नौका नामक पुंजांतल्या दोन तारा मिळून सात तारांचे सप्तर्षी होत. हे सप्तर्षी सदरहू त्रिशंकूच्या भोवतीं उत्तरेस आहेत. यास दक्षिणर्क्ष असें नांव कै० शं० बा० दीक्षित या ज्योतिर्विदांनीं योजिलें आहे. कथानकः—त्रिशंकू हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुण राजाचा पौत्र व निबंधन राजाचा जेष्ठ पुत्र होऊन गेला. त्याचें मूळचें नांव सत्यव्रत असें होतें. हा बालपणापासून

कुमार्गगामी होता. तो ब्राह्मणांच्या विवाहित स्त्रियांचें हरण करीत असे. म्हणून निबंधनानें यास नाना प्रकारें उपदेश करून पाहिला, पण तो बिलकुल ऐकत नाहीं असें पाहून त्यानें त्यास राज्याबाहेर हाकून दिलें व आपण त्या दुःखानें पीडित होऊन राज्य आपले मंत्र्याचे स्वाधीन केलें, व उत्तम पुत्राची प्राप्ती व्हावी म्हणून अरण्यांत जाऊन खडतर तप करूं लागला. इकडे सत्यव्रत अरण्यांत व्याधाप्रमाणें राहत असतां व निबंधन तपश्चर्या करीत असतां अयोध्या नगरींत बेबंदशाही माजली व अवर्षण पडलें. त्या योगानें त्या राज्यांत कोणासही अन्न मिळेनासें झालें, व चोहोंकडे हाहाकार माजला ! त्यांत विश्वामित्र ऋषीची स्त्री व तीन पुत्र सांपडले. पण त्यांस सत्यव्रतानें प्रत्यहीं मांस आणून देऊन त्यांचा निर्वाह चालविला. एके दिवशीं ह्या व्याधानें वशिष्ठ ऋषीची धेनू जाणून किंवा न जाणून मारिली. तेव्हां वशिष्ठ ऋषीनें त्यास असा शाप दिला कीं परस्त्रियांचा अपहार, पित्याचा क्रोध व धेनूचा वध या तीन शंकूस्तव म्हणजे पातकांस्तव सत्यव्रत हा त्रिशंकू हें नांव पावो. तें नांव पडल्यापासून त्यास चित्त-भ्रम होऊन तो रानावनांत पिशाचांप्रमाणें वणवण फिरूं लागला. इकडे निबंधन राजास सत्यरथ म्हणून दुसरा पुत्र झाला. निबंधन राजास प्रजेची दुर्दशा झालेली कळल्याबरोबर तो लगेच अयोध्येंत येऊन पूर्वीप्रमाणें प्रजेचें पालन करूं लागला. तेणेंकरून यथाकालीं पर्जन्य पडूं लागून राज्यभर चोहोंकडे सुबत्ता झाली. पण निबंधन राजानें सत्यव्रताचें नांवच घेतलें नाहीं हें पाहून सत्यव्रतास मोठा पस्ताव उत्पन्न झाला, व तो देहत्यागास तयार झाला. पण त्यास कोणी देवतेनें येऊन सांगितलें कीं तूं देहत्याग करूं नको, तुझा पिता लौकरच तुला राज्यावर स्थापिल. त्यावरून त्यानें आपल्या देहाच्या त्यागाचा विचार सोडून दिला. इकडे निबंधन राजास सहज असें वाटलें कीं आपला वृद्धापकाळ झाला आहे, व सत्यव्रताची बरी रग जिरली आहे तर त्यास आणून राज्यावर स्थापावें. त्याप्रमाणें राजानें अरण्यांत दूत पाठवून सत्यव्रतास अयोध्येस बोलावून आणिलें, व त्यास सदुपदेश करून आपल्या गादीवर बसविलें व आपण अरण्यांत जाऊन थोड्या वेळांत उत्तम गतीस पावला. पुढें त्रिशंकू हा मागील दुःखदायक अनुभवानें पुष्कळ निवळला होता. त्यानें पुष्कळ दिवस नीतीनें राज्य केलें. अशा सदाचरणानें तो वागत असतां त्यास हरिश्चंद्र व अंबरीष असे दोन पुत्र झाले.

याप्रमाणें त्रिशंकू हा राज्य करीत असतां त्याच्या मनांत असें आलें कीं आपण मर्त्य देहानें स्वर्गास जाऊन तेथील दिव्य भोग चिरकाल भोगितां येतील असा एक यज्ञ करावा. त्यावरून तो आपला कुलगुरू जो वसिष्ठ यांजकडे गेला व त्यास आपला हेतू निवेदन केला—असा तो विचित्र होता. वसिष्ठानें हें त्याचें बोलणें ऐकून उत्तर केलें कीं जन्मभर यज्ञ करावे व देहाचें पतन झाल्यावर स्वर्गास जावें असा अनादिसिद्ध मार्ग आहे. तर तूं ह्मणतोस असें होणें शक्य नाहीं. यावरून त्रिशंकू म्हणाला कीं मी आपली गाय पूर्वीं मारिली आहे—हा डाव मनांत धरून आपण असें म्हणतां हें मी समजतों, मग यज्ञ करून

स्वर्गास नेणारा दुसरा उपाध्याय पाहून मी सदेह स्वर्गास जातों कीं नाहीं हें पहा. यावरून वशिष्ठानें म्हटलें कीं पुढें सदेह स्वर्गास जावयाचें होईल तेव्हां पाहतां येईल. पण सध्यां तर तूं चांडाळ हो. असें म्हणतांच त्रिशंकू काळा ठिक्कर व नकटाफेपटा चांडाळ झाला. तेव्हां तो परम लज्जित होऊन अयोध्येस परत न जातां अरण्यांत निघून गेला. हें वर्तमान त्याचा पुत्र हरिश्चंद्र यास कळलें तेव्हां त्यास अतीशय वाईट वाटलें, व त्यानें त्याजकडे मंत्री पाठवून त्यास अयोध्येंत परत बोलाविलें पण त्यानें परत संदेश पाठविला कीं माझ्या सध्यांच्या स्थितींत माझें अयोध्येंत येणें होणार नाहीं. तर तूं माझ्या गादीवर बसून प्रजेचें पालन चालवावें. तो संदेश ऐकून हरिश्चंद्र निरुपायास्तव अयोध्येचें राज्य करूं लागला. इकडे विश्वामित्र ऋषी तपार्थ अरण्यांत गेला होता, तो परत आल्यावर तो आपल्या स्त्रीपुत्रांस विचारूं लागला कीं गेल्या अवर्षणांत तुम्ही आपले प्राण कसे वांचविलेत ? त्यास त्याची स्त्री म्हणाली कीं इक्ष्वाकुवंशांत सत्यव्रत म्हणून राजपुत्र आहे. त्यानें आम्हांस वेळोवेळीं मांस पुरवून आमचे जीव वांचविले म्हणून हे दिवस दिसले ! पण तो उपकारकर्ता सत्यव्रत सध्या वशिष्ठाच्या शापानें चांडाळ होऊन तुकडे मागत चोहोंकडे सैरावैरा भटकत आहे. तेव्हां कांहीं तरी करून त्रिशंकूस हल्लींच्या विपन्न स्थिततून सोडविलें पाहिजे, एरवीं आपण त्याच्या ऋणांतून उत्तीर्ण होणार नाहीं. असें तिचें कळकळीचें भाषण ऐकतांच विश्वामित्र ऋषी अती कडक म्हणून प्रसिद्धी आहे. तरी तो सद्गदित होत्साता आपण त्या चांडाळ होऊन पडलेल्या त्यास पाहतांच त्रिशंकूकडे गेला. त्यास दुरून साष्टांग नमस्कार त्या दीन झालेल्या त्रिशंकूनें घातला व म्हटलें कीं ह्या असह्य दुरवस्थेंतून माझा उद्धार करणें आपणाकडे आहे तें ऐकून लोण्याप्रमाणें विरघळलेला विश्वामित्र त्यास म्हणाला कीं बा त्रिशंकू, तूं कांहीं चिन्ता करूं नको. मी तुझा कांहीं तरी तरणोपाय काढितों. असें म्हणून तो गेल्यावर थोड्या दिवसांमध्यें त्यानें यज्ञ करण्याची झाडून सर्व सिद्धता केली व मोठमोठ्या विद्वान् ब्राह्मणांस यज्ञास येण्याबद्दल रीतसर निमंत्रणें पाठविलीं. त्यावर चांडाळ यजमान व क्षत्रिय उपाध्याय अशी त्यावर वशिष्ठानें मखलाशी केल्यामुळें बहुतेक ब्राह्मणांनीं आम्ही या यज्ञास येत नाहीं असा साफ निरोप पाठविला. त्यावरून विश्वामित्राच्या पायाची आग मस्तकांत गेली व त्यानें वशिष्ठाच्या पुत्रांस तुम्ही चांडाळ व्हाल म्हणून शाप दिला ! तेव्हां कांहीं ब्राह्मण होना करितां-करितां शेवटीं यज्ञास गेले व यज्ञही होत आला पण हविर्भाग घेण्यास देव नेहमींप्रमाणें यावयाचे, ते येईनात ! तेव्हां विश्वामित्रानें त्रिशंकूस म्हटलें कीं आतां जर कांहीं पुण्य माझ्याच पदरीं असेल तर तूं पावन होऊन स्वर्गीं जाशील. असें म्हणतांच त्रिशंकू विश्वामित्राच्या स्वार्जित पुण्यानें पक्षाप्रमाणें उडून स्वर्गीं जाऊं लागला ! हें पाहून इंद्रास अत्यंत क्रोध उत्पन्न झाला, व त्याजवळ त्रिशंकू पोहोंचतो न पोहोंचतो तोंच त्यानें त्यास सांगितलें कीं तूं गुरूच्या शापानें दग्ध झालेला आहेस. त्या अर्थीं तुला मर्त्य देहासह या माझ्या स्वर्गांत राहण्याचा अधिकार नाहीं म्हणून तूं खालीं पतन पाव. त्या क्षणीं त्रिशंकू भरर खालीं पडूं लागला

तसा तो ' हे विश्वामित्रा, हे विश्वामित्रा, मला आतां तार. म्हणून तारस्वरानें ओरडूं लागला. तो आर्तस्वर ऐकून विश्वामित्रानें हे त्रिशंको, तिष्ठ तिष्ठ ( स्थिर रहा, स्थिर रहा, ) असें म्हटलें. त्याबरोबर तो त्रिशंकू तेथेंच अंतरिक्षांत स्थिर होऊन राहिला. त्यानंतर प्रतिसृष्टी व प्रतिस्वर्ग निर्माण करून तेथें त्रिशंकूस स्थापण्याची प्रतिज्ञा करून विश्वामित्रानें इष्टी करण्यास प्रारंभ केला, व त्यानें दक्षिण दिशेकडे उत्तर दिशेप्रमाणें अनेक नक्षत्रें व सप्तर्षी उत्पन्न केले. आतां तो प्रतिसृष्टी खचित करूं लागणार म्हणून इंद्रादी देवांस भय पडलें व तें त्यानें न करावें म्हणून रदबदली करूं लागले. तेव्हां विश्वामित्रानें साफ सांगितलें कीं तें कांहीं म्हणा, पण त्रिशंकूला स्वर्ग प्राप्त झालेंच पाहिजे. तेव्हां विश्वामित्राचे तपाचें सामर्थ्य जाणून इंद्रानें पुढील गोष्टीनें त्याची समजूत काढली. त्यानें त्रिशंकूकडून जुना मर्त्य देह टाकविला व नवीन दिव्य देह धारण करविला, व त्यास खालीं तोंड करून स्वर्गात ठेववून घेतलें व त्यास विश्वामित्रानें निर्माण केलेलीं नक्षत्रें अनुसरतील अशी तजवीज केली–( वा. रा. बा. कां. ५८ ते ६० ) ( दे. भा. स्कं. ७ अ. १०–१४ )

टीपः—( १ ) पूर्वोक्त सात्विक परमभक्त ध्रुवाची कथा या तामसी परम-अभक्त त्रिशंकूच्या कथेशीं तोला म्हणजे त्यांतील विरोधाचा परिणाम वाचकांच्या हृदयावर ठसठशीत उमटल्यावांचून राहणार नाहीं ! त्या प्रेमळ ध्रुवाचें अढळपद कोणीकडे व ह्या विक्षिप्त सत्यव्रताचें खालीं तोंड करून लोंबत सोडिलेलें अढळ पद कोणीकडे !

( २ ) ध्रुवाची ऋजू मुक्ती कोणीकडे व सत्यव्रताची जुलमाची मुक्ती कोणीकडे ! ध्रुवाचें आयुष्य सरल्यावर त्यानें मोक्ष मिळविला आहे व सत्यव्रतानें देह टाकून किंवा आत्महत्या करून मोक्ष मिळविला आहे. ध्रुवाची मुक्ती स्वेच्छेची आहे व सत्यव्रताची मुक्ती स्वेच्छेचीच असो पण ती सर्वस्वी परच्छेची म्हणजे विश्वामित्राच्या पराक्रमाची आहे !

अशा प्रकारें स्वस्तिक, नरतुरंग व नौका ह्या तारकापुंजांची फाळणी त्रिशंकू व सप्तर्षी अथवा दक्षिण ऋक्ष ( आश्वल ) या तारकापुंजांत ब्राम्हण व क्षत्रिय यांच्या परस्पर चाललेल्या कांहीं वैदिक काळच्या व कांहीं पौराणिक काळच्या भांडणांत झाली असें आम्ही शास्त्रदृष्ट्या म्हटलें आहे. पण रामायणांतील संस्कृत श्लोकांत हें तारकामंण्डळ विश्वामित्रानें नवीन उत्पन्न करून त्यामध्यें त्रिशंकूस नेऊन ठेवण्याची तजवीज प्रत्यक्ष देवेन्द्राकडून लावून घेतली असें आहे. तेव्हां ह्या निश्चित विधानावरून असें मानण्यास अशी जागा आहे कीं आर्यावर्तांतील वशिष्ठादी ब्राह्मण व इक्ष्वाकुकुलोत्पन्न त्रिशंकू राजा यांचें सूत नव्हतें. म्हणून विश्वामित्रानें मध्यस्थ पडून त्रिशंकूस प्रथम दक्षिण अमेरिकेंत पेरू, चिली व ला प्लाटा ह्या १५०० मैलाहून जास्त मोठ्या प्रदेशांत नवीन वसाहत करून ठेविलें व त्या-प्रमाणें वसाहतीची साक्ष पुरविणारें तिकडे अद्वैत वेदान्त मत, अग्न्युपासना, मठ व स्मृतिकार वैवस्वत मनूसारखी हुबेहूब ग्रामसंस्थेपासून राजसंस्थेपर्यंत लोकनिया-

मक संघटना आढळतात. पण त्रिशंकूचें तोंड सतत उलट करून ठेविलेलें होतें, म्हणजे तो जरी देहानें दक्षिण अमेरिकेंत जाऊन पडला असला तरी त्यानें आपलें मन अखंड आर्यावर्तावर त्याचे कल्याणार्थ ठेवावें व दक्षिण अमेरिका व आर्यावर्त ( हिंदुस्थान ) यांमध्यें दर्यावरून गलबतांनीं देवघेव ठेवावी असा करार होता व त्याची साक्ष पेरू देशाच्या राजाचें इनका हें नांव इक्ष्वाकू त्रिशंकूसारखें व तिकडील यमिया प्रांतांतील त्रिशंकूचे विक्षिप्तपणासारखे देहान्त शासनाचे कायदे, त्रिशंकूच्या कुळासारखी सूर्योपासना, हिंदुस्थानांतील गलबतांसारखी नौका व त्यांच्या पायरवानें इकडे हिंदुस्थानांत येऊन अडकून पडलेलें तांबडे ओशियानाईड अथवा वैष्णव व इकडून मेक्सिको व पेरूमध्यें जाऊन रूढ झालेलें स्वस्तिक ( इनॉकचें सीक्रेट आफ पासिफिक, पान २४८ पहा ) हे पदार्थ देतात, व पुढें मर्त्य देह टाकून दिला असतां म्हणजे त्यानें देहावसान वसिष्ठाच्या म्हणण्याप्रमाणें केलें असतां त्रिशंकूच्या ह्या अपूर्व, अद्भुत, विचित्र व चमत्कारिक पराक्रमांच्या स्मरणार्थ त्यास दिव्य देह देऊन तो पहिल्या मर्त्य देहांत असतां तो परदेशीं जसा आपले मातृभूमीकडे तोंड करून होता तसाच तो त्या दिव्य देहांत स्वर्गींही मातृभूमीकडे खालीं तोंड करून त्यास तिच्या कल्याणार्थ प्रेमळ दृष्टीनें अढळ पदांत बसविलें व त्याभोंवती त्याच्या सहकारी लोकांस सप्तर्षी अथवा दक्षिणर्क्षे यांत ठेवून त्यांस त्या त्रिशंकूभोंवती फेरे घालण्यास लाविलें ! व त्यावरून नक्षत्रकार्यें तर काय पण राजकार्यें, सामाजकार्यें व गृहकार्यें सिद्ध व साधक यांची जुळणी घड्याळाप्रमाणें केल्यास सुयंत्र कशीं चालतात, एरवीं तीं कशीं कधींच सुरळीत चालत नाहींत व त्रिशंकूसारख्या अगदीं नाठाळ ठरलेल्या माणसाच्या हातून विश्वामित्रासारखा योजक सिद्ध कालवशात मिळाल्यास तो वरील पेरू व यमिया यांच्या वसाहतीबरोबर परस्पर दळणवळणानें तडीस जाणारीं व्यापारासारिखीं महत्कार्यें अनपेक्षित रीतीनें कशीं घडवून आणितो व ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या आत्मघातकी यादवीनें त्यांस निराशेनें रसातळीं नेऊन पोहोंचविलें असतां तेथें आशापूर्ण वसाहतीचा लाभ तत्र दुर्लभ योजक विश्वामित्रानें कसा करून दिला ही गोष्ट मोठी मननीय आहे ! अशा प्रकारें निराशेंतून आशा दुःखांतून सुख, अरिष्टांतून इष्ट, दुष्टापासून सुष्ट, अनपेक्षितापासून अपेक्षित अथवा लौकिक म्हणीप्रमाणें भांगेंत तुळस त्या सिद्धानें उत्पन्न केलेली नास्तिकानें पाहिली तर तो आस्तिक होऊन तो जसा खऱ्या भक्तिरसानें त्या अचिंत्य, अतर्क्य, सर्व शक्तिमान, सर्वज्ञ, व अमूर्त सद्वस्तूच्या ठायीं अनन्यगतिक तल्लीन होतो, तसा सांप्रदायी आंधळा आस्तिक कधींच होत नाहीं ! कारण असले आस्तिक हे नुसते आस्तिक म्हणवून घेत राहतात व खरे नास्तिक हे अशा अकल्पित गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन उलट खातात व आस्तिक बनतात तेव्हां ते अजागळ आस्तिक सांप्रदायी लोकांपलीकडे जाऊन ते ज्या कामांत असतात त्यांत ते अगदीं कमाल करून सोडितात ! कारण सयुक्तिक भक्तीची उसळी जितकी उंच परमा-

त्यांच्या पदकमलाकडे जाते तितकी सांप्रदायी आंधळ्या अयुक्तिक भक्तीची कधींच जात नाहीं हें पक्कें ध्यानांत धरण्यासारिखें आहे.

शेवटीं, आतां एका प्रश्नाचा उलगडा करावयाचा राहिला. तो हा कीं आपल्या पांढऱ्या व तांबड्या लोकांचे इतकें परस्पर दळणवळण होतें तर तें सुटलें कसें ? हा होय. तांबड्या लोकांच्या दोन्ही बाजूस मोठे अफाट समुद्र व सागर आहेत. म्हणून तें दळणवळण कायम राहण्यास त्यांतील नौकानयन म्हणजे गलबातांनीं जाणें येणें कायम राहिलें पाहिजे. पण इतर सर्व विद्यांप्रमाणें नौकानयनाच्या विद्येलाही एक केन्द्र असतो. तो कालगत्या व स्थलगत्या चलन पावतो. म्हणजे प्रत्येक देशांत असा एक काळ येतो कीं तेव्हां जेथें पूर्वीं मोठे धाडसी दर्यावर्दी व मोठीं तारवें पैदा होत असतात, तेथेंच धाडसी दर्यावर्दी व मोठीं तारवें पैदा होईनाशीं होतात, किंवा कधीं कधीं कोठें कोठें हिंदुस्थानासारखा असा एक अपूर्व प्रकार घडतो कीं बौद्ध धर्माच्या प्रसारार्थ देशांतील उत्तम उत्तम पुरुष इतके परदेशीं जाऊन कायमचे राहूं लागतात कीं त्यांच्या मातृभूमींत चांगल्या विचारशील लोकांची अगदीं टंचाई पडते व आपल्या मनुस्मृतीसारख्या उदार मताच्या कायद्याच्या कोडांत परदेशगमन व समुद्रपर्यटण यांवर वाळित घालणारा नियम घुसवावा लागतो, व तेणेंकरून अगदीं मोठ्या घसमटीच्या देशांतील परस्पर असणारें दळणवळण अगदीं मोडून ते एकमेकांस पारखे व अशांत होतात व कधींकधीं तोच धंदा करणाऱ्या इतर लोकांचें तद्विषयक सरस नैपुण्य कारण होतें. याचें प्रत्यंतर आमच्या पुढील नौकानयन, व्यापार व वसाहती यांच्या तीन काळांच्या तीन वर्णनांवरून जास्त पटेल.

याप्रमाणें या राशिचक्राचा व तारकापुंजांचा व्यवहारांत जो विशेष उपयोग करून दाखविण्यांत आला, त्यावरून पुढील सिद्धान्त ठरला—

(१) हिंदूंचा राशिचक्राचा चित्रपट हा कापटिक चित्रपटांचें मूळ होय व अर्थात् कापटिक व टालमिक चित्रपट हे त्या वैदिक चित्रपटाच्या सुधारलेल्या आवृत्त्या होत.

( २ ) मनुष्याची उत्पत्ती व उत्क्रान्ती क्रान्तिप्रदेशांत जीवाणूपासून एक किंवा अनेक केन्द्रांत प्रथम होऊन त्याचा प्रसार प्रथम पूर्वपश्चिम व नंतर दक्षिणोत्तर ध्रुवभागांकडे पोटापाण्याच्या सोईप्रमाणें सहज होत गेला व त्याच्यांत देशकालगत्या फरक पडून त्यांच्या निरनिराळ्या वर्णांच्या जाती झाल्या व कांहीं असानी व सुलतानी होऊन त्या जातींची मिसळ पूर्वीं झाली व सध्या होत आहे. ( शत-ब्राह्मण-२-१-३ वगैरे पहा ).

( ३ ) त्या मनुष्यांच्या पंचजन म्हणून पांढरे, तांबडे, पिवळे, काळे व फिके असे पांच वर्ण वेदांत प्रसिद्ध आहेत. ते असेः—१ पांढरे लोक ऊर्फ आर्य—हिंदुस्थान, इराण वगैरे देशांतील; २ तांबडे लोक ऊर्फ वैष्णव—मेक्सिको, युनायटेड स्टेटस, कानडा, तामिळ वगैरे देशांतील; ३ पिवळे ऊर्फ मोगल—चीन, जपान ब्रम्हदेश वगैरेंतील; ४ काळे लोक ऊर्फ सिद्दी—मिसर, सुदन, कानडा, तेलंगण,

तामिळ वगैरे देशांतील; व ५ फिके लोक ऊर्फ मले-ब्रह्मदेश, मसाल्याचीं बेटें, वगैरे टापूंतील.

टीपः—यावरून सिद्ध काय झालें ? (१) वेदोक्त वरुण व तदनुयायी यांनीं उत्तरएशियेंतून उत्तरअमेरिकेंत वसाहती केल्या व (२) वेदोक्त यम व पुराणोक्त इक्ष्वाकू व तदनुयायी यांनीं दक्षिणअमेरिकेंत वसाहती केल्या.

---

## भाग अकरावा.

### नौकानयन.

The correct forms of ships-only elaborated within the past ten years by the science of Europe-have been familiar to India for ten centuries and the vessels which carried peacocks to Ophir for king Solomon were probably the same as the fishing craft of the present day, which furnish the models the American and English clipper and Yatch builders are aspiring after-Notes on India-*Dr. Buist* (*about 1854*).

अर्थ—युरोपांतील शास्त्रज्ञ लोकांनीं गेल्या दहा वर्षांत जीं गलबतें मोठ्या मेहनतीनें बांधिलीं, त्यांचे शास्त्रशुद्ध आकार हिंदू लोकांस गेलीं दहा शतकें माहित आहेत, व ज्या गलबतांतून सालोमन राजाकरितां आफीरला मयूर ( मोर ) नेण्यांत आले, तीं हल्लीं मच्छिमारपणाचीं कामें तेथें करीत आहेत, व त्या नमुन्या-बरहुकूम अमेरिकन व ब्रिटिश लोक क्लिपर नामक गलबतें व यॉट नामक होड्या बांधण्याची हांव धरून आहेत.

हे अग्ने, आह्मांस राहण्यासाठीं व जलद चालण्यासाठीं अभंग असें सुकाणूं व वल्हीं असलेली अशी एक नौका तूं देणार आहेसच, पण ती अशी पाहिजे कीं जिच्यामध्यें आमचे सर्व योद्धे, यजमान व मुलेंमाणसें हीं बसून सर्व पार जातील व जी आम्हांस सुखाचा आसरा देतील. ( १-१४१-१२ )

तुम्ही तुग्रपुत्राकरितां महासमुद्रांत सचेतन व पंख असलेली व सुखकर अशी एक नोका तयार केलीत, तुह्मी उड्डाणकुशल आहां, तेव्हां त्या [नावेच्या] योगानें उदक-कल्लोळांतून वर उडून ईश्वराकडे लक्ष ठेवणाऱ्या त्या भक्तासह तुह्मी निघून गेलांत ( १-१८२-५ ).

तुग्रपुत्राला महासागरांत फेंकून दिलें होतें तेथें ' आरंभ ना शेवट ' अशा दाट काळोखांत तो गटंगळ्या खात असतांना अश्वी देवांनीं स्वप्रेरणेनें चालविलेल्या व समुद्रांत ( ज्यांचा आश्रय फारच ) प्रिय वाटतो अशा ह्या चार नावा त्याला सागराच्या अगदीं पार नेत आहेत ( १-१८२-६ )

आतुर झालेल्या तुग्रपुत्रानें ज्याला कवटाळून धरिलें व समुद्राच्या मध्यमार्गी जो अगदीं निश्चल उभा राहिला असा तो वृक्ष तरी कोणता असावा बरें ?

( त्याच्या योगानें ) धडपडून खालीं पडणाऱ्या एखाद्या पशूला स्वतःस सावरून धरण्यासाठीं जणूं पंखच मिळाल्यासारखे झाले. हे अश्वी देवांनो, ह्याप्रमाणें तुम्ही त्याला वांचविलेंत यामुळें तुमची कीर्ती चिरकाल राहिली ( १.१८२.७ )

India was one of the foremost maritime countries.

मागील भागांत तारकापुंजांचें वर्णन आटोपलें. आतां या भागांत आपल्या नौकानयनाचें वर्णन जमेल तितकें साधार व साद्यंत करण्याचा विचार आहे. कारण परदेशगमन वर्ज ठरविल्यापासून ह्या विषयासंबंधें जेवढा आंधेर आर्यावर्तभर पसरला आहे तितका तो दुसऱ्या कोणत्याही इतर विषयाबद्दल नसेल व हा अंधेर युक्तिप्रयुक्तीनें घालवून आपले आर्य परदेशीं ह्या देशांतून जितके विद्या, व्यापार, वसाहती वगैरे कारणांनीं जातील तितकें त्यास फारच इष्ट आहे.

अनादी ग्रंथ जो ऋग्वेद यांत नौ व प्लव यांचा अनेकदां उल्लेख करण्यांत आला आहे. ( १-११६-३;१-१८२-५;१-१३१-२;२;३९-४;८-४२-३; ८-७२-३;९-७०-१० ) यावरून त्या प्राचीनतम काळीं होड्या अथवा गलबतें होतीं व त्यांस वल्हीं होतीं. ( १०-१०१-२ ) व तीं समुद्रांत जात असत ( १-२५-७-नावःसमुद्रियः; ७-८८-३ ) व त्यांस शंभरही वल्हीं असत. (१-११६-३-४-५ शतारित्रां नावम् ) व आर्यांस होड्या व नौका बांधण्याची व तीं वहनें चालविण्याची कला चांगली अवगत होती असें स्पष्ट दिसतें. याच्या पुष्टीस ( १-११६-३-४-५ वगैरे ) ऋक्संहितेंतल्या ऋचांतील आख्यायिका विचार करण्यासारिख्या अशा आहेत ):—" एखादा मृत मनुष्य आपली मालमत्ता टाकून जातो, त्याप्रमाणें तुग्र यानें भुज्यूस भर समुद्रांत टाकून दिलें. अहो अश्विन् देवहो, तुम्ही त्यास वाऱ्यांतून जाणाऱ्या जलाभेद्य नांवांतून वाहून नेलें. तीन दिवस व तीन रात्रींपर्यंत ज्यांस शंभर पाय व सहा घोडे होते अशा तीन उडणाऱ्या वहनांतून तुम्ही त्याला नेलेंत व त्यास पाण्यानें भरलेल्या महासागरापलीकडील सुक्या जमिनीकडे नेऊन पोहोचविलेंत. शंभर वल्ह्यांनीं चालविलेल्या गलबतावर उभे राहून तुम्ही भुज्यूला त्याच्या स्वतःच्या जन्मभूमींत नेऊन पोहोंचविलेंत तेव्हां निराधार, अस्थिर, अथवा चंचळ अशा महासागरावर तुम्ही आपल्या शक्तीची शिकस्त केलीत. त्वेषानें उडणाऱ्या घोड्यांच्या सहाय्यानें तुम्ही भुज्यूला महासागरांतून वाहून नेलेंत. अहो अश्विन् देवहो, तुग्राच्या पुत्रानें आपला धावा केला. तुम्ही त्याला वाहून नेत असतां तो समुद्रावर निर्भय चालला होता. आपल्या मनोजव सुरथांत घालून तुम्ही त्याला बाहेर आणिलेंत. " " तुम्ही तुग्राच्या पुत्राकरितां महासागरांमध्यें तरण्यास ही सजीव पंखाची नौका केलीत. अगाध तमांत व जलांत बुडविलेल्या तुग्रास अश्विन् देवांनीं प्रेरित चार गलबतांनीं किनाऱ्याला लाविलें. समुद्राच्या लाटांमध्यें तो ठेविलेला ओंडा कशाचा होता बरें कीं ज्यास या संकटसमयीं तुग्राचा पुत्र आश्रयार्थ उडणाऱ्या प्राण्यांच्या पंखांप्रमाणें चिकटून राहिला होता ? भुज्यूला त्याच्या दुष्ट संवगड्यांनीं भरसमुद्रांत टाकून दिलें. ह्या गोष्टीचा उल्लेख आणखीं पुढील ऋचांत आहे:— [ १-११२-६-२०;१-११८-६;१-११९-४;१-१५८-३;६-६२-६;७-६९-१०;

८-५-२२;१०-३९-४;१०-४०-७;१०-६५-१२,१०-१४३-५] यावरून आपल्या या मायभूमींत महासागरावर जाणारे आपले आर्य नावाडी होते हें सिद्ध होतें. पण ह्या म्हणण्याच्या समर्थनार्थ असें सांगतां येण्यासारिखें आहे कीं त्या नावाड्यांत नाविक, व त्यांतील मुख्यास नौकाध्यक्ष ( नाखोदा) असें संस्कृतांत म्हणत असत. पूर्वी असले अनेक नौकानयनशास्त्रांतील शब्द प्रचारांत असतील. पण ते आमच्या समुद्रावरील अलीकडच्या गलबतांप्रमाणें कालवशात् नाहींसे होऊन त्यांच्या ठिकाणीं परकीय किताबांच्या अर्वाचीन अर्वाच्य आवडीनें नाखुदा, खलाशी, कपतान, बोटवाला वगैरे कर्णकटू पदव्या येऊन बसल्या असाव्या. कारण असलें गलबतें चालविण्याचें काम करणारे खारवे, कोळी, भंडारी वगैरे आपले हिंदू नावाडी आपल्या हिंदुस्थान-च्या किनाऱ्यावर सर्वत्र राहून सदरहू सिद्धान्ताचें समर्थन प्रत्यक्ष करीत आहेत, मग त्याच्या नौकानयनाच्या धंद्याचा सध्या कितीही अधःपात झाला असो, व त्यांच्या व इतर हिंदूंच्या परदेशगमनास खुद्द मनुस्मृती कितीही आडकाठी घालून बसो ! पण ते लोक समुद्रापलीकडील लांबचा प्रवास कसा करीत असत म्हणून पुसाल तर सांगणें कीं त्या कामास लागणारें अत्यंत जरुरीचें मार्गदर्शक साधन याची युक्ती या आपल्या मायभूमींत रावणाचा सासरा जो माईदानव यानें काढिली व तीस त्यानें मच्छयंत्र म्हणून नांव ठेविलें. ह्या गोष्टीची हकीगत काश्यप ऋषीच्या एका संहितेंत आहे असें बांबे ग्याझिटियरमध्यें कोणा पण्डितानें दिलें आहे व त्याप्रमाणें मागील तारकापुंजांचे एका भागांत हें मच्छयंत्र डोलकाठीस पक्कें खिळयास बसविलेलें असे. असें प्रत्यंतर अमेरिकेकडील आलें आहे ! व त्याचा उपयोग परवांपर्यंत इकडील नावाडी आपल्या जलपर्यटनांत घमघोकार करीत असत. तरी त्यांची सदभिरुची व स्वाभिमान कालांतरानें वरच्याप्रमाणें इतका भ्रष्ट व गलित झालेला आढळतो कीं ते त्या यंत्रास मच्छयंत्र ह्या संस्कृत नांवाच्या ठिकाणीं त्यांत परकी खलाशी मिसळूं लागल्यापासून होकायंत्रें या अर्ध संस्कृत व अर्ध आरबी अशा भ्रष्ट नांवानेंच फक्त ओळखूं लागले आहेत ! हें नवल नव्हे काय ? त्याचीं प्रमाणें व वर्णनें अशीं आहेत.–(१) " अर्वाचीन कॉंपस नामक इंग्रजी होकायंत्र याचा उपयोग हल्लीं (१८८२) या देशाच्या किनाऱ्यावरील सर्व नावाडी करितात. ह्याच्या पूर्वी एक जुनें होकायंत्र असे. त्यांतील सुई माशाच्या आकाराची असे. ती तेलाच्या अथवा पाण्याच्या भांड्यांत तरती ठेवीत असत. ती चुंबकशक्तीनें नेहमीं उत्तर दाखवीत असे. "–कर्नल जे. डब्ल्यू. वाटसन–काठेवाड.

(२) वेरावळ येथील एका खारव्यानें मला पंधरा वर्षांपूर्वी असें सांगितलें कीं मी आपला कोठ्या एडनास नेत आहें. त्यावर मी त्यास विचारिलें कीं तूं सुकाणू कशाच्या आधारानें फिरवितोस ? त्यावर तो म्हणाला कीं इंग्रजी होकायंत्राच्या योगानें अलीकडे फिरवितों. पण माझे वाडवडील हें यंत्र वापरीत नसत, तर तेलाच्या भांड्यांत तरंगत राहून उत्तर दिशा दाखविणाऱ्या लहान लोखंडी माशाच्या योगानें ते आपल्या गलबताची नाळ धरीत असत.–मिलर–(सन १८८२).

३ कुत्बनमा.—हें आपल्या मच्छयंत्राचें आरबी नांव होय. यांतील कुत्ब म्हणजे उत्तरध्रुव—हा शब्द आरबी आहे. नमा म्हणजे काटा—हा शब्द इराणी ( फारशी ) आहे. यावरून आरबांनीं इराण जिंकल्यावर त्यांनीं हा मिश्र शब्द जमविला असावा असें दिसतें. कारण इसवी सनाच्या आठव्या नवव्या शतकांत बगदाद येथील खलिफांनीं आपल्या हिंदू पण्डितांस आपल्या राजधानींत नेऊन त्यांच्या वसाहती केल्या व त्यापासून तेथील लोक नौकानयन, त्रिकोणमिती, ज्योतिष व वैद्यक शिकले, तेव्हांच त्यांस आपलें मच्छयंत्र माहीत झालें यांत संशय नाहीं. ( रैनाडचा—अबु—ल—फिदा ). तेव्हां होक्याची युक्ती आरबी दिसत नाहीं. कारण इ. स. १२८ तील एक ग्रंथकार उत्तरदर्शक मच्छयंत्र हिंदुस्थानांतून प्रथम आलें असें म्हणतो व इ. स. ५१५ तील मसूदीच्या नौकानयनाच्या इतिहासावरून असें दिसतें कीं त्या वेळच्या आरब लोकांनीं मच्छयंत्राच्या नौकानयनांत वापरण्यास प्रारंभ केला नव्हता. शिवाय, डंकनच्या पुराण्या इतिहासावरून असें ठरतें कीं आरब हे प्रथम खोल समुद्रावरील नावाडी नव्हते. कारण त्यांच्या होड्या केवळ चामड्याच्या असत, व त्या ते घेऊन येमेन व सीरियन किनाऱ्यावर फिरत असत.

४ लिंग—नान—चिन.—हें मच्छयंत्राचें चिनी नांव आहे. ह्याचा अर्थ दाक्षिणध्रुवदर्शक यंत्र असा आहे. त्यावरून ही चिनी लोकांची स्वतंत्र युक्ती दिसते. पण आरब लोकांपैकीं कोणताही ग्रंथकार चिनी नावाडी एखाद्या प्रकारचें मच्छयंत्र नौकानयनांत वापरीत असत असें म्हणत नाहींत. पण आपले हिंदू लोक आठव्या व नवव्या शतकांत चिनी लोकांपेक्षां तत्वज्ञान व ज्योतिष यांत पुष्कळ पुढें होते. असें स्पष्ट म्हणतात कीं चिनी लोकांचें होकायंत्र बाराव्या शतकांतील आहे व हिंदू लोक हे हिंदी महासागरांतील मुख्य खलाशी व वसाहतकार होऊन गेले आहेत, तर चिनी होक्याचा हिंदूंच्या मच्छयंत्राशीं कांहीं संबंध दिसत नाहीं.

५ ज्योतिषीः—निकोलो कोंती नामक एक इतालियन प्रवासी व फ्रा मौरो नामक इतालियन ग्रंथकार हे म्हणतात कीं हिंदूंच्या प्रत्येक गलबतावर ब्राह्मण ज्योतिषी असत. त्यांस वादळें उठवितां व शमवितां येत असत, व त्यांतील दुसरा गृहस्थ म्हणतो कीं एक गलबत ह्या आपल्या मायभूमींतून आफ्रिकेंत जात असतां तें तुफानांत २००० मैल दक्षिणेस व पश्चिमेस वाहत गेलें तेव्हां त्या गलबतावरील ज्योतिषानें तें उत्तरेस चालवून सत्तर दिवसांनीं मार्गावर आणिलें. असल्या वादळांत सूर्य व तारे अनेक दिवस अदृश्य असतात; तर त्या ज्योतिषांजवळ मच्छयंत्र असल्याशिवाय त्यास त्या गलबतांस इतर साधनांनीं कांहीं केल्या बचावितां आलें नसतें. यावरून जोशी हें काम करण्यास मच्छयंत्रें आपलेजवळ ठेवीत असलेच पाहिजेत—हें सिद्ध होतें, मग तीं गुप्त का असतना.

६ गलबतें:—आपल्या पश्चिम हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर आरमार, बारकस, गलबत घुराब, जहाज, नाव, तिरकटी, छबिना, मचवा, महागिरी, पडाव, पातीमार, फणी, कोत्या, ताराफा, बांबोट, होडी, पगार, वगैरे अनेक प्रकारचीं जलवहनें प्रचारांत आहेत.

त्यांपैकीं शेकडा ८० वहनांची नांवें देशी आहेत, बाकींची आरबी वगैरे विदेशी आहेत. सुकाणू, डोलकाठी, परबाण, शीड, कप्पी, इडाळी, वल्हें, नांगर वगैरे साहित्य त्यावर असतें. त्यापैकीं बऱ्याच साहित्यांची नांवें नुसतीं देशीच नव्हे तर गांवठीहि आहेत. पण घोसकर म्हणजे वारा घर व दमान कर म्हणजे वारा सोड किंवा नुसत्या घोस व दमान ह्या संज्ञापैकीं पहिली इराणी व दुसरी संस्कृत आहे या गलबतांस लागणारा साग कोकण व मलबार यांत व कापूस देश व गुजराथ यांत मुबलक मिळतो. तसा तो आरबस्तानांत वगैरे जवळपासच्या देशांत मिळत नाहीं. म्हणून हे दोन्ही जिन्नस इकडून त्या आसपासच्या देशांत केवळ इमारती बांधण्यास नेल्याचे उल्लेख आम्हांस पुराणवस्तुशोधनांत अनेक ग्रंथांत आढळले आहेत. त्यापैकीं कांहीं संदर्भानें पुढें दाखविण्यांत येतील.

७ वणिग्जन—वणिग्जन हे संस्कृत नांव वाण्यांचें आहे. त्यास ग्रीक प्रतिशब्द फिनिशन हा आहे. हे लोक आपल्या ठाणें जिल्ह्यांतील प्राचीन व्यापाराचें केन्द्र जें सोपारें अथवा शूर्पार्क येथील होत. ह्याबद्दल लेखी पुरावा असिरियांतील तळघरांत सांपडलेल्या विटांचा ( टॅबलेटस ) पूर्वीं दिला आहे हें वाचकांस आठवत असेलच. हे लोक ठाणें जिल्ह्यांतील आपल्या ह्या मायभूमीच्या अनेक भागांतून आणून सोडिलेला अनेक प्रकारचा माल घेऊन बाहरीन बेटाजवळील घेरा येंथे नेत असत. म्हणून ह्या ठिकाणास सोपारें किंवा ओपीर हें नांव परदेशियांनीं दिलें होतें. ह्या आमच्या व्यापारी लोकांनींच आपलीं ब्राह्मी मूळाक्षरें प्रथम मिसर व नंतर ग्रीक म्हणजे अयोनियन किंवा यवन लोकांस शिकविलीं व त्यां लोकांपासून त्यांचें म्हणजे लिपिज्ञान सर्व युरोपखंडभर पसरलेलें आहे. ह्या वाण्यांनीं आपला व्यापार आपल्या पृथ्वीच्या मधोमध असलेल्या भूमध्यसमुद्राच्या प्रलयानंतर शिल्लक राहिलेल्या भूमध्यसमुद्राच्या कांठच्या देशोदेशीं पसरीत नेला तेव्हां त्यांनीं त्यांचें बीं पक्षांप्रमाणें आपल्या चोचींतून नेऊन त्या देशच्या बंदरोबंदरीं पेरिलें असें ठरतें. हिरोडोटस नामक विद्वान म्हणविणारा यवन इतिहासकार असें म्हणतो कीं "इजिप्त देशाचा राजा पारोवानिको ह्यानें लिबिया ऊर्फ आफ्रिका हिजभोंवती ह्या वणिग्जनांस गलबतांतून जाऊन जिब्राल्टरच्या सामुद्रधुनींतून (द्यौस्पितराच्या) ( जुपिटर ) स्तभांतून परत येण्यास सांगितलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं तो प्रवास त्याच्या प्रारंभापासून तिसऱ्या वर्षीं आटोपला. पण त्यांनीं सूर्य त्या प्रवासांत आपल्या उजव्या हाताकडे खऱ्या प्रकाराप्रमाणें उगवतो असें यथादृष्ट सांगितलें पण तें त्या राजाच्या दरबारांतील कोणत्याही पण्डितास पटलें नाहीं ! एवढेंच नाहीं तर तें मलाही (हिरोडोटस) पटलेलें नाहीं ! !" हा वेड्यांचा बाजार नव्हे काय ?

सारांश, पूर्वोक्त पांढऱ्या आर्य व तांबड्या द्रवीड लोकांच्या अथवा गौड व द्रविड यांच्या मिश्रणापासून झालेल्या हिंदू लोकांनीं वैदिक काळापासून मच्छयंत्र प्रचारांत आणून आपल्या ह्या मायभूमींतच नव्हे तर लांबच्या हिंदी महासागरापलीकडील देशोदेशीं व्यापार व वसाहती केल्या असें दिसतें. त्याप्रमाणें, तसा पराक्रम त्यांच्या आंगीं वसत होता अशी आमची बालंबाल खात्री आहे. पण

हातच्या काकणाला आरसा कशास हवा ? ही गोष्ट खरी कीं खोटी याचें प्रत्यंतर पुढील वर्णनावरून प्रत्यक्षच घेऊं.

**वर्णन.**—कोकणच्या किनाऱ्यावर इ. स. १५० च्या सुमारास समुद्रावरून जीं गलबतें फिरत असत त्यांचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें.—( १ ) लहान, ( २ ) मध्यम व ( ३ ) मोठीं. जीं गलबतें लहान असत, तीं कोकणच्या किनाऱ्यानें फिरत असत. जीं गलबतें मध्यम असत, तीं इराण देशापर्यंत सफरी करीत असत. जीं गलबतें मोठीं असत, तीं येमेन व इजिप्तपर्यंत सफरी करीत असत. हीं मोठीं गलबतें—हिंदूंचीं, आरबांचीं व ग्रीकांचीं असत. ( व्हिन्सेन्ट २.३३·३७,३८ ). ग्रीक [ यवन ] व इजिप्शियन [ मेसरी ] लोकांची गलबतें मोठीं असून त्यांवर पुष्कळ खलाशी असत व त्यांस चाच्यांचा उपद्रव होऊं नये म्हणून त्यांवर तिरंदाज असत. ते एका वर्णनाप्रमाणें रोमन असत व दुसऱ्या वर्णनाप्रमाणें आरब असत असें दिलें आहे [ प्लिनीची नॅचरल हिस्टरी ] [ बु. ६, भा. २३ व पेटन्टचीं मतें, १-१०४ ]. लढाऊ गलबतांपेक्षां हीं वाटोळीं व ऐसपैस असत व तीं व्यापारी गलबतें आहेत म्हणून खूण पटविण्याकरितां त्यांच्या डोलकाठ्यांच्या शेंड्याशीं एक टोपली टांगलेली असे. ते त्यांच्या कोठ्यास मेण फाशीत असत, व त्यांवर नाळीच्या संरक्षक देवतांचीं चित्रें असत. त्यांचे मालक हिंदू, आरब व ग्रीक असत. लिंडसे [ मर्चंट शिपिंग, १-१०८ ] याचें असें मत आहे कीं ग्रीक लोकांचीं गलबतें मोठ्या आकाराचीं असत. त्यांत खलाशांशिवाय व गव्हांच्या ओझ्याशिवाय २७६ उतारू राहत असत. त्याला तक्तपोशी असे. त्यांची आघाडी व पिच्छाडी रुंद असे. त्यांवर कड्यांचे बुरूज असत. त्यांना तीन डोलकाठ्या असत. त्यांतल्या सर्वांतील मोठ्या डोलकाठीस मोठें चौरस शीड असे तसें लहान काठीसही लहान चौरस शीड असे. हीं गलबतें वाऱ्यापुढें चांगलीं चालत, पण वारा उलट झाला कीं तीं मंदगतिक होत.

टीपः—ह्या युरोपियन ग्रंथकारांच्या वर्णनांतील आत्मप्रौढीचा भाग—आधीं सोनार नी मग पृथ्वी होणार—ह्या म्हणीप्रमाणें जरूर बाद केला पाहिजे; कारण त्यांस त्यावेळीं वस्तुस्थिती समजण्याइतकेंही शास्त्रज्ञान नव्हतें हें त्यांतील हिरोडोटस नामक महापण्डितानें वणिग्जनांचा उपहास करून स्वतःचें हसें करून कसें घेतलें हें आपण वर पाहिलेंच आहे. ते केवळ भाडोत्री कामें करण्याच्या योग्यतेचे होते.



# भाग १२ वा.

## व्यापार व वसाहती.

याज्ञवल्क्य स्मृतींत व्यापार करणाऱ्या मनुष्यांचा उल्लेख आहे. ( इ. स. पू. ३०० ओपर्ट, मद्रास जर्नल, ( १८७८ ) ( १९४ )

" She (India) cultivated trade relations not only with the countries of Asia, but also with the whole of the known world, including the countries under the dominion of the Roman Empire, and both the East and the West became the theatre of Indian commercial activity and gave scope to her naval energy and throbbing international life."—*Prof. Radhamukund Mukarji–Indian Shipping P. 4.*

अर्थः—हिंदुस्थानच्या व्यापाराचा संबंध एशियेंतील देशांशीं होता; एवढेंच नाहीं तर रूमशामच्या बादशाहींतील देशांसुद्धां तेव्हां सगळ्या ज्ञात जगाशीं होता व पूर्वेकडील व पश्चिमेकडील देश हिंदू लोकांचा व्यापाराच्या नाटाकाची रंगभूमी बनले व त्यांनीं नाविक उद्योग, व फुरफुरणाऱ्या देशांतील जीवनक्रम यास सवड करून दिली.

" From the looms of Dacca went forth those wonderful tissues that adorned the noblest beuties of the court of Augustus Cæsar, bearing in the Eternal City the same designation sixteen centuries ago as that by which cotton is still known in India "—*Notes on India–by Dr. Buist.*

अर्थः—आगस्टस सीझरच्या दरबारांतील अत्यंत नामांकित सुंदरींस अलंकृत करणारें चमत्कारिक कापड डाक्का येथील मागावर निघत असे व त्यास हल्लीं हिंदुस्थानांत ज्या नांवानें ओळखतात त्याच नयनसुख, मलमल या नांवानें सोळाशें वर्षांपूर्वीं ओळखीत असत.

" An anonymous writer of the first century A. D. has described the trade in some detail, and from his work we learn that India exported spices, precious stones, and large quantities of muslin and other cotton goods. In return India took gold, silver, brass or copper, tin, lead, coral and cloth. The value of this trade must have been considerable, for Pliny complains that the annual drain of specie from Europe to India was never less than 55,000,000 sestertic ( £ 458,000 )—Imperial Gazeteer, III, 25, 258.

अर्थः—पहिल्या इ. सनांतील एका निनावी ग्रंथकारानें ( हिंदुस्थानच्या ) व्यापाराचें वर्णन केलें आहे. त्याच्या ग्रंथावरून असें दिसतें कीं हिंदुस्थानांतून परदेशीं मसाले, जवाहीर, पुष्कळ मलमल, व दुसरें कापड जात असे. त्याच्या मोबदल्यांत तें सोनें, रुपें, पितळ, अथवा तांबें, कथील, शिसें, पोंवळीं व कापड घेत असे. ह्या व्यापाराची किंमत फार असली पाहिजे व प्लिनी अशी तक्रार

करितो कीं युरोपांतून हिंदुस्थानांत वार्षिक संपत्तीचा निर्गम ४,५८,००० पौंडाचा होत असे.

मागील भागांत अनादी नौकानयनाचें विवरण आटोपलें. आतां या भागांत आमच्या अनादी व्यापाराचें विवरण कर्तव्य आहे.

परदेशगमनः—ऋग्वेद, रामायण व महाभारत या ग्रंथांच्या तत्वावरून असें दिसतें कीं ह्या ग्रंथांच्या काळांत लोकमताचा झोक गलबतांतून परदेशीं व्यापाराच्या तर काय पण वसाहतीच्याही उलट नव्हता. आतां मनुस्मृतींत परदेशगमनास प्रतिबंध केलेला आढळतो. पण तो पुढें पूर्वी सांगितलेल्या विशेष कारणाकरितां करण्यांत आलेला आहे. बौद्ध व जैन लोकांच्या अमदानींत विद्वान, धनाढ्य कारागीर वगैरे लोक धर्मोपदेशाचें पुण्य व पैशाच्या पिशव्या पदरीं पाडण्याच्या वेडानें परदेशीं कायमचे गेल्यानें आपल्या ह्या मायभूमीचें अपरिमित व दुसऱ्या कशानें भरून काढितां न येण्यासारिखें नुकसान होतें असें अनुभवास येऊं लागलें तेव्हां सदरहू अटकाव मनुस्मृतींत घालून ठेवण्यांत आला. पण वेड्यास आपलें वेडेपण समजून घेण्याचें सामर्थ्य कोठें असतें ? म्हणून त्या अटकावास न जुमानतां ते लोक स्वतःचा नाश धडधडीत होतांना दिसला तरी परदेशांत राहण्यास बेलगाम अनेक शतकें जातच राहिले, व हा प्रतिबंध कोणी शिरसामान्य केला असेल तर तो वरच्या दर्जाच्या कांहीं लोकांनीं म्हणून इतिहासपूर्व काळापासून हिंदीमहासागराच्या झाडून सर्व किनाऱ्याच्या लोकांमध्यें मोठा भरणा जलस्थलमार्गांनें व्यापारी, वसाहतकार व प्रवासी, फार तर काय पण मजूर म्हणून गेलेल्या हिंदू लोकांचा आढळतो. कारण त्याच्या ठायीं धैर्य व साहस यांची उत्कट इच्छा व आवड स्वाभाविक होती. वरील कृत्रिम निर्बंधानें एकदम अंमल होण्यासारिखा नव्हता. तेणेंकरून असें झालें आहे कीं आपले हिंदू लोक आपल्या मायभूमींत कोंडले राहून परदेशी लोकांस व्यापाराचे अमोलिक जिन्नस पुरविण्याचें काम अनादी काळापासून करून राहिले आहेत असें पूर्वी बिलकुल कधींही झालेलें नाहीं असें दिसूं लागलें. यास अनेक प्रमाणें आहेत.—

विन्सेट ( प्राचीन लोकांचा व्यापार, २. ४५. २८१–४२३ ), हिरन ( इतिहासाचे शोध, ३. ४०८ ), रैनाउड, ( अबु–ल–फिदा व मेमॉयर ),—यांचें असें मत आहे कीं हिंदू व अरब लोक व्यवस्थित व्यापाराच्या नांवांच्या सहाय्यानें इतिहासपूर्व काळापासून पश्चिम हिंदुस्थानांतून इराण, अरबस्तान व आफ्रिका ह्या देशाशीं व्यापार करीत आले आहेत. ह्या समजुतीस एक पुरावा आहे. तो हा कीं अरब लोक हिंदी मसाल्याचा व्यापार करीत असत असा उल्लेख जुन्या कराराच्या पहिल्या पुस्तकात ( इ. पू. १७००, भाग १८ ) आहे; प्राचीन काळीं इजिप्शियन लोक हिंदुस्थानांतील चिजांचा उपयोग करीत असत ( विल्किन्सनचे प्राचीन इजिप्शियन लोक, लोकोपयोगी आवृत्ती, २. २३७; रावलिसनचा हिरोडेटस, २. ६४. २७५; मिसेस मॅनिंगचें प्राचीन हिंदुस्थान २. २४९ वगैरे ); व विल्फोर्डप्रमाणें ( एशियाटिक रीसर्चेस, १०. १०० )

व लासेनप्रमाणें हिंदू लोकांनीं सकोत्रा ( सुखतर ) नामक बेट व अरबस्थानचा पूर्व किनारा यावर वसाहत केली आहे, त्यास आणखीं पुरावा आहे. तो हा कीं एडनच्या आरबांनीं हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर वसाहत केली व सकोत्रांतील वसाहतकार हिंदुस्थानशीं व्यापार चालवीत असत ( अग्याथर सायडीस, इ. स. पू. १७७, व्हिन्सेन्ट,३८; फ्लिनीचें कोकण किनाऱ्यावरील झिझेरस अथवा जझरा ( इ. स. ७७ ) व टॉलमीचें मेलीजायझेरस ( इ. स. १५० ) हें जंजिऱ्याचें नांव आरबी आहे; सेफारे हएल-हेंडे व सेफास्टे- एल झेंडे यांचा ठाणें जिल्ह्यांतील सोफला किंवा सोपारें व आफ्रिकेंतील सोफला यांचा परस्पर मेळ आहे ( व्हिन्सेन्ट, २. २८१. २८२ ); व पेरिप्लसचें ( व्हिसेन्ट, २. ४२३ ) असें म्हणणें आहे कीं हिंदुस्थान, आफ्रिका व अरबस्तान यांचा परस्पर व्यापार ग्रीक लोकांच्या काळापेक्षां पुष्कळ जुना आहे.

इजिप्शिन लोकांनीं हिंदुस्थानाशीं व्यापार चालविला होता कीं नाहीं ? याबद्दल संशय आहे. शंकहर नामक इजिप्शन राजानें पंत नामक क्षेत्रावर प्राचीन काळीं ( इ. स. पू. २५०० ) स्वारी केली होती. तें हिंदुस्थान होय अशी पूर्वी समजूत होती ( क्यांपोलायनचें ईजिप्त, १-९८ ) पण पुढील ग्रंथकर्ते तें स्थळ इजिप्तजवळच होतें; ब्रूक्स ( पारोवाच्या अमलाखालील इजिप्त, १-११४ ) सोमालीच्या किनाऱ्यावर; व डंकरचा जुना इतिहास, १-१५०-१५७-३१४ ) दक्षिण अरबस्थानांत होतें असें म्हणतात. पण हें म्हणणें खरें धरिलें तर आपले विवेकानन्दांच्या मागील म्हणण्याप्रमाणें मलबारच्या किनाऱ्यावर आपले हिंदुस्थानाचें पंट होतें तर त्यास अनुसरून हें तद्देशीं दुसरें पंट असलें पाहिजे. इ. स. पू. १६०० च्या सुमारास इजिप्शन लोकांजवळ इंद्रनील, कमळें, तीळ, काळीं मिर्‍यें, वेलदोडे, सुंठ, दालचिनी, मलमल वगैरे हिंदुस्थानांतील माल असे ( विल्किनसनचे प्राचीन इजिप्शियन, लोकोपयोगी आवृत्ती, २-२३५; रावलीसनचा हिरोडोटस, २-६४-१६८-१७३-२७५ ); पण त्यांनीं, हिंदुस्थानाशीं प्रत्यक्ष व्यापार केला असेल असें दिसत नाहीं.

मागें सांगण्यांत आलें आहेच कीं वणिग्जन ऊर्फ फिनिशन यांचा संबंध ठाणें जिल्ह्यांतील सोपारें ( शूर्पारक ) गांवाशीं पूर्वापार होता. इ. स. पू. ११०० ते ८५० तेथून मुख्य निर्गत पुढील मालाची होत असे.-सोनें, कथील, चंदन, कापूस, गुग्गुळ, साखर, दालचिनी, काळें मिरीं, मोर, माकडें, हस्तिदंत, व अबनूस ( मॅक्स मुल्लरचें भाषाशास्त्र, २९०; काल्डवेलचें द्रविड व्याकरण, ९२). आयात माल बहुधा दारू, गुलाम, मातीचीं व धातूचीं ताटें, दागिने, हत्यारें, कांच, रुपें, कशिद्याचें व विणलेलें कापड ( डंकर, २-७२-७३-२८४-२९१-३०६ )

हिंदुस्थानचा संबंध आरबस्थान व आफ्रिका यांशीं जितका जुना आहे, त्यापेक्षां तो इराणच्या अखाताशीं जास्त जुना आहे. कारण ही सफर फार जवळची आहे व इराणच्या अखातांत गलबतें चालविणें सोपें आहे, व अंतर्गत

मार्ग फारसा ओसाड नाहीं. बाबिलोनियाच्या दंतकथांस प्रारंभ पूर्वी सप्रमाण दाखविल्याप्रमाणें दक्षिण समुद्रांतून आलेल्या लोकांपासून होतो. ह्या लोकांनीं बाबिलोनियाच्या लोकांस आपला देवधर्म व विद्याकला शिकविल्या. एका कथेप्रमाणें हे लोक इजिप्तमधून आले व दुसऱ्या कथेप्रमाणें ते हिंदुस्थानांतून गेले, व त्यांचा मुख्य गुरू अंदुबार नांवाचा हिंदू होता ( हीरनचे ऐतिहासिक शोध, २-१४५; रौलिसन, रॉयल एशिआटिक सोसाइटीचें जर्नल—नवाक्रम–२०१–२०८–२१८ ). रौलिसनचें असें मत आहे कीं इराणच्या अखाताच्या पश्चिमेस बेहरीन बेटाच्या जवळ मुख्य भूमीवर घेरा येथें हिंदुस्थानच्या व्यापाराचें केन्द्र प्राचीनतम काळापासून होतें, व तें सालोमनचें ओफीर असावें; कारण ह्या घेराचें जुनें नांव अमीर असें होतें ( सदर २-१४१. )-मूळचे व्यापारी वणिग्जन ( फिनिशन ) होते. प्राचीन इतिहासाप्रमाणें ते बेहरीन येथून वायव्येस भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर गेले ( रौलिसनचा हिरोडोटस, ४–२४१; लासेनचें इंड, २-५८९; रौलिसन, रॉयल एशियाटिक सोसायटीचें जर्नल, १२–२१९ )

इराणच्या अखाताच्या माथ्याच्या व्यापाराच्या संबंध हिंदुस्थानाशीं प्राचीनतम काळापासून होता. इ. स. पू. ईसाया ( ४३-१४ ) यांत असें वर्णन आहे कीं बाबिलोनियन लोकांस आपल्या गलबतांबद्दल मोठा आनंद वाटत असे व सातव्या शतकाच्या शेवटीं नेबुशद नेझर ( इ. स. पू. ६०६-५६१ ) यानें इराणच्या अखातावर बळकट फरसबंदी, बंधारे व धक्के बांधिले व लंका व पश्चिम हिंदुस्थान यांशीं व्यापार चालविला (रौलिसनचा हिरॉड, १-५१३; हीरन, २ ४१५-४१७) व तो हिंदुस्थानांत लोकरीचें व तागाचें कापड, मातीचीं भांडीं, काच, जवाहीर, चुना व उटणीं पाठवीत असे व तेथून लाकूड, मसाले, हस्तिदन्त, अवनूस, रत्नें, किर्मिजी रंग, मोत्यें व सोनें आणीत असे (हीरनचे ऐतिहासिक शोध, २-२०९, २४७; डंकर, १-३०५ ). इ. स. पूर्वी सहाव्या शतकांत देदन अथवा बेहरिन येथील लोक अबनूस, व हस्तिदन्त टायर येथें ( इ. स. पू. ५८८; इझेकेल, १७-१५ ) आणीत असत.

इराणी लोक ( इ. स. पू. ६३८–३३० ) व्यापाराचा वीट मानीत असत व म्हणून त्यांनीं टायग्रीस नदीचीं मुखें बंद करून टाकिलीं ( प्लासेनचें इंड, व २-६०६; रूकचा एरियन, २-१४९; हीरन, २-१४७–२४५ ) व हिंदुस्थानांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें वीट मानणारे लोक सत्ताधीश झाले व त्यांनीं मनुस्मृतींत (इ. स. पूर्वी ३००) समुद्रपर्यटण हा गुन्हा होय असें ठरविणारा नियम करून घातला. त्याचीं कारणें मागें दिलीं आहेत. पण ते व्यापारविद्वेषी खचित नव्हते. ( इंडियन ऍंटिक्विटीज, ४-१३८ ) हा नियम मनूच्या इतर नियमांच्या विरुद्ध आहे. ( हीरनचे ऐतिहासिक शोध, ३-३४९, ३६०, ३६९ ). एवढेंच नव्हे तर ही गोष्ट ऋग्वेद, रामायण व बौद्धलोक यांतील व्यापाऱ्यांच्या मान्यतेच्या विरुद्ध आहे. कारण, ऋग्वेद, रामायण, भारत व बौद्ध काळांत व्यापाऱ्यांची मोठी बडेजाव चाललेली असे ( प्राचीनतम वैदिक काळ व रामायणकाळ यांतील

हिंदूंच्या व्यापाराच्या जोमाबद्दल विल्सनचा ऋग्वेद, १-१६२; लासनचें इंड, २-५८१; मिसेस मॅनिंगचें प्राचीन हिंदुस्थान, २-३४७; काल्डवेलचें द्रवीड व्याकरण, १२२; हीरनचा ऐतिहासिक शोध, ३-३६३, ३६६, ३८ व बौद्धांच्या व्यापाराच्या मानमान्यतेबद्दल बनौफीचा उपक्रम, २६०; र्‍हिस डेव्हिड्सच्या बुद्धाच्या जन्मकथा, १०-१३८,१४९,१५७; व मिसेस मॅनिंग, २-३६४ पहा ). ह्या ब्राह्मणांच्या व इराण्यांच्या व्यापाराविषयीं दुजाभावामुळें व विशेषतः समुद्रगत व्यापाराच्या द्वेषामुळें शिकंदर बादशहाच्या वेळीं (इ. स. पू. ३२१-२६ ) हिंदुस्थानचा इराणशीं असलेला व्यापार साफ बुडाला होता. सिंधमध्यें त्यानें पुष्कळ तपास केला व त्याचा सरदार निआर्कस यानें कराचीपासून इराणच्या अखातापर्यंत सफर केली तरी त्यास धुपानें भरलेलें एक गलबत सिंधूनदीच्या मुखापासून इराणच्या आखातावरून आरबस्थानच्या किनाऱ्याकडे जाणारें आढळलें. तेंच काय तें आमच्या प्राचीनतम जगडव्याळ व्यापाराचें अवशिष्ट चिन्ह होतें. रूकचा एरियन, २-२६२,२८२,२८६; व्हिन्सेन्ट, २-३८० ). बौद्धलोक ( इ. स. पू. २६० ) इराणशीं व्यापार वाढवूं पहात होतें ( इंडियन ऍंटिक्वरी, २-१४७ ). इ. स. पूर्वी पहिल्या व दुसऱ्या शतकांत बेहरीनच्या प्राचीन व्यापाराचें पुनरुज्जीवन झालें, व मुख्य जमिनीवरील पूर्वोक्त घेराचा हिंदुस्थानशीं असलेला व्यापार वाढला. (हीरन, २-१००, १०३,११८, १२४-१३६ ) तेथील मुख्य आयात म्हटली म्हणजे कापूस व साग यांची होती, पण ते हिंदुस्थानांतून येतात अशी पुढें तिकडील लोकांची बालंबाल खात्री झाली ( हीरन, २-२३७, २३९ पहा ).

अशोक बादशहाच्या कारकीर्दींत पश्चिम हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर इजिप्तमधून पैसा प्रत्यक्ष असा प्रथम येऊं लागला, पण त्या वेळीं व्यापार मोठा होता असें दिसत नाहीं. पण सह्याद्रीच्या नाना घाटांतील एका शिलालेखावरून ( इ. स. पूर्वी १०० ) असें दिसतें कीं, तेथील शातवाहन राजाच्या कारकीर्दींत तो व्यापार अती वाढला व कोंकणचा सर्व प्रदेश श्रीमंत झाला. इ. स. पूर्वी ३० त रोमन लोकांनीं इजिप्त जिंकिलें व आपलें हिंदुस्थान व इजिप्त यांमधील व्यापारास ऊत आला. तो इतका कीं तसा व्यापार टालमीच्या कारकीर्दींत कधींही दृष्टीस पडला नाहीं. थोड्याच वर्षांत ( इ. स. पूर्वी ६५ ) तांबड्या समुद्रांत हिंदू गलबतांचा जो काफला पूर्वींपासून होता, त्याची वाढ १२० गलबतांपर्यंत झाली. रोमन लोक इराणच्या अखातांतून किनाऱ्याकिनाऱ्यानें कराचीस येत असत. शेवटीं इ. स. ४७ त हिपलस यानें नियतकालिक वारे शोधून काढिले. या वाऱ्यावर ते प्रथम जंजिऱ्याला व पुढें मलबार किनाऱ्यावरील मुरिया कोठला जात असत. रोमन लोकांस मसाले फार आवडत असत; ह्मणून या वेळीं मलबारच्या किनाऱ्यावरील व्यापाराची फार भरभराट झाली.

" आगस्टस बादशहाच्या कारकीर्दींत ( इ. स. पू. ३६ तें इ. स. १७ ) रोम शहरांत मसाल्याच्या दुकानांचा एक मोठा रस्ता होता, व पोंपियाच्या अंत्य-

विषीच्या वेळीं नीरोबादशहानें एका वर्षाचें मसाल्यांचें पीक त्या कामीं लाविलें असें म्हणतात. रॉबर्टसनचें हिंदुस्थान, ५६–५७; हिरनचे एशियेंतील शोध, २–९–४६६. प्लिनीच्या मताप्रमाणें या वेळीं रोममधून हिंदुस्थानांत दरवर्षी १,४०,००.००. रुपये येत असत, पण व्हिन्सेंन्टच्या हिशोबाप्रमाणें ते ८० लक्ष येत असत."

पण याप्रमाणें मलबारास जाण्यापेक्षां त्यांना आपल्या कोंकणांत येणें जास्त सोयकर असे. ते आरबस्तानच्या किनाऱ्यानें फरतक भूशिरापर्यंत येत असत, व त्या फरतक भूशिरापासून चौल किंवा जंजिरा येथें येत असत. तेणेंकरून शातकर्णी राजांच्या वेळीं कोकणची संपत्ती अतीशय वाढली. साष्टी तालुक्यांतील कान्हेरीची व थळ घाटाच्या रस्त्यावरील नाशिकची त्रिरश्मी येथील लेणी, बोरघाटाच्या रस्त्यावरील वेडसें, भाजें, कार्ली व कोंडाणें येथील लेणी, सोपारें येथील स्तूप, व घाराघुरी व कल्याण येथील लेणीं यांचे अवशेष आहेत. ते अवशेष त्या वेळचे तेथील राजे व व्यापारी ह्यांच्या बेसुमार संपत्तीची व कारागिरांच्या कौशल्याची साक्ष देतात. ही संपत्ती अतीशय वाढण्याचें मुख्य कारण असें आहे कीं शातकर्णी राजांचा अंमल कोकणपासून कृष्णानदीच्या मुखापर्यंत पसरला होता. ह्या पूर्व व पश्चिम हिंदुस्थानच्या किनाऱ्यांच्या राजकीय व व्यापारी संबंधाच्या योगानें स्थानिक मालाप्रमाणें बंगाल व इतर पूर्वेचा किनारा यांवर मिळणारा माल मच्छलीपट्टण, तगर व पैठण या शहरावरून वरील बंदरीं निरामयपणें आणितां येत असे. यास प्रमाणें:—

"मॅकक्रिंडिलचा पॅरिप्लस*–१२६ यावरून असें दिसतें कीं हा माल सह्याद्रीचे घाटमाथ्यावरून पूर्वेस दक्षिणेंतून गाड्यांनीं पैठणास जात असे व तेथून दहा दिवसांच्या रस्त्यावरील तगर येथें जात असे. दक्षिण हिंदुस्थानांत तगर हें व्यापाराचें मोठें केन्द्र होतें. या केन्द्रस्थानीं बंगालपासून किनाऱ्याच्या देशांवरील माल जमा करण्यांत येत असे. असें मानण्यास हें सबळ कारण आहे कीं चीन व पूर्वेकडील द्वीपसमूह यांतून ज्या मार्गांनीं रेशमी वस्त्रें, रेशिम व उत्तम मसाले येत असत त्यांपैकीं हा एक मार्ग होता ( हीरन, ३–३८४ याशीं तुलना करा ) टॉलमी म्हणतो कीं कृष्णानदीच्या मुखाजवळ एक मैसोलिया नांवाचें शहर होतें ( तें उघड हल्लीचें मच्छलीपट्टण होय ) व त्याचे जवळ एक अलोसिक बंदर होतें. तेथून गलबतें मलाक्का अथवा सुवर्णभूमीकडे जात असत ( वर्टियस, एशियेचे नकाशे १० व ११ ) हें शहर इतकें महत्वाचें होतें कीं आपली गोदावरी नदी ही टॉलमीला मैसोलॉस नदी म्हणून ठाऊक होती. ( सदर ). पेरिप्लसमध्यें कारोमांडल किनाऱ्यावर एक मसालिया शहर दिलेलें आहे. तें तेथील मलमली-

*हें एक पुस्तक आहे. तें यवन ( ग्रीक ) व्यापारी व नावाडी यांच्या उपयोगाकरितां लिहिलेलें आहे. यावरून काय समजतें ? तें इराणच्या अखातांतून पश्चिम हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर जाण्याचा मार्ग दाखवितें. ह्याचें सगळें नांव पेरिप्लस मारिस एरिथ्रिई–असें आहे. पण ह्यांच्या कर्त्याचें नांव कोणास माहित नाहीं–रॅपसन.

करितां प्रसिद्ध होतें ( मॅकक्रिंडल, १४६; व्हिन्सेन्ट, २-५२३ ). तगरहून किनाऱ्यावरील देशांतून भडोचला येणाऱ्या एका कापडाला पेरिप्लसमध्यें मलोचिनान असें नांव होतें. तें चुकीचें असावें असा व्हिन्सेंटला संशय आहे. ( व्यापार, २-४१२,७४१,७४२ ) यास मसुलिवान अथवा मसूली कापड असें म्हटलें पाहिजे ( मॅकक्रिंडल, १३६; व्हिन्सेन्ट, २-१२ ). यावरून इंग्रजी मस्लिन हा शब्द साधला आहे. मोसिला हें मलमलीचें आरबी नांव आहे ( यूल १-६९ ). मार्कोपोलोच्या वेळीं ( २९० ) मच्छलीपट्टण जवळ मुदापल्ली ह्मणून गांव होतें. तें कोळ्याच्या जाळ्यासारख्या तलम कापडाबद्दल विख्यात होतें. मच्छलीपट्टण व ठाणें यांतील व्यापार अगदीं अर्वाचीन काळपर्यंत कायम होता. सतराव्या शतकाच्या मध्यभागीं थेवनॉट याचे पाहण्यांत असें आलें कीं (हॅरिस, २-३७३-३८४ ) चीट व दुसरे कपडे मच्छलीपट्टणाहून गोवळकोंडें, चांदोर व नासिक व थळघाट यांवरून ठाणें जिल्ह्यांतील बंदरांत जात असत. याच वेळेच्या सुमारास बाल्डियस ( चर्चिल, ३-६८९ ) असें वर्णन करितो कीं मच्छलीपट्टण हें फार दाट वस्तीचें शहर होतें, व तेथें, युरोप व चीन येथील व्यापारांचा संगम होत असे व तेथें खंबायत, सुरत, गोंवें व दुसरे पश्चिम समुद्रावरील पदार्थ यांचा मोठा समुदाय जमलेला असे. हें लक्षांत ठेवण्यासारिखें आहे कीं मुंबईचे कांहीं प्रभू, मुसलमान व पारशी जें ठिपक्यांचें काळें कापड पूर्वी पागोट्यांना वापरीत, तें बहुधा त्यांनीं जुन्या ठाण्याच्या व्यापाऱ्यांपासून घेतलें असावें व तें कापड ते ठाण्याचे मच्छलीपट्टणाहून आणीत असत. म्हणून त्या कापडास मुसली बंदरी किंवा नुसतें बंदरी असें नुसतेंच म्हणत असत. कृष्णानदीच्या मुखाजवळ घरणीकोट म्हणून शातकर्णी तैलंगराजांची राजधानी होती. तेथील व्यापारी जे होते, त्यांचा ठाणेजिल्ह्यांतील व्यापारी लोकांशीं संबंध होता. ही गोष्ट आपल्या इलाख्याच्या पश्चिम किनाऱ्यावरील लेण्यांतल्या शिलालेखावरून उघड होते. प्लिनी म्हणतो कीं त्यावेळचे हिंदूलोक आपले जवळचीं मोत्यें व हिरेमाणकें देऊन शिसें घेत असत व त्याप्रमाणें घरणीकोट व कोल्हापूर येथें शातकर्णीराजांचीं प्राचीन नाणीं जीं आहेत तीं शिशाचीं सांपडतात. सदहू मोत्यें तेव्हां वसईच्या खाडींत पिकत असत व अजूनही पिकतात. तीं चौल व सोपारें येथून परदेशीं जात असत. कदाचित ते हा माल पूर्वोक्त परदेशच्या देवघेवींत लंका व तांबडा समुद्र येथून आणण्याचाही संभव आहे. यावेळीं आपल्या मायभूमीतील पोलाद असी प्रसिद्ध असे. त्या पोलादाच्या केलेल्या छिण्या व हातवड्या यांनीं इजिप्तमधील वज्रदंती ( ग्रानाईट ) नामक मनोऱ्यांचे ( पिरामिड ) दगड घडण्यांत आले आहेत ( शार्पे इजिप्त, ३६४ ) पेरिप्लस व ऑन्टोनाईनचें सार ( डायजेस्ट) या ग्रंथांमध्यें आपल्या हिंदुस्थानांतील पोलादाचा उल्लेख आहे, प्रत्येक सप्टेंबरमध्यें तुर्कस्थानच्या सुलतानाचें मोठें गलबत तांबड्या समुद्राच्या माथ्यापासून मोखा येथें येत असे. त्यांत इतर नानाप्रकारच्या मालाबरोबर यवन (अयोनियन-ग्रीक), हंगारियन, व सायप्रस ( बेट ) येथील स्त्रीपुरुष गुलाम असत ( चर्चिलचे प्रवास,

३-६१६). राजदरबारीं यवन मुली लागत. याप्रमाणें कालिदासाच्या नाटकांतील राजांचें स्वागत करणाऱ्या व शाकुंतल नाटकांतील दुष्यंतराजाबरोबरच्या चापधारी व मालाधारी मुली यवन जातीच्या असत म्हणून स्पष्ट वर्णन आहे. बसा येथील इराणी राजाच्या वाड्यांत आरब लोकांना तिकडे न होणाऱ्या सागवानाच्यां तुळ्या आढळल्या ( आडझलेचें इराण, २-२८० ). त्या आपल्या मायभूमींतूनच तिकडे नेऊन पोहोंचविल्या असल्या पाहिजेत.

यावरून परदेशचा मुख्य व्यापार पश्चिमेस तांबडा समुद्र व इजिप्तशीं चालला होता व अंतर्गत व्यापर पैठण व तगरवरून बंगालच्या उपसागरावरील किनाऱ्याशीं व बंगालच्या उपसागरांतून मलाक्का अथवा सुवर्णभूमी व चीन या परदेशांशीं चालत असे. इजिप्तशीं निर्गत व्यापार पुढील जिनसांचा चाले.–खाद्यें–तीळ, तेल, साखर, तांदूळ व सुंठ; कपडे–दक्षिणेंतील निरनिराळ्या प्रकारचीं कापडें, व पूर्वेकडील किनाऱ्याकडून रेशमी सूत, सूत व कच्चें रेशीम व रेशमी कपडे; मसाले वं औषधें–गुग्गुळ व मिरच्या; रंग–लाख व नीळ; दागिने–हिरे, पाचा, मोत्यें; धातू–लोखंड अथवा पोलाद व सोनें. आयात माल–मुख्यतः पुढील असे–*मद्यें (अरेबियन, लाओडिसियन व इतालियन); कपडे–कमरबंद; मसाले व औषधें–धूप, डिंक, शिलापुष्प; धातू–पितळ अथवा तांबें, कथिल, शिसें, व सोनें व रुप्याचीं नाणीं; दागिने–पोवळीं, रुप्याचीं भांडीं, ताटें व कांच; व गुलाम–देशांतील राजाकरितां सुंदर स्त्रिया. कोंकणच्या किनाऱ्यावरील व्यापारी हिंदू असत; कारण बौद्धधर्म व्यापारास प्रतिकूल नव्हता, व त्यांच्या औदार्याच्या योगानेंच कारली व कान्हेरी हीं लेणीं कोरण्यांत आलीं व कुडें, कान्हेरी व नासिक येथील लेण्यास लहान लहान देणग्या ( अग्रहार वगैरे ) मिळाल्या आहेत ( लेण्यांतील कोरीव लेख पहा ).

तामिळ, यवन ( ग्रीक ) व लॅटिन भाषेंतील प्राचीन सारस्वत पाहिलें तर आपल्यास अशी साक्ष पटते कीं कारोमांडल ( संस्कृत–चोलमंडळ ) किनाऱ्याचा व्यापाराचा संबंध अलेक्झांड्रिया व तेथून युरोपाशीं चालला होता. त्याचा व्यापार रोम शहराशीं चालला होता. यास पुरावा येथें सापडणाऱ्या रोमन नाण्यांवरून मिळतो. हीं अगणित नाणीं दक्षिण हिंदुस्थानांतील अनेक जिल्ह्यांत सांपडतात. ब्रिटनवरील विजयाचें स्मरण रहावें म्हणून रोमच्या क्लॉडियस बादशहानें सोन्याचीं नाणीं पाडिलीं होतीं. त्या नाण्यांपैकीं कांहीं नाणीं ह्या भूमिगत नाण्यांत सांपडतात. यावरून एक कालमर्यादा नक्की ठरते. म्हणजे क्लॉडियस बादशाहाच्या वेळीं व पुढें आपल्या लोकांचा रोमशीं व्यापार बिनहरकत चालला होता.

* दारुड्यांचे देखावे उमरावतीच्या कोरकामांत ( इ. स. ४०० ) व अजंठ्याच्या चित्रांत ( इ. स. ५००–६०० ) पुष्कळ दाखविले आहेत. रौलिसन म्हणतो कीं पार्थियन लोकांस दारूचा फार शोक असे ( ए. मा. ६-०३८३ ) व हुवेनसंग ( ६४० ) म्हणतो कीं मराठे शिपाई दारू फार पीत असत. जुलियनचें मेमॉयर, ३–१५० )

( इ. स. ४१–६४ ). पण ह्याच्या मागील कालमर्यादामात्र निश्चित करितां येत नाहीं. पण एवढें सांगतां येण्यासारिखें आहे कीं वरील चोलमंडलापैकीं चोल लोकांचा उल्लेख महाभारतामध्यें आहे, तसाच तो अशोक बादशाहाच्या शिलालेखांत ( इ. स. २५०१ ) आहे. ह्या लेखांत चोल लोक मौर्य साम्राज्याच्या पलीकडे स्वतंत्र राहत होते असें म्हटलें आहे. दक्षिण हिंदुस्थान व पाश्चात्य देश यांतील व्यापारी संबंधाचा पुरावा शब्दशास्त्रावरूनहि मिळतो. तो असा कीं काळ्या मिऱ्यांस तामिळ भाषेंत पिप्पली असें म्हणतात. त्या पिप्पलीस ग्रीक भाषेंत पेपरी असें म्हणतात. त्यावरून मिऱ्यांस इंग्रजींत पेपर असें म्हणतात. तेव्हां या एका शब्दावरून हिंदुस्थानचा इग्लंडशीं व्यापारी संबंध सिद्ध होतो.

मध्य हिंदुस्थानांत शिंद्याच्या राज्यांत माळव्यामध्यें उज्जयिनी ( अवंती ) म्हणून एक शहर सिप्रा नदीच्या कांठीं आहे. तें आम्हीं जाऊन मुद्दाम पाहिलें आहे. हें शहर असें वसलें आहे की तें स्वभावतः एक व्यापाऱ्याचें केंद्र प्राचीनकाळीं होऊन बसलें होतें. त्या शहरांत व्यापाराचे तीन रस्ते येऊन मिळत असत–( १ ) एक रस्ता, सोपारें ( शूर्पार्क ) व भडोच ( भृगुकच्छ ) ह्या पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांपासून निघणारा; ( २ ) दुसरा, दक्षिणेंतून ( आग्रा रोड ) येणारा; ( ३ ) तिसरा; अयोध्या ( कोसल ) प्रांतांतील श्रावष्टीपासून निघणारा. ज्याप्रमाणें दक्षिणेस तगर नांवाची एक मोठी व्यापाराची उत्तम पेठ होती, त्याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांत ÷ उज्जयिनी ही एक मोठी व्यापाराची उत्तम पेठ होती.

हल्लीं हिंदुस्थानच्या उत्तर भागीं पूर्वेकडील व पश्चिमेकडील लांबलांबच्या देशीं जाण्यास पर्वत वगैरे अनेक सृष्ट, सामाजिक व राजकीय प्रतिबंध आहेत, त्या प्रमाणें ते इतिहासपूर्वकाळीं नव्हते व त्याप्रमाणें तिकडे येथील लोकांचें लोकांचें दळणवळण व व्यापार चालूच राहिला हें मानवशास्त्र ( एथनॉलजी ) व भाषाशास्त्र यावरून स्पष्ट दिसतें. हिंदुस्थानच्या पूर्व व पश्चिम टोंकाशीं नदी-

÷ येथील महांकाळ, हरसिद्धी, गंगाद्वार, सांपडलेल्या रामाच्या मूर्तीचें देवालय वगैरे प्रेक्षणीय स्थळें तेथील पेशव्यांचे माळव्यांतील बिनीवाले जहागीरदारांच्या बरोबर जाऊन पाहिलें. मुसलमानांनीं ह्या शहराची व तेथील महांकाळ वगैरे देवालयांची पाहावत नाहीं अशी नासधूस केली आहे ! त्या नासधुशीचे कांहीं भाग महांकाळाच्या सध्याच्या एका कोपऱ्यांतील देवळाच्या समोरच्या एका मोठया तलावांत पडून राहून मुसलमानांच्या निष्कारण उपद्रवाची पुरी साक्ष देतात. महांकाळास आम्ही स्वत: अभिषेक केला तेव्हां आम्हांस तेथें आपल्या दक्षिणेप्रमाणें स्पर्शास्पर्श व जातपात यांची चाड बिलकुल आढळली नाहीं! आमचे उपाध्याय श्रीयुत दामोदर भट्ट जोशी, त्र्यंबककर हे पूर्वोक्त तलावाच्या कांठीं देवासकराच्या वाड्यांत राहतात. अभिषेक करीत असतां आम्हांस एक मोठा संशय आला. तो हा कीं मुसलमानांनीं केलेलीं शकलें जोडून सध्याची पिण्डी बसविलेली आहे! तीवर सांध्याच्या रेषा उभ्या दिसतात !!

थड्या आहेत. त्यांतून पूर्वेकडे चीनच्या साम्राज्याशीं व पश्चिमेकडे इराणच्या राजाशीं व्यापार वगैरे हरएक प्रकारचें दळणवळण प्राचीनतम काळापासून रहात आलें म्हणून हिंदुस्थानच्या पूर्वभागीं जाती व भाषा मोंगोलियन (पिवळ्या लोकांच्या) आहेत व हिंदुस्थानच्या पश्चिमभागीं जाती व भाषा द्राविडी ( काळ्या तांबड्या ) लोकांच्या आहेत, व त्यांत मिसळ पारशी व आरबी ह्यांची आहे.

याप्रमाणेंच, हिंदुस्थानच्या व्यापराचे आणखी दोन स्थलमार्ग प्राचीन काळीं प्रसिद्ध होते; ( १ ) एक, झांझिबारपासून पश्चिमेस कोंगोकडे जाणारा, व ( २ ) दुसरा, झांझिबारपासून उत्तरेस त्रिपोलीकडे जाणारा. पण त्या मार्गांचा संबंध आपल्या हिंदुस्थानशीं प्रत्यक्ष नव्हता, तर आपल्या हिंदुस्थानांतील आफ्रिकेंतल्या वसाहतीशीं होता. म्हणून त्यांचें वर्णन आमच्या आफ्रिकेंतील वसाहतींच्या वर्णनांत समाविष्ट केलें आहे.

केंद्रें—इ. स. २६० च्या सुमारास पेरिप्लसच्या कर्त्याच्या मताप्रमाणें पुढील व्यापाराचें केन्द्र आपल्या मायभूमीच्या पश्चिम किनाऱ्यावर होतें.--( १ ) सोपारें, ( २ ) कल्याण, ( ३ ) चौल ( ४ ) पाल ( महाडाजवळ ) यांपैकीं शातकर्णी राजांनीं कल्याण बंदरीं व्यवस्थित पेठ बसविली होती. पण गुजराथच्या साघनसिंह राजांनीं कोंकणचा स्वाभाविक व्यापार गुजराथेंत भडोच येथें जबरदस्तीनें नेण्याचा नसता उपद्व्याप केला. त्याचा परिणाम असा झाला कीं इकडील व्यापाऱ्यांनीं त्यांस दाद दिली नाहीं. ते इजिप्त वगैरे परदेशांशीं व्यापार उत्तरेकडे भडोच येथें करण्याऐवजीं मलबारच्या किनाऱ्यावरील मुयिरीकोट्ट ( मुसिरिस ) व केनट्री ( नेलकिंड ) या केन्द्रस्थानीं दक्षिणेस करूं लागले. त्याकरितां ते किनाऱ्यानें चालणारीं गलबतें घेऊन त्या केन्द्रस्थानीं इजिप्तच्या गलबतवाल्यांस भेटण्यास जात असत. अथवा पुढें लंकेला जात असत; अथवा मच्छलीपट्टणची मलमलीसारखीं तलम कापडें आणण्याकरितां कारोमण्डल ( चोलमण्डल ) किनाऱ्यावरील अनेक बंदरीं जात असत ( मॅकक्रिंडलचा पेरिप्लस, १४६; व्हिन्सेन्टचा व्यापार, २-६२३ ). शिवाय त्यांच्या पूर्व किनाऱ्यावरील गेद्रोसिया व इराणच्या अखाताच्या माथ्याशीं ओबोला ह्या दोन बंदरांशीं महत्वाचा व्यापार चालत असे. गेद्रोसिया येथें मुख्य व्यापार पुढील वस्तूंचा चाले.—इमारती लांकडें, गलबताकरितां तुळया ( साग ) व अबनुसाचे ओंडे. याच्या मोबदल्यांत ते दारू, खारिक, खजूर, कापड, जांभळा रंग, सोनें, मोत्यें व गुलाम घेत. शिवाय, त्यांचा व्यापार आरबस्थानचा पूर्व किनारा, सोकोत्रा, एडन, व मोकाजवळील मूसा, या बंदराशीं पुढील वस्तूंचा चाले:—

मलमल, धान्य तेल, कापूस व गुलामस्त्रिया ( व्हिन्सेन्ट २-२९६,२९७, ३४६. मॅकक्रीडलचा पेरिप्लस, ९४;९५ ). त्यांचा व्यापार झांझिबार वगैरे आफ्रिकेच्या किनाऱ्याशीं चाले. ते धान्य, तांदूळ, लोणी, तीळ, कापूस, कमरबंद साखर व लोखंड देऊन गुलाम, कासवाच्या पाठी ( कवच्या ) व दालचिनी घेत असत ( व्हिन्सेन्ट, २-१६८ ) त्यांचा व्यापार अबिसिनीयाचें बंदर जें अदुली-

याशीं चाले. ते आपल्या गलबतांतील कापड, लोखंड, कापूस, कमरबंद, मलमल व लाख देऊन त्याच्या मोबदल्यांत हस्तिदंत व गेंड्यांचीं शिंगें घेत असत.

आपल्या मायभूमींतील धर्म व व्यापार यांच्या प्रसाराबरोबर आमच्या लोकांच्या वसाहती सर्व भरतखंडभरच नव्हे तर उत्तर आर्यावर्तांत तिबेटापासून उत्तर कुरूपर्यंत व हिंदी महासागरांत मसाल्याच्या बेटापासून मारिशस बेटापर्यंत व आफ्रिकेंत केप कालनीपासून मिसर देशापर्यंत व एशियेंत एशिया मायनर, इराण व आरबस्थान यांपासून चीनजपानपर्यंत पसरला. हिंदी वसाहती उत्तरेस इराणचें अखात, तांबड्या समुद्राचा किनारा, व पश्चिमेस व दक्षिणेस झांझिबारचा किनारा यांवर आढळतात. विद्वान लोकांनीं अलीकडे जे शोध केले आहेत, त्याप्रमाणें हिंदी वसाहती अगदीं पूर्वेस पुढील ठिकाणीं नजरेस पडतात.—हिंदी द्वीपसमूह फिलिपाईन बेटें, सुमात्रा, जावा, बोर्निओ, कांबोज व सयाम. बौद्ध लोकांच्या हालचाली चालू होण्यापूर्वी अनेक वर्षें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं या वसाहती केल्या. पुढें बौद्ध लोकांनीं याच ठिकाणीं या आपल्या नवीन हिंदी धर्माचे उपदेशक पाठविले, व तो धर्म त्याच ठिकाणीं नव्हे तर आणखीं पुढें पूर्वेस चीनजपानपर्यंत स्थलमार्गानें व जलमार्गानें पसरला व तो हिंदुस्थानांत अस्तंगत झाला तरी तो तेथें आजतागाईत हयात आहे. हिंदी उमरावांनीं आपल्या अनुयायांसह चालून जाऊन दूरदूरचे परदेश जिंकून त्यांत वसाहती केल्या आहेत. त्यांनीं प्रथम सुमात्रा,नंतर जावा, व शेवटीं कांबोजिया व कोचीन चिनचा दक्षिण-भाग हस्तगत केला. कांबोज देशांत जे शिलालेख आहेत, त्यांवरून असें दिसतें कीं, तेथील सरकारदरबारची भाषा संस्कृत होती. तेथें शिव व विष्णू यांचें पूजन होत असे, व स्वदेशाप्रमाणें तेथें रामायण व महाभारत यांचें मोठ्या धार्मिकपणानें पुराण चालत असे. तेथें जी हल्लीं देवळांची पडझड आहे, तीवरून तीं आपल्या हिंदी पद्धतीनें बांधिलीं आहेत याचें प्रत्यंतर प्रवाशास येतें. हल्लीं जी आपल्या हिंदुस्थानची स्थिती आहे तीप्रमाणें विचार करणारास हें सांगितल्यास खरेंसुद्धां वाटणार नाहीं कीं प्राचीनकाळीं आपल्या हिंदू लोकांनीं हिंदुस्थानांतून जाऊन अगदीं दूरच्या पूर्वेकडील देशांत वसाहती केल्या व तांबडा समुद्र व नाताळपर्यंत आफ्रिकेचा किनारा व इराणच्या अखाताचा किनारा यांवर व्यापारी पेढ्या व वसाहती स्थापिल्या होत्या. चौथ्या शतकांतील जुन्या चिनी यात्रेकरूंच्या प्रवासाच्या वर्णनावरून असें दिसतें कीं जावा बेटांत सगळी वसाहत आपल्या हिंदू लोकांनीं केली होती. हे आपले हिंदू लोक गंगथडी-पासून लंकेत व लंकेहून जावा येथें ( यवद्वीप ) व जाव्यांतून चिनांत गल-बतांत बसून गेले, व त्या गलबतावर जे नावाडी होते, ते सर्व ब्राह्मणी म्हणजे वैदिक धर्माचे होते याबद्दल साधार व सविस्तर माहिती आमच्या ललितविस्तार नामक अरुणोदयांतील लेखांत आहे. पण ते सध्या उपलब्ध नसल्यामुळें त्यांतील झाडून सर्व माहिती येथें देतां येणार नाहीं. कारण ( १ ) तो या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय नाहीं व ( २ ) त्या लेखांच्या रचनेस जी साधनसामुग्री लागली

होती, ती सध्या जमविणें दुरापास्त आहे. म्हणून पुढें त्यापैकीं जें साहित्य आम्हांजवळ या क्षणीं आहे तें मासल्याकरितां व आमच्या वाचकांच्या व आमच्या अपौरुषपणाच्या भ्रमाच्या निरसनार्थ दूध नाहीं तर ताक म्हणून तरी त्यांस सादर करणें भाग आहे. प्रोफेसर राधाकुमुद मुकरजी यानें जावांतील बोरोबदर देवळांतील कोरीव चित्रांतल्या एका गलबताच्या चित्राची नक्कल दिली आहे. त्यावर हिंदू नावाडी आहेत व ते तें गलबत जावांत वसाहत करण्यास नेत आहेत. " हिंदुस्थानच्या वसाहती पेगू, कांबोडिया, जावा, सुमात्रा, बोर्नियो, व आणखीं पूर्वेकडील जपानपर्यंतच्या देशांत होत्या. त्यांच्या व्यापारी वसाहती दक्षिण चीन, मलया द्वीपकल्प, आरबस्थान, व इराणांतील झाडून सर्व शहरें व आफ्रिकेचा सगळा पूर्व किनारा—यांत होत्या.—( इंडियन शिपिंग पा. ४ ). मिसेस बेझंट आपल्या—बा हिंदुस्थाना जागा हो—वेक अप इंडिया—पान २६ यांत म्हणते कीं " तुम्ही जावाला जा म्हणजे तेथें महाभारतांतील गोष्टी तुम्हांस आढळतील. तेथें तुम्हांस श्रीकृष्णाच्या मूर्ती व त्याच्या चरित्रांतील व पांडवांच्या व दुसऱ्या हिंदू योद्धयांच्या चरित्रांतील घटनांचीं चित्रें नजरेस पडतील. जेव्हां हिंदुस्थानांतिल लोकांनीं आपल्या मायभूमीच्या सीमेबाहेर वसाहती करून राज्यें स्थापिलीं तेव्हां त्या वसाहत करणाऱ्या हिंदूलोकांनीं तीं चित्रें उघड तेथें नेलीं आहेत. कारण त्या वेळीं हिंदू लोक मोठे बळकट, व साहसप्रिय होते व ते बंगालचा उपसागर तर काय पण हिंदीमहासागरही ओलांडण्यास बिलकुल भीत नसत. म्हणून जगाच्या पुष्कळ भागांत असलीं हिंदुस्थानचीं चिन्हें म्हणजे हिंदूलोकांच्या रीतीभाती, हिंदूलोकांचे आचारविचार, हिंदूलोकांची रहाणी आढळते व तीं चिन्हें तुमच्या पूर्वजांच्या कृतीचीं आहेत. कारण ते महासागरावरील प्रवासास भीत व डरत नसत. ते मजेखातर, व्यापारांतील लाभाकरितां, अथवा शिक्षण मिळविण्याकरितां इष्ट असेल तिकडे बिनदिक्कत खुशाल भटकत असत. एवढेंच नाहीं तर आपल्या देवनागरी लिपीची आद्यजननी जी ब्राम्ही तीस त्यांनीं येथून नेऊन परमुलखांतही पसरविली आहे." डाक्तर स्टीनचे अलीकडील प्रवास ( धि लिटल पेपर १९१४ ) याप्रमाणें पाहतां आमच्या उत्तर एशियेंतील अथवा सुमेरुखंडांतील वसाहतींचें प्रत्यंतर पुढीलप्रमाणें सांपडलें आहे.—" निया नांवाच्या जागेजवळ सर आरेल स्टीन यास एक मोठी वसाहत आढळली. ती वाळूंत गडप झालेली आहे. त्या वाळवंटांतील वाळूखालीं घरांची पडझड आहे. तींतून त्यानें कांहीं लेख खणून काढिले. ते सुमारें २००० वर्षांपूर्वी हिंदी भाषेंत लिहिलेले होते. त्या वसाहतींतील जुन्या लोकांनीं जें सामानसुमान, हत्यारेंपात्यारें व व्यापारांतील मालटाल वापारला तो तेथें आहे. त्यांत चमत्काराची गोष्ट ही कीं तेथें आज एक जुनी टाकिलेली फळबाग आहे. तींतील झाडें मेलेलीं आहेत. पण त्यांतील मेलेल्या द्राक्षींचे वेल आपल्या जाळ्यांस चिकटून राहिलेले आहेत. व त्यांवरील शेवटचें द्राक्षांचें पीक शेकडों वर्षांपूर्वी काढून घेण्यांत आलेलें आहे." ह्यांतील

लेखांसंबंधें आमच्या वाचनांत आलें कीं त्यांत एक वैद्यकीची पोथी आहे व तींत सर्पाच्या विषाचा कांहीं रोगांवर उपयोग दाखविला आहे. या प्रतिपादनास आपल्यास कांहीं अन्य शोधकांचीं प्रमाणें सांपडलीं तर त्यांचा आपण स्थळवार विचार करूं:—

१ इराण:—ओडेरिक ( १३२० ) खालच्या युफ्राटिसला देशान्तर्गत हिंदुस्थान असें म्हणतो ( यूलचा कथे ) व मार्कोपोलो ( १२९० ) मोठें हिंदुस्थान उर्मझपर्यंत पश्चिमेस आणून भिडवितो ( यूलचा मार्कोपोलो १२-३३६). आरबांच्या कारकीर्दीत ( ६४०—१००० ) इराणी अखाताच्या माथ्याजवळील प्रदेशांत जाट व सनगर लोकांनीं वसाहत केली. हे लोक ( जतान व सागान ) सिंधूच्या मुखाजवळ राहणार होते, व म्हणून या प्रदेशास हिंदुस्थान हें नांव पडलें ( रौलिसन, रॉयल एशियाटिक सोसायटीचें जर्नल, नवा क्रम, १२-२०८ व प्रोसिडिंगज जर्नरॉयल जिऑग्राफिकल सोसायटी, १—४०; यूलचा कथे, १-६६ टीप ३. मसुदी ( प्रेरिस, ४-२२५ ) म्हणतो कीं आरबांच्या विजयाच्या काळीं ( इ. स. ६४० ) बसराजवळील प्रदेशास हिंदुस्थान असें म्हणत असत व ही वहिवाट खिस्ती शकाच्या आरंभापर्यंत मागें जाऊन भिडते. ( रौलिसन, जर्नल रॉयल एशियाटिक सोसाइटी, २७-१८६ ). सहा, सात, आठ व नऊ शतकांत इराणच्या अखातावर हिंदुस्थानांतून समुद्राच्या मार्गानें भयंकर स्वाऱ्या झाल्या ( अबू-ल-फिदा व रौलिसन, प्रोसिडिंगस रॉयल जिऑग्रेफिकल सोसाइटी १-४० ). ह्या कारणाकरितां ह्या प्रदेशास हिंदुस्थान असें नांव पडलें असावें. प्राचीन इराणी लोकांनीं [ इ. स. पूर्वी ३२० ] समुद्राच्या किनाऱ्याजवळ एकही शहर वसवलें नाहीं [ एलियेट व डावसेन, १-६१२ ] व त्यांनीं टैग्रीस नदीला बंधारा घातला. रूकचें एरियन, २—१४९; एलियट व अवसन, १-५१३. ] यास कारण आपल्या हिंदूंच्या ह्या समुद्रावरील स्वाऱ्या असाव्या. खिस्ती शकापूर्वी हिंदू म्हणविणाऱ्या जातीचे लोकांस कॉकेशस पर्वताजवळ नेऊन सोडण्यांत आलें. ते इराणच्या अखातांतून आलेले हिंदू चाचे किंवा स्वाऱ्या करणारे असावे असें वाटतें ( एलियट व डावसन, १-५१२ ). पूर्वी सांगितलें आहेच कीं अंदुबार-प्रभृती आपले हिंदू लोकांनीं इराणच्या अखातांतून येऊन बाबिलोनियन लोकांस देवधर्म व विद्याकला शिकविल्या ( रौलिसन, जर्नल रॉयल एशियाटिक सोसायटी, १२-२०९ ). हिवेन संग ( ६४२ ) याला इराणांतून हिंदू लोकांच्या वसाहती तेथील शहरांत असून त्यांतील लोक आपलें धर्माचरण निरामयपणें करीत असत असें आढळलें ( रेनाडचा अबू-ल-फिदा ) येथें दोन तीन बौद्ध मठ होते ( जुलियन—हिवेन संग, ३—१७९ ). बेहेराम घोर हा कनोजच्या राजाच्या मुलाखतीस (४२०—४३८) गेला व एका हिंदू राजाच्या कन्येशीं लग्न लावून येथील गायन व सारस्वत ह्या येथील विद्या घेऊन इराणांत गेला, ससानियन राजांच्या कारकीर्दीत बुद्धि-

बळांचा खेळ व आरबी भाषेंतील गोष्टी आपले हिंदुस्थानांतून इराणांत नेण्यांत आल्या. अर्थात, तज्ज्ञ लोक तिकडे नेण्यांत आले.

२ आशिया मायनर—आर्मिनिया येथें तिसऱ्या शतकांत आपले हिंदू लोकांनीं वसाहत केली. रैनाउडचे मेमॉयर, ७२० )

३ आरबस्थान—तांबड्या समुद्रावर अक्षुमी ( लक्षुमी-लक्ष्मी ) येथें आपलें हिंदूंचें एक देवालय इ. स. ४०० च्या सुमारास होतें ( ज. रा. ए. सो. २०-२७८, टीप ४ ). तेव्हां त्या भोंवती आपल्या हिंदूंची वसाहत असलीच पाहिजे.

४ आफ्रिका—पूर्वी हें सांगण्यांतच आलें आहे कीं प्राचीनतम काळापासून आपल्या पश्चिम हिंदुस्थानचा पूर्व आफ्रिकेशीं परस्पर संबंध होता, व त्याचें केन्द्र तीन ठिकाणीं होतें—[ १ ] सोकोत्रा, [ २ ] अबिसिनीयाचा किनारा व [ ३ ] झांझिबारचा [ जंगबारचा ] किनारा.

१ सोकोत्रा—याचें संस्कृत नांव सुखतर असें आहे. मसूदी [ ९१५ ] म्हणतो कीं [ प्रेरीज, ३–३७ ] तेथें यवन [ ग्रीक ] येण्यापूर्वीं ह्या बेटावर वस्ती हिंदूंची झालेली होती, व मसूदी, मार्कोपोलो व इबन बाटूटा [ प्रेरीज, ३–३७, यूलचा मार्कोपोलो, २-३२८, ३४४, ३४५ ] यांतील कांहीं वाक्यांवरून असें दिसतें कीं दहा ते चौदा शतकापर्यंत हें बेट हिंदू चाच्यांचें ठाणें होतें. अलीकडे असा एक कोटिक्रम करण्यांत आला आहे कीं [ फिलॉझॉफिकल म्युझियम, २-१४६; स्मिथचा ग्रीक व रोमन भूगोलाचा कोश, १–६० ] इथिओपियांतील मेमनोन लोक हिंदुस्थानांतून आले होते व त्या शतकाच्या अव्वलीस [ * विल्फोर्डच्या इजिप्तवरील निबंधावरून [ एशियांतील शोध ३-२९५-४६२ ]. सर विल्यम जेम्सची अशी खात्री झाली कीं [ सदर ४६७ ] प्राचीन हिंदू लोकांस मिसर व नील नदी ह्यांची माहिती होती. हल्लींच्या गोंडाळच्या राजाच्या शस्त्रवैद्यकीच्या इंग्रजी इतिहासांत आम्हांस असें वाचलेलें आठवतें कीं दहा हजार हिंदू लोकांनीं जाऊन मिसर देशांत वसाहत केली. पण त्याचा सन वगैरे देण्यास सदर पुस्तक येथें नाशकास उपलब्ध नाहीं. जार्डेनस हा अबिसिनीयाला लहान हिंदुस्थान म्हणतो [ यूलचा मार्कोपोलो, २-३६६ ] व मार्कोपोलो [ १२९० ] बेंजामिन [ ट्यूटेलकर ] [ ११५० ] अबिसिनीयाला अथवा अबाशाला मध्य हिंदुस्थान म्हणतो [ सदर, ३६०, ३६५ ]. पांचव्या व सहाव्या शतकांत अबिसिनीयाचा हिंदुस्थानाशीं निकट संबंध होता [ ज. रॉ. ए. सो. २२–२९२ ]; अबिसिनीयाच्या राजाच्या युद्धांत हिंदुस्थानांतील व इथिओपियांतील हत्ती वापरण्यांत येत असत असा उल्लेख आहे [ मार्कोपोलो, २-३६८ ]. आपालोनियस [ इ. स. १०० ] म्हणतो कीं हिंदुस्थानांतून एक वसाहत इथिओपियांत झाली [ प्रिओल्क्स, ज. रा.

* ही माहिती पुढें अलाहिदा दिली आहे. याचा संबंध शिवपुराणाशीं आहे.

ए. सो. १८-९२ ] व्हर्जिल पासून होमरपर्यंत रोमन व ग्रीक ग्रंथकार हिंदुस्थान व इथिओपिया यांत अभेद समजतात [ स्मिथचा प्राचीन भूगोल भूगोलवर्णन, २-४३ ). ह्या घोटाळ्यासंबंधें सर विल्यम जोनसचें असें मत आहे कीं ( एशियेंतील शोध, ३-४,५ ) हिंदू लोकांच्या अबिसिनियांत वसाहती झालेल्या होत्या असें मानिल्याशिवाय ह्या कोड्याचा उलगडा होण्यासारिखा नाहीं. झांझिबारच्या वसाहतीसंबंधें जॉर्डेनस ( १३२० ) झांझिबारच्या किनाऱ्याला इंडिया टर्टीया असें म्हणतो ( यूलचा कथे १८३ ) व मार्कोपोलो ( १२९० ) झांझिबारला हिंदू बेट असें म्हणतो ( यूलचा एड, २-३९६ ). रिटरचें असें म्हणणें आहे कीं हिंदू लोकांच्या वसाहती झांझिबारांत समुद्रकिनाऱ्यावरच होत्या असें नाहीं. त्याच्या असें लक्षांत आलें आहे कीं झांझिबारच्या अक्षांशांतील आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील कोंगो नदीच्या घबघब्याजवळ बनियाचीं ऊर्फ वडाचीं झाडें लाविलेलीं आहेत ( अर्दकुंडे, बँड ४, अबक. २-६६१ ). पोर्तुगीज लोक केप ऑफ गुडहोपला वळसा घालून आले त्यापूर्वीं त्यांस कोंगो नदीपासून आफ्रिकेंतील जाणाऱ्या हमरस्त्याची चांगली माहिती होती ( सदर व स्टिव्हेन्सनच्या शोधाचें टिपण, ३३६ ). ते मोझांबिकला पोहोंचले तेव्हां त्यांस असें आढळलें कीं त्या किनाऱ्याचे लोकांस पोलो ड गामाच्या गलबतांत असलेल्या गिनीच्या काफराची बोली सहज समजत होती ( व्हास्को ड गामाच्या तीन सफरी, ७९, टालमी ( इ. स. १५० ) यास मध्य आफ्रिकेचें पुष्कळ ज्ञान होतें. तो झांझिबारपासून अंतर्गत व्यापाराचे दोन रस्ते दाखवितो. ( १ ) पश्चिमेस अटलांटिक महासागराकडे जाणारा, व ( २ ] उत्तरेस त्रिपोलीकडे जाणारा [ आफ्रिकेचा नकाशा ५ बर्टियेस आवृत्ती पहा ]. आफ्रिकेंतील रहदारी अद्याप कायम आहे. क्यामेरॉन यानें इ. स. १८७४ त झांझिबारपासून कोंगो नदीपर्यंत प्रवास केला. त्याला हिंदी महासागर व अटलांटिक महासागर यावरील व्यापाराचा संगम मध्य एशियेंत झाला आहे असें आढळलें, [ केथ जॉन्सनची आफ्रिका, ३४९ ]. अल बिरूणी [ १०२० ] असें म्हणतो कीं झांझिबारच्या दक्षिणेचे कोमेरिस हे लोक आम्ही हिंदू धर्माचे आहोंत असें म्हणतात [ रैनाडचा अबू-ल-फिदा ] व रमी [ १८११ ] यास झांझिबारच्या किनाऱ्यावरील सवाहिली लोकांमध्यें हिंदी रक्ताची छटा दृष्टीस पडली [ ट्रँन्झॅकशनस ऑफ बॉंबे जिऑग्रफिकल सोसाइटी, ६-९३ ]. मादागास्करचे लोक मलयवंशांतील [ केथ जॉन्सनस आफ्रिका, ५३१ ] अथवा मॅले लोकांच्या पूर्वीच्या पॉलिनिसियन लोकांपैकीं असावे. ह्या गोष्टीवरून हिंदू लोकांच्या प्राचीन वसाहती किती अवाढव्य महासागर ओलांडून केलेल्या होत्या हें उघड दिसतें.

आफ्रिकेंतील ह्या हिंदू वसाहतींच्या संबंधें एक लोकोत्तर गोष्ट आहे. ती ही कीं एक पूर्वेकडील लोकांची टोळी आफ्रिकेंतून दक्षिण युरोपांत गेली. म्हणून त्या पश्चिमेकडे गेलेल्या व पूर्वेकडेच राहिलेल्या लोकांच्या दगडी मनोऱ्यांत स्थूल व सूक्ष्म दृष्टीनें पाहतां एक प्रकारचा सारखेपणा आढळतो. असा पौरात्य व पाश्चात्य

तज्ञांचा अभिप्राय एकमेळाचा आहे. कर्नल लेस्ली [ स्काटलंडच्या प्राचीन जाती, २.४७८ ] याचें असें मत आहे कीं आवडघोबड दगडी मनोऱ्यांचे अवशेष तिकडे आढळतात. यावरून असें ठरतें कीं सेल्टिक लोकांचें एक स्थलांतर आफ्रिकेच्या मध्यभागापासून स्पेन व फ्रान्स या देशांत व तेथून स्काटलंड देशाच्या उत्तरेस झालें आहे. मनुष्याच्या निरनिराळ्या जाती एशियाच्या मध्य भागापासून सर्व पृथ्वीवर पसरल्या आहेत—हा सिद्धान्त जितका सर्वमान्य आहे तितकाच पश्चिम हिंदुस्थानांतून पूर्व आफ्रिकेमध्यें मनुष्यांच्या टोळ्या पूर्वी सांगितल्याप्रमाणें पसरल्या—हा सिद्धान्त सर्वमान्य आहे. पण डा. फर्ग्यूसन यापलीकडे उड्डाण मारून असें प्रतिपादितो कीं आल्जीर्समधील मनोऱ्यांत उघड हिंदूकालची छटा दिसते. म्हणजे कांहीं हिंदूलोक अथवा बौद्ध धर्मोपदेशक पश्चिमेकडे आल्यामुळें हा प्रकार घडला असावा [ ओबड घोबड दगडी मनोरे, ४१४, ४२६; ४९६, ४९८, ५०७ ].

पूर्व आफ्रिकेमध्यें आपल्या हिंदूंच्या आणखीं दोन वसाहती होऊन गेल्या आहेत. अबिसीनीयाच्या पश्चिमेस मध्यसदनामध्यें ( साउडन ) कनुरी लोकांची एक वसाहत आहे. त्यांचें नांव व त्यांच्या भाषेंतील विशेष यांवरून असें दिसतें कीं त्यांचा आपल्या हिंदुस्थानांतील द्रवीड लोकांशीं संबंध असावा ( काल्डवेलचें द्रविड व्याकरण ८०; केथ जानसनची आफ्रिका, १७६, १८८ ). आफ्रिकेंतील लोकांमध्यें एक भाग आहे. त्याची भाषा आपले हिंदुस्थानांतील भाषेशीं मिळती आहे. ते लोक कोण म्हणून म्हणाल तर ते इजिप्तमधील जिप्सी लोक हे होत. ह्या लोकांचें मूळचें नांव सनगर असें आहे. ते सिंध, कच्छ व काठेवाड येथें राहणारे होते. ते चाच्यांचा धंदा करीत असत. ते तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर वसाहत करून होते. तेथून ते इजिप्तमध्यें गेले व तेथून ते सर्व युरोपभर पसरले. त्याप्रमाणेंच ते सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आहेत. पाणी, आग, बाल, आंख हे शब्द त्यांत सर्वत्र सारखे आढळतात.

याप्रमाणेंच आपल्या हिंदू लोकांचीं आणखीं सहा स्थलांतरें इ. सनाच्या पूर्वींपासून इ. स. १४२० पर्यंत वायव्य हिंदुस्थानांतून झालीं आहेत:— (१) कर्क, सिंधी, कोळी, मेद व दुसऱ्या पश्चिम हिंदुस्थानांतील जाती खिस्ती शकापूर्वीं [ एलियट व डाउ नु. ५०९-५१२ ] [२] बेहराम गोर याचें इराणांत इ. स. ४५० त हिंदू गवयांस नेऊन हाकून देणें [ रौलिन, प्रोसि. रा. जि. सो. १-४० ] [ ३ ] कर्क, सनगर व जाट या लोकांस आठव्या व नवव्या शतकांत इराणच्या अखातांतून काढून एशिया मायनरमध्यें नेऊन घातले [ सदर व एन-ब्रिटानिका, १०-६१७ ]; [ ४ ] गझनीच्या महंमदानें हिंदूंचा पराभव केल्यावर त्यांतील जाट लोक पश्चिमेस गेले [ १०२५ ]; [ ५ ] बाराव्या शतकांत सेलजूक व चौदाव्या शतकांत उसमानली तुर्क यांचा विजय झाल्यावर इराण व एशिया मायनर येथून हिंदूंच्या जागीं त्यांनीं स्वजातीय लोक आणून बसविले; व [६] तैमुर-

लंगाच्या जुलूम जबरदस्तीमुळें चौदाव्या शतकाच्या शेवटीं हिंदुलोक पश्चिमेकडे गेले.

लंका.—[ इ. स. पू. ५० ]—" सीलोन [ लंका बेट ? ] मगध देशाच्या विजयसिंह नांवाच्या राजपुत्रानें जिंकिलें. तेथें हिंदूंची वसाहत झालेली होती. या बेटास ग्रीक [ यवन ] इतिहासकारांनीं तांब्रोबेन हें नांव दिलें असून तें संस्कृत ताम्रपर्णी किंवा पाली भाषेंतील तांबपण्णी याचा अपभ्रंश आहे. जयपीर या राजानें सिंहलद्वीपास आपला वकील गलबतांतून पाठविला होता असें राजतरंगिणी या ग्रंथांत लिहिलें आहे. यावरून आपले लोक दोन अडीच हजार वर्षांपूर्वींपासून जलमार्गानें प्रवास करीत हें सिद्ध होत नाहीं काय ? "—आर्यांच्या सणांचा इतिहास–पान ६०–ऋग्वेदी–२२–६–१७ ]

जावा, सुमात्रा, बोर्निओ, सेलिबिस, संबावा—इ. स. ७८–" येथील हिंदूलोकांनीं कित्येक शतकामागें अन्यधर्मीय व अन्य भाषा बोलणाऱ्या लोकांच्या देशांत जाऊन तेथें वसाहती देखील केल्या. सन ४०० वर्षांचे सुमारास चीन देशांतील बुद्ध भिक्षू फा–हावन हा या देशीं बौद्धधर्मीय ग्रंथ गोळा करण्याकरितां आला. सिलोन बेटापर्यंत प्रवास करून तो तेथून कांहीं ग्रंथांसह स्वदेशीं जाण्यासाठीं जहाजांतून निघाला; तेव्हां वाटेंत वादळ झाल्यामुळें जावा बेटांत उतरला. तेथें वसाहत करून राहिलेले अनेक ब्राह्मण त्याच्या दृष्टीस पडले. तेथून कांहीं महिन्यानंतर चीन देशास जाण्यासाठीं तो जलमार्गानें प्रवास करीत असतां पुनः वादळ होऊन जहाज बुडण्याच्या बेतांत आलें. तेव्हां जहाजांतील कांहीं ब्राम्हणांनीं त्या भिक्षूमुळेंच पुनः पुनः प्रवासांत विघ्न उपस्थित होतें असें मानून त्याला मध्येंच कोणत्या तरी बेटावर टाकून जाण्याचा बेत केला, असें फा-हियाननें आपल्या प्रवासवर्णनांत लिहिलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं त्या काळीं जावा बेटांत ब्राम्हणांची वसाहत होती, व लांबचा प्रवास करणारे ब्राम्हण त्याच्या गलबतांत होते.–सदर.

" जावा बेटाच्या द्वीपसमुद्रामध्यें जावा बेटाचें जितकें महत्व आहे तितकें सुमात्रा बेटाचें आहे. जावा, सुमात्रा, बोर्निओ, सेलिबिस, सबाळा या बेटांची नांवें अनुक्रमें यवन, सुमित्र, भरणी, शलभा आणि संभव [ संबव ? ] या संस्कृत शब्दापासून झालेलीं आहेत. हिंदुस्थानांतून वसाहत करण्यासाठीं जी मण्डळी बाहेर निघाली तिचा सुमित्र नांवाचा एक नायक होता, व त्याच्याच नांवावरून यांपैकीं एका बेटाचें नांव सुमात्रा असें पडलें असावें. या बेटांतील अचिन नांवाचें व त्याच नांवाचें प्रसिद्ध असलेला पश्चिमेकडील प्रांत हे सुमित्र ह्या संज्ञेनेंच ओळखले जात असत. प्राचीन कालीं सुमित्र शहर या बेटाची राजधानी होती, व त्याचे अवशिष्ट भाग अद्यापि पाहण्यास सांपडतात. या बेटांत चिंचेची झाडें बरींच असून त्यांवर वानरांचें कळप नेहमीं वस्ती करून रहात असल्यावरून तेथील लोकांची अशी समजूत झाली आहे कीं, रामायणांत किष्किंधा या नांवानें प्रसिद्ध असलेलें स्थळ म्हटलें म्हणजे हेंच बेट होय; आणि या ठिकाणीं वाली, सुग्रीव

यांची राहण्याची जागा अमुक असावी असें दाखवितात. सुमात्रा बेटाची जास्तींत जास्त लांबी व रुंदी अनुक्रमें १०४७ व ३३० मैल आहे. व एकंदर क्षेत्रफळ १ लक्ष ६१ हजार ६१२ मैल आहे. या बेटांतील लोकवस्ती पातळ आहे. येथील लोकांची लोकसंख्या सुमारें ३५६ लक्ष आहे. येथील प्रदेश डोंगराळ असून त्यांत इंद्रजित, हरी, पाणी, शक वगैरे नांवांच्या नद्या उगम पावतात. शिवाय ज्वालामुखी पर्वत व सरोवरेंही आहेत. सरोवरांचीं नांवें मर्णाद्रि, शंकर अशीं आहेत. या ठिकाणचे मूळचे लोक नरमांस भक्षक असल्यामुळें आर्य लोक तेथें गेल्यावर त्यांना दस्यू आणि राक्षस या नांवानें संबोधित असत. इ. सनाच्या ७८ व्या सालीं हिंदु लोक जावा येथें राहण्यास गेले, याबद्दल सर्व इतिहासकारांचे मतैक्य आहे व सुमात्रा येथील वसाहत यापेक्षांही जुनी असली पाहिजे असें वाटतें. सुमित्र नांवाचा हिंदु येथें वसाहत करण्यास निघाला, तो कृष्णा नदीच्या मुखापाशीं श्रीककुलं नांवाचें शहर होतें तेथून होय. या वसाहतवाल्या लोकांना सुमात्रा येथील मूळच्या रहिवाशांकडून बरीच पीडा सोसावी लागली. चवथ्या शतकांत गुजराथ व सिंघ या प्रांतांतील बौद्ध धर्मांचे कांहीं लोक प्रथम सीलोन येथें जाऊन नंतर ते सुमात्राकडे गेले होते. हिंदु व बुद्ध अशा दोन्ही धर्मांचे लोक या बेटांत स्नेहानें राहत असत. त्यांची एकमेकांशेजारी असलेलीं अनेक देवालयें आढळतात. तेथील लोक आपण सूर्यवंशीय व चंद्रवंशीय आहों असें अभिमानानें सांगतात. आपण शिकंदराचे वंशज आहों असें सांगणारेही त्यांत कांहीं आहेत. सुमात्रा बेटाचा राज्य कारभार जावा बेटांतील राजाच्या हातीं असे. सुमात्रा बेटांत ठिकठिकाणीं राम, शिव, सीता, भवानी, दुर्गा, महादेव, महेश, सुग्रीव, रुद्र इत्यादि नांवाच्या हिंदु देवालयांचे अवशिष्ट भाग आढळतात—सदर, पान १८९–१९० ].

याप्रमाणें या प्राचीन भूवर्णनांत पृथ्वींतील खंडें, देश, व त्यांत आर्यांचें नौकानयन, व्यापार व वसाहती यांचें विवरण आटोपलें. आर्यांचें नौकानयन, व्यापार व वसाहती ह्यांची दोन आणखीं वर्णनें पुढें आहेत.

---

## यादी—ह्या ग्रंथास आधारभूत ग्रंथांची.—

१ वेद २ रामायण ३ महाभारत ४ भागवत ५ विष्णुपुराण ६ भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ७ भारतीय ज्योतिः शास्त्र ८ आकाश—सौंदर्य ९ ज्योतिर्विलास १० वेदिक इंडेक्स आफ नेमस ऍंड सबजेक्टस-डा. मॅकडोनेल ११ मॉडर्न रिव्ह्यू, एप्रील १९१३; अकटोबर १९१६ १२ लॉस्ट हिस्टरीज ऑफ अमेरिका—डब्ल्यू. एस. ब्लॅकेट १३ धि व्हिसिसिटयूडस आफ आर्यन सिव्हिलीझेशन-मि. एम्. एम्. कुंठे १४ धि आर्कटिक होम-लोकमान्य बा. गं. टिळक.



ॐ

# श्रौतभूमी.

# प्रकरण तिसरें.

## भाग १ ला.

### उपक्रम.

### आपल्या ऋषींच्या वस्तीचा स्थलनिश्चय

(मुख्यलक्षण—सिद्धाग्नीच्या उत्तरदक्षिण पडझडीवरून उत्तरदक्षिण आर्यवर्ताचा भूगोलचा तपशील.)

"One part of the Vedas (श्रुती) deals with Karma,-forms and ceremonies (*संस्कार) the other part deals with the knowledge of Brahman and discusses religion. The Vedas in this part teach of the Self and because they do, their knowledge is approaching real knowledge.—Vivekananda's Works-Vol. VII. P. 31.

"The rivers are older than the hills which they traverse."-Geology Paradox P. 278-Mr. D. N. Wadia.

The Dravidians were a Non-Aryan race of Central Asia, who preceded the Aryans and those of Southern India were the most civilised. Women with them stood higher than men. They subsequently divided, some going to Egypt, others to Babilonia, and the rest remaining in India.--Vivekananda's complete Works--Vol. VII-P. 58.

"Pods burst and winged seeds are borne away by the winds to distant soils where, in combination with new invironments, variations are produced, and nature, full of creative curiosity, is given opportunity for making new experiments. In the history of man such experiments have been made with races, driven by some ethnic storm, who reached lands far away from their original habitation, different in climate and surroundings."--Dr. Ravindranath Tagore--The Indo--Iranians Vol. I-No. 3.

"तस्मा देतस्यामुदीच्यां दिशि ये केच परेण हिमवंतं जनपदा उत्तरकुरव उत्तरभद्रा इति वैराज्य यैव तेऽभिषिच्यन्ते"—ऐ. ब्रा. ८-१४

"भूस्तरशास्त्रविषयक आधुनिक शोधांवरून निदान दोन तरी हिमकाल आजवर होऊन गेले, असें सिद्ध झालें असून अमेरिकन शास्त्रज्ञांच्या मतें शेवटचा हिमकाल इ. स. पू. ८००० वर्षांपूर्वींच संपून हिमोत्तर कालाला आरंभ झालेला आहे. अवस्त्यांतील हिमपाताचें वर्णन भूस्तरशास्त्रांतील शोधाशीं * मिळतें आहे."—आर्य लोकांचें मूलस्थान—पा. २६६.

---

* आमचें उत्तरार्धातील चौथें प्रकरण पहा. त्यांत—सोळा संस्कार, वैदिक सूक्तें, स्तोत्रें, व हीनाहीन याग—यांचें वर्णन आहे.

" दीर्घ उषा, अखंड काळोख, दशमासावधि संवत्सरसत्रें इत्यादिकांविषयींचे उल्लेख वेदांत आहेत, तरी आर्यांचें अगदीं उत्तरेकडील मूलस्थान व तें सोडून दक्षिणेकडे त्यांनीं प्रयाण करण्याचीं कारणें या विषयींचे उल्लेख त्यांत सांपडत नाहींत. पण सुदैवानें वेदांतील ही उणीव अवेस्त्यानें फार सुरेख भरून काढिली आहे. * * उत्तरेकडील आर्यांचें मूलस्थान, व त्याचा बर्फाच्या योगानें झालेला नाश या विषयींचें अवेस्त्यांतील वर्णन स्वतंत्र एकटें असून * * तें प्राचीन काळीं खरोखर घडून आलेल्या ऐतिहासिक गोष्टीची साक्ष देत आहे असें निःसंशय दिसतें. हें वर्णन अवेस्त्यांतील वंदिदाद नामक पुस्तकाच्या पहिल्या दोन अध्यायांत आलेलें आहे."—आर्य लोकांचें मूळ वसतिस्थान–पा. २५५–मि. के. ल. ओगले.

" खुद्द ध्रुवावर सूर्य प्रथम दिसूं लागला म्हणजे एकसारखा सहा महिने क्षितिजावर असतो, आणि एकदां खालीं गेला कीं, सारखा सहा महिने खालींच असतो. पण थोडें खालीं आलें असतां जरा निराळा प्रकार दृष्टीस पडतो. तेथें एकदां सूर्य दिसूं लागल्याबरोबर कांहीं कालपर्यंत सूर्यप्रकाश व संध्याप्रकाश यांचे पर्याय होतात."—सदर.

मागील भागांत व्यापार व वसाहती यांचें विवरण आटोपलें. आतां या भागांत श्रौतभूमीचा अथवा आपल्या ऋषींच्या वस्तीचा स्थलनिश्चय कर्तव्य आहे.

आमच्या स्वतःचा थोडा *सेतिहास स्थलकालनिर्णय.—आम्ही भुसावळ जि० खानदेश येथें फर्स्ट ग्रेड ऍंग्लो व्हर्न्याक्युलर स्कूलचे हेडमास्तर असतां शाळेस नवीन आणिलेल्या वेबस्टरच्या डिक्शनरींतील भूगर्भशास्त्राधारें पृथ्वींतील निरनिराळ्या थरांच्या कालनिर्णयाचें चित्र पाहून आमच्या मनांत इ. स. १८९१ पूर्वीं दोन तीन वर्षें दोन गोष्टींचा प्रादुर्भाव झाला. त्या ह्या कीं [१] वेदांत काय आहे ? हें ठरविण्याकरितां वैदिक वगैरे सारस्वताचे देशीविदेशी ग्रंथ स्वतःच्या डोळ्यांनीं पहावे, व[२]त्यांचा कालनिर्णय जमेल तर भूगर्भशास्त्राधारें करावा. त्याचें

* ह्या विवरणांत कांहीं वैयक्तिक भाग आहे. पण तो येथें देणें अपरिहार्य आहे. कारण त्यावांचून आमचे सन्मान्य कै. टिळक साहेबांच्या आठवणींत आम्हीं उगीच मरतां मरतां वैगुण्य आणिलें म्हणून आमचेकडे दोष राहणार आहे. असें विनाकारण न व्हावें म्हणून लोकमताच्या निखाऱ्याच्या शेगडीवरील त्या विस्तवांतील श्रीयुत लेले यांच्या मध्यस्थ पितळीवर केस पिकलेल्या आह्मी ह्या संक्रांतीच्या पर्वणीनिमित्त त्यांतील तेलकट, कडवट व खोकला आणणारे तीळ साफ पांढरे करून घालितों. त्यांत आमचा हेतू असा आहे कीं त्यांच्या चरित्रकारांनीं त्यावर आठवणीच्या साखरेचा पाक थेंब थेंब टाकून त्यास वारंवार हालवून कांटा आणण्याचा प्रयत्न आमच्या अपरोक्ष करावा व त्यांवर कांटा आला तर तो आमच्या लहान थोर बंधुभगिनींस गोड बोलावें म्हणून वाटावा. ह्यांत एक त्याची चाचणी आहे. ती अशी कीं ते लेल्यांच्या पितळींत घातलेले दाणे खरे असतील तर त्यावर त्या पाकाचा कांटा यथायोग्य येईल, व ते खोटे असतील तर त्या पाकाची साखर होईल.

दृश्यफळ आम्हीं अहंमदाबाद मुक्कामीं मे. एज्युकेशनल इन्स्पेक्टर, उत्तरभाग यांचे ठाणें व मुंबई येथील शिरस्तेदार झालों असतां कै. काशिनाथपंत फडके यांच्या माजी चटकदार अरुणोदयपत्रांत दोन प्रकारें परिणत झालें. तें असें कीं— आमच्या आर्यललितविस्तार—या लेखपरंपरेंत आमच्या आर्यांच्या वसाहती, शेती, व्यापार वगैरेंचा पसारा आपल्या ह्या मायभूमींतील गोदावरी व नर्मदा यांतील भूगर्भाच्या तृतीय युगांतील मूळस्थानापासून ( आमचें सध्यां लिहून तयार झालेलें भूगर्भदर्पण पहा ) उत्तरेस मधील अलंघ्य विंध्याद्री लगतच्या गोंडवनापलीकडील उत्तर व दक्षिण गोलार्धांतील सीमाभूत भूमध्य समुद्रापलीकडल्या त्रिविष्टप ऊर्फ तिबेटापासून गोबीसमुद्र उलटून उत्तर उषांच्या देखाव्यापर्यंत व तो पसारा दक्षिणेस पूर्वपश्चिम ब्रह्मदेश, चीन व जपान व इराण, आर्बस्तान व इजित व दक्षिणेस तो पसारा मसाल्याचीं बेटें, पूर्व आफ्रिकेंत झांझिबार, मादागास्कर, केपकॉलनी व पश्चिम आफ्रिकेंत जिब्रॉल्टर या स्थळांपर्यंत पडला आहे हें वैदिक वगैरे सारस्वतावरून आधार देऊन सिद्ध केलें व तो पसारा पूर्वोक्त भूमध्यसमुद्रांतून पिरिनीजपासून कामश्चाटकापर्यंत भूगर्भाच्या प्लिओसीन काळांत एकाएकी संपातबिंदूच्या चलनानें उठलेल्या लाटेंत वर आलेल्या हिमालयसंभवाच्या पूर्वीं मेरूपर्यंत उत्तरेस पडला होता, तो हिमालयसंभवाच्या योगानें उत्पात पावलेल्या मेरूपर्यंतच्या प्रदेशांत जलप्रलय माजून पुढें हवापाणी बदललें व तेणेंकरून अन्नपाणी यांचें दुर्भिक्ष झालें, त्यांत आमचे अनेक लोक मेले गेले व देशोधडीस लागले व त्यांतील कांहीं मनूबरोबर प्राचीन विंध्याद्री व नूतन हिमालय यांमध्यें नवीन सिंधू, गंगा वगैरे नद्यांच्या गाळाच्या बनलेल्या जमिनींतल्या आर्यांनीं आवर्त म्हणजे पुनः फिरणें मूळ जातभाईंत केलें व ह्या गोंडवनाच्या भूमीचें आर्यावर्त हें नांव सार्थ केलें, कारण ते ह्या नैसर्गिक आपत्कालीं ह्या सुपीक उत्तर हिंदुस्थानांत आले होते हें गीकीच्या जिऑलजींतील क्रोलची उपपत्ती, डॅपर्स इन्टेक्चुअल डेव्हलपमेन्ट आफ युरोप व त्या काळचे रिलिफ मॅक्स यांवरून अपूर्व सिद्ध केलें. हें पाहून ज्यांस ज्यांस ह्या अपूर्व गोष्टीचा चमत्कार वाटला त्यांनीं त्यांनीं ह्या अरुणोदय कर्त्यांस वारंवार विचारावें कीं ह्या आर्यललित विस्ताराखालीं मधुप म्हणून सही करणारा कोण कोठें आहे ? तें कळविण्यास मनाई असतांही त्या कर्त्यांनीं एका मोठ्या मनुष्यास आमचें नांवगांव सांगितलें व त्यावरून छडा काढून ते अहंमदाबादेस आमचेकडे आले व त्यांनीं हव्या होत्या त्या सर्व गोष्टी विचारून घेऊन आम्हांस उत्तेजनार्थ श्रीयुत रमेशश्चंद्र दत्त यांचें सिव्हिलिझेशन इन एन्शन्ट इंडिया हें पुस्तक आणून दिलें. तें आम्ही वाचलें. त्यांतील वैदिक काळाचा प्रारंभ मोक्षमुल्लरप्रमाणें इ. पू. १५०० वर्षांचा वाचून आम्हांस बरें वाटलें नाहीं व आम्ही त्यांच्या पुस्तकावर इतर बाबतींत अनुकूळ पण कालाच्या बाबतींत प्रतिकूल टीका डा. क्रोलच्या थिअरीप्रमाणें वगैरे हिमालयाची नवीन उत्पत्ती व त्यानंतर आर्यावर्ताची पुन्हां भरती सिद्ध करून दाखविली. तेव्हां त्यांनीं आम्हांस सदरहू पुस्तकाचें भाषांतर मराठी करून त्यास सदरहू काल बदलण्यास

सांगितलें. त्याप्रमाणें सदरहू पुस्तकापैकीं वैदिक काळाच्या इतिहासाचें भाषांतर करून अरुणोदयांत छापिलें. इतक्यांत आमची बदली एल्फिनस्टन मिडल स्कूल, मुंबई, यांत मास्तरच्या जागीं झाली, तेव्हां आमचा ठाण्यांतील अरुणोदयाचा संबंध सुटला व आम्ही मुंबईमध्यें पाश्चात्य पण्डितांचे अनमान-धपक्याचे सर्व कालनिर्णय मिळवून त्यांचें खण्डन व त्यावेळीं लोकमान्य टिळक यांच्या नुकत्याच झालेल्या ओरायनमधील ज्योतिषमूलक कालनिर्णयाचें गौरवपूर्वक मण्डण करून सदरहू पुस्तकाची शास्त्रीय प्रस्तावना माझे मित्र श्रीयुत राजाराम शास्त्री भागवत यांचे मार्फत खरा प्रकार नामक मासिक पुस्तकांत छापिली. त्यांत वेदाचा काल हिमालयाच्या उत्पत्तीच्या तृतीय चतुर्थ कालीं म्हणजे भौगर्भिक उपपत्तीच्या २६००० वर्षांच्या चक्राच्या निम्में म्हणजे बारा तेरा हजार दिला; कारण आम्हांस असें दिसून आलें होतें कीं एखाद्या वस्तूच्या घडणीस जितका वेळ लागतो तितका त्या वस्तूच्या मोडास बिलकूल लागत नाहीं. हें तत्व ध्यानांत धरून ग्रीस व रोम या देशांच्या ऱ्हास–काळास जर त्यांचा इतका उर्जित दशेचा काळ तर आपल्या हिंदुस्थान देशाच्या विदेशी महंमदगोरीच्या पहिल्या मुसलमान राज्याच्या मुहुर्तमेढीपासून कांग्रेसच्या स्थापने-पर्यंतच्या ऱ्हास काळास किती वर्षांचा ऊर्जितदशेचा काळ अशीं दोन त्रैराशिकें मांडिलीं असतां सदरहू उत्तराचा काळ २०,००० वर्षांपेक्षां जास्त येऊं लागला. तेव्हां कलीचे दोन पाद व्यतीत झाले आहेत असें समजून हें मित १३००० वर्षांचें मान धरलें असतां तें आम्हाप्रमाणें इतरांसही मान्य होईल असें वाटलें व इ. स. १८९६ त पहिली एज्युकेशनल कॉन्फरन्स पुण्यास सायन्स कालेजांत भरली असतां आम्ही तींत—+प्रायमरी एज्युकेशन ऍज इट इज ऍंड ऍज इट शुड बी—हा लेख वाचला, तेव्हां तो पुष्कळांस मान्य होऊन नवी ओळख झालेले लोकमान्य टिळक काउन्सिलर यांनीं वाचण्यास नेला व तो पुढें डा. भांडारकर यांनीं वाचावयास मागितला असतां श्रीयुत लक्ष्मण गणेश शास्त्री लेले यांचे बरोबर त्या लोकमान्यांच्या घरीं गेलों व तो लेख परत घेतांना त्यांस सदरहू आमचे शोधांचें छोटेखानी पुस्तक सादर केलें तेव्हां त्याजबरो-बर भूगर्भशास्त्रांतील डा. क्रोलच्या थिअरीचा ऊहापोह केला व नंतर आम्ही परतून डा. भाण्डारकरांकडे आमचा निबंध नेऊन दिला. नंतर पुष्कळ वर्षांनीं (१९०२ ?) त्यांचें आर्टिक होम प्रसिद्ध झालें. या आमच्या झालेल्या चर्चेचा व पुस्तकाचा उल्लेख त्यांच्या सुंदर पुस्तकांत मुद्दामच म्हणून केलेला नसो, पण आम्हांस त्यांच्या पुढील अर्थाच्या वाक्यांत समाधानास अप्रत्यक्ष जागा सांपडली आहे. " खरें सांगावयाचें तर ( लो. टिळक म्हणतात ) ध्रुवस्थाना-विषयींचीं प्रमाणें वेदांतून शोधून काढण्याची कल्पना मूळ शास्त्रीय शोधावरून जरी सुचली नसली तरी तिला त्यावरूनच उत्तेजन मिळालें. " ( आर्यलोकांचें मूलस्थान, पा. ३१६–रा. ओगले ) यावरून त्यांस ह्या कामास स्फूर्ति आमच्या-

+ हा लेख लाहोरच्या वेदिक मॅग्याझीनमध्यें प्रसिद्ध झाला आहे.

सारख्या लोकांच्या भेटींतील शास्त्रीय वादविवाद व त्यांचे संग्राहक मूळग्रंथ यांचे योगानें मिळाली हें त्यांस कबूल होतें असें दिसतें.

कै० लोकमान्य टिळकांच्या ओरायन ग्रंथाचा सारांश—या ग्रंथांत— " प्रथमतः वेदकाल निर्णयाचें महत्व व त्याच्या निरनिराळ्या पंडितांनीं स्वीकारलेल्या निरनिराळ्या पद्धति सांगितल्या आहेत. पुढें वैदिककाळाच्या पंचांगांचें थोडें वर्णन देऊन यज्ञयागाचे काळ व वर्षारंभ यांचें विवेचन केलें आहे. यानंतर वसंतसंपात एका काळीं कृत्तिकांत होता असें दाखविणाऱ्या गोष्टी देऊन तो काळ ठरविला आहे. त्यापुढें मृगशीर्षांत वसंतसंपात होता हें दाखविण्यासाठीं मृगशीर्ष नक्षत्राचें दुसरें नांव जें अग्रहायणी त्याच्या व्युत्पत्तीचा विचार करून तें एकदां पहिलें नक्षत्र होतें असें दाखविलें आहे; व त्यांतच अग्रहायणी शब्दाचा व्युत्पत्तीवर आणखीं चुकीच्या गोष्टी कशा रचल्या गेल्या हें सांगून, संपाताच्या आंदोलनाच्या कल्पनेचें एक शक्य कारण दिलें आहे. त्याच्यापुढें मृगाच्या शीर्षाविषयींचा वेद, ब्राम्हणें व पुराणें यांतील, व तशाच ग्रीक पुराणांतील गोष्टी देऊन त्यांचें निकट साम्य दाखविलें आहे. नंतर ग्रीक ओरायन व त्याचा पट्टा यांचें आपला ' प्रजापति ऊर्फ यज्ञ ' व त्याचें यज्ञोपवीत याशीं आणि पारशांच्या होम ( आपला सोम ) व त्याची मेखला याशीं साम्य दाखवून, ग्रीक ओरायन शब्द वैदिक अग्रहायण शब्दापासून निघाला असावा असें सांगितलें आहे. त्या सर्वांच्या मुळाशीं वसंतसंपात एका काळीं मृगांत होता ही कल्पना आहे! त्यापुढें वैदिक काळच्या लोकांचें ज्योतिषविषयक ज्ञान किती होतें हें सांगून, तेव्हां वसंतसंपात मृगशीर्षांत होता हें दाखविण्यास प्रत्यक्ष पुरावा म्हणून ऋग्वेदांतील एक ऋचा व एक सबंध सूक्त यांचें विवेचन केलें आहे. शेवटीं वसंतसंपांत त्याहूनही पुढें म्हणजे पुनर्वसू नक्षत्रामध्यें होता असें दाखविणारी एक गोष्ट पुन्हा एकवार तिन्ही काळ म्हणजे कृत्तिकाकाळ, मृगशीर्षकाळ व पुनर्वसूकाळ यांच्या मर्यादा सांगून हीं अनुमानें इतर गोष्टींशीं अगदीं अविरुद्ध आहेत असें दाखविलें आहे. "—वेदकालनिर्णय—पा. २—३

" वेदांग ज्योतिषाचे वेळीं वसंतसंपात भरणी नक्षत्राच्यापुढें दहा अंश होता म्हणून त्याचा काल गणितानें इ. स. पू. १३०० च्या सुमारास ठरतो. तैतिरीय ब्राह्मणामध्यें कृत्तिका नक्षत्रांत वसंतसंपात असावा असें अनुमान काढण्यास प्रमाणें सांपडतात. यावरून त्याचा काळ इ. स. पू. २५०० वर्षांच्या सुमारास असावा असें ठरतें. ऋग्वेदामध्यें हा वसंतसंपात मृगशीर्ष, आग्रहायणी किंवा ग्रीक ओरायन या नक्षत्रांत असल्याबद्दलचीं प्रमाणें सांपडतात. यावरून हा काल इ. स. पू. ४००० वर्षांचा असावा. याच्याही पूर्वीं पुनर्वसूंत वसंतसंपात असल्याचीं अस्पष्ट ज्ञापकें आढळतात. पण त्याचा स्पष्ट उल्लेख वैदिक वाङ्मयांत सांपडत नाहीं.

यांत तीन काल दिले आहेत. १ आदितिकाल—इ. पू. ६००० ते ४००० वसंतसंपात पुनर्वसूंतून मृगशीर्षांत येईपर्यंत. २ मृगशीर्षकाल—इ. पू. ४००० ते २५०० वसंत संपात मृगशीर्षपासून कृत्तिकेंत येईपर्यंत. ३ कृत्तिकाकाल—इ. पू. २५०० ते १४०० वसंत संपात कृत्तिकेंतून भरणीजवळ येईपर्यंत. याप्रमाणें ऋग्वेदाचा काळ इ. स. पू. ४००० वर्षांचा म्हणजे पाश्चात्य पण्डितांच्या काळापेक्षां २०० वर्षें पूर्वींचा ठरतो व आर्यसंस्कृति इजिप्शियन, चिनी किंवा खाल्डियन पेक्षां जुनी ठरते.

कै. लोकमान्य टिळकांचा वैदिक कालाचा निर्णयः—" हिमपातामुळें ध्रुवस्थानाचा नाश झाल्यावर त्यांतून बचावलेल्या आर्यांनीं शक्य तेवढी सुधारणा व धर्म बरोबर घेऊन तेथून गाशा गुंडाळला, आणि या प्रलयांतून तगून निघालेल्या धर्मांच्या अवशेषावर हिमोत्तर कालांतील धर्माची रचना त्यांनीं केली. या उपपत्तीप्रमाणें हिम्मोत्तर कालापासून तों गौत्तमबुद्ध पर्यंतच्या काळाचे जे भाग होतात ते असे:—

१०,०००—८००० [ शकापूर्वीं ]-मूळ ध्रुवस्थानचा हिमकालानें झालेला नाश आणि हिमोत्तरकालाचा आरंभ.

८०००—५००० [ शकापूर्वीं ]—मूलस्थानांतून आर्यांचें प्रयाण. प्रलयांतून निभावलेले आर्यलोक या काळांत युरेशियाच्या उत्तर भागांत नवीन वसतिस्थानाच्या शोधार्थ भटकत होते. या काळांत वसंतसंपात पुनर्वसूंत होता; पुनर्वसूनक्षत्राची देवता अदिति असल्यामुळें वेदकालनिर्णयांत दिलेल्या संज्ञेअन्वयें या कालाला अदितिकाल ऊर्फ मृगशीर्षपूर्वकाल हें नांव देऊं.

६०००—३००० [ शकापूर्वीं ]—मृगशीर्षकाल—या काळांत वसंतसंपात मृग नक्षत्रांत होता. बरींच वैदिक सूक्तें या काळाच्या आरंभींचीं असून तेव्हां ध्रुवस्थानासंबंधीं आख्यायिकांच्या खऱ्या अर्थांनी स्मृति नष्ट झाली नव्हती. पंचांगांची सुधारणा करण्याचे व्यवस्थित प्रयत्न या कालांत होऊन यज्ञयागांतही विशेष शिस्त उत्पन्न झाली.

३०००—१४०० ( शकापूर्वीं )१—कृत्तिका काळ—यांत वसंतसंपात कृत्तिका नक्षत्रांत होता. कृत्तिकांपासून नक्षत्रचक्राला आरंभ करणारे, तैतिरिय संहिता व ब्राह्मणें इत्यादि ग्रंथ या काळांत झाले. वैदिक सूक्तांची संहितात्मक रचना या काळाच्या आरंभीं झाली. मूळ ध्रुवस्थानाविषयींच्या आख्यायिका या सुमारास अस्पष्ट होऊन वैदिक सूक्तांचा अर्थ यापुढें अधिकाधिक गूढ होत गेला. यज्ञपद्धतीला शास्त्रीय स्वरूप येऊन तिची याच काळांत वाढ झाली. या कालाच्या शेवटीं वेदांगज्योतिष मूळ रचण्यांत आलें, निदान त्यांत सांगितलेली संपाताची स्थिति पाहून निश्चित करण्यांत आली.

१४००—५०० ( शकापूर्वीं )—बुद्धपूर्व काळ—या कालांत सूत्रग्रंथ व षड्दर्शनें यांचा अवतार झाला. "

टीपः—( १ ) ओरायनमध्यें सांगितलेल्या कालाहून सदर काळ जरा भिन्न आहेत. अदिती कालाची पूर्व मर्यादा ध्रुवोपपत्तीमुळें चालू हिमोत्तर कालाच्या आरंभापर्यंत हटल्यामुळें हा भेद लोकमान्य टिळकांना करावा लागला आहे.

( २ ) वेदामध्यें कोठेंही ध्रुवाचें ऊर्फ अत्यंत उत्तर मेरूचें नांव आलें नाहीं, त्या अर्थी आमच्या शोधाप्रमाणें आमच्या श्रौतधर्मी आर्यांची वसाहत पुराणा-प्रमाणें पण वेदाप्रमाणें नव्हे हो, सुमेरुखंडांत म्हणजे समरकंदांत लोकमान्य टिळकांच्या शोधाप्रमाणें ३० दिवसांच्या उषेच्या भूमीपर्यंतच जाऊन पोहोचलेली होती असें दिसतें ( आर्य लोकांचें मूळ वसतिस्थान, पान ९६ यांतील तीस उषांचें सूक्त पहा ), आमच्या समरकंदांतील मेरूस जर सुमेरू म्हटलें आहे तर उत्तर ध्रुवाजवळील मेरूस सापेक्षतः कुमेरू हें नांवच तो शब्द योजणारास अभिप्रेत दिसतें.

कै. लोकमान्य टिळकांच्या 'आर्टिक होम'चा सारांश.—" आर्यांचें वसतिस्थान या पुस्तकाची कल्पना ओरायनप्रमाणें ज्योतिशास्त्रावर अवलंबून नाहीं. तें शास्त्र स्वतः टिळकांच्या पूर्ण परिचयाचें असल्यामुळें त्यांना त्यांत स्वतंत्र विचार करितां येत होता. पण या दुसऱ्या पुस्तकाचे कामीं आधारभूत असे कांहीं सिद्धांत भूगर्भशास्त्रावरून घेतलेले असल्यामुळें या बाबतींत टिळकांना कांहींसें परावलंबी व्हावें लागलें. या विषयावरील अनेक पुस्तकें त्यांनीं वाचलीं व टिपणें केलीं. पण त्यांवरून त्यांस निष्कर्षमूलक असा सिद्धान्त मांडतांना केवळ अज्ञ नसलें तरी अतज्ञ म्हणून टिळकांना प्रथम आत्मविश्वास पटेना. वास्तविक या नव्या दिवसांत प्रत्येक विषयांतील उपांगांचा अभ्यास वाढून तींही जवळ जवळ शास्त्रें बनलेलीं असतात. शिवाय एका विषयाचें अध्ययन करणाराला, त्याच्या जवळच्या इतर असहोदर अशाही विषयांतून, केव्हां केव्हां माहिती समजून घ्यावी लागते, सुदैवानें पाश्चात्य विद्यापीठांतून अनेक शास्त्रांचे पण्डित एकत्र कार्य करीत असतात. त्यामुळें एकाची दुसऱ्यास मदत होते. यामुळें टिळकांस मोठी अडचण पडली. तथापि स्वतः भूगर्भशास्त्री नसतांही केवळ या शास्त्रावरील पुस्तकें वाचून जीं प्रमेयें त्यांनीं बनविलीं त्यांत कोणी फारशा चुका काढिल्या नाहींत. पण त्यांच्या ग्रंथांतील वादाचा मुख्य विषयही तो नसून, वेदांतील कांहीं ऋचांचा जो अर्थ त्यांनीं बसविला व आर्यांचें मूलवसतिस्थान उत्तरध्रुवाजवळ होतें असें ठरविलें या अर्थाच्या संबंधाचा होता.

उत्तरध्रुवाजवळील प्रदेश खि. श. पू. ८००० वर्षें वसति करून राहण्याला योग्य होता हें शास्त्रज्ञांनीं ठरविलें. पण तेथें कोणी लोक प्रत्यक्ष राहत होते कीं नाहीं याविषयीं स्पष्ट निर्णयाचीं कांहीं साधनें जीं त्यांना भूस्तरविद्येंत मिळालीं नाहींत, तीं ऋग्वेदांत टिळकांना आढळलीं. अर्थात उत्तरध्रुवाजवळच्या प्रांतांतील निसर्गसिद्ध देखाव्यांचें वर्णन जर ऋग्वेदांत सांपडतें तर ऋग्वेद लिहिणारे किंवा त्यांचे पूर्वज हे सदर देखावे दृष्टीस पडण्यासारख्या ठिकाणींच कोठें तरी राहात असावे, असें अनुमान टिळकांनीं काढिलें. या कल्पनेनें

आर्यांच्या मूलवसतिस्थानावर जसा प्रकाश पडला तसाच ऋग्वेदाच्या कांहीं ऋचांचा जो अर्थ लागत नव्हता, तो चांगला लागण्याला मदत झाली. टिळक म्हणतात ही कल्पना माझे मनांत येऊन पुष्कळ दिवस झाले; पण भूगर्भशास्त्राची मदत मिळल्याशिवाय मजला ठाम वाटणारा सिद्धान्त बोलून दाखविण्याचें धैर्य होईना."–नाम. केळकर.

भागवार माथितार्थ.—आर्टिक होमचे भाग तेरा आहेत. पहिल्या भागांत शास्त्रीय शोधापूर्वी वैदिक इतिहासाची मर्यादा फार अलीकडे पडली होती, ती फार मागें गेली. दुसऱ्या भागांत ध्रुवप्रदेशाची हवा एकदां उष्ण होती. ती थंड होत गेली, व प्रालेयप्रलय झाला व तीच हवा पुन्हां उष्ण होत गेली. यांत एवढेंच सुचविलें कीं कोणी असें मानिलें कीं ध्रुवप्रदेशांत माणसें राहत होतीं तर तें अशक्य नाहीं. तिसऱ्या भागांत ध्रुवप्रदेशांत प्रालेयप्रलयापूर्वी वसंतऋतु वास करीत होता. तेथें सूर्य दक्षिणेस उगवतो व चांदिण्या उगवतही नाहींत व मावळतही नाहींत तर त्या प्रदक्षिणा घालितात. तेथें ६ महिन्याचा दिवस व ६ महिन्याची रात्र असते. सूर्य एकदांच उगवतो व एकदांच मावळतो म्हणजे येथें एकच सकाळ व एकच संध्याकाळ आहे. येथें उषा नांवाचा संधिप्रकाश क्षितिजावर वाटोळा फिरतो व तो अनेक दिवस टिकतो. चौथ्या भागांत ह्या दिवस रात्रीस देवांचा दिवसरात्र कसें म्हणतात हें दाखविलें आहे. यास समरस इराणी, ग्रीक, नार्स, जर्मन वगैरे लोकांच्या दंतकथा आहेत. पांचव्या भागांत उषेच्या ऋचेचें आधारभूत भाषांतर आहे. सहाव्या भागांत दीर्घरात्र व दीर्घदिवस यांचें साधार विवेचन आहे. त्यांत पांच ऋतूंचें वर्ष म्हणजे ७ ते १० महिन्यांचें तुटकें वर्ष आहे–असें दाखविलें आहे. आठव्या भागांत नवग्व व दशग्व म्हणजे नऊ दहा महिन्यांच्या सत्रांचे वर्णन वरील समजुतीस पोषक दिलें आहे. यांत–गवानां–याचा अर्थ दिवस होतो. बाकीच्या गवाम् म्हणजे दिवस वृत्र चोरितो असा समज असे. नवव्या भागांत इंद्रवृत्र-युद्धाची कथा आहे. दहाव्या भागांत तदनुरूप प्रातःकालची देवता, त्रिपाद-विक्रम, सप्तमूल, दशमूल विभाग, द्वादशराज्ञयुद्ध, दशमुखरावण वगैरे कल्पनांचा उलगडा केला आहे अकराव्या भागांत इराण्यांचा झेंदावेस्ता नामक वेदांतील प्रमाणें देऊन या विचारास पुष्टि दिली आहे. तेराव्या भागांत आर्यधर्मांचे खोल काळांत शिरलेलें मूळ जरी पुष्कळ अनुमानग्रस्त आहे तरी त्यावरून आर्यसंस्कृति खरी ठरवितात. भूगर्भशास्त्रोक्त २६००० वर्षांनंतर प्रलय व पुनरुत्पत्ति होते यावरून जीवसृष्टीचें व वेदांचें अनादित्व व पुनर्जन्म सिद्ध होतें.

अग्रहायन ग्रंथ जसा निरुत्तर आहे तसा दुसरा मनोरंजक पण निरुत्तर नाहीं.

ज्योतिर्गणित हें वेदांग आहे हें पाश्चात्य पण्डितास ठाऊक होतें. पण वैदिक ग्रंथांचा संबंध भूगर्भशास्त्राशीं लावितां येईल हें त्यांस ठाऊक नव्हतें."–नामदार न. चिं. केळकर–लोकमान्य टिळक यांचें चरित्र–पा. ६३२

टीपः—हीं मोठ्या अक्षरांची विधानें ध्यानांत धरण्यासारिखीं आहेतः वैदिक ग्रंथाचा संबंध भूगर्भ शास्त्राशीं लावितां येईल—हें लोकमान्यांस मूळ ठाऊक झालें काय ? नसेल तर तें आम्ही आमच्या त्यांच्याशीं पहिल्या भेटींत त्यांस अवगत करून दिलें हें आमच्या मागील बनावावरून ( गोष्टी ) ठरत नाहीं काय ?

कै. लोकमान्य टिळकांचा वैदिक स्थळांचा निर्णय—"दीर्घ, अखंड काळोख, दशमासावधि संवत्सरसत्रें इत्यादिकाविषयींचे उल्लेख वेदांत आहेत, तरी आर्यांचें अगदीं उत्तरेकडील मूलस्थान व तें सोडून खालीं दक्षिणेकडे त्यांनीं प्रयाण करण्याचीं कारणें या विषयींचे उल्लेख त्यांत सांपडत नाहींत. पण वेदांतील ही उणीव ( पारशांच्या ) अवेस्त्यानें फार सुरेख भरून काढिली आहे."

"वंदिदादच्या पहिल्या अध्यायांत अहुरमज्दानें ( सं. असुरमर्दनानें ) उत्पन्न केलेल्या सोळा भूमींची यादी दिली आहे. प्रत्येक भूमि तयार झाल्यावर अहुरमज्दाच्या प्रतिस्पर्धी जो अंग्रमैन्यु यानें ती रहाण्याला अयोग्य करण्यासाठीं तींत कांहीं तरी अरिष्ट उत्पन्न केलें आहे. या अध्यायचा सारांश असा:—

"पवित्र अशा झरदुष्ट्राला अहुरमज्द म्हणतो, 'जी भूमि पूर्वी पसंतीला सर्वस्वी अयोग्य होती ती मी सुखकर केली आहे. मी हें केलें नसतें, तर सर्व प्राणी ऐर्यन वइजोकडे धांवले असते. १-२.

"ज्या अहुरमज्दानें ऐर्यन वइजो ही पहिली उत्तम भूमि निर्माण केली. तेव्हां अंग्रमन्यूनें प्रतिकारार्थ म्हणून, मोठा अहि व हिम अशी आसुरी सृष्टि तींत उत्पन्न केली. तेव्हां तेथें हिंवाळ्याचे दहा महिने असून उन्हाळ्याचे दोन आहेत. ३-४.

"ज्या अहुरमज्दानें सुगंधसुक्त अशी गऊ नांवांची दुसरी उत्तम भूमि उत्पन्न केली. तेव्हां तिच्या प्रतिकारार्थ अंग्रमन्यूनें पशु आणि क्षेत्रें यांचा नाश करणारी अशी दुष्ट मक्षिका तेथें उत्पन्न केली. ५"

याप्रमाणें एकामागून एक सोळा प्रदेश अहुरमज्दानें उत्पन्न केले. त्यांत चवदावा वरेन ( सं. वरूण ), पंधरावा हप्त हेंदु ( सं. सप्तसिंधु ) व सोळावा रंघ ( सं. रसा ) नदीच्या कांठचा प्रदेश असे होते.

या सोळा प्रदेशांपैकीं दहांची ओळख आज प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांशीं झेन्द पंडितांनीं खात्रीलायकपणें लाविलेली आहे. अर्थात् वेदिदादांतील हा मजकूर केवळ दन्तकथात्मक नसून ऐतिहासिक आहे असें मानावें लागतें !"

याप्रमाणेंच या ऐर्यन वेजोचा राजा यिम ( सं. यम ) हा होता. त्यांत अहुरमज्दानें सभेस बोलाऊन पुढील प्रमाणें सूचना केली आहे—

"हे विवंगत पुत्रा यिमा ( सं. वैवस्वत मनू ), या पृथ्वीवर भयंकर थंडीचा काळ येऊन अतीशय धुकें पडेल, व अत्युच्च्य शिखरावरही अरेहि इतका बर्फांचा थर पडेल. आणि त्यामुळें रानांत राहणारे, डोंगरावर राहणारे, व दऱ्यांत राहणारे असे तिन्ही प्रकारचे पशु नाश पावतील. हा हिमकाल ये पशूंकरितां क्षेत्रांत विपुल तृण उगवेल; वाहणारे पाण्याचे प्रवाह आणि वित बर्फ यांच्यामुळें ही भूमि पृथ्वींत सुखकर अशी आहे, व तींत अद्यापिहि पशूंचं

उमटलेलीं आहेत. म्हणून तूं एक दीर्घ चौकोनी वर तयार कर आणि त्यांत, गाई, मेंढ्या, मनुष्यें, श्वान, पक्षी व रक्तवर्ण अग्नि यांचीं बीजें आणून ठेव."

असल्या प्रालेयप्रलयासंबंधें आम्ही आमच्या भूगर्भदर्पणांत दोन उपपत्ती दिल्या आहेत:–१ जुनी पूर्वोक्त–डॉ. क्रोलची.–ह्याच्या मताप्रमाणें आमच्या पृथ्वीची कक्षा बदामासारिखी दीर्घवर्तुलाकार आहे व तिच्या संपातबिंदूचें चलन होतें व तेणेंकरून कांहीं ठराविक कालानें आपल्या पृथ्वीवर प्रालेयप्रलय होतो; २ नवी लायलची.–ह्याच्यामतें आपल्या पृथ्वीवर जमीन व पाणी यांची जी वाटणी झालेली असते तींत कांहीं फरक पडतो व कांहीं भूमाग पाण्यांतून वर येतात व कांहीं पाण्याखालीं जातात व तेणेंकरून प्रालेय–प्रलय होतो.

याप्रमाणें "भूस्तरविषयक आधुनिक शोधांवरून आजवर दोन तरी हिमकाल होऊन गेले असें सिद्ध झालें असून अमेरिकन शास्त्रज्ञांच्या मतें शेवटचा हिमकाल इ. स. पूर्वी ८००० वर्षांपूर्वींच संपून हिमोत्तर कालाला आरंभ झालेला आहे."

टीप.—तर सदरहू कारणामुळें ऐर्यन वैजोमध्यें जमीन खालवर झाल्याळें जेथें पूर्वीं दहा महिन्याचा उन्हाळा व दोन महिन्यांचा हिंवाळा होता तेथें दोन महिन्यांचा उन्हाळा व दहा महिन्यांचा हिंवाळा होऊन भयंकर प्रालेयप्रलय माजला व तेथील लोक आपली बाडबिछात घेऊन रस्ता सांपडला तिकडे पडत झडत पळाले !

आमच्या दशावतारांच्या वर्णनांत मत्स्यावताराच्या कथेंत (शतपथ ब्राह्मणां) प्रमाणें जलप्रलय चोहोंकडे माजला असतां एका मत्स्यानें मनूस एका नावेंतून आणून आपल्या हिमालयावरील [ उत्तरगिरी ] नौबंधन शिखरावरल्या एका झाडास बांधावयास लाविलें. नंतर त्या पुराचें पाणी ओसरलें तशी ती नांव खालीं आली व तो व इडा नांवाची स्त्री या जोडप्यापासून प्रजा वाढून विंध्य व हिमालय यांमधील ऐर्यन वैजो या अर्थाचें आर्यावर्त यांत आर्यांनी पुनः उलट खाऊन वसाहत झाली. ह्या कथेंत हे आर्य कोठून व केव्हां येथें आले याचा मागमूस नाहीं. पण ह्या मूळच्या गोंडवनाच्या प्रदेशावर हिमनद्यांनीं (ग्लेसीअर्स) सिंधू, गंगा वगैरे नद्यांतून अतोनात गाळ येऊन ती जमीन सुपीक झाली असो पण त्यांत कर्दमोत्थ शीतज्वर होत असावा ह्मणून यास पूर्वीं नाशक असें नांव पडलें होतें. पुढें तेथील हवा सुधारली व नाशकाचें अनाशक होऊन त्या गोंड देशास गौड म्हणजे गूळ पिकविणारा देश ऊर्फ पहिलें स्वर्ग असें नांव पडलें असें दिसतें [ छा. उ. ८–१–६ टीप पहा. ]

असेंच कथानक नोव्हाचें गलबताचें बायबलांत व ड्यूकेलियनच्या गलबताचें ग्रीक पुराणांत आहे.

ऋग्वेदामध्यें ( शतम् हिमाः ) ( १०६४,१४,२-३३,६,६४,१६ इ. ) हे शब्द व ऐतरेय ब्राम्हणांत । तस्मादेतस्या मुदीच्यां दिशि ये केच परेण हिमवतं जनपदा उत्तर कुरव उत्तर मद्रा इति वैराज्यायैव तेऽभिषिभिंच्यन्ते, ( ८,१४ ) ह्या उत्तर दिशेस उत्तर कुरू व उत्तर मद्र नांवाचे प्रजासत्ताक देश हिमालयापली

कडे आहेत. त्याचें वर्णन रामायण व महाभारत यांत अजिंक्य म्हणून केलें आहे. ( ख्या. ४,४३,३८ ) [ इ. स. अ. २८ ]. त्याचा उल्लेख टालमी नांवाच्या यवन भूगोल वेत्त्यानें-ऑत्तर कोरो पर्वत, लोक व नगर म्हणून केला आहे.

तात्पर्य, ह्या वैदिक व अवैदिक वचनांच्या पुराव्यावरून आमच्या आर्य ऋषींच्या वसाहतीची उत्तर मर्यादा सुमेरुखंडांत ३० दिवसांच्या साम्राज्यापर्यंत होती व तिचा नाश प्रालेयप्रलयानें नव्हे तर जलप्रलयानें झाला व अजून सैबिरियाच्या बर्फमय प्रदेशांत केसाळ हत्ती ( मॅमॉथ ), हरणें ( रेनडियर ) वगैरेचीं अवशिष्ट शवें कुत्र्यांस खाण्यालायक सांपडतात.

पण लोकमान्य टिळकांनीं ज्याप्रमाणें वर दिलेल्या अवतरणामध्यें असें कबूल केलें आहे कीं वरील ऐर्यन वेजोचें वर्णन हिमालय व विंध्याद्री यामधील आर्यावर्तास यथार्थ लागतें त्याप्रमाणेंच त्यांनीं असें कबूल केलें आहे कीं "वंदिदादांतील मजकुराचें प्रत्येक अक्षर ऐतिहासिक दृष्ट्या खरें आहे असें म्हणण्याचा आमचा उद्देश नाहीं; कारण आपल्या मेरूप्रमाणेंच ऐर्यन वेजो देखील पुराणांच्या जाळ्यांत गुरफटून गेलेला आहे. तरी पण इराणी आर्यांच्या ध्रुवाजवळील मूलस्थानाची ऐतिहासिक माहितीचें वंदिदादांत दिली असून, त्याच्या पहिल्या फर्गदांत, ते आपल्या मूलस्थानांतून (?) निघून हिमोत्तरकालाच्या आरंभीं रसा ( रंघ ) नदीच्या काठीं किंवा सप्तसिंधूच्या प्रांतांत येऊन तेथें वसाहत करीपर्यंत त्यांना वाटेंत लागलेल्या देशांचेंच वर्णन आहे, या गोष्टी नाकबूल करितां येत नाहींत." ( आर्य लोकांचें मूलस्थान पा. २६८ ).

यावर आमचें म्हणणें असें कीं ऐर्यन वेजो हें हिमालय व विंध्य या पर्वतांतील आर्यावर्त होऊं शकेल हा असा संशय लोकमान्यांस येण्यास जीं कारणें झालीं, तीं त्यांनीं आपल्या लोकमान्य ग्रंथांत कोठेंही दिलीं नाहींत. पण तीं आम्हांस भूगर्भशास्त्राचा वगैरे अभ्यास करीत असतां अशीं आढळलीं आहेतः—

( १ ) वरील हिमालय व विंध्य यांतील आर्यावर्त गोंड देशाचा गौड म्हणजे गूळ पिकविणारा गोड देश होऊन बसला. असो, पण तो एकदां नाशक स्थितींत असून पुढें अनाशक अथवा प्रथम स्वर्गाच्या स्थितींत येऊन पोहोंचला आहे असें छांदोग्य उपनिषदांतील मन्त्रावरून उघड दिसतें; कारण त्यास नाशक व अनाशक नांवें अनुक्रमें प्राप्त झालेलीं त्यांतील अनाशकायन ( अ+नाशक+अयन) या शब्दांतील पहिल्या दोन पदांवरून काढितां येण्यासारिखीं आहेत;

( २ ) या गोंड किंवा गौड देशामध्यें हिमालयाच्या उत्पत्तीनंतर त्यावरून आलेल्या तीन हजार फूट चिखलाची भर पडली व उंच म्हणून अगस्त्य ऋषीस दुर्लंघ्य असलेला विंध्य ( रामायण पहा ) पुढें ठेंगणा व सुलंघ्य झाला आहे.

( ३ ) या कर्दमाच्या भरीपूर्वीं येथें हिमालयावरून निघालेल्या सिंधू, गंगा-यमुना, ब्रह्मपुत्रा वगैरे नद्यांनीं तर काय पण त्यांच्या पूर्वज असख्यात हिमनद्यांच्या ओघांनीं ह्या प्रदेशाचा गोडा समुद्र तयार केला होता व नंतर तो चिखलानें हळूहळू भरून काढिला. त्याची साक्ष त्या हिमनद्यांच्या पसाऱ्यांतील ओघा

बाहेर सुटून पडलेले शिलाखंडांची परंपरा अजून जागोजाग विंध्याद्रीपर्यंत सुस्पष्ट देते [ भूगर्भशास्त्र पहा. ] आमचें भूगर्भदर्पण पहाल तर हिमालयाच्याच परंपरेपैकीं लहानशा आल्प्सपर्वताच्या ह्या शिलाखंडाचें असेंच युरोपच्या भूगर्भशास्त्रावरून दिलेलें एक चमत्कृतिजनक उदाहरण आढळेल !

( ४ ) नुकताच आम्ही भोपाळचा तलाव व त्यांचें मूळचें पात्र भोपाळपासून वरखेडीपर्यंत २५० मैल क्षेत्रफलाचें विंध्याद्रीच्या लगत्यास पाहिलें ! तो तलाव वरील गोड्या समुद्राचा अवशिष्ट भागच होता व त्याची पाहणी करून आमच्या अनेक विद्याव्यसनी परमारवंशीय धारच्या भोजराजानें त्यास दोन ठिकाणीं कायतें अप्रतिम बांधकाम करून त्यास तलावाचें रूप दिलें असें आम्हांस वाटलें ! ( त्याचें वर्णन पुढें हिंदुकाळांत येईल ). हा तलाव एका मुसलमान सरदारानें फोडिला. तो वाहून वस्तीस व शेतीस लायक होण्यास तीस वर्षें लागली ! तर वरच्या गोड्या समुद्राचा खाडा चिखलानें भरून नाशकचा अनाशक म्हणजे स्वर्ग होण्यास किती युगें लागलीं असतील याची कल्पना यावरून करावी ! कारण त्या तलावाचा खड्डा अजून भरलेला नाहीं. फक्त त्यांतील भोपाळच्या सध्याच्या पांच सहा मैल तलावापलीकडील पाणी नुसतें निचरून त्याच्या पलीकडील पात्राची उत्तम गव्हाळी शेतीनें वेष्टित सदतीस खेड्यांची वसाहत झाली आहे ! हें आम्ही खुद्द ( १८-१२-२३ ) जाऊन पाहिलें.

( ५ ) आपल्या जंबुद्वीपांत मनुष्याच्या आद्य अवशेषाचीं चिन्हें नर्मदा व गोदावरी ऊर्फ वृद्धगंगा ह्यांच्यामधील खनिजखचित द्रविड प्रदेशांत आढळतात. तेव्हां यास पितरदेश म्हणण्यास कोणत्याही शास्त्रशाची हरकत येणार नाहीं.

( ६ ) अलीकडच्या नवीन शोधाप्रमाणें पारशी लोकांची मिसळ ह्या आर्यावर्तांतील लोकसंख्येंत झालेली आहे. हें चंद्रगुप्त साम्राटाच्या पाटणा शहराच्या खोदकाम करणाऱ्या पण्डितानें तेथील अवशेषांवरून सिद्ध केलें आहे व त्याच्या दक्षणच्या महेन्द्र पर्वतावरून आलेल्या श्रीपरशुराम अवतारानें त्याच्या वडिलांस मारणाऱ्या मस्त क्षत्रियांचें शासन करून व जिंकलेली भूमी ब्राह्मणांस दान देऊन पश्चिम हिंदुस्थानांत साठ अनुयायांसह वसाहत केली. ते सर्व लोक पारशी होते असें त्यांच्या वंशजांच्या रूपलक्षणांवरून आमच्या रा. राजवाडे ह्या निरिच्छ इतिहासशोधार्थ कष्टणाऱ्या पुरुषानें ठरविलें आहे !

(७) आर्यावर्त याची पदें आर्य+आवर्त अशीं पडतात. त्यांचा अर्थ म्हटला म्हणजे आर्यांचें परत आगमन असा होतो, व ऐर्यनवैजो ह्यांचीं लक्षणें ह्या आर्यावर्ताशीं सरूप आहेत असें आम्हांस निखालस वाटतें. तर संकटसमयीं घरचे मुलगे घरीं ह्या आर्यन वैजोंत किंवा आर्यावर्तांत आले असले पाहिजेत; कारण ज्याप्रमाणें मनू उत्तरेच्या गिरीवरून म्हणजे हिमालयावरून गलबतानें आला आहे, तसाच मोठा माणसांचा लोट हिंदुकुशावरून इराणाप्रमाणेंच पंजाबाकडे ह्या

आर्यावर्तांत घुसला आहे तर त्यांत हे दोन्ही श्रोत्रिय शाखांचा अंतर्भाव ह्या देशची लेकरें म्हणून निःसंशय झाला असला पाहिजे !

( ८ ) हें तर काय पण मंगळासारखे आपल्या पृथ्वीवरील पूर्वपश्चिम फिरण्यास सुलभ पट्टे प्रामुख्येंकरून, पांढऱ्या, तांबड्या, पिवळ्या, काळ्या व फिक्या मनुष्यांनीं गजबजलेले होते, ते हिमालयाच्या उत्पत्तीच्या वेळीं एकत्र जुळले असतां ह्या हिंदुस्थानांत वेदांत उल्लेखिलेल्या पंचजनांची भरती झाली असली पाहिजे. कारण त्यापूर्वीं नौकानयन विद्या ज्यांस येत नसे त्यांस उत्तरदक्षिण जाण्यास जशीं हरकत असे, तशी ती आतां राहिली नाहीं.

या व अशा अनेक प्रमाणांवरून आम्हांस नामदार केळकर यांच्याप्रमाणें निखालस वाटतें कीं कै० लोकमान्य टिळक यांचा ओरायन हा ग्रंथ कालगणेच्या बाबतींत ज्याप्रमाणें सर्वसंशयविदेही झाला आहे त्याप्रमाणें त्यांचा आर्टिक होम हा ग्रंथ आर्यांचे मूलस्थान ठरविण्याच्या मुख्य बाबतींत तरी झाडून सर्व संशयांचा विच्छेद करणारा झाला नाहीं; कारण यांतून आपले पूर्वज मेरुखंडांत होते हा जसा सरळ निष्कर्ष निघतो, तसा ते ते उत्तरध्रुवावरील मूळचे रहिवासी हा निष्कर्ष सुतराम जमत नाहीं. तर आमच्या मूळ आद्यप्रमाणाप्रमाणें आमचे लोक जंबुद्वीपांतून पोटाच्या सोईप्रमाणें सुमेरुखंडांत उत्तरकुरुपर्यंत गेले होते, ते जलप्रलयाच्यावेळीं पोटाच्या सोईबरोबर जीवावरही आफत गुदरल्यामुळें ते श्रोत्रिय वैदिक आपलें मूलस्थान म्हणून उत्तरगिरी म्हणजे हिमालय उत्पन्न झाला त्यावेळीं म्हणजे शकापूर्वीं आठ दहा हजार वर्षें (आमच्या म्हणण्याप्रमाणें दहा बारा हजार वर्षें नसो )-दाशराज्ञ सुदासाचे भरत कुळाचें नांवावरून भरतखंड म्हटल्या जाणाऱ्या भरत खंडांत विंध्याद्रि व हिमालय यांमध्यें गोंडवनावर नवीन झालेल्या गौड देशांत घरच्या घरीं परत येऊन आपल्या भरभराटीच्या वेळीं पावलेल्या आर्य ह्या नांवावरून त्यास आर्यावर्त म्हणजे आर्यांच्या प्रत्यागमनाचें स्थान हें सार्थ नामाभिमान देण्यास कारण झाले, तसेंच त्वष्ट्याच्या कांहीं कटकटीवरून विभक्त झालेले त्यांचे सहोदर श्रोत्रिय अवैस्तिक आपलें मूळस्थान म्हणून तेव्हां सदरहू आर्यावर्तांत उर्फ अर्यन वैजोंत प्रत्यागमन करून त्यांत समरस झाले आहेत, मग त्यांतील कोणी गलवतांतून उत्तरगिरिवरून ( शतपथ ब्राम्हण ) व त्यांतील कोणी खुषकीनें हिंदुकुशाकडून पश्चिमेस इराणांत म्हणजे आर्यांच्या रानांत व पूर्वेस आर्यावर्तांत पार्सी आले असोत. अहुरमझ्दाचे मनांत अवेस्तिक पारशांनीं ऐर्यन वेंजोमध्यें न जावें असें होतें असें त्याच्या तोंडच्या एका वाक्यावरून दिसतें, त्याप्रमाणें त्यांतील कांहीं जण स्वतंत्रतेनें फटकून राहण्याकरितां मूळच्या अढीनें इराणांत गेले होते ! पण तेही मुसलमानांच्या स्वाऱ्यांच्या आफतीच्या वेळीं आपले बीजस्थान आठवून व मूळची अढी विसरून घरचे मुलगे घरीं ह्या आर्य देशांत खंबायतच्या राज्यांत सनजान येथें आपले अग्नी घेऊन कसे आले आहेत हें सांगावयास नकोच; कारण ही गोष्ट अलीकडे अगदीं ऐतिहासिक

काळांत घडली आहे. म्हणूनच " पुराणांतील नद्यांचीं किंवा प्रदेशांचीं नांवें मागाहून खऱ्या नद्यांना किंवा प्रांतांना दिलीं असतील. पण तेवढ्यावरून केवळ नामसादृश्यावरून त्या मूळ नद्यांचीं किंवा देशांची स्थानें जर आपण ठरवूं लागलों तर ऐर्यन वइजो हा हिमालय व विंध्य पर्वतांच्या मधला प्रदेश होय असें म्हणावें लागेल; कारण या प्रांतालाही ऐर्यन वइजो याच अर्थाचें आर्यावर्त असें नांव आहे " ( आर्य लोकांचे मूलस्थान पान २६४ )–असें संदिग्ध वाक्य लोकमान्याचें खुद्द आहे. यांतील संदिग्धपणाचा त्याग करून आपणास आर्यावर्त म्हणजे आर्यांच्या प्रत्यागमनाचें स्थान असा अर्थ अक्षरशहाच नव्हे तर तत्वशाहाही घेऊन चाललें पाहिजे हें सिद्ध होय असें म्हणतों; कारण आम्हांस कांही डॉ. वॉरेन सारख्या पाश्चात्य पंडिताच्या मतास पुष्टी द्यावयाची नाहीं किंवा पुरस्सरगदा दिसूं लागली असतां इंग्रजी म्हणीप्रमाणें स्वतःची कुऱ्हाड घामून घ्यावयाची नाहीं. आम्हांस सत्यास धरून जें असेल तें सांगावयाचें तर मनुष्यास राहण्यास अनुकूल अशी वसंतऋतु नांदणारी जागा ऐतरेय उपनिषदाप्रमाणें जलाच्छादित पृथ्वीवर प्रथम सूर्याचे लंबरूप किरण व पृथ्वीच्या पोटांतील धग यांनीं जबुद्वीपासारख्या क्रान्तिप्रदेशांत उत्पन्न होईल व ती पुढें त्रिविष्टपांत व नंतर सुमेरूच्या खंडांत उत्पन्न होईल घ ती शेवटीं उत्तर कुमेरू ऊर्फ उत्तर ध्रुवावर उत्पन्न होईल हें आमच्या इ. स. १८९१ त प्रसिद्ध झालेल्या आर्यललित विस्तारांतील शास्त्रसिद्ध तत्व कोणाही सुज्ञ व मर्मज्ञ मनुष्यास मान्य झाल्यावांचून राहणार नाहीं.

पुष्टी—ह्या प्रतिपादनाचें दृढीकरण हिंदुस्थानसरकाचे पुराणवस्तुशोधक खात्याचे मुख्याधिकारी सर जान मार्शल यांनीं अलीकडे ( इ. स. १९२४ अखेर ) पुढीलप्रमाणें अनपेक्षित रीतीनें केलें आहे:—

" पंजाब व सिंध या प्रांतांत सुमारें ७ ते ९ हजार वर्षांपूर्वीं बांधिलेलीं पक्क्या विटांचीं व पाण्याच्या उत्तम सोईचीं मंदिरें नऊ शहरांत तेथील जमिनीच्या खोदकामांत सांपडलीं आहेत, व आणखींही कांहीं सांपडण्याचा संभव आहे. या शहरांतील अवशेषांवरून हिंदुस्थानच्या सुधारणेचा काळ बाबिलोनियाच्याहून प्राचीनतर असल्याचें सिद्ध होतें. इतक्या प्राचीन काळची नगररचनेची सुंदर पद्धति, प्रशस्त व सरळ रस्ते, प्रेक्षणीय व अपूर्व अशा विटा, शिक्कामोर्तबाचे नमुने इत्यादि प्रकार पाहून आश्चर्य वाटतें ! ह्या हिंदुस्थानांतील जीर्णकामाचा परंपरागत संबंध असिरिया, मेसापोटेमिया व सुमेरिया यांतील संस्कृतींशी निकट आहे. "—केसरी ३–२–२६ पा. २—क्रानिकल ( १९२४ )—

यावरून काय सिद्ध होतें ? आम्हांस पूर्वीं सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील पोरबंदर येथें भेटलेले सुमेर किंवा मेर लोक, सिंध व पंजाबमधील पुराणवस्तुशोधकानें शोधून काढिलेल्या मंदिराचे पडझडीचे कर्ते सुमेर लोक, असिरिया व मेसापोटेमिया यांतील पूर्वोक्त नासत्यादी वैदिक देवपूजक सुमेर लोक व सुमेरु खंडांतील ( समरकंद ) उपरिनिर्दिष्ट यक्ष, गंधर्व, किन्नर, व अप्सरा यांच्या

गानवादनासक्त इंद्रादी देवलोक यांचे संस्कृतीचे जलप्रलयापूर्वी व नंतर वाहिलेलें अनुलोम व विलोम प्रवाह यांच्या दक्षिणोत्तर व उत्तरदक्षिण दिशा सुस्पष्ट दाखवितात. त्या दिशांत मध्यें हिमालय भूमध्यसमुद्रांतून अवचित आड आल्यामुळें कांहीं अपूर्व फरक झाला असेल पण त्या दिशा कोणासही अमान्य करितां येणार नाहींत असें आमचें अधिक ठाम मत झालें आहे. पण यावर कोणी अशी शंका घेईल कीं असे जे दक्षिणोत्तर व उत्तरदक्षिण लोकप्रवाह वाहिले त्यांचा मागमूस आमच्या स्मरणाच्या किंवा सारस्वताच्या चित्रपटावर कसा नाहीं ? त्यास एकच उत्तर शास्त्रदृष्टीनें देतां येण्यासारिखें आहे. तें हें कीं आम्हांस दोन गोष्टींची जाणीव ( संवेदना ) रहात नाहीं; ( १ ) अत्यंत सूक्ष्म गतीची व ( २ ) अत्यंत तीव्र गतीची. आमच्या लोकांचा दक्षिणोत्तर प्रसार अन्नपाण्याच्या सोईप्रमाणें अगदीं मुंगीच्या पायांनीं अनेक युगांच्या अवधींत झाला आहे व त्यांची दक्षिणोत्तर धांवपळ जलप्रलयाच्या वेळीं कानांत गोष्ट सांगितल्याप्रमाणें थोड्या वेळांत हजारों मैल झाली आहे ! म्हणून ह्या गत्यंतरांच्या गोष्टी आम्हांस अत्यंत अगोचर राहिल्या आहेत पण त्यांच्या खुणा पृथ्वीच्या पोटांतील खडकांच्या चित्रपटावर चित्रगुप्तानें वज्रलेपाप्रमाणें सुमेरु खंडांतील मर्व्हपासून हिंदुस्थानांतील पोरबंदरपर्यंत लिहून ठेविल्या आहेत ! त्या योगमार्गांतील दीर्घसंयम दृष्टीनें पाहील त्यास स्पष्ट गोचर होतील !

पण हें ज्यांस खोटें वाटत असेल त्यानें आपल्या दिव्यदृष्टी, बहुदृष्ट, सुज्ञ, व मर्मज्ञ विवेकानन्दाच्या समग्र ग्रंथांतील पुढला उतारा व्हाल्यूम, ७, पान ३१३ वरील पहावा म्हणजे सुमेरियन लोकांचे मेसापोटेमिया, असिरिया, बाबिलोन व इजिप्त देश हे तर काय पण उत्तर हिंदुस्थानांतील आर्यही त्यांच्या कोणकोणत्या गोष्टीबद्दल ऋणी आहेत हें उघड होईल.

"The Madras Presidency is the habitat of that Tamil race, whose civilisation was the most ancient, and a branch of whom, called the **Sumerians,** spread a vast civilisation on the banks of the **Euphrates** ( मेसापोटेमिया ) in very ancient times; whose **astrology** ( फलज्योतिष ), **religious lore**(धर्म), **morals** ( नीती ) and **rites** ( संस्कार ) &c. furnished the foundation for the Assirian ( असिरिया ) and Babilonian ( बाबिलोनिया ) civilisations; and whose **mythology** ( पुराणें ) was the source of the **Christian Bible** ( बायबल ). Another branch of the Tamils spread from the Malabar coast (मलबार) and gave rise to the **wonderful Egyptian** (इजिप्त) **civilisation** and the **Aryans** ( आर्य ) also are indebted to this race in **many respects.** × × Even now the study of the **Dvaita** ( द्वैत ), **Vishishtadvaita** and **Advaita** ( अद्वैत ) **Systems** of **Vedanta** ( वेदान्त ) is cultivated more in Southern India than anywhere else. Even now the thirst for religion is stronger here than in any other place."

**सिद्धान्त—दक्षिण हिंदुस्थानांतील सुमेर अथवा द्रवीड यांनीं पश्चिम एशिया व आफ्रिका ह्यांत वसाहती केल्या.**

यवन ( ग्रीक ) लोक ह्या सुमेर इजिप्शियनांचें शिष्य होते तर त्यांचे शिष्य सारे युरोपियन परंपराया झाले; कारण युरोपियन हे त्या यवनांचे शिष्य आहेत. यांमधील मुख्य कडी विस्तारभयास्तव एका वाक्यांत देतोः—

The Greeks were the deciple of these ( Egyptians. )–The same P.328



## +भाग दुसरा

### आपल्या ऋषींच्या वसाहतींच्या अक्षांशाचा निश्चय.

"In all our religious observances, we start always with a declaration of the place and the time of their performance. × Every religious ceremony begins with a संकल्प as it ends with a समर्पण and every संकल्प must begin with देशकालसंकीर्तन. Such is the importance we are accustomed to attach to the **time** and the **place** co-ordinates. History and Geography thus seem to us to be the two pillors on which our religious arch is supported. × ×

Mr. Tilak's two books—The orionand the Arctic Home may be looked upon as giving the **time** and the **place** co-ordinates.—Shrouta Bhumi.—Preface–Prof. R. S. Athawale.

The latitude of 88° is indicated by 30 days of continuous dawn.—The same.–P. 34.

(The) latitude 86°½ approximately would be indicated by the continuous dawn of 24 day periods.—The same. p. 29.

Our interpretations of the original signification of the terms चतुर्विंश, द्वादशाह, दशरात्र, अभिप्लव and पृष्ठ्य so fit in with each other ( in latitude 86°½ ) that they form a congruous and consistent whole and thus lend mutual support. To expect stronger and weightier evidence than what has been offered above is too much, especially when we remember that we are dealing with a long antiquity–separated from our own times from even historical times by ages, and that many must have been the catastrophes that overtook and broke many links in the chain of evidence.—The same P. 41.

"If there is a country on earth which can justly claim the honour of having been the cradle of the human race or at least the scence of primitive civilisation × × that country assuredly is India."–Mr. Cruser.

मागील भागांत श्रौतभूमीच्या स्थलनिश्चयाचें विवरण आटोपलें. आतां या भागांत श्रौतभूमीचे अथवा आपल्या ऋषींच्या उत्तरेकडील वसाहतीचे अक्षांश हे निश्चित करावयाचे आहेत.

---

+हा भाग सामान्य वाचकांच्या वाचनास सुगम नाहीं. म्हणून त्यानें तो पाहिजे तर वाचनांत सोडावा.

कै. प्रो. आठवले यांचा गणितानें श्रौतभूमीचा अक्षांशनिश्चयः—आमच्या प्रत्येक धर्मसंस्कारामध्यें देशकालसंकीर्तन येतें. मग तो संस्कार संध्येसारखा नित्याचा असो किंवा मौंजिबंधनासारखा नैमित्तिक असो. म्हणून प्रत्येक संस्कारांत संकल्प व समर्पण हे दोन आद्यंतीं विभाग असतात व त्यांत देशकालसंकीर्तन हें त्यांतील आद्य संकल्पांत प्रथमारंभीं येतें. त्याअर्थीं आमच्या धर्माच्या कमानीची उभारणी इतिहास व भूगोल अथवा कालदेश यांच्या खांबावर केलेली असली पाहिजे. तर आपल्या श्रुतींचा धर्मांतील अनिश्चित भूमींचा गणितानें अक्षांशनिश्चय कै. लोकमान्य टिळकांच्या शोधांत पूरक म्हणून कर्तव्य आहे. तर आमच्या प्राचीन आर्यांच्या ध्रुवाकडील मूळभूमीचा प्रत्यक्ष पुरावा असा आर्टिक होमच्या चौथ्यापासून आठव्या अध्यायापर्यंत पुरा झाला आहे. यासंबंधें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं ह्या वरच्या उत्तर ध्रुवाकडील अक्षांशाचें पंचांग व आपल्या हिंदुस्थानाकडील खालच्या अक्षांशाचें पंचांग कांहीं बाबतींत भिन्न असलें पाहिजे व ही पंचांगांतील कालगणना प्राचीनकाळीं यज्ञसत्रांकरितां किंवा यज्ञसत्रांनीं करीत असत. तर ह्या सत्रांतील यज्ञांचें स्वरूप व वांटणी हीं ते यज्ञ ज्या स्थानीं अथवा अक्षांशांत होत असतील, त्यांतील हवेच्या व जागेच्या वैशिष्ट्याप्रमाणें होत असले पाहिजेत. म्हणून अशी अपेक्षा करणें वस्तुस्थितीस धरून आहे कीं ज्याप्रमाणें आपल्या लोकांच्या वसाहतीचें अक्षांश बदलले व वर्षाचें स्वरूप बदललें तर त्याप्रमाणें तत्समान बदल यज्ञसंबंधीं पंचांगांतील कालगणेंत जरूर करावी लागत असली पाहिजे; व जुने विभाग व व्यवस्था हीं स्थानिक परिस्थितीशीं विरोधी झाल्यावरही टिकून राहात असल्यामुळें व पुराणप्रिय जोशी, उपाध्ये व धर्माधिकारी ( आमच्या हल्लींच्या टिळक—भाटवडेकर पंचांगांच्या सुधारणेनंतर येथील जोशी भटांच्या हट्टाप्रमाणें ) जुने कालविभाग व कालव्यवस्था सोडून देण्यास नाखुश असतात, त्यानें काय फायदा होतो? तो हा कीं नव्या पंचांगाबरोबर जुन्या पंचांगांतील कालगणनेचे अवशिष्ट भाग सांपडतात. म्हणून असें होतें कीं वरच्या अक्षांशांतील लोकवस्ती उठून खालच्या अक्षांशांत वसाहात करावयास आली असेल तर ह्या खालील अक्षांशांतील स्थळांतल्या पंचांगामधील कालगणनेंत उत्तर ध्रुवाकडील विशेष गोष्टी कोठें कोठें आढळतील. म्हणून असलें यज्ञसंबंधीं सारस्वताचें परीक्षण केल्यास कांहीं लभ्यांश होण्याचा संभव असतो. लोकमान्य टिळकांनीं आपल्या यज्ञसंबंधीं पंचांगोक्त कालगणनेंत आपल्या उत्तरेकडील वसाहतीचा ठसा उमटलेला आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याप्रमाणें तो त्यांत ( ठसा ) उमटला आहे ही गोष्ट त्यांच्या ग्रंथाच्या पुष्कळ वाचकांस पटल्यावांचून राहिली नसेल. त्यांतील आदर्शभूत गवामयन व त्याचे पर्याय यांचें स्वरूप, अवधी व घटना व १०० रात्री चालणारे सोमयज्ञ, अतिरात्र यज्ञ, यांचें स्वरूप, उद्देश व अवधी, गौ चोरणाऱ्या वृत्राची दन्तकथा, आकाशापलीकडे ऋतांत ( म्हणजे अमेरिकेंत ) पतनाची दन्तकथा, वृत्राचे १०० किल्ले—ह्या यच्चयावत प्रकारांवरून ९ ते १० महिन्यांची दिनाचर्या व प्रत्येक

२४ तासांची एक याप्रमाणें १०० अखंड रात्रींची अवधी सुस्पष्ट सिद्ध होते. लोकमान्य टिळक म्हणतात कीं शंभर रात्रीचे यज्ञ, कीं जे मूळारंभीं वर्षांतील प्रकाशरहित भागीं करावयाचे होते, त्यांचा अंतर्भाव वार्षिक सत्रामध्यें करण्यांत आला व अशाप्रकारें त्या यज्ञसत्राची अवधी ६ महिन्यांपासून १२ महिन्यापर्यंत विस्तृत करण्यांत आली.

तर ह्याच्या भरीस घालण्याकरितां दोन गोष्टी करावयाच्या आहेत. त्यांत सुस्पष्ट करावयाच्या राहिलेल्या चतुर्विंश, अभिप्लव, पृष्ठ्य वगैरे संज्ञांचा खुलासा करणें व २ वैदिक वाक्यांतील व कथांतील अनेक चमत्कारांच्या स्थळांचे अक्षांश काढणें.

सारभूत वर्षाचे घटक.—रा. आठवले यांनीं ध्रुवबिंदूपासून २० अंशापर्यंत निरनिराळ्या स्थळीं एका वर्षाच्या अवयवांचें प्रमाण कसें असतें हें दाखविण्याकरितां कित्येक कोष्टकें दिलीं आहेत. त्यांत ध्रुवाच्या प्रदेशांतील वर्षाच्या अवयवाचें प्रमाण स्थानपरत्वें बदलतें. त्या प्रमाणास आधारभूत धरून त्या त्या स्थानाच्या अक्षांशांचा निश्चय करितां येतो. म्हणून प्रत्येक पूरक अक्षांशास धरून सारभूत वर्षाचे अवयव पुढें दिले आहेत:—

## १ ( ध्रुवाजवळचे वर्षाचे घटक. )

पोलर क्यालेन्डर

| घटक | चौवीस तासांची अवधी |
|---|---|
| दीर्घ दिवस | १८६–१८८ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | ४४–४३ |
| दीर्घ रात्र | ९१ |
| अखंड उषा | ४४–४३ |

## २ ( १° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक. )

को–लॅटिट्यूड १°+९९.°

| | |
|---|---|
| सूर्य प्रकाश व संधिप्रकाश यांचे विपर्यय ( आल्टरनेशन ) | ५ |
| दीर्घ दिवस | १८१–१८४ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचे पर्याय | ६–५ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | ३८–३७ |
| संधिप्रकाश व काळोख यांचे पर्याय | ७ |
| अखंड दीर्घरात्र | ८४ |
| काळोख व संधिप्रकाश यांचें पर्याय | ७ |
| अखंड दीर्घ उषा | ३८–३७ |

## ३ ( १° १/२ पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक ).

को-लॅटिटयूड १° १/२+८८° १/२

| घटक | चोवीस तासांची अवधी |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचे विपर्यय | ८ |
| दीर्घ दिवस | १७८–१८० |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ८ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | ३५–३४ |
| संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय | १० |
| अखंड दीर्घ रात्र | ८१ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | १० |
| अखंड दीर्घ उषा | ३५–३४ |

## ४ (३° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक).

को-लॅटिटयूड ३°+८७°

| | |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश | १५ |
| अखंड दीर्घ दिवस | १७१–१७४ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | १६–१५ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | २७–२६ |
| संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय | २० |
| अखंड दीर्घ रात्र | ६१ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २० |
| अखंड दीर्घ उषा | २७–२६ |

## *५ (३° १/२ पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक).

को-लॅटिटयूड ३° १/२+८६° १/२

| | |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | १७–१८ |
| अखंड दीर्घ दिवस | १६९–१७१ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | १८–१७ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | २४–२३ |
| संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय | २४ |
| अखंड दीर्घ रात्र | ६६ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २४ |
| अखंड दीर्घ उषा | २४–२३ |

* ह्या अक्षांशावरील वर्षाच्या घटकांचा दृढ अभ्यास करा; कारण त्यांवरच ह्या ज्योतिर्गणिताची मुख्य मदार आहे. म्हणून त्यांची ओळख सर्व कोष्टकांत इष्टतम आहे.

## ६ ( ४° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड ४°+८६°

| घटक | चौवीस तासांची अवधी |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | २१–२० |
| अखंड दीर्घ दिवस | १६६–१६९ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २०–२१ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | २२–२० |
| संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय | २८ |
| अखंड दीर्घ रात्र | ६० |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २७ |
| अखंड दीर्घ उषा | २१–२० |

## ७ ( ४½° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड ४½°+८५½°

| | |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | २३ |
| अखंड दीर्घ दिवस | १६३–१६५ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २३–२२ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | १९ |
| संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय | ३१ |
| दीर्घ अखंड दीर्घ रात्र | ५६ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ३१ |
| अखंड दीर्घ उषा | १९–१८ |

## ८ ( ७½° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूट ७½°+८२½°

| | |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचे विपर्यय | ३९ |
| अखंड दीर्घ दिवस | १४८ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचे विपर्यय | ३९ |
| अखंड सायंकाळचा संधिप्रकाश | २ |
| संधिप्रकाश व काळोख यांचे विपर्यय | ६७ |
| काळोख व संधिप्रकाश यांचे विपर्यय | ६८ |
| अखंड दीर्घ उषा | २ |

## ९ ( ८° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड ८°+८२°

| | |
|---|---|
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचें विपर्यय | ४१ |
| अखंड दीर्घ दिवस | १४४ |

| घटक | चौवीस तासांची अवधी |
|---|---|
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचें विपर्यय | ४१ |
| संधिप्रकाश व काळोख यांचें विपर्यय | ६९ |
| काळोख व संधिप्रकाश यांचें विपर्यय | ७० |

## १० ( १०°पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड १०°+८०°

| | |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश व सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ११ |
| अखंड दीर्घ दिवस | १३२ |
| सूर्यप्रकाश, व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४२ |
| सूर्यप्रकाश, संधिप्रकाश, काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ११ |
| काळोख, व संधिप्रकाश याचा विपर्यय | १२६ |

## ११ ( १४°पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड १४°+७६°

| | |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश, सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ३२ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| अखंड दीर्घ दिवस | १०९ |
| सूर्यप्रकाश, व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| सूर्यप्रकाश, संविप्रकाश, काळोख, व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ३२ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | १०३ |

## १२ ( १४°½ पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड २४°½+७५°½

| | |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश, सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | २४ |
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| अखंड दीर्घ दिवस | १०७ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| सूर्यप्रकाश, संधि काश, काळोख, संधिप्रकाश यांचा विपर्यय | ३४ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | १०२ |

## १३ ( १५° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिटयूड १५°+७५°

| | |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश, सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ३८ |
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| अखंड दीर्घ दिवस | १०३ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| सूर्यप्रकाश, संधिप्रकाश, काळोख व संधिप्रकाश-यांचा विपर्यय | ३८ |

| | |
|---|---|
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ९८ |

## १४ ( १६° पूरक अक्षांशावरील वर्षाचें घटक )

को-लॅटिट्यूड १६°+७४°

| घटक | चोवीस तासांची अवधी. |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश, सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४६ |
| अखंड दीर्घ दिवस | ९६ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४५ |
| सूर्यप्रकाश, संधिप्रकाश, काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ४४ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ९१ |

## १५ ( २०° पूरक अक्षांशावरील वर्षाचे घटक )

को-लॅटिट्यूड २०°+७०°

| | |
|---|---|
| काळोख, संधिप्रकाश, सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ६९ |
| संधिप्रकाश व सूर्यप्रकाश यांचा विपर्यय | ५० |
| अखंड दीर्घ दिवस | ६४ |
| सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ५० |
| सूर्यप्रकाश, संधिप्रकाश, काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ६९ |
| काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय | ६३ |

या कालमानांच्या विचारामध्यें रात्री या शब्दाचा सहा तऱ्हेनें अर्थ होऊं शकतोः—

१ सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंतचा काळ;
२ सूर्यास्तापासून पूर्वेस उषेच्या उदयापर्यंतचा काळ;
३ संधिप्रकाशानंतरच्या काळोखापासून सूर्योदयापर्यंतचा काळ;
४ संधिप्रकाश व उषा वगळून उरलेला खऱ्या काळोखाचा काळ;
५ चोवीस तासांची एक अहोरात्र ( संध्याकाळपासून संध्याकाळपर्यंत किंवा मध्यरात्रीपासून मध्यरात्रीपर्यंत वगैरे ).
६ अज्ञात ( रूपकानें )

या सहा अर्थांपैकीं शेवटचा अज्ञात हा अर्थ रूपकानें अध्यात्मिक असल्यामुळें तो आपल्या बिलकुल उपयोगाचा नाहीं; कारण आपणास नैरुक्त अर्थ असेल त्याचीच जरूर आहे. सोमयागांपैकीं शतरात्र हा भाग शंभर रात्रींच्या अवधींचा आहे. तर त्यामध्यें रात्री या शब्दाचा अर्थ काय अभिप्रेत आहे हें पाहिलें पाहिजे.

बऱ्याच उच्च अक्षांशामध्यें सूर्यप्रकाशरहित काळाचे पुढील पांच घटक आढळतातः—

१ अखंड ( कंटिन्युअस ) संधिप्रकाश;

२ संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय;
३ अखंड काळोख;
४ काळोख व उषा यांचा विपर्यय;
५ अखंड उषा.

या पांच भागांची जोडणी निरनिराळ्या प्रकारें केल्यास रात्रीं या शब्दाचे नऊ प्रकार होतील:—

| प्रकार | | एकत्र करावयाचे भाग | प्रकार | | एकत्र करावयाचे भाग. |
|---|---|---|---|---|---|
| १ | ... ... | १ ते ५ | ६ | ... ... | २ ते ३ |
| २ | ... ... | १ ते ४ | ७ | ... ... | ३ ते ५ |
| ३ | ... ... | १ ते ३ | ८ | ... ... | ३ ते ४ |
| ४ | ... ... | २ ते ५ | ९ | ... ... | |
| ५ | ... ... | २ ते ४ | ० | ... ... | |

टीप.—या रात्रीच्या नऊ अर्थांनीं कित्येक पूरक अक्षांशांमध्यें रात्रींच्या निरनिराळ्या अवधी होतात. त्यांचा विचार करणें योग्य आहे; कारण त्यावांचून १०० दिवसांच्या अवधीची नव्या अर्थाची दीर्घरात्र कोठें शक्य आहे व कोठें शक्य नाहीं हें समजणार नाहीं.

कोष्टक:—वरील निरनिराळ्या नऊ अर्थांनीं रात्रींच्या अवधीं दाखविणारें:—

| पूरक अक्षांश को-लॅटिटयूड | १ (१-५) | २ (१-४) | ३ (१-३) | ४ (२-५) | ५ (२-४) | ६ (२-३) | ७ (३-५) | ८ (३-४) | ९ (३) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०° | १७९ | १३५ | १३५ | १३५ | ९१ | ९१ | १३५ | ९१ | ९१ |
| १° | १७४ | १३६ | १२९ | १३६ | ९८ | ९८ | १२९ | ९१ | ८४ |
| १½° | १७१ | १३६ | १२६ | १३६ | १०१ | ९१ | १२६ | ९१ | ८१ |
| ३° | १६३ | १३६ | ११६ | १३६ | १०९ | ८९ | ११६ | ८९ | ६९ |
| *३½° | १६१ | १३७ | ११३ | १३७ | ११३ | ८९ | ११३ | ८९ | ६५ |
| ४° | १५८ | १३७ | १०९ | १३७ | १०९ | ८८ | १०९ | ८८ | ६० |
| ४½° | १५६ | १३७ | १०६ | १३७ | १०६ | ८७ | १०६ | ८७ | ५६ |
| ७½° | १४० | १३८ | ७० | १३८ | १३६ | ६८ | ७० | ६८ | ० |
| ८° | १३९ | १३९ | ६९ | १३९ | १३९ | ६९ | ६९ | ६९ | ० |
| १०° | १२७ | १२७ | ६३ | १२७ | १२७ | ६३ | ६३ | ६३ | ० |
| १४° | १०३ | १०३ | ५१ | १०३ | १०३ | ५१ | ५१ | ५१ | ० |
| १४½° | १०२ | १०२ | ५१ | १०२ | १०२ | ५१ | ५१ | ५१ | ० |

*ह्या ओळींतील आंकडे या विषयाच्या समजुतीस फार महत्वाचे आहेत.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५° | ९८ | ९८ | ४९ | ९८ | ९८ | ४९ | ४९ | ४९ | ० |
| १६° | ९१ | ९१ | ४५ | ९१ | ४५ | ४५ | ४५ | ४५ | ० |
| २०° | ६९ | ६९ | ३४ | ६९ | ६९ | ३४ | ३४ | ३४ | ० |

टीप:–[ १ ] वरील कोष्टकाकडे नजर दिली असतां हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे कीं वेदांत उल्लेखिलेली १०० दिवसांच्या अवधीची नव्या अर्थाची दीर्घ रात्र कोठेंही, [ ध्रुवावरही ] शक्य नाहीं. ध्रुवाजवळ तिची अत्यंत दीर्घ अवधी म्हटली म्हणजे सुमारें ९१ आहे.

[ २ ] उषेचे स्वतंत्र यज्ञयाग होत असल्यामुळें तिचा अंतर्भाव रात्रीमध्यें करीत नसत. याप्रमाणेंच अखंड सायंकाळचा संधिप्रकाशही रात्रीमधून वगळीत असत.

( ३ ) नीच अक्षांशांमध्यें लघु सायंकाळ संधिप्रकाश असतो तेथें देखील रात्रीस प्रारंभ म्हटला म्हणजे सूर्यास्ताबरोबर झाला असें समजत नाहींत, तर तिचा प्रारंभ प्रत्यक्ष काळोख पडूं लागला म्हणजे समजतात. याप्रमाणेंच संधि-प्रकाश रात्रींतून वगळण्याची गोष्ट उच्च अक्षांशांमध्येंही (८२° ते ९०° ) करितात. पण सायंकाळच्या अखंड संधिप्रकाशानंतर व सकाळच्या उषेपूर्वीं काळोख व संधिप्रकाश यांचा विपर्यय येतो, व दोन्ही विपर्ययांमध्यें एखादी अखंड रात्र आल्याशिवाय जो संधिप्रकाशाचा विपर्यय मध्यें येतो, तो संध्याकाळचा किंवा सकाळचा हें ओळखण्यास सामान्य प्रेक्षकांस कठीण जातें. म्हणून शक्यता पाहतां उच्च अक्षांशांतील प्रेक्षकांस ( ५, ६ व ८ ) एवढेच अर्थ मननीय राहतात.

( ४ ) असें असल्यामुळें शंभर मेंढ्या किंवा बैल यांचें बळी, वृत्र अथवा शंबर याच्या शंभर किल्ल्यांचा नाश, शंभर रात्रिक्रतूः त्रितआप्त्य याची कथा व विष्णूचा तृतीय पाद ह्यांनीं दर्शित शंभर रात्री म्हटल्या म्हणजे त्या १°½ अथवा १५ पूरक अक्षांशांत शक्य आहेत. पण ६ व ८ रकान्यांतील ( कॉलम ) रात्रीची अवधी १०० संख्येपर्यंत पोहोचत नाहीं. म्हणून हें उघड आहे कीं ८८°½ अथवा ७५° अक्षांश ह्यांचीच कायती जागा अशीआहे. तींत १०० पुरे पुरे रात्रिक्रतू करणें संभाव्य आहे.

तात्पर्यः—गणितानें काय सिद्ध झालें तें पहा:—

( १ ) १०० अखंड रात्री १५° पूरक अक्षांशावर १, २, ४, व ५ या अर्थानें संभाव्य आहेत;

( २ ) १०० अखंड रात्री ५°½ पूरक अक्षांशावर ३ व ७ या अर्थानें संभाव्य आहेत; व

( ३ ) १०० अखंड रात्री १°½ पूरक अक्षांशावर ५ वा अर्थानें संभाव्य आहेत व

( ४ ) ६ व्या व ८ व्या अर्थानें ध्रुवासुद्धां कोठें ही १०० रात्री अखंड होणें बिलकुल संभाव्य नाही.

गवामयन—अर्थात, याप्रमाणें गणिताच्या दृष्टीनें विचार करितां या तीन स्थळांपैकीं खरें खरें कोणतें ? ह्याचा निवाडा करितां येत नाहीं. म्हणून आपणास या कामास दुसरी कांहीं तरी योजना करणें भाग आहे. १०० दिनावर्धींची अखंड रात्र व अखंड उषा या दोन्ही गोष्टी एका स्थळासंबंधेंच अभिप्रेत आहेत असें मानिलें तर वरच्या ७५° अक्षांशावरील प्रदेश त्याज्य ठरतो; कारण तेथें दीर्घ रात्रीप्रमाणें दीर्घउषा अखंड असत नाहीं. याप्रमाणेंच पूर्वोक्त संधिप्रकाश व उषा ह्या रात्रींतून गाळल्या तर ५° १/२ व १° १/२ पूरक अक्षांशावरील प्रदेश त्याज्य ठरतात. पण १०० रात्रिकृतूंची संख्या ८८° १/२ अक्षांशाखालच्या तत्सम ८६° १/२ अंशावर सर्वांगांनीं संभाव्य आढळली आहे. हें अनुमान आदर्शभूत गवामयन नामक संवत्सरसत्रांतील निरनिराळ्या घटकांच्या कांहीं कसोटयांवर पडताळून पाहूं म्हणजे झालें. एका गवामयनांच्या सत्रांत पुढील चार घटक असतात:—

| | |
|---|---|
| ( १ ) अभिप्लव | २७० दिवस. |
| ( २ ) पृष्ठ्य | ६६ दिवस. |
| ( ३ ) स्थिर ( पहिला भाग ) | १२ दिवस. |
| शेवटच्यांत पुढील अवयव मोडतातः— | ३४८ |
| २ अतिरात्र—यज्ञ | |
| १ चतुर्विंश—यज्ञ | |
| १ महाव्रत—यज्ञ | |
| ६ स्वरसायमन्—यज्ञ | |
| १ अभिजित—यज्ञ व | |
| १ विश्वजित—यज्ञ | |
| ( ४ ) स्थिर ( दुसरा भाग ) | |
| यांत पुढील अवयव मोडतात. | |
| १ गोष्टोम—यज्ञ | |
| १ आयुष्टोम—यज्ञ व | |
| १० दशरात्र—यज्ञ | १२ |
| १२ | ३६० |

हे सगळे यज्ञ मिळून ३६० यज्ञांची भरती होते. याशिवाय आणखी एक गोष्ट या व्यवस्थेमध्यें आविर्भूत होते. ती ही कीं ह्या यज्ञांच्या सत्रांमध्यें विषुवन् नांवाचा अगदीं मध्यवर्ती दिवस असतो व त्याच्या भोंवती हे यज्ञांचे संस्कार सरूप ( सिमेट्रिकल ) पण विरूप ( रिव्हर्सड ) व्यवस्थेनें जोडलेले असतात.

स्थिर.—( पहिला भाग ).—अतिरात्र व चतुर्विंश किंवा आरंभणीय—चतुर्विंश व आरंभणीय ह्या दोन गवामयन आदिक यज्ञांतील संज्ञा समान अर्थाच्या आहेत. यांतील चतुर्विंश म्हणजे चोवीसाची. वस्तुतः पाहतां यज्ञाच्या स्थिर घटकांतील ह्या चतुर्विंश भागास आरंभणीय म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. पण त्यास चतुर्विंश ही संज्ञा कशी रूढ झाली हा मोठा प्रश्न उत्पन्न होतो. पण त्या

कोड्याचा उलगडा ब्राम्हणावरून पडत नाहीं. त्यांत ह्या कोड्याच्या उलगड्यांत उडवाउडवी करून असें उत्तर देऊन ठेविलें आहे कीं त्यावेळीं स्तोम चोवीस म्हणावे लागत म्हणून. असें हें उत्तर गुळमुळीत आहे तरी त्यांतून इष्ट ध्वन्यर्थ निघतो. तो असा कीं ह्या स्तोम नांवाच्या स्तोत्रांपैकीं प्रत्येक स्तोत्र उषाप्रीत्यर्थ आहे व तें रोज प्रत्येक नाक्षत्र प्रदक्षिणेचे शेवटीं एक याप्रमाणें चोवीस उषांप्रीत्यर्थ म्हणावें लागत असे व तें अशा प्राचीन काळीं व स्थळीं कीं तेव्हां आपले पूर्वज २४ उषांच्या साम्राज्यांत राहत होते. पण आपले लोक उत्तरेकडून दक्षिणेकडे पुढें इतके आले कीं तेथें चोवीस उषांच्या जागीं एकच उषा उगवत असे, पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पुराणप्रिय अध्वर्यूंनीं जुनी चालू वहिवाट इतकी कायम ठेविली कीं ते राहत तेथें एकाच उषेचा उदय होत असे तरी ते आपल्या यज्ञसत्राचे प्रारंभास चोवीस दिवस मागें लोटून त्या दिवशीं यचयावत चोवीस स्तोत्राचें पठण त्या एका दिवशीं उरकून घेऊं लागले. पण ह्या त्या आचार्यांच्या पुराणप्रियतेपासून इतिहासकारांस काय फलप्राप्ती झाली ? त्यांस असें कळलें कीं हें चोवीस स्तोमांचें आमच्या पूर्वज ऋषींच्या वस्तीचें स्थळ ज्या ठिकाणीं उषांचा विस्तार चोवीस दिनावधीपर्यंत होता त्या ठिकाणीं म्हणजे ८६°½ अक्षांशावर अथवा ३°½ पूरक अक्षांशावर होतें ! ( मागील पांचवें कोष्टक पहा ). तेव्हां चतुर्विंश व आरंभणीय ह्या संज्ञा एकरूप ठरल्या.

हल्लींच्या गवामयनाच्या संवत्सर सत्रामध्यें अतिरात्र यज्ञाचा संस्कार हा त्या सत्राच्या प्रारंभी घातलेला आहे. ह्याचा मूळ अर्थ असा कीं तो दोन एक महिन्यांच्या शेवटीं किंवा ही दीर्घरात्र व चोवीस दिनावधीची उषा यांच्यामध्यें घातलेला होता. आतां चतुर्विंश व आरंभणीय एकच होत हें ठरल्यावर अतिरात्र ह्या संज्ञेचा सहज खुलासा होण्यास सवड झाली. ती अशी कीं ठरलेल्या दीर्घ रात्रीच्या शेवटीं सदरहू अतिरात्र यज्ञाचा संस्कार करून आमचे आचार्यमहाराज नवीन सूर्योदयाची वाट पहात. पण तो सूर्यबापा कसला वस्ताद ! तो चोवीस स्तोत्रांचें पठण करून घेतल्याशिवाय क्षितिजावर आपलें डोकेंच वर काढित नसे ! तो चोवीस तासांच्या ऐवजीं तेव्हां चोवीस दिनावधींचे उषांचें फेरे करून घेतो असें त्या आर्त आचार्यांच्या नक्षत्रांच्या प्रदक्षिणेच्या पाहण्यावरून नक्की निघे. म्हणून या आरंभणीय सत्राच्या खरोखरी प्रारंभींच्या आरंभणीय संस्कारास चतुर्विंश ही संज्ञा अतिरात्र संस्कारानंतरच्या चोविसाव्या दिवसांवरून पडली होती. हें उघड दिसतें. लोकमान्य टिळकांनीं सूर्याचें क्षितिजाखालीं गमन १६° अंश होतें असें दिलें आहे. पण अर्वाचीन ज्योतिषशास्त्राच्या ग्रंथाप्रमाणें तें १८ अंश दिलेलें आहे तर त्या दोहोंची सरासरी काढून चोवीस उषांचें स्थळ गणितानें काढिलें असतां तें ८६°½ अक्षांश अथवा ३°½ पूरक अक्षांश अंदाजें येतें.

यावरून असें दिसतें कीं याप्रमाणेंच तेथें अखंड संधिप्रकाश लागतो. त्यावर पहारा ठेऊन त्या आचार्यांस कळे कीं पक्की रात्र लागली. त्याबरोबर ते दुसरा अतिरात्रीचा संस्कार ( अर्थ पांचवा ) करून त्या संवत्सर सत्राची परिसमाप्ती

करीत असत. मग यांत द्वादशाह संस्कार केव्हां करीत हें नक्की सांगतां न येवो. पण हल्लीं ह्या द्वादशाहांत दशरात्र संस्काराचा अंतर्भाव झाला आहे. यावरून पहातां असें दिसतें कीं हा संस्कार ह्या सत्राच्या शेवटीं व रात्रीच्या प्रारंभीं करीत असले पाहिजेत.

रात्रियज्ञः—याप्रमाणें ८६°$\frac{1}{2}$ अक्षांशावर हें सवंत्सरसत्र आटोपल्यावर सुमारें ११३ दिवसांच्या अवधीच्या रात्रीस सुरवात होई (पांचवा अर्थ पहा). ह्या अवधीपैकीं पहिले २४ दिवस संधिप्रकाश व काळोख यांचा विपर्यय तेथें चालतो व त्यानंतर तेथें ६६ दिवसांची अखंड रात्र चालते व त्या रात्रीची अखेर काळोख संधिप्रकाश यांच्या विपर्ययानें होते. अशा ह्या पूर्ण काळोखाच्या ११३ दिवसांत विशेष रात्रियज्ञांचे सत्र चालत असे. ह्या अवधीच्या शेवटीं उषेची झकाकी त्या रात्रीं त्या ठिकाणच्या क्षितिजाभोंवतीं गरगरां फिरूं लागून त्यांत काळोखाचा खंड बिलकुल येत नाहीं. त्यापुढें अतिरात्र संस्कार दुसरे दिवशीं सूर्यबापा उगवेल या अपेक्षेनें करीत, पण तो पुढें २४ दिवसांच्या अवधीपर्यंत उगवत नसे व तो उगवला म्हणजे संवत्सरसत्राच्या पाहिल्या यज्ञास सुरवात होई. म्हणून पूर्वीं सिद्ध केल्याप्रमाणें ८६°$\frac{1}{2}$ अक्षांशावर २४ दिवसांनीं आपल्या सूर्यबापाचें बिंब क्षितिजावर दिसूं लागल्यावर संवत्सरसत्र चालू होई, म्हणून त्या कालावधीस चतुर्विंश अथवा आरंभणीय ह्या संज्ञा यथार्थ पडल्या.

शतक्रतू, द्वादशाह, दशरात्र व अतिरात्रः—मागील कलमामध्यें असें सांगितलें आहे कीं ८६°$\frac{1}{2}$ अक्षांशाच्या स्थळीं रात्री ११३ दिवसाच्या असत, पण यज्ञशास्त्राप्रमाणें पाहतां हे रात्रियज्ञ १०० असत. पण हल्लीं दशरात्र ह्या संस्काराचा अंतर्भाव द्वादशाहमध्यें करून १०० क्रतू निराळे ठेविले आहेत. ते झाडून सर्व रात्रिसत्रांचे घटक असावेत व द्वादशाह व दशरात्र हे संस्कार वेगळे असावे व त्यांतील दशरात्र हा संस्कार त्याच्या व्युत्पत्तीवरून पाहतां रात्रियज्ञांचाच एक दुवा असावा व सोमसुक्तें एकंदर ११४ आहेत तर रात्रिक्रतू १०० च्या ऐवजीं ११४ असावे. म्हणूनच हल्लीं रात्रियज्ञांचे दोन घटक (१२—१००) असे आढळतात. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें दशरात्र संस्काराचा अंतर्भाव १०० रात्रियज्ञांत केला असतां रात्रियज्ञ एकंदर ११० भरतात. ह्या संख्येमध्यें आदी व अंत यांकडील अतिरात्र यज्ञ मिळविले तर ८६°$\frac{1}{2}$ अक्षांशावरील स्थळीं ११२ रात्रियज्ञ होत असत असें ठरतें. ह्यांत कालपरत्वें व स्थलपरत्वें एक दोन यज्ञांच्या संख्येचा फरक पडला तर त्याबद्दल विशेषशी फिकीर बाळगण्याचें कारण दिसत नाहीं.

टिपाः—(१) हे यज्ञ करण्याचें स्थळ अगदीं नक्की ८६°$\frac{1}{2}$ अक्षांशावर होतें असें समजण्याचें कारण नाहीं.

(२) वक्रीभवनाच्या योगानें उषेच्या उदयास्तांत फरक पडण्याचा संभव आहे.

(३) आपले ऋषी वर्षाचे दिवस बरोबर ३६६ धरीत असें समजण्याचें कारण नाहीं.

(४) ८८ अक्षांशावर ३० दिवसांची अखंड उषा असते.

(५) सप्तगू ह्या संज्ञेचा अर्थ ८५°½ अक्षांशावर सात महिन्याचा उन्हाळा अथवा २११ दिवस सूर्यप्रकाश व संधिप्रकाश व अखंड सूर्यप्रकाश असा होतो.

(६) नवग्वा ह्या संज्ञेचा अर्थ ७४°½ अक्षांशावर नऊ महिन्यांचा सूर्यप्रकाशाची अवधी असा होतो.

(७) दशग्वा ह्या संज्ञेचा अर्थ ७०° अक्षांशावरील स्थळांस बरोबर लागतो.

**गवामयनाचीं कांहीं लक्षणें**:—ह्या सत्राच्या कांहीं लक्षणांवरून पूर्वोक्त अभिप्लव आदिक मूळ घटकांचा व संज्ञांचा कांहीं विशेष अर्थ लागतो कीं काय हें पाहूं:—

**अभिप्लव व पृष्ठ्य**:—हल्लीं जी यज्ञांची योजना शास्त्रांत नमूद आहे. ती ६७°½ अक्षांशावरील स्थळची आहे व तींतील रात्रियज्ञ वगळून ३६० यज्ञांचा अंतर्भाव केलेला आहे. या यज्ञांपैकीं ३३८ यज्ञ रूपविकारी ( व्हेरिएबल ) व २२ यज्ञ स्थिररूपी आहेत. हे रूपविकार काय ते अभिप्लव व पृष्ठ्य ह्या सत्राच्या घटकांमध्यें होतात. हे विकार होण्याचें कारण काय ? (१) यज्ञांच्या सत्राच्या घटकांच्या विकासाच्या निरनिराळ्या पायऱ्या; (२) लोकांच्या वस्तीचीं निरनिराळीं स्थळें; व (३) वर्षाच्या स्वीकारलेल्या निरनिराळ्या लांब्या–ह्यांच्या कार्यानें त्याच्या स्वरूपांत फरक पडला आहे. याप्रमाणें पाहतां ( ३०० दिवसांच्या ) म्हणजे १० महिन्यांच्या गवामयनाचें सत्र १७४ दिवसांच्या दोन रूपविकारी घटकांतून ५ षळह अथवा ३० दिवस वजा करून तयार होतें. यावरून असें तें सत्र चालविणारांचें स्थळ ८६° अक्षांशांवर होतें असें दिसतें; कारण त्या ठिकाणीं अखंड दीर्घ रात्र ६० दिनावधींची असते. आदित्यभक्तांचें आदित्यानामयन हे ११ पृष्ठ्य षळहाचे दिनावधी वजा करून निघतें. याप्रमाणें या सत्रामध्यें २९४ अथवा ३६६ दिवसांचें वर्ष धरून ३०० दिनावधीचें हें सत्र असतें. हें वजावाट करण्यासारिखें स्थळ म्हटलें म्हणजे ८६°½ अक्षांशांवर असे; कारण, या ठिकाणीं अखंड दीर्घ काळोख सुमारें ६६ दिनावधींचा असे. तमोभक्त आंगिरसाचें सत्र अभिप्लव षळह वजा करून काढीत. हे षळह ४५ असत, म्हणून तें सत्र ९० [ ९६ ] दिनावधींचें असे. यावरून ह्या अखंड दीर्घ रात्रीच्या उपासकांचें वसतिस्थान ह्याच अक्षांशावर असे. अधिकमासविरोधी उत्सर्गाणामयनाचें सत्र एक षळह [ ३६६ दिवसांच्या वर्षांत मूळ दोन षळह ] वजा करून काढीत. तेव्हां या सत्राचे दिवस ३६४ असत. हे यज्ञकर्ते सौरमासांपेक्षां चांद्रमास पसंत करीत. याप्रमाणें पाहतां चांद्रमासांचें वर्ष ३५४ दिवसांचे असे व

सौरमासांचें वर्ष ३६६ दिवसांचें असे. म्हणून उत्सर्गीयाणाम् अयनवाल्यांचें सत्र ३५४ दिवसांचें असे व तदितरांचें सत्र ३६६ दिवसांचें असे. म्हणजे त्यांच्या वर्षांमध्यें २ षळहाचा म्हणजे १२ दिवसाचा फरक असे. याप्रमाणें वेदांगज्योतिषांत वर्ष ३६६ दिवसांचें धरिलें आहे, त्या अर्थी वर्षाची जुनी लांबी ३६६ दिवसांची होती व ३६० दिवसांची नव्हती. तर या उपपत्तीप्रमाणें या सत्रांतील रूपविकारी घटक ३६४ दिवसांचा असे. ह्या सौर व चांद्र वर्षांतील १२ दिवसांचा फरक हाच द्वादशाह संस्कार व अधिक मासाचा अंश होय. तेव्हां यांत दशरात्र संस्काराचा अंतर्भाव होत नव्हता. वरील अधिक मासाचा १२ दिवसांचे अंश अथवा २ षळह चांद्र व सौर वर्षांतील तफावत भरून काढण्यास सुरू करण्यांत आला होता, त्याअर्थी जो अंश स्वतंत्र होता, व तो वर्षाच्या शेवटीं किंवा अखंड संध्याकाळच्या अवधीच्या शेवटीं जोडीत असत. पुढें द्वादशाह व दशरात्र अगदीं लगत असल्यामुळें दशरात्र रात्रीच्या अवयवांतून सुटा होऊन द्वादशाहांत लुप्त झाला. म्हणूनच हा रात्रीचा भाग ८६°½ अक्षांशाच्या स्थळांतील आहे तरी त्या रात्रीची अवधी ११२ दिवसांची आहे व त्या अवधीचे १२ व १०० असे पोटभाग आहेत व यावरून ह्या पोटभागांस अहीन व सत्र असें कां म्हणत हें समजतें. या ठिकाणीं लोकमान्य टिळकांचा तर्क चुकला आहे असें प्रो. आठवले यांचें मत आहे.

नीच अक्षांशः–[ ६७°½ खालील ].–येथें सूर्यबापा वर्षांत ३६० [ ३६५ ] दिवस उगवतो म्हणून येथें यज्ञांची संख्या स्वभावतः ३६० अथवा ७२० [ ३६० दिवस व ३६० रात्रींकरितां ] असली पाहिजे पण वहिवाट अशी आढळते कीं त्या दिवसांकरितां ३६० यज्ञ करितात व रात्रींकरितां फक्त १०० यज्ञ करितात. मग बाकीच्या रात्रींकरितां यज्ञ कां करीत नाहींत ? नीच अक्षांशावर वर्षाचें स्वरूप बदललें तेव्हां रात्रींच्या यज्ञांची १०० संख्या कायम राहिली पण मूळच्या ३६० यज्ञांच्या सख्येंन दीर्घ रात्रीच्या २४०० तासांचे १२ तासांस १ प्रमाणें १०० दिवस व १२ तासांस १ प्रमाणें १०० रात्री काढून १०० यज्ञांची भर घातली.

अभिप्लव व पृष्ठ्यः–११२ सूर्यरात्रींतून [१० दश रात्र+२ अतिरात्र ] वजा करून बाकीच्या १०० संख्या अभिप्लवास जोडून केली असेल तर अभिप्लवाची मूळची संख्या फक्त १७० असेल;कारण हल्लींची संख्या २७० आहे. आतां ८६°½ च्या कोष्टकाकडे लक्ष दिलें असतां काय आढळतें ? अखंड अथवा दीर्घ दिवसांची संख्या ह्या अभिप्लवाच्या अवधी एवढी आहे, व हा मेळ [ कोइनसिडेन्स ] कांहीं आकस्मिक नाहीं. व ही अभिप्लव संज्ञा मूळ अखंड दीर्घ दिवसास लागत असली पाहिजे. आपण, दीर्घ रात्रीं दीर्घ रात्र स्वभावतः दीर्घ दिवसासारिखी आहे हें ध्यानांत आणिलें असतां वरील १०० संख्येची भरती मूळच्या अभिप्लवाच्या संख्येस केली असें मानणें रास्त होईल. अभिप्लव या शब्दाचा धात्वर्थ पाहिल्यास ह्या म्हणण्याबद्दल खात्री होईल.

ह्या शब्दाचा अर्थ अभि ह्मणजे वाटोळा व प्लुव् ह्मणजे वाहणारा असा आहे. सूर्याचें बिंब ज्या वेळीं क्षितिजावर जणूं गलबतांत बसून फिरत असतें त्यास अभिप्लव असें म्हणतात. पृष्ट्य षळहांची संख्या ११ असून त्यांच्या दिवसांची संख्या ६६ होते. ८६°½ अक्षांशावरील सूर्य व संधिप्रकाश यांचा विपर्यय व अखंड दीर्घ संधिप्रकाश यांचा काळ ६० दिवसांचा असतो. या दोहोंमध्यें फरक दिसतो तो द्रष्ट्याचा दृष्टिदोषानें पडतो. म्हणून पृष्ट्य षळहांच्या अवधीवरील सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांच्या विपर्ययाचा व अखंड संधिप्रकाशाच्या अवधीचा दर्शक असावा असें वाटतें. पृष्ट्य शब्दाच्या धात्वर्थावरून ह्या म्हणण्यास पुष्टी मिळते. पृष्ट्य याचा अर्थ पृष्ठभागावरील किंवा पाठीवरील असा आहे. ८६°½ अक्षांशावरील कोणत्याही स्थळीं सूर्यप्रकाश व संधिप्रकाश यांच्या विपर्ययाच्या काळांत क्षितिजापासून सूर्याची अधिकांतील अधिक उंची ७ अंशांहून अधिक नसते ह्मणून तो जणूं पृथ्वीच्या पाठीवर फिरतोसा वाटतो. तो थोडा क्षितिजाखालीं जातो व कधीं तो वर डोकावतो. अर्थात्, अशा पृथ्वीच्या सूर्याच्या पाठीवर लोळण्याच्या काळास पृष्ठ्य असें ह्मणतात.

निष्कर्षः—अशा प्रकारें चतुर्विंश, द्वादशाह, दशरात्र, अभिप्लव व पृष्ट्य ह्यांचे मूळ अर्थ जे आह्मी काढिले त्यांचा एकमेकाशीं असा उत्तम जम (८६°½ अक्षांशांवर) बसतो कीं त्यांचा एकाकार होऊन त्यांची एकमेकांस पुष्टी मिळते. आम्ही जीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांपेक्षां जास्त भारदस्त प्रमाणांची कोणी अपेक्षा करूं नये; कारण आपणास हल्लींच्या ऐतिहासिक काळापासून अशा इतिहासपूर्व काळांतील प्रमाणें शोधून काढावयाचीं आहेत कीं त्या प्रमाणांच्या साखळींतील अनेक कड्या काळाच्या अनेक आपत्तींनीं मोडून समूळ बेपत्ता केल्या आहेत !

यज्ञसत्र व यज्ञसंज्ञा यांच्या मूळच्या स्थितीसंबंधें ज्या आम्हांस स्फूर्ती झाल्या त्यांच्या सत्यतेविषयीं विचार करून आमचें हें अनुमान दृढमूल झालें आहे कीं आमच्या वसाहतीची जागा एकदां ८६°½ अक्षांशावर होती. त्यांत वरच्या विवरणानें आम्हांस असें सुचलें आहे कीं, ह्या ठिकाणीं आमच्या आर्यांची वसाहत इतर ठिकाणापेक्षां जास्त दिवस होती; कारण, झालें आहेत तसे बनलेले शब्द व संज्ञा रूढ होण्यास फार काळ लागतो.

१ उषेची लकेर क्षितिजावर दिसूं लागली कीं अतिरात्र संस्कार करीत. २ ह्या अतिरात्र संस्कारानंतर २४ उषांच्या अमलांत चतुर्विंश अथवा आरंभणीय संस्कार होई. ३ ह्या चतुर्विंशानंतर दिवस उगवला असतां मुख्य यज्ञांचें अर्धें सत्र विषुवनपर्यंत चाले. ४ ह्या विषुवन अथवा मध्यादिवस यापुढें तेच संस्कार व्युत्क्रम क्रमानें चालत. ५ पुढें चतुर्विंश किंवा आरंभणीय याची प्रतिमा जो महाव्रत हा संस्कार करीत. ६ शेवटीं, आरंभाप्रमाणेंच दुसरा अतिरात्र संस्कार करीत. अर्थात् हे झाडून सर्व संस्कार ज्योतिषाच्या घड्याळाप्रमाणें होत असत. आपली वस्ती ६७°½ अक्षांशाखालीं असतां ह्या सत्राच्या क्रमांत त्या घड्याळाप्रमाणें आमूलाग्र फरक पडावयास पाहिजे होता, पण आचार्यांच्या नवविद्वेषप्रयुक्त इंद्रानें आमच्या

प्राचीनतर ८६ $^{\circ}\frac{1}{2}$ अक्षांशावरील वसाहतीचा माग वरील सत्रक्रमांत अबाधित राखिला आहे.

टीप:—पण यावरून आमचें ऐर्यन वइजो आर्यावर्त किंवा गौड या खालील गोंडवनांत नव्हतें असें सुतराम ठरत नाहीं असें आमचें दृढ मत आहे; कारण आमच्या मुख्य वसाहती आशिया व आफ्रिका व अमेरिका यांत पूर्व पश्चिम प्रथम झालेल्या आहेत ! व उत्तरेकडून दक्षिणेकडे झालेल्या नाहींत; कारण अशा वसाहती येथें टिकावयाच्या नाहींत. याच्या उलट प्रतिपादन—त्वे विश्वा सरस्वती श्रितायुंषि देव्याम् ( ऋ. २·४१-१७ ) यांत—हे देवी सरस्वती, तुझ्या ठिकाणीं अखिल चैतन्याचें अधिष्ठान आहे व त्याचा परिपोष—मेडलिकाटच्या हिंदुस्थानच्या भूगर्भशास्त्रोक्त जे जीवावशेष पंजाबांतील सैंधवाद्रीमध्यें व कमाउनच्या उत्तरेस विपुल सांपडतात, ते करितात. शिवाय, हें आम्हीं स्वानुभवावरून सांगतों कीं आम्ही कोकणांतून नाशकास राहण्यास आलों म्हणून आम्हांस येथील वर्णन करण्यासारिख्या थंडीचें व द्राक्षांचें महत्व वाटतें तसें कोकणचा पाऊस व नारळ यांचें वर्णन करण्यासारिखें महत्व वाटत नाहीं. तेंच आम्ही हरद्वारच्या यात्रेच्या वेळीं आग्रा, दिल्ली, गंगापूर व जयपूर इकडे गेलों असतां, हे देवा, आम्हांस येथील त्रासद उन्हाळा व चटचट भाजणारी वाळूची ' अंधी ' ह्याच्या दुःखांतून सोडव असे उद्गार जसे आमच्या तोंडांतून तौलनिक दृष्टीनें येत, तसे इकडून आमचे पूर्वज, त्रिविष्टप व सुमेरुखंड यांत ८६ $^{\circ}\frac{1}{2}$ अक्षांशावरील स्थळीं गेले असतां, हे देवा, आम्हांस त्रासद दीर्घरात्रीच्या दुःखांतून सोडव असे उद्गार त्यांच्या तोंडांतून साहजिक तौलनिक दृष्टीनें निघाले आहेत, तसे उद्गार ज्यांनीं कधीं अन्यस्थिती पाहिली नाहीं अशा तिकडील लॅप, एस्कीमो वगैरे लोकांच्या तोंडून साहजिक निघणें बिलकुल संभाव्य नाहीं; त्या अर्थीं आपल्या त्या पूज्यपाद-पूर्वजांचें मूलस्थान आपल्या हिंदुस्थानाच्या उत्तरभागीं गोंड किंवा गौड देशामध्येंच असलें पाहिजे ह्यांत शंका तिळमात्र नाहीं. म्हणून आम्ही ह्मणतों कीं झाडून सर्व मनुष्य जातीचा ' पाळणा ' ह्मणून मिरविण्यास योग्य असा एखादा देश पृथ्वीवर असेल तर तो निःसंशय हिंदुस्थानच होय !

सिद्धान्तः—(१) इंद्र व त्याचे अनुयायी यांच्या वसाहती पितृदेशांतून ( गौडदेशांतून ) सुमेरुखंडांत अगर उत्तर एशियेंत ३० दिवसांच्या उषांच्या ८६ $^{\circ}\frac{1}{2}$ अक्षांशावरील साम्राज्यापर्यंत झाल्या होत्या.

(२) ते जलप्रलयकालीं ( ८०००ते१०००० वर्षे ) त्या उत्तर-आर्यावर्तांतून दक्षिण आर्यावर्तांत अथवा आपल्या पितरांच्या देशांत ( उत्तर-हिंदुस्थानांत ) आले व तेथून ते दक्षिण हिंदुस्थानांत पसरले व अंशतः मूळच्या लोकांशीं मिश्र झाले व त्यांनीं अंशतः त्यांस आपल्यासारिखें अनुग्रहानें केलें.

---

## भाग तिसरा.



### आमच्या ऋषींच्या वस्तीच्या भेदांचा निश्चय.

( मूलस्थान व वसाहती )

Mr. Bal Gangadhar Tilak has made a strenuous and sustained attempt to prove × × the original home of the Aryans in the Arctic regions. I have therefore examined **in extenso** all his principal arguments, and proved their unreliability.-Rig Vedic India–P.14-Mr. Abinas Chandra Das, M. A. B. L. (Ed. 1921).

I have examined his arguments at length and found them unconvincing.–The same–P. 567.

I have also tried to prove in this book that, Northern Europe was not, and could not have been the original cradle of the Aryan race. Nor was the Arctic region their cradle.–The same P. 14

I have also thoroughty examined the hypothesis of the Central Asiatic home of the Aryans, and found it to be antenable–The same–P. 14 Vol. 1.

To some of these questions, Mr. Tilak has attempted an answer which, for injenuity, absurdity and desperateness, is hard to beat.–The same–Vol. I-p. 366.

त्वे विश्वा सरस्वति श्रितायुंषि देव्याम् । ऋ. २. ४१. १७.

अर्थ–हे देवी सरस्वती, तुझ्या ठिकाणीं अखिल चैतन्याचें अधिष्ठान आहे. पा २५

And the most ancient form of life occurs near the eastern end of the hill–(Medlicott). Still farther East too, in the north of Kamaun, Silurian fossils have been discovered in considerable quantities.–(Manual of (Geology of India P. 25)

In Asia Lower Cambrian fossils (; Olenellus Neobolus &c. ) occur in the Salt Range in India.–(Prof Lapworth's Geology of India).

The grander mountain ranges of the northern hemisphere, from Spain, through the Caucasus and the Himalayas, to the Pacific, all present more or less distinct evidences of former extended glacial conditions.–The same P. 389.

## 2,500 Secrets of a Dead World

*Book of Words of An Unknown Tongue.*

Discoveries, in the Far East, of the lost capital of a lost empire, and of a library of 2,500 books in seven languages, including the vocabulary of an unknown tongue, are reported.

After an absence in Mongolia of 20 months, the Russian Professor Koslov has brought to Leningrad 50 large cases filled with objects discovored in the Desert of Gobi.

He found the buried city of **Harohoto** the old capital of **Tanguth.**

In reference to the 2,500 volumes, Sir Frederick Kenyon ( director and principal Librarian of the British Museum ) tells "The Daily Chronicle" that, in the absence of details, it is impossible for him to comment on the discovery.

"Without knowing to what period they belong or what they contain, one cannot place them in any category." says Sir Federick. **Remains of ancient libraries have been found in Turkestan and also in Tibet."**

Professor Koslovs discoveries included sarcophagi containing the bodies of Chinese princes of thousands of years ago.–**Dily Mail**, 31–1–25

मागील भागांत श्रौतभूमीच्या उत्तर अक्षांशनिश्चयाचें वर्णन केलें. आतां या भागांत आम्हांस मूलश्रौतभूमी व त्या श्रोत्रियांच्या वसाहती यांच्या भेदांचें वर्णन कर्तव्य आहे.

**श्रीयुत नानासाहेब पावगी यांचा श्रौतभूमीच्या मूलस्थानाचा निश्चय.**— नानासाहेबांनीं आपल्या आर्यावर्तांतील जन्मभूमी या ग्रंथांतल्या पहिल्या भागांत असें दिलें आहे कीं, आपल्या भारतभूमीची उत्पत्ती, ज्वलनात्मक व बाष्परूपी भूगोलापासून झाली आहे. त्याच्या अवस्था अशा–(१) ज्वलनात्मक व बाष्परूपी, (२) द्रवरूपी, (३) तप्तजलावरणवान्, (४) भूमिपर्वतरूप, (५) जीवनानुकूल परिस्थितिवान् अशा भूमीपासून प्रथमतः १ उद्भिज्ज, नंतर २ जलज, पुढें ३ भूमिज, त्यावर ४ सस्तन, पश्चात् ५ मानव–उद्भवले. त्या प्राणिशिरोमणी मानवांपैकीं मनूआर्यास इंद्रानें भूमी सरस्वतीकांठीं ( ऋ. ४-२६-२; व २-४१-१७ ) प्राग्विंध्यकाळांत दिली. त्याच्या दुसऱ्या भागांत असें दिलें आहे कीं पूर्वोक्त मानवभूगर्भशास्त्रांतर्गत तृतीय युगांतल्या वराहमन्वंतरांत प्रालेयप्रलयाच्या पुष्कळ पूर्वी जन्मास आला. त्यापूर्वी आपल्या मायभूमीस पुढील अवस्थांनीं जीवनानुकूल स्थिती प्राप्त झाली. (१) अचैतन्यावस्था, (२) चैतन्यावस्था, (३) वराहावस्था. यांत शिवालिक कालांत ( मानवी प्राण्यासुद्धां ) सस्तन जीनकोटी १ शिवालिक पहाडांत, २ मंच्छर येथें सिंधमध्यें, ३ खंबायतच्या आखातांतील पेरीमबेटांत, व ४ नर्मदा नदीच्या दरींत अवशेषरूपानें आढळते. आतां कोणी असें म्हणोत कीं येथें हे प्राणी उत्तरेकडून इकडे आले, पण उत्तरेकडील जीवकोटी भारतवर्षांत टिकाव धरीत नाहीं. ह्या किंवा ह्यासारख्या पांच सात कारणांवरून इकडून अनादी कालीं उत्पन्न झालेले प्राणी पूर्वपश्चिम व दक्षिणोत्तर आपल्या श्वान, बोकड आदिक प्राण्यांसह वसाहतीस गेले आहेत. म्हणून या देशास मनुस्मृतींत सरस्वती व दृषद्वती ह्या नद्यांच्या मधील प्रदेशास देवनिर्मित ब्रम्हावर्त असें म्हटलें आहे, व ऋग्वेदांतही ह्यास देवकृत म्हटलें

|| सरस्वती दृषवत्योर्देव नद्योर्यदन्तरम् । तं देवनिर्मितं देशं ब्रम्हवर्तं प्रचक्षते || (म. स्मृ. २–१७); योनिं देवकृतम् (ऋ. वे. ३-३३-४). तिसऱ्या भागामध्यें अर्वाचीन मत म्हणून डॉ. वॉरेन आदिक पाश्चात्य पण्डित व त्यांची री ओढणारे लोकमान्य टिळक आदिक पौर्वात्य पण्डित असें म्हणतात कीं आम्हीं आर्य हिंदुस्थानांतील आर्यावर्तांत आगांतुक आहों व आमचें ऐर्यन वइजो पुढीलपैकीं कोणत्या तरी विदेशी स्थानीं आहे: १ उत्तरध्रुव, २ युरोप, ३ जर्मनी, ४ काळ्यासमुद्राचा उत्तर भाग, ५ डान्यूब व कास्पियन यांमधील टापू, ६ युरोपचा उत्तरेकडील प्रदेश, ७ स्कांडेनेव्हिया, ८ फिन्लंड, ९ पांढऱ्या समुद्राजवळचा प्रांत, रशिया, १० आर्मिनिया, ११ अक्षय्या ( ऑक्सस ) व १२ जगत्सरित् ( जक्सार्टिस ). पण हें अनुमान केवळ बादरायण संबंधाचेंच असल्यामुळें ह्या आगान्तुक पूर्वपक्षावर एल्फिन्टन, टॉड आदिक पाश्चात्य पण्डित यांचीं मतें दिलीं आहेत व हा वाळूचा डोलारा व भूस्तरशास्त्र, आर्यावर्तांतील जन्मभूमी व उत्तर ध्रुवाकडे सोमपानाच्या झंझावातापुढें टिकण्यासारिखा दिसत नाहीं. कारण टिळकांनीं भट्ट मोक्षमुल्लारांस सादर केलेल्या टिळकांच्या टिपणावर त्यांचा खुद्द असा अभिप्राय आहे:–१ वेदांतील उताऱ्यांचा अर्थ टिळकांनीं केलेला संभवतो पण उत्तरध्रुव जन्मभूमिविषयक त्यांची कल्पना, भूस्तरशास्त्राच्या सिद्ध गोष्टींशीं विसंवादी व विरोधी आहे. २ दीर्घ रात्रींतून पार पडण्यास व सूर्यदर्शनाचा लाभ होण्यास इंद्रास संतुष्ट करण्याच्या हेतूनें जेथें सोमोत्पत्तीचें ठिकाण माहित नाहीं अशा उत्तर ध्रुवाकडील प्रदेशांत केलेलीं अतिरात्रसत्रें, दशरात्रसत्रें, शतक्रतुसत्रें कशीं संभाव्य आहेत ? म्हणून सोम इकडून तिकडे नेण्यास ते मूळ हिंदुस्थानांतले रहिवासी असले पाहिजेत. अशींच उत्तरें युरोपखंडवादी व आशियाखंडवादी लोकांस देतां येण्यासारिखीं आहेत म्हणून मॉन्सियर जेकलियट जें म्हणतो तें खरें दिसतें कीं अखिल जगाची आदिजननी भरतभूमी असून ह्या मूल निवासस्थानांतून तिचा वेल अन्यत्र पसरला व इराण, अरबस्तान, मिसर, पालेस्ताईन, इत्यादी देशांतून दूरवर पर्यटन करीत तो थेट पश्चिम व उत्तर टोकापर्यंत देखिल जाऊन थडकला. अर्थात्, त्यामुळेंच आर्यावर्तांतील भाषा, स्मृतिग्रंथ, नीतिग्रंथ, सदाचार, वाङ्मय, व धर्म हीं सर्वच पाश्चात्य देशांत व मिश्री, हिब्रू, ग्रीक, रोमन यांत व खिस्ति धर्मांत प्रतिबिंबित झालेली दृष्टीस पडत असल्यानें ती गोष्ट वरील पाश्चात्य शोधकांसही निर्विवादपणें कबूल करावी लागली व एका नांवाजलेल्या पाश्चात्य इतिहासकारास ( टॉड ) देखील मान्य करणें भाग पडलें वगैरे. त्याच्या चौथ्या भागांत आर्यभूमिविषयक प्राचीन मत म्हणून असें सांगितलें आहे कीं प्रालेयप्रलयाच्या मधल्या काळास २,४०,००० वर्षें झालीं असें डॉ. क्रोल वगैरे पाश्चात्य शोधक म्हणतात. मनू स्मृतिकार होऊन गेल्यास ३००० वर्षें झालीं. ह्या सर्वमान्य स्मृतीमध्यें येथील ब्रह्मवर्तादी देशांचें वर्णन असें दिलें आहे:—

१ सरस्वती व दृषद्वती नद्यांच्या दरम्याच्या प्रदेश देवनिर्मित असून त्यालाच ब्रम्हावर्त म्हणतात.

२ ह्या ब्रह्मावर्तांतील आचारविचार परंपरेनें चालत आले असल्यामुळें, तो पवित्र व म्हणून सदाचार समजून, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र यांनीं व संकीर्ण जातींनीं आपला वर्तनक्रम तदनुसारच ठेविला पाहिजे.

३ ब्रम्हावर्तानंतर, पण त्यालाच लागून कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, पंचाल, अथवा कान्यकुब्ज [ कनोज ] देश, व शूरसेन इत्यादी लागतात, व ह्या सर्वांस संघशः ब्रम्हर्षिदेश अशी संज्ञा आहे.

४ ह्या देशांत जे ब्राम्हण जन्म पावतात, त्यांच्यापासून या भूतलावरील सर्व लोकांनीं आपआपला चरित्रक्रम शिकून घेतला पाहिजे.

५ हिमाचल व विन्ध्यापर्वत यांच्या दर्म्यानचा प्रदेश जो गुप्त झालेल्या सरस्वतीच्या पूर्वेस व प्रयागाच्या पश्चिमेस आहे, तोच मध्यदेश या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

६ सदरहू गिरिद्वयांच्यामध्यें असलेला व पूर्व व पश्चिम समुद्रांनीं मर्यादित झालेला जो प्रदेश त्यालाच आर्यावर्त म्हणतात.

टीपः—ह्यावरून ह्या वेळीं हिंदुस्थानच्या पूर्वबाजूस राजपुतान्याचा समुद्र व पश्चिमेस बंगालचा उपसागर पुष्कळ आंतपर्यंत होता असें दिसतें,

७ व ह्याच प्रदेशांत कृष्णमृग स्वभावतः व स्वयमेव चरतात, म्हणजे ते येथें अन्य ठिकाणाहून मुद्दाम आणिलेले नाहींत. किंवा केवळ बलात्कारानें पाळल्यानें उत्पन्न झालेले नाहींत. त्यामुळें हाच आर्यांचा यज्ञ करण्यायोग्य देश समजावयाचा. अर्थात, तदितर व त्यांच्या पलीकडील देश म्लेच्छांचा होय.

८ सदरीं निर्दिष्ट केलेल्या देशांतच ब्राह्मणांनीं होतां होईल तोंपर्यंत राहण्याचा प्रयत्न करावा. मात्र, शूद्रांनीं स्वोपजीवनार्थ येथें किंवा दुसऱ्या ठिकाणीं वस्ती केल्यास हरकत नाहीं.

अशा प्रकारें आर्य या प्रदेशांत उत्पन्न होऊन येथेंच अनेक पिढ्या मरत आले. त्याबद्दल त्या वेळेच्या लोकांचा देशाभिमान जागृत होता. म्हणून याच गोष्टीचें शब्दचित्र उठविण्याकरितां सुप्रसिद्ध कुल्लुक भट्टानें—आर्या अत्राऽऽवर्तन्ते पुन्हः पुनरुद्भवन्ती त्यार्यावर्तः—म्हणजे, जेथें आर्य पुन्हः पुन्हां उद्भवतात तो आर्यावर्त

यावरून आर्य हे ह्या गौड देशांतील मौल म्हणजे मूळचे राहणारे ठरतात; नाहींतर त्या आगन्तुक वसाहत-वाल्यांस मध्यवर्ती सरस्वतीसारख्या नदीचें आव्हानपूर्वक स्तोत्र गाणें असंभाव्य आहे; कारण आगंतुक बाबराप्रमाणें त्या उत्तर ध्रुवाकडील नन्दनवनांतून आल्यावर आम्हांस हा गौंड देश बिलकूल गोड लागला नसता, व ह्यास आम्ही देवनिर्मित म्हणून आंजारलें गोंजारलें नसतें व ह्यास यज्ञार्ह श्रुतिभूमी मानिलें नसतें व ह्या कामधेनूस छळूं नये म्हणून स्वाभिमानी वशिष्ठास विश्वामित्राचा बंदोबस्त करण्याची देशाभिमानाची स्फूर्ती झाली नसती! तेव्हां हा सप्तसिंधूचा नव्हे तर ११ वेदोक्त नदीमातृक देश आमचें ऐर्यन वइजो पांचव्या भागामध्यें झंदावस्ता अथवा वंदिदाद, होमयाष्ट इत्यादि पारशांच्या ग्रंथांत

त्यांचा जन्म सातसिंधूंत झाल्याबद्दल आमच्या वेदाप्रमाणेंच सुस्पष्ट प्रमाणें आहेत. हे अवैस्तिक पारशी आमचे जवळचे सख्खे सोयरे वैदिक काळीं होते व ते आमच्यामध्यें सप्तसिंधू अथवा पंजाब या प्रान्तांत राहत असत. पण कालान्तरानें त्यांच्यांत व आमच्यांत भाऊबंदकी सारखी पूर्वोक्त तेड उत्पन्न झाली व आम्ही व ते विभक्त झालों व श्रीयुत पावगी यांच्या भारदस्त शद्बांनीं सांगावयाचें तर ते व आम्ही बरोबर किंवा एकामागून एक विजिगिषार्थ म्हणजे पराक्रम करण्याचे इच्छेनें व कुतुहाल–पारणार्थ अथवा आपलें कोड पुरविण्याच्या हेतूनें जागोजाग आपल्या वसाहती करित थेट उत्तरध्रुव प्रदेशाकडे गेलों. ही गोष्ट कांहीं काल्पनीक नव्हे. आमचे हे जवळचे गोत्रज व वंशज जरी प्रथम इराणांत व पुढें ध्रुवाकडे गेले तरी त्यांच्या वन्दिदाद पुस्तकावरून ( २९, ३०, ४५, ४६, ७२, ७३, ७६, ७७, पहा) असें प्रत्ययास येतें कीं त्यांस उपर्युक्त सप्तसिंधू प्रांत चांगला परिचयचा होता. पण या दोन पक्षांमध्यें धर्मसंबंधानें जी कटकट चालू झाली तिचीं इतिहासगर्भ प्रमाणें वैदिकांच्या व अवैस्तिकांच्या ग्रंथांत सुस्पष्ट आढळतात. ही भाऊबंदकीचीं भांडणें सुरासुरांचें युद्ध या नांवानें दोघांच्या ग्रंथांत सुप्रसिद्ध आहेत.

कारणें—होमयाष्ट ( ९, १० ) मध्यें पारशांस झरथुष्ट्रानें ज्या पर्वतावर सोम उत्पन्न होतो, त्या पर्वतावर जाऊन त्याचें दर्शन घेण्यास व त्यांचें रसपान करण्यास आज्ञा केली आहे, पण स्पेंट मैन्यू गाथा ८, १० मध्यें त्याच सोमाची भरपूर निन्दा आली आहे; एवढेंच नाहीं तर ह्या सोमपानानें सोमयज्ञ करणारे उन्मत्त व गर्विष्ट होतात असें प्रतिपादिलें आहे. याप्रमाणेंच यस्नामध्यें ( १२ पहा ) सुर हे दुष्ट, नीच व अपाय करणारे आहेत म्हणून त्यांच्या पक्षाचा अवलंब न करितां मी त्यांजपासून अगदीं अलग राहतों. आहुनंवैति गाथा ( परिच्छेद ५ पहा ) यांत ह्या आसुरांनीं आम्हां सुरांस मन्त्री, जादूटोणा करणारे, कपटविद्यापटू, व प्रतिमापूजक असें म्हटलें आहे. याप्रमाणेंच ऐतरेय ब्राह्मणांत असें ह्मटलें आहे कीं सुर व असुर हे एकमेकांशीं सतत भांडत व युद्धें करीत. ह्मणून असुरांनीं आपल्या नगरास तटबंदी केली. तेव्हां त्यांच्याशीं सामना करण्याकरितां सुरांनीं ही आपल्या नगरांची तटबंदी केली. ( १-२३ ). पुढें सुरांनीं एकदां यज्ञ करण्यास सुरवात केली असतां, त्यांच्या कृत्यास विघ्न करण्याकरितां असुरानीं त्यांजवर छापा घातला [ २-११ ]. ह्मणून सुरांनीं त्या असुरांशीं युद्ध चालू केलें. [ ३-३९ ].

युद्धः—या युद्धांत त्या असुरांनीं त्या सुरांचा पराभव केला. तेव्हां ते स्वर्गास जाण्यास निघाले ( ३-४२ ). [ हें स्वर्ग त्रिविष्टप (तिबेट) काय ? ]

परिणाम.—पुन्हां ह्या पृथ्वीवर सुरासुरांचें युद्ध जुंपलें. त्यांत सहा दिवसांच्या अनुष्ठानानें त्या सुरांनीं असुरांस ह्या पृथ्वींतून हुसकून दिलें ( ५-११ ). ते असे कायमचे येथून घालविण्यांत आले कीं, ऋग्वेद ( ३-५३-२४ ) यांत विश्वामित्रानें असें ह्मटलें आहे कीं, हे इन्द्रा, भरताच्या पुत्रपौत्रांस व वंशजांस वियोग

दुःखाचा अनुभव आला आहे, पण त्यांस संयोग सुखाचा लाभ मात्र केव्हांही पुन्हां मिळाला नाहीं.

निन्दा.—आम्ही सुरांनींही त्यांच्या निन्दा कमी केल्या आहेत असें नाहीं:—आम्ही त्यांस धर्मभ्रष्ट (अयज्वानः १-३३-४); कर्महीन ( अव्रतान्-१-३३-५); कपटी ( मायावान्-४-१६-९ ); स्तोत्रपाठ न करणारे ( अब्रम्हा-४-१६-९ ); दास ( वधर्दासस्य नुविनृम्ण नीनमः । ८-२४-२७ ); असुर ( निनमो वधरदेवस्य पीयोः । २-१९-७ ); राक्षस ( य ऋक्षादंहसोमुचत् ८-२४-२७ ) अशीं नानाप्रकारचीं नांवें ठेवलेलीं ऋग्वेदांत आढळतात.

युद्ध, नगरांचा विध्वंस व पाठलाग.—आम्ही सुरांनीं त्या असुरांशीं युद्ध करीत असतां त्यांच्या नगरांचा विध्वंस करून त्यांचा पाठलाग कसा केला ह्याचें दिग्दर्शन ऋग्वेदाच्या ऋचेच्या पुढील भाषांतरांत आहे:—

१ हे इन्द्रा, तूं शत्रूच्या वीर्याचा समूळ उच्छेद करून टाक. त्यांस आम्ही प्रत्येक लढाईंत जिंकूं असें तुझ्या सहाय्यानें कर ( १-१०२-४ )

२ तूं त्या शेकडों किंबहुना हजारों काळतोंड्या शत्रूंचा संहार केलास, व त्यांच्या नगरांची फोडतोड करून टाकिलीस ( ४-१६-१३ )

३ इंद्रानें दिवोदासासाठीं शंबर नांवाच्या शत्रूचे नव्याण्णव म्हणजे शेकडों किल्ले फोडून त्यांचीं नगरें सर केलीं ( २-१३-६ )

४ इन्द्र हा शत्रूचीं नगरें फोडितो व त्यांचा संहार करितो; व संपत्ती देऊन कर्महीन आर्यावर ( दासांवर ) जय मिळवितो ( ३-३४-१ )

५ इंद्रानें आपल्या बलानें व मायेनें असुरांचें व दस्यूंचें चूर्ण केलें (३-३४-६)

टीपः—वरचीं नगरें काल्पनिक नव्हतीं तर तीं दगडांचीं [ अश्मन्मयानां पुराम् ४-३०-२० ] व मजबूत व लोखंडी तटबंदीचीं अभेद्य शहरें होतीं ( पुर आयसीः ।२-२०-८ ) व ह्यांच्या आश्रयानें राहिलेल्या धनाढ्य [ दस्युं धनिनम् ] पण क्रियानष्ट पारशांच्या व यज्ञकर्महीन दासीपुत्रांचा इंद्रानें नाश केला ( हत्वी-दस्यून ( २-२०-८ ) असें वृत्त गृत्समदानें सांगितलें आहे.

अशा प्रकारें सुरांनीं असुरांस इतहिंदूतून हांकून दिलें असतां त्यांचे परदेशांत हाल कुत्रेही खाईनासे झाले ! त्यांस त्यांचे जुने चाकर विचारीनातसे झाले ! ! व त्यांस सुरही विचारीनातसे झाले ! ! !

ग्रंथ:—नंतर उत्तर देशीं ऐर्यनवैजो नांवाचें तटबंदी नगर बांधून त्यांत झरथुष्ट्र नामक ह्या थोड्या असुरांच्या पुढाऱ्यानें वन्दिदाद नांवाचा ग्रंथ रचिला. त्याच्या पहिल्या पर्वांत सृष्टिरचना, दुसऱ्यांत यमाच्या साम्राज्याचें वर्णन, तिसऱ्यांत कृषि-कर्मविद्या, चौथ्यापासून सतरा पर्वांपर्यंत गृह्यसंस्कार व समाजबंधनें व अठरापासून बावीस पर्वांपर्यंत किरकोळ गोष्टी आहेत.

वसाहती:—भूगर्भशास्त्राच्या तिसऱ्या युगांत आमचे वैदिक आर्यही ह्या उत्तरेदेशीं वसाहती करीत उत्तरध्रुवाचे परिसरापर्यंत गेले होते. त्यांच्या मागून

वरील अवैस्तिक आर्य त्या वर्षाचे उत्तरायणाचे चार महिने निघून गेल्यावर गेलेले दिसतात. ह्मणून चमत्कार काय झाला आहे कीं झरथुष्ट्रानें त्या ऐर्यनवैजोंत २ महिने वसंत व १० महिने हिंवाळा आहे असें लिहून व तो वैदिक आर्यांनीं मुद्दाम उत्पन्न केला असें म्हटलें खरें, पण जास्त अनुभवानें वंदिदाद साद्यांत त्याची दुरुस्ती सात महिन्याचा वसंत व पांच महिन्याचा हिंवाळा तेथें असतो अशी पहिल्या म्हणण्याची दुरुस्ती केली पण ह्या उत्तर धुवाकडील निसर्ग स्थितींतील अनेक दिवसपर्यंत प्रकाशणाऱ्या उषा व न मावळणारा सूर्य पाहून त्यांजला जें आश्चर्य वाटलें त्याचा ठसा त्यांच्या महद्देवानामसुरत्वमेकम् । ( ३-५५-१।६ ) ह्या उद्गारांत व अती दीर्घ रात्रीचें जें भय त्यांस वाटलें त्याचा ठसा त्यांच्या । मा नो दीर्घा अभिनशन्तमिस्त्राः ( ऋ. २-२७-१४ ) व न यस्याः पारं न ददृशे ( अ. वे. १९-४७-२ ) या वाचनांत उमटला आहे.

अवैस्तिकांच्या मार्गांतील बरेवाईट प्रांत.—१ ऐर्यन वैजो.—म्हणजे आर्यबीज-( ऐर्य=सं. आर्य, वैज=सं. बीज, हा प्रदेश १ अत्यंत रमणीय होता. ह्याचा दुसरा अर्थ दुसरें आर्यावर्त असाही होऊं शकेल. ह्या पाठच्या बहिणीशीं लग्न न करणाऱ्या व प्रेतें कोनाड्यांत खोचून ठेऊन तीं पक्षांस खाऊं घालणाऱ्या लोकांच्या आफ्रासियाब राजाची स्मशानभूमी समरकंदच्या पडझडींत अजून दाखवितात ( मि. मोदी )

(२) गौ.—ग्रीक सोगडियाना ( सुखधाना ) हा प्रांत सुखाचें जणूं धामच होता. येथील गुरांना माशांचा व इतरांना गांधिलमाशांचा उपद्रव होत असे.

(३) मोरू.—हा प्रदेश मर्व्ह होय ( ह्याचें फारशी नांव मरघ्रू, ग्रीक नांव मार्गीयाना, व संस्कृत नांव मेरू व हल्लींचें नांव मर्व्ह असें आहे.) येथील उपद्रव विषयासक्ती हा होता. येथें : अप्सराविलासी देव व गायनवादनपटू गंधर्वकिन्नर राहत असत. सुरासुरांचा दावा असल्यामुळें वैदिक सुरांचें वरील व्यंग अवैस्तिक असुरांनीं अगदीं बिनचूक काढिलें आहे. याची तुलना समरकंद व सुमेरुखंड ह्या त्यांपासून निघालेल्या शद्बांशीं करा.

(४) बाल्ख.—( बाक्ट्रिया ) हा वीरखंड होय ( फा. बाखत्री, सं. बल्हिक ( बल्क ) येथें उपद्रव मुंग्या व हिंस्र पशू यांचा होत असे.

(५) तिसाई.—हा मर्व्ह व बाल्खच्या दरम्यान आहे. ( येथील लोक नास्तिक असत. )

(६) हरयू.—हा सरयू होय. ( फा. हरैव, ग्री. एरैव, व हल्लींचें नांव हिरात होय ) येथें उपद्रव दोनः—१ डांस. २ दारिद्य.

(७) सेजिस्थान.—( हें वैकरत काय ? व येथील उपद्रव पैरिक म्हणजे तरी काय ? हें समजत नाहीं ).

(८) ऊर्व.—ह्यास हल्लीं काबूल म्हणतात. ( हा प्रदेश इस्शाहान भोंवती आहे. येथील उपद्रव, गर्व व जुल्म हे होत. )

(९) खेन्त.-ह्यास कंदाहार म्हणतात. ( फा. बारकन, ग्री. हिरकर्णी येथील उपद्रव सृष्टिविरुद्ध पाप हें होय. )

[ १० ] हरकेती.—ह्यास सरस्वती असें नांव आहे. [ फा. हरौवती व ग्री. अखोंशिया व चालू नांव हरुत. येथील उपद्रव मृतास मूठमाती देणें हें पारशांच्या रिवाजाविरुद्ध आहे. ]

( ११ ) हेतुमतः-[ सेतुमत-हेल्मंड? ]. [ ग्री. एतुमंद्रोस ] येथील उपद्रव चेटकें व टोळ.

( १२ ) राईः-[ ग्री.-रगई, फा. रग व चालू नांव रै. येथील उपद्रव पाखांडीपणा ]

( १३ ) चखः-[ सं. चक्र, खोरासन ] [ येथील उपद्रव प्रेतदहन दिला आहे. ही पद्धती पारशांच्या रिवाजाविरुद्ध आहे ]

( १४ ) वरुणः-धलव [ घिलत-हें ह्याचें चालू नांव. येथें विदेशी लोकांच्या सुलतानीचा मोठा उपद्रव असे. ]

[ १५ ] हसहेन्दूः—सप्तसिंधू. [ फा. हिंद्स, ग्री. इंदोई, सं. सप्तसिंधू व चालू नांव पंजाब. येथील उपद्रव अती उष्णता ]

[ १६ ] रंघाः-रसा नदी [ चालू नांव मेसापोटेमिया, येथें हिंवाळा व भूकंप ह्यांचा उपद्रव फार होत असे ].

टीपः-[ १ ] या यादीमध्यें आमच्या आर्यावर्तांतील रसा, सरस्वती, सरयू वगैरे लहान पण पवित्र नदीथड्यांचा व सप्तसिंधूथडीचा नामनिर्देश केला आहे.

[ २ ] वसाहतीकरितां वैदिक व अवैस्तिक आर्यांचें हप्त हिंदूतून हे स्थलान्तर भूगर्भशास्त्राचे तृतीययुगांत झालें आहे. तर त्या संबंधानें आम्हांस भूगर्भाच्या अभ्यासानें कळलेली माहिती येथें नोंदून ठेविली पाहिजे; कारण तत्संबंधीं विचार नानासाहेब पावगी यांचा ह्या प्रदेशाच्या रूपरेखनांत बिलकुल जमेस धरलेली दिसत नाहीं. तो विचार हा कीं, हिमालय उत्पन्न होण्यापूर्वी तो जेथें उत्पन्न झाला आहे, तेथें पूर्वी अर नांवाचा भूमध्य समुद्र होता व त्यास विंध्याद्रीपासून निघालेल्या अनेक नद्या हल्लींच्या गौड देशाखालील गोंडवनांतून काश्मीरच्या बाजूस वगैरे मिळत होत्या. त्यांस सप्तसिंधू असेंच नांव तृतीययुगांत असेल. आमच्या भौगर्भिक शोधाप्रमाणें एक महानदी विंध्याद्रीकडून काश्मिराकडे वहात जात होती असें आम्हांस कळलें आहे व तिचा उल्लेख आमच्या ह्या ग्रंथातल्याच पुढील विद्युद्विज्ञानांतील हिमालयकाव्यांत अन्यत्र केला आहे. बाकीच्या सहा नद्यांचा शोध त्या गोंडवनावरील ३ हजार फूट बसलेल्या चिखलाखालीं करण्यांत आला पाहिजे. एरवीं हें विवरण अव्यंग होणार नाहीं.

[ ३ ] ह्या आर्यावर्तावर तृतीययुगापुढें बर्फाचे व चिखलाचे थर बसले तसे उत्तरेकडील आर्यनवैजोवरही बर्फाचे थर बसले आहेत; म्हणून ह्या आर्यावर्त

एकदां जसा त्यावरील बर्फानें व चिखलानें कांहीं वेळ वस्तीस नालायख झाला होता, तसा ऐर्यनवैजो वस्तीस बर्फाच्छादनानें कायमचा नालायख झाला होता.

( १ ) लायलची उपपत्तीः—पृथ्वीचा प्रदेश खालवर झाल्यानें हा प्रालेयप्रलय ८००० वर्षांपूर्वीं झाला.

( २ ) क्रोलची उपपत्तीः—संपातबिंदूच्या चलनानें पृथ्वीचा प्रदेश खालवर प्रत्येक २६००० वर्षांनीं होतो.

[ ४ ] अर नांवाच्या भूमध्यसमुद्रांतून जुन्या आर्यावर्ताच्या उत्तरेस हिमालय अथवा उत्तरगिरी वर आला तेव्हां जो प्रालेयप्रलय उत्तरध्रुवाकडे माजला त्यावेळीं तिकडे वसाहतीस गेलेले आर्य गलबतांत बसून हिमालयाच्या नौबंधनशिखरावर लागले, व ते आर्यावर्तांत पुन्हां राहूं लागले—हें खरें दिसत नाहीं.

सहाव्या भागांत पितामह मनूचें पौराणत्व व उत्पत्तिस्थान दाखविलें आहे. त्यांत प्रो. डॅनाचें मत असें दिलें आहे कीं, मानवी प्राण्याची उत्पत्ती प्राचीकडेच झाली असली पाहिजे. प्रो. जड्ड म्हणतो कीं मानवी कृतीचीं उपकरणें नर्मदा व गोदावरी ह्या नद्यांच्या मधल्या भागांत सांपडतात. [ आमचें भूगर्भदर्पण पहा ] तेव्हां मनुष्य हा तृतीययुगांतील शिवालिक ( मिओसीन ) व शिवालिकोत्तर [ प्लिओसीन ] या काळांत भारत वर्षांत झाल्याचें दिसतें. एडवर्ड क्लॉडनें असें प्रतिपादिलें आहे कीं दूरतर भारतवर्षांत ( फर्दर इंडिया ) शिवालिक कालांतील मानवीकृतीच्या कांहीं चिपा उपलब्ध झाल्या आहेत. शिवाय प्रो. कीन व डा. नोटलिंग यांच्या शोधांवरून देखील मानवीप्राण्याची उत्पत्ती हिन्द–मलया प्रदेशांत झाली असें सिद्ध झालें आहे. ह्या व ह्यासारख्या दुसऱ्या प्रमाणांवरून सर जॉन इव्हॅन्सनें कीनच्या मताचा अनुवाद करून असें म्हटलें आहे कीं, येथून मनुष्यप्राणी युरोप, आफ्रिका व अमेरिकाखंडांत गेला. याचप्रमाणें युरोपखंडांतील विद्वान् शोधकांचें असें मत आहे कीं मानवी जातीचें स्थलान्तर व पर्यटण उत्तरेकडून दक्षिणेकडे बिलकुल झालेलें नाहीं, तर तें पूर्वेकडून पश्चिमेकडे व युरोपखंडांत झालें आहे. मेडलिकॉट व ब्लॅंडफर्ड नामक भूस्तर शास्त्रज्ञानीं अनुभवसिद्ध सिद्धान्त असा मांडिलेला आहे कीं जीवकोटीचें उत्तरेकडून दक्षिणेकडे स्थलान्तर किंवा पर्यटण होत नाहीं व तें यदाकदाचित झालें तर ती जीवकोटी येथें भरतखंडांत टिकाव धरून रहात नाहीं, व याचें एल्फिनस्टनसारखे इतिहासकार सदरहू सिद्धान्ताचा निरपवाद परिपोष करितात. तेव्हां लोकमान्य टिळकांचें मनुष्याचें उत्तरध्रुवाकडून दक्षिणेकडे स्थलांतर व वसाहती झाल्या या प्रतिपादनास सहजीं विरजण पडतें. म्हणूनच तें भट्ट मोक्षमूलरसारख्या चाणाक्ष शोधकांस बिलकूल ग्राह्य वाटलें नाहीं. तेव्हां याच सरणीनें विचार करितां हा आपला भूगोल मूलावस्थेंत जळजळीत होता. त्यास इंद्रानें दार्ढ्य आणिलें व रसमय पर्वतांस अक्षय स्थिरत्व दिलें. नंतर त्या पृथ्वीची जीवनानुकूळ स्थिति झाली असतां तिजवर ओषधि, तृण व शस्य इत्यादी उद्भिज्ज उत्पन्न झालें. पुढें

उत्क्रान्तिनियमानें मनुष्यप्रभृती जीवसमुदाय उत्पन्न झाला [ ऋ. १०-९०; ९७-१; तै० उ.२-१;२-२ ] ह्यांतील प्रांण्यांचें स्वास्थ्य साधण्याकरितां मनुष्याचा मूळपुरुष जो मनू यास इंद्रानें भूमी [ ऋ. ४-२६-२ ]व उदक [ऋ. ४-२६-२] व प्रकाश [ ऋ.१-१०१-५ ] दिला. तेव्हां इंद्र, त्याचा पिता सोम, त्याचें मनूस भूमिदान, त्याकरितां उदकवृष्टी व त्यास शारिरिक, मानसिक, बौद्धिक, धार्मिक व नैतिक उन्नती देणाऱ्या प्रकाशाची प्राप्ती ह्यांचें स्थान ह्या आपल्या सप्तसिंधूच्या प्रान्ताबाहेर कोठें आहे असें आह्मांस वाटत नाहीं.

सातव्या भागांत भारताग्नीची आर्यावर्तात अंगिरस ऋषीनें सरस्वतीच्या कांठीं प्रथम सिद्धता कशी केली हें दाखविलें आहे. आर्यांचा मूळपुरुष मनू व मूळ राजा पुरुरवा होय. मनूकरितां अग्नीनें आकाशांत गडगडाट केला ह्या अर्थाचें ऋग्वेदांत, त्वमग्ने मनवे द्यामवाशयः । [१–३१–४] व त्यानें सुशील पुरुरव्याचें विशेष कल्याण केलें ह्या अर्थाचें त्यांतच, पुरुरवसे सुकृते सुकृत्तरः । [१-३१-४ ] असें वचन आहे व तसेंच त्यास भरतपुत्र असें दुसऱ्या ठिकाणीं म्हटलें आहे [ऊर्जः पुत्रं भरतं अग्निम् । १-९६-३] पुढील ऋचेंत दृषद्वती, आपया व सरस्वती ह्या नदीकांठीं राहणाऱ्या लोकांच्या घरीं प्रकाश पाडून त्यांस धन देण्याविषयीं प्रार्थना आहे. दृषद्वत्यां मानुष आपयायां सरस्वत्यां रेवदग्ने दिदीहि ॥[ऋ. ३-२३-४].

आठव्या भागामध्यें असें प्रतिपादिलें आहे कीं, आर्यावर्त इंद्र व सोम यांची जन्मभूमी आहे. कारण इन्द्र ही देवता वैदिक आर्यांची जशी आहे तशी ती अवैस्तिक आर्यांची नाहीं. फार तर काय पण ती युरोपांतील आर्य भाषांतही आढळत नाहीं (आ. होम—पा. २९५). सदरहू इंद्र हा जन्मादारभ्य सोमपान करणारा आहे ( ऋ. ३-४८-२-३ ). हा सोम येथील मुंजावत पर्वतावर उत्पन्न होतो ( ऋ. १०–३४–१). तो पर्वत आर्यावर्ताच्या प्रान्त भागावर आहे. तो वृत्रघ्न इन्द्र सोम शर्यणावत सरोवरावर पितो [ ९–११३–१ ]-हें शर्यणावत सरोवर कुरुक्षेत्राच्या कटिप्रदेशावर आहे. [ ९–११३–१ ]. सोम हा सिंधु-नदीच्या वीचितरंगाचा आश्रय करून राहिला आहे [ ९–१४–१ ]. इंद्राप्रीत्यर्थ सोमयज्ञ करण्याची वहिवाट प्राचीनतम आहे [ ऋ. १·९१–१ ] [ आ. हो. पा. २०५–२०६ ] इन्द्रानें उषेचा रथ मोडून विपाशा [ वियाज ] नदीच्या तीरावर इन्द्र पडल्याबरोबर उषेनें तेथून पळ काढिला [ ऋ. ४–३०–११ ]. ह्यावरून इंद्र व सोम ह्यांची जन्मभूमी आर्यावर्तच होय.

नवव्या भागांत असें सांगितलें आहे कीं प्रत्येक यज्ञक्रियेंत वेदकालीन ऋषी सोमपेयाचें पान करीत. तें पेय स्वादिष्ट, मधुर, तिखट पण अत्यंत रुचिकारक व उन्मादक असे [ ऋ.४–४७–११२ ]. याचे योगानें सुविचारांची जागृती राही व वाचेस स्फुरण चढे [ ऋ. ६८–४७–३ ]; बुद्धीच्या वैभवाचा प्रकाश पडे व अमरत्वाचें व निर्जराचें ज्ञान होई [ ८-४८-३ ] व इन्द्रादिकांस लढण्यास बळ चढे; तें इतकें कीं त्याच्या समोर लढावयास कोणाचीही मजाल नसे [ ६-४७-२ ]. १ सोम, २ इन्द्र व वैदिक आर्य यांचा इतका अभेद्य संबंध

आहे कीं त्यांतील एकही इतरांस सोडून नाहीं. म्हणजे त्या तिहींचें जन्मस्थान व आदिनिवासस्थान एक आहे, व म्हणून आम्ही उत्तरेस ज्या ज्या ठिकाणीं उत्तरध्रुवापर्यंत वसाहती केल्या आहेत त्या त्या ठिकाणीं आम्ही ह्या काश्मिरांतील सोमवल्लीचें महात्म्य सोमयागांबरोबर प्रतिष्ठापित केलें आहे; कारण ही सोमपूजा निसर्गपूजेप्रमाणें आमच्यामध्यें अनादी काळापासून रूढ होती. ती वैदिक आर्य व अवैस्तिक आर्य यांच्या फाटाफुटीपूर्वीं तर काय पण यिमाच्यापूर्वींही [ यम ] हा आर्यावर्तांत प्रतिष्ठापित झाली होती. सोमाच्या व अवैस्तिकांच्या व होमाच्या अती प्राचीनत्वाविषयीं वर्णन ऋग्वेदामध्यें असें आढळतें. हे सोमा आमच्या धीरोदात्त पुराण पूर्वजांनीं तुझ्या नेतृत्वाखालीं, देवांसमवेतच हें दैविक ऐश्वर्य संपादन केलें ( ऋ. १-९१-१ ). इन्द्र व सोम ह्या दोन्ही देवता आपल्या ह्या मायभूमीस अशा अनन्यसाधारण आहेत कीं, आमच्याशीं संबंध असलेले इराणी व ग्रीक ह्या लोकांशिवाय कोणत्याही लोकांच्या भाषांत ह्या देवतांच्या नांवाचीं अपभ्रष्ट रूपेंही आढळत नाहींत, मग पूजा कोठील रूढ असणार ? आमचा ह्या दोन इराण व ग्रीस यांशीं भाऊबंदकीचा संबंध प्राचीनतम काळापासून होता म्हणूनच ह्या सोमाचा अथवा होमाच्या सहोदर देवतेचा वाचक जो इन्द्र शब्द, त्याचा पर्याय वृत्रघ्न हा शब्द आहे. त्या वृत्रघ्न शब्दाचें 'वेरेथ्रघ्न' हें अपभ्रष्ट रूप इराणी सारस्वतांत व 'ऑर्थॉस' हें अपभ्रष्ट रूप ग्रीक सारस्वतांत आढळतें. हा सोम पुढील ठिकाणीं होत असेः—स्वर्ग (त्रिविष्टप=तिबेट काय ?), मौंजावत डोंगर, सुषोमा व अर्जिकी या नदीथड्या, व शर्यणावत् सरोवर. पूर्व्यः। प्रत्नः। प्रत्नेन जन्मना देवा। यज्ञस्यपूर्व्यः। अशा वैदिक वचनांवरून यज्ञाच्या प्रचारापेक्षांही जुनी सोमवल्ली होती, तिची देवघेव आमच्या उत्तरध्रुवाकडील वसाहतींपर्यंत गाड्याघोड्यांनीं प्रालेयप्रलयापूर्वीं तिकडे आमच्या ( जरूर पडेल तसे नवग्व, दशग्व यज्ञ करितां येणारे विरूपास ) अंगिरस ऋषींनीं चालू केलेल्या सोमयागांच्या सत्रांकरितां धंधोकार चालत असली पाहिजे; ( लाट्यायन श्रौतसूत्र ८–२–१६ ) ( ऐ. ब्रा. ३-४ ) म्हणून असें म्हटलें आहे कीं, दशमासात्मक सूर्यप्रकाशाचें संवत्सर पूर्ण होतांच सोमराजाला रात्रिसत्रांत विकत घ्यावें. दहाव्या भागांत आर्यांच्या अश्विनीकुमार आदिक उपदेवतेचें वर्णन आहे. विवस्वत-शरण्यपुत्र अश्विनीकुमारांस (ऋ. १०-११२) यांत मधुमन्न म्हणजे गोड पाण्याच्या सिंधुमातर म्हणजे सिंधू आहे माता ज्यांची असें म्हटलें आहे. ह्या देवतांचा संबंध जान्हवीस म्हणजे गंगेस आपल्या या मायभूमींत वाहूं लावणाऱ्या ऋग्वेदकालीन जन्हुराजाशीं व त्याच्या वंशांतील आठवा ऋग्वेदोक्त पुरुष विश्वामित्र व त्याचा दत्तक मुलगा ऋग्वेदोक्त शुनःशेप ऊर्फ देवरात या प्राचीनतम कुळाशीं आहे. तो असा कीं ह्या कुळांतील पुरुष ह्या देवांस सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं असा त्रिकाल हविर्भाग देत असत, म्हणून त्यांना अश्वींनीं उत्तम बल, संतती, संपत्ती, आयुरारोग्य व शौर्य दिल्याचें वर्णन आहे ( ऋ. १-११६-१९ ) व असें म्हटलें आहे कीं, अहो, शूर अश्वी देवांनो ! तुम्ही दिलेली संपत्ती व धन-

धान्यसमृद्धी जन्हुकुळांतच राहिली आहे ( ऋ. ८·५८·६ ). यांची आई जी सिंधू हिच्याबरोबर एका बाजूस रसा व दुसऱ्या बाजूस गंगा ह्यांचा संबंध आला आहे, त्या अर्थीं ह्या देवता सप्तसिंधुप्रदेशांतच उद्भवलेल्या आहेत व हीच गोष्ट त्याचा सापत्न बंधू यम ( अवैस्तिक यिम ) व सापत्नभगिनी यमी व मनू विवस्वान यांस लागू आहे. याप्रमाणेंच सोमाचें पान करणारे मरुद्गण ह्यांसही सिंधुमातर म्हटलें आहे ( ऋ. १०-७८-६ ). अकराव्या भागामध्यें अखंड उषा दीर्घ अहोरात्री व दुसरे उत्तर ध्रुवाकडील अनन्य दृष्ट चमत्कार यांचें वर्णन आहे. उत्तरध्रुव व पर्युत्तरध्रुव या प्रदेशांमध्यें १९४ दिवसांचा सूर्यप्रकाश, ८६ दिवसांचा काळोख, ४७ दिवसांची उषा व ४८ दिवसांचा संधिप्रकाश असतो. अक्षांशाप्रमाणें तिकडे उषा एक एक, दोन दोन महिने टिकते. पुढें ती उषा सूर्यप्रकाशांत अंतर्धान पावते, हा प्रकाश पाडणारा दिनमणी उगवला म्हणजे तो अक्षांशाच्या मानानें सात, आठ, नऊ दहा महिने क्षितिजावर राहतो व तशाच तिकडे रात्रीही अखंड १०० दिवसांपर्यंत असतात. उत्तर ध्रुवाकडे १ सूर्योदय दक्षिणेस झालेला दिसतो, २ तारागणांचा उदयास्त बिलकूल होत नाहीं, तो २४ तासांत वाटोळा फिरतो. ३ उत्तरखगोल सर्व वर्षभर डोक्यावर दिसतो. ४ तिकडे दक्षिणखगोल कधींही दिसत नाहीं. ५ उत्तर ध्रुवाकडे संधिकाल धरून वर्षांत सहा महिने रात्र व सहा महिने दिवस असतो. ६ तिकडे उभ्या वर्षांत एकच रात्र व एकच दिवस व एकच सकाळ व एकच सायंकाळ असते, व ७ चोवीस तासांचा एक दिवस या मानानें प्रभातकाळ व सायंकाळ अखंड दीड दोन महिन्यांचा असतो. पर्युत्तर ध्रुव प्रदेशांत बर्फाचे प्रकार निरनिराळे दृष्टीस पडतात, २ तेथें दक्षिणायनांत दीर्घ रात्री होतात व त्या बहुत टिकतात ३ ह्या दीर्घ रात्री अक्षांशाच्या प्रमाणाप्रमाणें कमींत कमी चोवीस तास व जास्तीत जास्ती त्या पांचापासून सहा महिन्यांच्या असतात, उत्तरायणांत रात्रीप्रमाणें दिवस देखिल मोठे होतात, ५ मोठे दिवस होऊन अक्षांशाच्या मानाप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर वर्षाच्या राहिलेल्या भागांत समशीतोष्ण व ऊष्णकटिबंधासारख्या दिवस व रात्री सुरू होतात. पण त्यांचें प्रमाण दिवस व रात्र मिळून चोवीस तासांपेक्षां जास्त नसतें. ६ दीर्घ रात्रीनंतर जी उषा उदय पावते, ती बहुत दिवसपर्यंत सारखी राहते, ७ पण हा प्रकाश उत्तरध्रुव प्रदेशासारखा दीर्घ कालिक नसतो; एवढेंच नाहीं तर त्याचें तेजही तितकें जाज्वल्य नसतें. मनुष्य स्वभावाचा विचार केला असतां असें दिसतें कीं जें कांहीं अपूर्व दृष्ट असतें त्याचाच एखाद्यास चमत्कार वाटतो, पण रोजच्या रावत्याच्या गोष्टीचा कोणासही बिलकुल चमत्कार वाटत नाहीं. वैदिक अर्यांस उषेचा प्रकाश प्रथमतः पूर्व गोलार्धांत दिसला ( ऋ. १-९२-२ ); इतकेंच नव्हे तर आमच्या प्राचीनतम पूर्वजांस उषेचें दर्शन विपाशा नदीच्या क्षितिजावर प्रथम झालें, म्हणूनच आम्ही उत्तर ध्रुवाकडे गेल्यावर त्यांच्या तोंडांतून ( कियात्यायत्समया भवाति ( ऋ. १-११३-१० ), अबन्धनश्चराति वत्स एकः । महादेवाना मसुरत्व

मेकम् (ऋ. ५५-३), तानी दहाति बहुला न्यासन्या प्राचीनमुदिता सूर्यस्य (ऋ. ७-७६-३.) आरत्री+ पारशीमहि भद्रे पारशीमहि (अ. वे. १९-४७-१) मा नो दीर्घा अभिनशन्तमिस्त्राः । ऋ.

असले दीर्घ उषेबद्दल दीर्घ दिवसाबद्दल व दीर्घरात्रीबद्दल सखेदाश्चर्योद्गार तौलनिक दृष्टी उघडल्यानें स्वाभाविक बाहेर पडले आहेत! अशा गोष्टी ज्यांच्या रोजच्या सहवासाच्या, त्या लॅप व एस्किमो लोकांस ह्या कधीं सखेदाश्चर्यानें वर्ण्य वाटल्याचें कधीं कोणीं ऐकिलें आहे काय? आमच्या वैदिक आर्यांच्या तैतिरीय संहितेंत तीस उषांबद्दल सुस्पष्ट उल्लेख असा आहेः— (तै. सं. ४-३-११)

भावार्थ.—१ हीच ती उषा प्रथम उगवली असून हिचा प्रकाश क्षितिजावर होऊं लागला आहे. ही नवोढा व नूतन माता आतांच जन्म पावली व हिच्या मागून आणखीं तिघीजणी येत आहेत.

२ ह्या दोन उषा छन्दस्वती आहेत. त्या स्वयमेव अलंकार होत. त्या एकाच जन्मस्थानांत संचार करितात. त्या सूर्याच्या बायका आहेत. त्या आपला ध्वज फडकावितात, व आपला मार्ग जाणतात. त्यांना जरा (म्हातारपण) ठाऊक नाहीं. व त्या विपुलबीजात्मक आहेत.

३ त्या तीन कुमारी ऋताच्या (अमेरिका-लो.—टिळक) मार्गानेंच आल्या आहेत व त्यांच्या मागून दीप्तिमान घर्मत्रय (अग्निविशेष) येत आहेत. सदरहू उषारूपी तीन कुमारींपैकीं एक प्रजेचें रक्षण करिते, दुसरी सत्व राखते व तिसरी भक्तिशील मनुष्यांचें व्रत कायम ठेविते.

४ ही चवथी उषा यज्ञांतील ऋषीप्रमाणें चतुष्टोम बनली व तिनें गायत्री, त्रिष्टुभ, जगती, अनुष्टुभ नांवाचें मोठें स्तोत्र इत्यादिकांचा उपयोग करून, हा प्रकाश (सर्वांमिळून आणिला).

५ विधात्यानें पांच उषा निर्मिल्या व प्रत्येकीस पांच पांच बहिणी उत्पन्न केल्या. ह्यांचे पंचऋतू नानाविध रूपें धारण करितात व त्या एकत्रपणें व जुटीनें सदैव जातात.

---

+ भूगर्भ शास्त्राप्रमाणें गंगा पूर्वी सिंधूला मिळत होती. ती पुढें कांहीं निमित्तानें पूर्ववाहिनी झाली आहे! एक, तें निमित्त जन्हू व भगिरथ यानीं केलें असें प्रसिद्ध आहे. दुसरें, कांहीं भौगर्भिक अधःपतनानें (जसें, विंध्य व हिमालय यांतील ३००० फूट चिखलाच्या बसणाऱ्या नवीन दाबानें पूर्वेकडे पश्चिमेपेक्षां खळगा पडत जाणें) तिची वाट सुलभ झाली असेल, नाहीं असें आमचें म्हणणें नाहीं, पण तिचें पश्चिम-प्रवण पात्र पूर्वप्रवण होण्यास त्यांनीं कांहीं तरी मोठा कृत्रिम उपाय खचित केला आहे. त्याचा इतिहास भगीरथ प्रयत्न ह्या शब्दांत खास आहे! त्यानें तोफेच्या रोखा-प्रमाणें तिचा दक्षिणाभिमुख प्रवाहाचा रोख उगमाकडे थोडा बदलला असावा.

६ ह्या तीन बहिणी ( अशा प्रकारें ) एकाच ध्वजाखालीं आपल्या अनियनित स्थळीं जातात. ह्याच दूरदर्शी ऋतु उत्पन्न करितात. ह्या आपला मार्ग जाणतात; व स्तोत्रांच्या घोषांमध्यें प्रज्वलित होऊन त्या परिभ्रमण करितात.

१३ जी उषा प्रथमतःच उगवली, ती यमसदनाप्रत पावली. ही दुभती उषा म्हणजे तेजानें रसरसलेली उषा आम्हांस प्रतिवर्षी प्रकाशरूपी दुग्ध देवो.

१५ ही उषा ऋतूंची पत्नी होय. ती क्षितीजावर प्रथमच आली. ती ( तिच्यापासून येण्याऱ्या सर्व ) दिवसांची नेत्री व म्हणूनच पुरोगामिनी असून प्रजेची केवळ माताच आहे. हे उषे ! तूं जरी एकच आहेस, तरी नानाविध रूपांनीं प्रकाशतेस, व जरी तुला केव्हांही वार्धक्य येत नाहीं, तरी तूं इतरांस वार्धक्य खचितच आणितेस.

टीपः- ( १ ) या अवतरणावरून ह्या उषा निरनिराळ्या पांच दिवशीं पांच उगवणाऱ्या आहेत.

( २ ) त्यांना निरनिराळ्या पांच बहिणी आहेत व त्या सर्वां मिळून एकंदर तीस उषा आहेत, व त्या तीस दिवसपर्यंत एक सारख्या प्रकाशतात.

( ३ ) नंतर प्रथम उदय पावलेली उषा दिनमणी सूर्याच्या तेजोराशींत गडप होते.

( ४ ) ही उषा एका वर्षानें उगवते.

( ५ ) तर ह्या तीस उषांचा उदय अशा ठिकाणीं होत आहे कीं तेथें दिवस व रात्री फारच मोठ्या आहेत हें सिद्ध होतें. पण नानासाहेब पावगी यांच्या म्हणण्याप्रमाणें तेथें दिवस व रात्र षाण्मासिकच आहेत असें म्हणण्यास मुळांत आधार नाहीं. पण त्या निसर्गांत तशा असणाऱ्या उत्तर दिशेकडे खास आहेत. ही गोष्ट आम्हांस कबूल आहे. कारण आम्हांस रा. आठवले यांच्या पूर्वोक्त ८६[११] अक्षांशापलीकडे आमच्या वसाहती गणितास सोडून कल्पिणें फारसें संयुक्तिक दिसत नाहीं. पण ह्या एवढ्याच अखंड तीस दिवसांच्या उषा ह्या रोज घटका अर्धी घटका उषा अथवा अरुणोदय अनुभवणाऱ्या आमच्यासारख्या मनुष्यांच्या दृष्टीनें खरोखरच ( महद्देवावामसुरत्वमेकम् ) असे उद्गार आश्चर्यानें काढण्यास लावणाऱ्या नाहींत असें नाहीं ! मग निराधार बेलगाम जाण्यांत अर्थ काय ?

दीर्घ दिवसः-शयुः परस्तादध नु द्विमाताऽबन्धनश्चरति वत्स एकः ।
\+ + + महद्देवानामसुरत्वमेकम् ॥ ६ ॥

ऋ. ३. ५५. ६.

भावार्थः-पश्चिमेकडे शयन करणाऱ्या दोन माता ज्या द्यावा व पृथ्वी यांचा वत्स जो सूर्य तो उष्ण कटिबंधामध्यें ज्याप्रमाणें रोज पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे नियमानें मावळतो, त्याप्रमाणें तो येथें असें न करितां बेलगाम चालतो. अर्थात् तो अनेक महिने क्षितिजावर उगवलेलाच राहतो हें मोठें आश्चर्य होय ! पण हें आश्चर्य कोणास ? जो क्रान्तिप्रदेशांत रहात असेल त्यास, इतरास अलबत नाहीं.

ऋ. १०. १३८. ३

सूर्यो मध्ये अमुन्वद्रथं दिवो विदद्दासाय प्रतिमान मार्यः ॥

भावार्थः—अंतरिक्षांत सूर्यानें आपला रथ मध्येंच सोडला. त्यामुळें जशासतसें होऊन आर्यानें दासाचा सूड उगविला व दीर्घ रात्रीच्या अंधकाराचा वचपा काढिला. या वरून सूर्यानें दीर्घ दिवस केला असें यांत सुस्पष्ट ध्वनित होत आहे.

दीर्घरात्र व दिवस.—दीर्घरात्र दक्षिणायनांत मकरसंक्रान्तीनंतर होतात व दीर्घ दिवस उत्तरायणांत कर्कसंक्रान्तीनंतर होतात. यासंबंधें चर्चा पुढील ऋचेंत आहेः—

नाना चक्राते यम्या वपुंषि तयोरन्यद्रोचते कृष्णमन्यत् ।
श्यावी च यदरुषी च स्वसारौ महद्देवानामसुरत्वमेकम् ॥

ऋ. ३-५५-११

भावार्थ.—हीं दिवस व रात्र मिळून दोन जुळीं आहेत. यांतील एक जुळें नानाप्रकारचीं रूपें धारण करितें म्हणजे त्याचे अवयव लहान मोठे होतात. ह्यांपैकीं एक प्रकाश पाडितें व दुसरें काळोख पाडितें, बाकी राहिलेलें दुसरें जुळें दोन बहिणींचें आहे. त्यांतील एक बहीण शुभ्रवर्णाची व दुसरी कृष्ण वर्णाची आहे. ह्या देवांचा मोठा चमत्कारच होय !

ऋतूंचे पर्याय.—एकं हि शिरो । नाना मुखे । कृत्स्नं तदृतुलक्षणम् ।

तै. आ. १-२-६

१ शुक्लकृष्णे संवत्सरस्य । दक्षिणवामयोःपार्श्वयोः । तस्यैषा भवति ।
शुक्लं ते अन्यद्यज तं ते अन्यद् विषुरूपे अहनी द्यौरिवासि ॥ १-२-४

भावार्थ.—ह्या वर्षास एक डोकें व अनेक ऋतूंचीं तोंडें आहेत. ह्या संवत्सररूप देवाच्या दक्षिण व वाम भागीं शुक्ल व कृष्ण वर्णांचे दिवस आहेत. शुक्ल ही उत्तरायणाची सहामाही व कृष्ण ही दक्षिणायनाची सहामाही होय. हें वर्णन विषुववृत्तावरील दिवसरात्रीप्रमाणें आहे, पण त्यांचें मात्र नाहीं. तें उत्तरध्रुवाकडील वस्तुस्थितीचें दर्शक आहे.

२ नीरस्य तु स्वश्व्यं जनासः प्र नु वोचाम विदुरस्य देवाः ।
षोळहा युक्ताः पंचपंचा वहन्ति मह्द्देवाना मसुरत्वमेकम् ॥

ऋ. ३-५५-१८

भावार्थ.—हे जन हो, ह्या सूर्यरूप वीराचे अश्व चांगले आहेत. म्हणून आपण त्याच्या भाग्याचें वर्णन करूं. ही गोष्ट देवांस देखील माहित आहे कीं ह्या सूर्याला सहा सहा ( ऋतुरूप ) घोडे नेतात व पांच पांच ( ऋतुरूप ] घोडे असतात. हें देवाचें ऐश्वर्य होय.

टीप.—वर्षांचे पांच ऋतू असणें हें उत्तरध्रुवाकडील वस्तुस्थितीचें ज्ञापक होय!

दीर्घरात्रीची भीती.—( १ ) न यस्याः पारं ददृशे न योयुवद्विश्वमस्यां निविशते यदेजति । अरिष्टासस्त उर्वि तनस्वति रात्रि पारमशीमहि भद्रे पारमशीमहि.

अ. वे. १९-४७-२

[ २ ] रात्रिं रात्रिमरिष्यन्तस्तरेम तन्वा वयम् ।

अ. वे. १९-५०-३

भावार्थ.—[ १ ] ज्या रात्रीचा पैल तीर दृष्टीस देखील पडत नाहीं, तिच्यांत सगळया वस्तू विराम पावतात. हे दीर्घरात्री, हे भद्रे, आम्हाला कोठेंही आफत न पोहोचतां तुझ्या पैल तीरावर जाऊं दे.

[ २ ] एकामागून एक येणाऱ्या रात्रींतून आमचा निभाव लागूं दे.

[ १ ] चित्रावसो स्वस्ति ते पारमशी येत्याह ।

तै. सं. १-५-६-४

[ २ ] चित्रावसो स्वाति ते पारमशी येत्याह । रात्रिर्वै चित्रावसुरव्युष्टयै वा एतस्यै पुरा ब्राम्हणा अभैषु ॥

तै. सं. १-५-७-५

भावार्थ.—[ १ ] हे रात्री चित्रावसू ! तुझें कल्याण असो. तूं आम्हाला ह्या रात्रीच्या पैलतीरीं ने.

[ २ ] ही चित्रावसू रात्रच होय. ही दीर्घरात्र सरणार नाहीं. म्हणून प्राचीन काळीं ब्राम्हण भीत असत.

[ १ ] एकं वा एतद्देवानामहः यत्संवत्सरः: । तै. ब्रा. ३-९-२२

भावार्थ.—ह्या उत्तरध्रुवभागीं सहा महिन्याची रात्र व सहा महिन्यांचा दिवस मिळून एक दिवस देवांचा होतो.

बाराव्या भागामध्यें हिमालयपर्वत अथवा उत्तरागिरी व प्रलयकालीं जन्मभूमीचें आर्यांस स्मरण याचें वर्णन आहे.

१ यस्येमे हिमवन्तो माहित्वा ।　　ऋ. १०-१२१-४.

२ गिरियस्ते पर्वता हिमवन्तो ज्रण्यं ते पृथिवि स्यो नमस्तु ।

अ. वे. १२-१-११

भावार्थ.—ह्या पर्वताची हीं शिखरें मोठीं हिमानें आच्छादित आहेत. हे पृथिवी, तुझ्यावरील हे पर्वत सदैव हिमाच्छादित असोत.

टीप.—ह्यावरून वेदकाळीं हिमालय आपल्या ऋषींस माहित होता असें सिद्ध होतें. पण ह्यांतील ही खुषी लक्षांत ठेविली पाहिजे कीं हा वेदकाळ जलप्रलयाच्या पूर्वींचा नव्हे.

स औघे उत्थिते नावमापेदे । तं स मत्स्य उपन्यापुप्लुवे ।

तस्य शृंगे नावः पाशं प्रतिमुमोच । तेन एतमुत्तरं गिरिमधिदुद्राव ।

शत. ब्राम्हण १-८-१-५

प्राचीन जलप्रयलाच्या वेळीं जलौघ उत्पन्न झाला. एका मत्स्यानें सांगितल्याप्रमाणें मनूनें त्याच्या शिंगाला एक नाव तयार करून तिचा दोर बांधला नंतर तो मत्स्य ती नांव घेऊन ह्या उत्तर गिरीकडे गेला. तो उत्तरगिरी हिमालय होय असें शतपथ ब्राम्हण ग्रंथावरील टीकाकारांचें मत आहे. ह्या ग्रंथांत (एता (कृतिकाः) हवै प्राच्यै दिशो न च्यवन्ते २-१-२-३) (ह्या कृतिका पूर्वदिशेपासून च्युत होत नाहींत)—ह्या वचनावरून तो काल इ. स. पू. २५०० वर्षांवर आहे—असें प्रथम रा. दिक्षितांनीं व नंतर लोकमान्य टिळकांनीं गणित करून काढिलें आहे. यावरून शतपथब्राम्हण लेखकापुढें सुमारें आजपासून ५००० वर्षांपूर्वीं सदरहू उत्तरेकडील हिमालय पर्वत दिसत होता असें—एतमुत्तरंगिरिम्—या शद्बांवरून व्यक्त होतें; कारण एतम् शद्बाबद्दल एक नियम मननीय आहे. तो हा कीं इदस्तु सन्निकृष्टं समीपतरवर्ती दैतदोरूपम्—ह्यांतील इदम् शद्बापेक्षांहि एतम् समीतरवर्ती म्हणजे अगदीं जवळचे पदार्थ निर्दिष्ट करितो. मनूनें ती नांव त्या मत्स्याच्या सांगण्यावरून एका वृक्षास बांधिली. पाणी उतरलें तशी ती नांव खालीं आली. त्यावरून त्या पर्वतशिखराला मनोऽवसर्पण हें नांव पडलें. पुढें तो मनू व इडा नांवाची स्त्री यांच्यापासून प्रजा उत्पन्न झाली. ह्या शिखरास अथर्ववेदांत (१९;३९, ७, ८.) नावभ्रंशन असें नांव दिलें आहे. महाभारतांत ह्यास नौबंधन म्हटलें आहे. याच्या बरोबर प्रस्तुत पुस्तकांतून गाळलेला पुढील आपल्या मत्स्य व भागवत या पुराणांतील व झेन्दावेस्तांतील मजकुराचा विचार केला असतां नानासाहेब पावगी ह्यांचें 'एतमुत्तरं गिरीम्'—ह्या पदावर जोर देऊन मनूच्या गलबतांतील लोक उत्तरध्रुवाकडून गलबतानें हिमालयावर ओघानें वाहात येऊन लागले व प्रलयाचें पाणी खालीं उतरलें तसें त्याचें गलबत वरील 'नौबंधन'शिखरावरून आर्यावर्तांत किंवा आर्यन वैजोंत येऊन लागलें—हें लोकमान्याप्रमाणेंच म्हणणें वादांत टिकेल कीं नाहीं याबद्दल आम्हांस मोठा संशय उत्पन्न झाला आहे, मग त्या गलबतांतिल लोकांस आर्यावर्ताचें पूर्वीचे स्मरण होतें कीं नाहीं हा प्रश्न आलाहिदा आहे. कारण मत्स्यपुराणांत मनूच्या तपश्चर्येचें स्थान मत्स्य ऊर्फ मलबार असें दिलें आहे व भागवतांत या प्रलयाच्या कथेचा नायक द्रवीड देशाचा राजा सत्यव्रत होता असें म्हटलें आहे. शतपथब्राम्हणामध्यें मनू कोणत्या स्थळीं नावेंत बसला हें दिलेलें नाहीं. वैदिक मनू विवस्वत पुत्र आहे तसाच अवैस्तिक यिमही विवस्वत पुत्र आहे, पण मनूवर गुदरलेला प्रलय जलाचा आहे व यिमाचा प्रलय बर्फाचा आहे. मनूची बायको इडा हें नांव त्याच्या डाम्त स्वरूपावरून द्रविड दिसतें.

टीपः—यावरून असें उघड दिसतें की हें आमच्या विवस्वत मनूचें गलबत विंध्य पर्वताच्या आसमन्तात भागचें नसेल तर उत्तरभागच्या गोंडवन नामक जुन्या उत्तरवाहिनी सप्तसिंधूच्या प्रदेशांतून (उर्फ हल्लीं तीन हजार फूट चिखला खालच्या तृतीय युगांतल्या) आर्यावर्तांतून त्या जलप्रलयास मुख्यत्वेंकरून कारण झालेल्या नवीन उद्भवलेल्या उत्तरगिरविर अथवा हिमालयावर त्या

जलप्रलयाचें पाणी चढलें तसें त्यांतील जुने आर्य नौबंधन शिखरापर्यंत ८००० वर्षांपूर्वीं चढले व तें पाणी ओसरलें तसें तें गलबत खालीं उतरलें तसे ते मनू आदिक आर्य पूर्वीच्या आर्यावर्ताची आठवण पक्की ठेवून खालीं उतरले ! पण त्या जुन्या आर्यावर्तभर काय होतें ! चोहोंकडे पाणीच पाणी व चिखलच चिखल ! पूर्वोक्त भोपाळ सारखा भोपाळापासून वरखेडीपर्यंत २५० मैलांचा तलाव बसतिक्षम होण्यास अलीकडे ३० वर्षें लागलीं तर विंध्य व हिमालय ह्यांमधील १८०० ते २००० मैल लांबीच्या तलावाचें पाणी ओसरण्यास तीन साडेतीन हजार वर्षें जरूर लागलीं असलीं पाहिजेत व त्या तलावाच्या दलदलींत वस्ती प्रथम सरस्वती व दृषद्वती ह्या नद्यामध्य ब्रह्मावर्तांत झाली असली पाहिजे ! म्हणून त्या वैवस्वत मनूच्या स्मृतींत पुनर्जन्म पावलेल्या ऋग्वेदांत पुढील उक्ती आढळतातः—

(१) सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।
तदेव निर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ म. स्मृ. अ. २

(२) योनिं देवकृतम् । ऋ. ३-२३-४

टीपः—देवकृतं योनिं म्हणजे ईश्वर निर्मित प्रदेश.

(३) नित्वा दधे वर आ पृथिव्या इळायास्पदे सुदिनत्वे आम्हाम् ।
दृषद्वत्यां मानुष आपयायां सरस्वत्यां रेवदग्ने दिदीहि ॥ ऋ. ३-२३-४

भावार्थः—हे अग्नि, तुला मी उत्सवाच्या दिवशीं पृथ्वीच्या शिखरावर (हिमालयावर) व इळेच्या स्थानावर ठेवितों; आतां तूं दृषद्वती, आपया व सरस्वती या नद्यांच्या प्रदेशांत ज्या लोकांची वस्ती असेल, त्यांचा घरीं प्रकाश पाडून त्यांस संपत्ती दे.

(३) दक्षिणेन सरस्वत्या उत्तरेण दृषद्वतीम् ॥ २०४
ये वसन्तिकुरुक्षेत्रे ते वसन्ति त्रिविष्टपे ॥ २०५ ॥ महाभारत.

टीपा—ह्याप्रमाणें आपलें प्रसिद्ध कुरुक्षेत्र हें सरस्वती व दृषद्वती ह्या नद्यांच्या मध्यें दक्षिणोत्तर आहे व हा प्रदेश प्रतिस्वर्गच (त्रिविष्टप=स्वर्ग, तिबेट) आहे.

इयं मे गंगे यमुने सरस्वतीपासून कुभया, गोमती, क्रमूपर्यंत १९ नद्यांचा उल्लेख ऋग्वेदांत १०-७५-५।६ येथें केलेला आहे.

नव्या आर्यावर्तांतील पुनर्जन्म पावलेल्या सप्तसिंधू पुढील होतः—सिंधू, चिनाब (असिक्नी) रावी (परुष्णी), सतलज (शुतुद्री), यमुना, गंगा, व सरस्वती.

(४) पावका नः सरस्वती ॥ ऋ. १-३-१०

टीप—ह्या सर्व नद्यांत सरस्वती नदीसारखी दुसरी पवित्र नदी नाहीं. ही सरस्वती नदी पूर्वी सतलज नदीला मिळत असे. पुढें सतलजचा ओघ फिरून बिपाशेला (बिआज) मिळूं लागला तशी सरस्वती ही सतलजच्या जुन्या पात्रानेंच वहात राहिली, पण तीस हा एकाकीपणा जणू न आवडून ती वाळवंटांत लुप्त झाली आहे !

(५) उत नः प्रिया प्रियासु सप्तस्वसा सुजुष्टा सरस्वती ॥ ( ऋ. ६-६१-१० )

टीप.—म्हणून ह्या सरस्वती प्रमुख बहिणी बहिणी सप्तसिंधूंचें वर्णन असें वर आलें आहे, त्या अर्थी जुन्या आर्यावर्ताचें ऊर्फ गोंडवनाचें जन्मान्तर नव्या आर्यावर्तांत अथवा गौड देशांत झालें आहे. पण त्याच्या दरम्यान त्यास नाशक व अनाशक या अवस्थेंतून जावें लागलें आहे व ह्या दक्षिणेकडील पितर देशांतून हिमालयाखालील अर नामक भूमध्यसमुद्रापलीकडील त्रिविष्टप ऊर्फ ( तिबेट ) स्वर्गांतील सुखी वसाहतीची आठवण चांगली उपमा देण्यासारखी टिकली आहे !

म्हणूनच सदरहू जलप्रलयानंतर तीन साडे तीन हजार वर्षांनीं रचलेल्या शतपथ ब्राह्मणाच्या ग्रंथांत तल्लेखकानें ह्या नव्या वसाहतीची दिशा पुढील श्लोकांनीं सुस्पष्ट दाखविली आहे असें आम्हांस तर खास वाटतें:—

(१) स ओघे उत्थिते नावमापेदे । तं स मत्स्य उपन्यापुप्लुवे ।
तस्य शृंगे नावः पाशं प्रतिमुमोच ॥ तेनैत मुत्तरगिरिमभिदुद्राव ॥

शत. प. भा. १-८-१-५

टीप.—ह्याचा अर्थ पूर्वी आला आहे. त्यावरून हें गलबत प्रलयांत वर गेलेलें खालीं उतरलें, व त्यांनीं वसाहात सरस्वतीपासून पूर्वेकडे चालविली कशी तें पहा:—

( २ ) विदेघो ह मान्थवोऽग्निं वैश्वानरं मुखे बभार × × तर्हि विदेघो माथव आस सरस्वत्याम् । स तत एव प्राङ् दहन्नभीयायेमां पृथिवीम् ॥

शतप. ब्राम्हण १·४·१·२०

टीप.—सरस्वती आदिक सप्तसिंधूंकडून विंध्य व हिमालय यांतील नाशक दलदलींत माजलेलें जंगल जाळून शेती करीत विदेघ माथव पूर्वेकडून पश्चिमेकडे गेला व तेणेंकरून तें कालगत्या सुधारून अनाशक झालें व शेवटीं गोंडवनाचें ऊस पिकविणारें गौड अथवा आर्यावर्त अथवा प्रथम स्वर्ग झाले ! मग ह्या धालमेलींत व घडामोडींत ज्याप्रमाणें आपल्या दक्षिणेंतील पंच सिंधूंपैकीं नर्मदा, तापीप्रमाणें गोदा, कृष्णा व कावेरी ह्या नद्या मूळ पश्चिमवाहिनी होत्या, त्या सह्याद्रीच्या उत्पत्तीच्या वेळीं पूर्व वाहिनी झाल्या आहेत, त्याप्रमाणेंच पूर्वोक्त जुन्या आर्यावर्तांतील सप्तसिंधू पूर्वीं उत्तरवाहिनी होत्या, त्या हिमालयाच्या उत्पत्तीच्या वेळीं प्रथम सिंधूप्रमाणें दक्षिणवाहिनी होऊन कांहीं विंध्याच्या अडचणीमुळें पुढें पूर्ववाहिनी झाल्या असोत ! पंचसिंधूच्या वरील फेरफारांचे वर्णन अलाहिदा निराळें दिलें आहे. बाकी सप्तसिंधूंतून उत्तरध्रुवाकडे वसाहत करण्यास गेलेल्या वैदिक व अवैस्तिक लोकांचें काय झालें ? ते सरळ जुन्या आर्यावर्त्ताकडे किंवा आर्यन वैजोकडे येण्यास त्रिविष्टपांत अथवा दुसऱ्या स्वर्गांत आले असतां हिमवान उत्तरगिरी भूमध्यसमुद्रांतून वर नवीन आलेला पाहून वरील रस्त्यांत आलेल्या विंध्याद्रीस पाहून बिचकलेल्या गंगा, यमुनादी नद्या जशा पूर्वेकडे वळल्या त्याप्रमाणें ते भूमध्यसमुद्रांतून वर नवीन आलेल्या हिमनद्याविशिष्ट

हिमालयास पाहून बिचकले व पश्चिमेकडे वळले व हिंदुकुशाकडून पूर्वेस आर्यावर्तांत किंवा आर्यनवैजोंत सदानीरा नदीपर्यंत शिरले व कांहींचे मनांत त्वष्टयाच्या अर्ढींची खुमखुम कामय होती तें व ज्यांस पूर्वीं आलेले वैदिक व अवैस्तिक यांनीं येण्यास हरकत केली ते मागें इराणांतच राहिले! कारण सदानीरापुढें दलदल होती. ती आरोग्यकारक नव्हती, यास प्रमाण.—

( १ ) आदंगिराः प्रथमं दधिरे त्रय इद्धाग्नयः शम्या ते सुकृत्यय ॥
(ऋ. १-८३-४)

टीप.—भारतांतील अंगिरा ऋषीनें काष्ठांचें मंथन करून अग्नीची सिद्धता केली म्हणून त्या अंगिरा ऋषीस अग्नीचा पिता असें म्हणतात. यास प्रमाण—पितुर्यत् पुत्रो ममकस्य जायते ( १-३१-११ )

( २ ) अयं यः ( अग्निः ) सृजये पुरो दैववाते समिध्यते । १-१५-४

टीप.—ह्या अग्नीला अंगिराकुळांतील सृंजयाच्या घरीं पूर्व दिशेला पेटवण्यांत आलें. हा सृंजय देववाताचा पुत्र. हा देववात व देवश्रवा हे भरताचे पुत्र होत.

[ १ ] अत एवते प्राचीनं भुवनं ××। सैषाऽप्यतर्हि कोशलविदेहानां मर्यादा ।

टीपः—ह्यावरून ते कोशल व विदेहापर्यंत येऊन तेथेंच थांबलेले दिसतात.

[ २ ] पूर्वमनयन्नापरं पुन्हः ॥ १-३१-४

टीपः—ह्यावरून वाईट हवेकरितां त्यांतील कांहींस त्या पलीकडच्या दलदलीच्या जमिनींतून आपला सिद्धाग्नी पूर्वेकडून पश्चिमेकडे परत आणावा लागला.

[ ३ ] तदुह एतर्हि क्षेत्रतरमिव ब्राह्मणा उहि नूतनमेतद्यज्ञैरसिष्विदन् ।
शतप० ब्राह्मण १-४-१०

टीपः—ते तेथेंच चिकाटी धरून राहिले तेव्हां सदानीरा नदीच्या पूर्वबाजूच्या प्रदेश चिखल कमी होऊन वस्तीस योग्य झाला व अर्थात् पश्चिमेकडे वस्ती पसरत गेली.

याप्रमाणें शतपथ ब्राह्मणावरून पुढील गोष्टी सिद्ध होतातः—

[ ० ] वैदिक आर्यांस गलबत चालविण्यासारखें पाणी लागलें म्हणून ते गलबतांतून उत्तर गिरीवर जाऊन लागले आहेत, पण अवैस्तिक आर्यांस पाण्याऐवजीं बर्फ लागल्यामुळें त्यांस वरांत आश्रा घ्यावा लागला आहे. तेव्हां ह्या दोघांची स्थानें भिन्न दिसतात. एकाचें स्थान दक्षिण आर्यावर्तांत होते, व दुसऱ्याचें स्थान उत्तर आर्यावर्तांत होतें.

[ १ ] नवीन आर्यावर्तांत किंवा ऐर्यनवैजोंत सिद्धाग्नी प्रथम सरस्वतीतीरीं आंगिरसांनीं काष्ठांचें घर्षण करून स्थापित केला.

[ २ ] तो अग्नी आंगिरसकुळांतील भरत, देववात, देवश्रवा सृंजय वगैरेंनीं पश्चिमकडून पूर्वेकडे प्रथम सदानीरा नदी कांठच्या कोसल व विदेहापर्यंत वसाहतींबरोबर नेला. हा अग्नी कदाचित् ह्या वसाहती करणारांस जंगलें जाळून दळयांची शेती करण्यास मदत करीत असे असें वाटतें.

[ ३ ] त्या आर्यांनीं चिकाटी धरून सदानीरेपुढची दलदल सुकल्यावर वसाहतीचें काम पुढें पुष्कळ पश्चिमेस चालविलें.

[ ४ ] अर्थात्, ह्या ब्राह्मणांत जलप्रलयानंतरच्या दक्षिण आर्यावर्तांतील वसाहतींची साद्यंत हकीगत आहे.

तेराव्या भागामध्यें वैदिक कालमानाचें वर्णन आहे. ह्या वैदिककाळीं आमचें कालमान बारा महिन्यांचें व अधिकमासासह तेरा महिन्यांचें होतें:—

वेदमासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः । वेदा य उपजायते ॥ १. २५. ८

टीपः—चांद्र व सौर वर्षांतील फरक काढून टाकण्यास तीन वर्षांनीं येथें एक अधिक मास धरीत.

ऋतू—ऋतू स्वाभाविक सहा असतः—

पळिद्यमो देवजा । १·१६४. १५

दिवस, रात्र व वर्षः—बारा तासांचा दिवस व बारा तासांची रात्र असे. तीनशें साठ दिवसांचें व तीनशें साठ रात्रींचें वर्ष असेः—

द्वादशारं न हि तज्जराय वर्तति चक्रं परियामृतस्य ।
आ पुत्रा अग्ने मिथुनासो अत्र सप्त शतानि विंशतिश्च तस्थुः ।
ऋ. १. १६४. ११

उत्तरध्रुवाकडील कालमानः—बारा महिन्यांचें पांच ऋतू—यांत हेमन्त व शिशिर हे दोन ऋतू मिळून एक ऋतू समजावयाचाः—

द्वादश मासाःपंचर्तवो हेमन्त शिशिरयोः सभासेन । १.१

टीपः— दोन कोणते ऋतू एकवटावे याबद्दल शतपथ ब्राम्हणाच्या वेळीं वाद पडला होताः वर्षा व शरद किंवा हेमन्त व शिशिर. अर्थात हा जुन्यानव्याचा वाद दिसतो.

गवामयनः—खूर व शिंगें प्राप्त व्हावीं म्हणून गाईनीं केलेल्या सत्रामध्यें त्या उत्तरेकडून दक्षिणेकडे येत असल्या तर त्यांस बारा महिन्यांच्या सत्राची माहिती आहे ही एकच गोष्ट काय दाखविते ? त्या उष्णकटिबंधांतून उत्तरध्रुवाकडे गेल्या होत्या.

शतपथ ब्राह्मणः—मासात्मक आदित्य किती धरावयाचे हा प्रश्न उत्पन्न झाला असतां ते बारा समजावयाचे असा निवाडा ह्या वेळीं झाला आहे.:—

कतम आदित्या इति । द्वादश मासाः संवत्सरस्यैत आदित्याः ॥
श. ब्रा. ११. ६. ३.८

ऋग्वेदांतील रात्रीचा महिमाः—एका ऋचेंत हिरण्यस्तूप ऋषीनें जगाचें विश्रान्तिस्थान जी रात्र हिचें आव्हान असें केलें आहेः—

व्हयामि रात्रिं । जगतो निवेशिनीं । ऋ. १-३५-१

टीपः—ह्या वरून हें रात्रीबद्दल प्रेम आर्यावर्तांतीलच दिसतें, पण ही ऋचा मात्र जुनी ठरली पाहिजे.

चौदाव्या भागांत अनार्य, दस्यू, दास, असुर, राक्षस इत्यादिकांच्या कथा दिल्या आहेत. याप्रमाणें या प्रत्येक शब्दाचा अर्थ नानासाहेब पावगी यांनीं असा दिला आहेः—

दस्यूः—हा शब्द ऋग्वेदांत अमित्र किंवा शत्रू या अर्थीं वापरला आहे. हा शब्द आर्यांचे कुळांत उत्पन्न होऊन द्वैतानें राहणाऱ्या इसमास लावीत. कधीं कधीं याचा उपयोग भ्रष्ट आर्य ह्या अर्थीं करीत.

राक्षसः—हे बलाढ्य व बेफाम लोक होते. पाण्याचें रक्षण करणारे ते राक्षस व यश करणारे ते यक्ष असा एका ठिकाणीं दुसरा अर्थ ह्या शब्दांचा दिला आहे.

वृत्र, अदेव व असुरः—हे वैदिक सारस्वतांत शत्रुत्वाचेच द्योतक आहेत. छांदोग्य उपनिषदांत असुर शब्द कृपण, अनुदार व श्रद्धाहीन व यज्ञयाग न करणाऱ्या प्रेतावर वस्त्रालंकार घालून सजविणाऱ्या व तेणेंकरून स्वर्गलोक प्राप्त होईल असें मानणाऱ्या मनुष्यास लाविला आहे. ह्याच अर्थानें म्लेंच्छ हा शब्द वापरतात.

शक, कांबोज, यवन, द्रविड, कालिन्द, पुलिन्द, उशीनर, कोलिसर्प, माहिषक, मेकल, लाट, कोन्वशिर, शौंडिक, दर्व, चौर, शबर, बर्बर, किरात, गांधार, चीन, मद्रक, पौंड्र, रमठ, चोल, केरल इत्यादि देशोद्भव जाती सप्तसिंधू प्रांतांत उत्पन्न झालेल्या आहेत असें रा. पावगी यांचा अभिप्राय आहे.

यवन, म्लेच्छ, यादव व वैभोज—ह्या जातींची उत्पती महाभारतामध्यें अशी दिली आहेः—

> यदोस्तु यादवा जातास्तुर्वशो यवनाः स्मृताः । द्रुह्योः सुतास्तु वैभोजा अनोस्तु म्लेच्छ जातयः ॥ महाभारत आदिपर्व १·७९·४२·४३.

टीप.—ह्या हिंदुस्थानांतील अभ्रष्ट जातीचे दोन मुख्य भेद पडतात. १ पंच द्रवीड व २ पंचगौड म्हणूनच ह्यावरून असें दिसतें कीं वरील पंचगौड व पंचद्रवीड या लोकांच्या भाषा भिन्न मूलोद्भव मानोत, पण त्यांच्या मूलतत्वांत इतकें साम्य आहे कीं तें साम्य घुणाक्षर न्यायानें उद्भवलें असेल असें आम्हांस वाटत नाहीं. तेव्हां त्या एकमूलोद्भव आहेत; कारण त्या बोलणारे लोक ह्या सिद्धाग्नी बाळगणाऱ्या विंध्य व हिमालय यांतील श्रौतकर्मरत आर्यावर्तांतील किंवा त्यांच्या दक्षिण व उत्तर, पूर्व व पश्चिम दिशेकडील प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष श्रौतकर्मरत वसाहतींतील रहिवासी असावेत !

आमचा उपसंहार.—ह्या विषयावरील निरनिराळ्या मतांचा जो गलबला चोहोंकडे माजला आहे, त्यांचें विवरण तीन भागांत आम्ही मूळग्रंथ पाहून शक्य तितकें सप्रमाण व सविस्तर केलें. तें इतकें कीं त्यांतील मूल, प्रमाणें व टीका यांचे उतारे घेण्याचे कामीं बिलकुल कसर केली नाहीं, त्यांत ग्रंथकर्त्यांच्या प्रतिपादनाचा मोड कोठेंही कुरतुडलेला न दिसावा व त्यावर आपल्या म्हणण्यास थोडासा अवकाश डोळ्यांतील केर तर निघावें पण डोळा तर फुटूं नये असा मिळावा एवढाच हेतू धरिलेला आहे. तेव्हां त्या दीर्घ

अवतरणांबद्दल कृपाभिलाषपूर्वक ऋणीपणा व्यक्त करून ह्या गलबल्यांतील अव्यवस्थेची थोडी फार शक्य ती व्यवस्था यथाशक्ती लावण्याचा आमचा विचार आहे; कारण या सगळ्या प्रतिपादनाच्या स्वरूपाचा आमूलाग्र विचार केला तर असें आढळतें कीं मूर्ती तितक्या प्रकृती या न्यायानें आम्ही स्वतः इ. स. १८९१ पासून आमचें मूळचें वसतिस्थान विंध्य व हिमालय यांमध्यें आहे असें म्हणणारे आहों, लोकमान्य टिळक हे आमचें मूळचें वसतिस्थान उत्तरध्रुवावर आहे असें म्हणणारे होते व नानासाहेब पावगी हे आमचें वसतिस्थान विंध्य व हिमालय यांमध्यें आहे व आमची वसाहत उत्तरध्रुवावर आम्ही तृतीययुगांत केली होती असें म्हणणारे आहेत. तर या निरनिराळ्या मतांचा मथितार्थ आमच्या सारासार विचाराप्रमाणें तरी काय आहे ? हें आम्हांस स्वतंत्र ग्रंथकार म्हणून सांगणें भाग आहे.

आमच्या स्वतःच्या मताचा आढावा.—आमच्या आर्यललितविस्तारांत आम्ही या वेदोदधींत बुडी मारून आम्ही कांहीं मातीरेती वर आणिली असेल तर ती एवढीच कीं आम्ही वैदिकधर्मी रहिवासी हिंदुस्थानांतील मूळचे वतनी आहों, त्यांत आम्ही उपरी आलों आहों ही कल्पना आमचे मनास बिलकुल कधींही शिवली नव्हती. पुढें आम्ही एकाचे एकवीस या न्यायानें वाढलों तेव्हां आम्ही आमच्या वसाहती जशा दक्षिणेस मसाल्याच्या बेटांत व पश्चिमेस इराण, आरबस्तान व आफ्रिकेचा इजिप्त पासून पूर्वकिनारा व जिब्रॉल्टरपर्यंत पश्चिम किनारा यांवर केल्या, त्याप्रमाणें आमच्या वसाहती एशियाखंडाच्या उत्तरभागीं ज्या ठिकाणीं उषा गोचर होते त्या ठिकाणापर्यंत त्रिविष्टपांतून ( तिबेट ) जाऊन पोहोंचल्या होत्या ! इतक्यांत पिरिनिज पर्वतापासून कामश्चाटकापर्यंत मि. गिकीच्या भूगर्भशास्त्रांतील डॉ. क्रोलच्या उपन्यासाप्रमाणें जमिनीचा मोठा उत्पात इओसीनकाळीं म्हणजे बारा तेरा हजार वर्षांपूर्वी झाला व त्यांत भूमध्य-समुद्रांतून आपल्या हिमालयाची उत्पत्ती झाली ! तेव्हां उत्तरेकडील आमच्या वसाहतींतील त्या वर चढलेल्या प्रदेशांत प्रळय माजला ! लोक अन्नपाण्याच्या टंचाईमुळें व हवा बदलल्यामुळें पटापट मरूं लागले ! तेव्हां ते आपली वाड-बिच्छात घेऊन येऊन आपल्या आर्यावर्तांतील पंजाबांत घुसले !

आमच्या जमेस शोधः—[१]वेदांतील २७ नक्षत्रांवरून आर्य क्रांतिप्रदेशांत प्रथम पूर्व पश्चिम त्रिखंडांत फिरत होते हें आम्हीं सिद्ध केलें.

[ २ ] आम्ही आमच्या श्रौतभूमीची मर्यादा उषेच्या दर्शनापर्यंत एशिया खंडामध्यें उत्तरेस नेली होती.

[ ३ ] भूगर्भाच्या इओसीन ते प्लिओसीन काळांत म्हणजे बारा तेरा हजार वर्षांपूर्वी आपली भूमिमाता सूर्यबापाच्या साहचर्यांत रहात असतां तिच्या पोटीं प्रसव वेदना होऊन ती एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळत असतां ( अक्ष-चलनानें व संपातचलनानें ) आपल्या उत्तरेच्या हिमालय पुत्राची उत्पत्ती झाली !

[ ४ ] तेव्हां मोठा जलप्रलय माजला असतां आपले उत्तरेकडील दीर्घउषे-

पर्यंत जाऊन पोहोचलेले वसाहतवाले आपला सिद्धाग्नी घेऊन वायव्य दिशेकडून मूळ घराची आठवण करून घाईघाईनें पंजाबांत घुसले !

व्यंग:—आम्ही पारशांचे ग्रंथ वाचले नव्हते व गवानामयनाचा व उषा-सूक्ताच्या नवीन अर्थ लाविला नव्हता.

आमच्या पहिल्या सिध्या व साध्या शोधांच्या इमारतीची उभारणी एवढीच झाली व तीमध्यें कालगत्या कांहीं दुरुस्ती करण्याचें कारण अजून उत्पन्न झालें नाहीं.

लोकमान्य टिळकांच्या जमेस शोध:–( १ ) रा. कुठयांप्रमाणें व नंतर रा. टिळकांनीं पारशांचे धर्म ग्रंथ वाचून असें सिद्ध केलें कीं वैदिक व अवैस्तिक लोक मूळचे एक होते व त्यांची मूळ वसाहत उत्तरध्रुवावरील आर्यावर्तांत किंवा ऐर्यनवैजोंत होती. तेथें ते भांडून विभक्त झाले !

( २ ) या त्यांच्या एकीबद्दल व बेकीबद्दल व त्यांच्या मूळच्या उत्तर-ध्रुवाकडील आर्यावर्तांतील व ऐर्यनवैजोंतील वस्तीबद्दल ह्या दोन्ही लोकांचे वेदा-दिक सारस्वत व झेन्दावेस्तादिक सारस्वत जें आहे त्यांतील गवामयन, उषासूक्तें, जलप्रलयार्थ नौका वगैरे व ऐर्यनवैजो, एशियेंतील सोळा वसतिस्थानें, प्रालेय-प्रलयार्थ यिमाचा वर वगैरे शतशः वचनांच्या प्रमाणांनीं त्या प्रतिपादनाचा परि-पोष उत्तम प्रकारचा केला आहे; व त्यास ज्योतिषशास्त्राधारें कृतिकादी नक्षत्रांच्या स्थिती वरून कालगणननेचा जोड दुधांत साखर घालण्यासारखा गोड दिला आहे.

व्यंग.—आमची वरील श्रौतभूमीची इमारत रा. टिळक यांनीं जी खालीं हिंदुस्थानांत कळस व उत्तरध्रुवाकडे पाया करून ठेविली, ती त्यांनीं भीत भीतच ठेविली ! हें त्यांचें कृत्य सर्वसंमत झालें नाहीं ! ह्याचें प्रत्यंतर श्रीयुत अविनाश-चंद्र दास यांचे वेदिक इंडियांतील वरील अवतरणें व नामदार नरसिंह चिंतामण केळकर यांचें लोकमान्य टिळक यांचें चरित्र यांतील मागें घेतलेलीं अवतरणें ह्यांत पाहावयास सांपडेल.

प्रो. आठवले यांच्या जमेस शोध:—(१) आमच्या श्रौतभूमीच्या इमार-तीचा कळस ८६° १/२ अक्षांशावर जाऊन पोहोचला होता हें त्यांनीं गणिताधारें व चतुर्विंशादी संज्ञा यांच्या अर्थाधारें बिनचूक सिद्ध केलें आहे.

श्रीयुत नानासाहेब पावगी यांच्या जमेस शोध—(१) लोकमान्य टिळकांची प्रमाणें वैदिक व अवैस्तिक सारस्वतांत तपासून व त्यांत अनेक नवीन देशी व विदेशी ग्रंथांतील शतशः प्रमाणांची भर घालून लोकमान्यांनीं श्रौत-भूमीची इमारत जी ' आधीं कळस मग पायारे ' अशी कापत कापत उलटी करून ठेविली होती, ती नानासाहेबांनीं शतपथ ब्राम्हणांतील उत्तरगिरी आदिक अनेक प्रमाणांधारें व भूगर्भशास्त्राधारें छातीठोकपणानें सुलटी करून ठेविली. म्हणजे त्यांनीं हिंदुस्थान व त्यांत विंध्यापासून हिमालयापर्यंत आर्यावर्त अथवा उत्तर हिंदुस्थान हें आमचें मूलस्थान व उत्तरध्रुवापर्यंत आमचीं जनस्थानें म्हणजे हीं आमचीं वसाहतस्थानें ठरविलीं.

[ २ ] यांतील शतपथ ब्राम्हणांतील उत्तरगिरीपासून सरस्वतीकांठीं आलेल्या आर्यांच्या सप्तसिंधूंच्या प्रदेशांतील सदानीरा नामक नदीपर्यंत सिद्धाग्नी समवेत पुनरावर्तनाचें चित्र प्रलयानंतर माजलेल्या दलदलींतील जंगलामध्यें अडकून अडकून चिकाटीनें मूळांत जसें अपेक्षित आहे तसेंच त्यांनीं सप्रमाण उत्तम काढिलें आहे !

व्यंग.—मनुष्यांची मूळ उत्पत्ती नर्मदा व गोदावरी व लवणाद्री व शिवालिक पहाड यांमध्यें होऊन विंध्याद्रीपलीकडील गोंडवनावरील जुन्या आर्यावर्तांत त्यांचा प्रसार झाला व नंतर त्यांची संख्या अती वाढून तीं माणसें हळू हळू तेथील वसंतकाळच्या उत्तरेकडील संक्रमणाप्रमाणें पायरी पायरीनें तृतीय युगांत उत्तर-ध्रुवापर्यंत जाऊन ठेपलीं. पण तृतीय व चतुर्थ युगांच्या संधिकाळांत उत्तराद्री ऊर्फ हिमालय याचा संभव व प्रालेयप्रलय एका कालीं झाले आहेत, व मत्स्य-पुराण व २ भागवत पुराण यांत वैवस्वत मनू हा द्रवीड सत्यव्रत राजा होता असें दिलें आहे व शतपथ ब्राह्मणांत तो उत्तरेकडून किंवा दक्षिणेकडून आला होता हें दिलेलें नाहीं व विंध्य व भूमध्यसमुद्रांतून नवीन वर आलेला गगनचुंबित हिमालय यांमध्यें हिमनद्यांबरोबर दगड, धोंडे, गदळ व पाणी यांचा महापूर आला होता तर विवस्वान मनूच आपल्या अनुयायांसह गलबतांत बसून दक्षिणेकडून त्या उत्तर-गिरीच्या नौबंधन शिखरापर्यंत पाणी चढलें तसा चढला असला पाहिजे व पाणी खालीं उतरलें तसा तो गलबताबरोबर खालीं उतरला पाहिजे व त्यानें ब्रम्हवर्ता-पासून पुन्हां आर्यांची वसाहत सरस्वती आदिक सप्तसिंधूपासून सदानीरानदीच्या पलीकडील दलदलींत नेऊन पोहोचविली असली पाहिजे व सर्व स्थिरस्थावर झाल्यावर त्यांतील शत. ब्राम्हण लेखकास लिहिलेल्या शतपथ ब्राम्हणांत त्या नवीन उद्भवलेल्या उत्तरेकडच्या गिरीस एतदुत्तर गिरी ( किंवा हिमालयापली-कडील कुरूना उत्तरकुरू ) असें संबोधणें हें वस्तुस्थितीस धरून स्वाभाविक आहे; कारण नानासाहेबांनीं या दोन पुराणांचा उल्लेख केला नाहीं तरी त्यांत तो मनू कोठला हें स्पष्ट दिलें आहे व ज्या शतपथ ब्राम्हणाचा उल्लेख केला त्यांत तो कोठला हें सांगितलें नाहीं हें आम्ही व कै. वे. शा. गोविंदशास्त्री रावेरकर यांनीं श. ब्रा. तपासून खुद्द पाहिलें. तर हें ओघानेंच ठरलें कीं ह्या आर्यावर्तांत पहिली भरती होण्यास इसम इकडले इकडेच समोर दिसणाऱ्या उत्तरगिरीवरून आले ! ह्यांस पूर्वस्मृतीची जरूरच नव्हती. पण ह्या भरतीनंतर दुसरी टोळी हिंदु कुश-कडून सप्तसिंधूंत घुसली त्यांस पूर्वस्मृती ह्या उत्तरगिरीपेक्षां ह्या सप्तसिंधूंचीच असली पाहिजे; कारण, सप्तसिंधुप्रदेश हा त्यांस तृतीययुगापासून माहित होता, पण तसा त्यांस उत्तरगिरी बिलकुल माहित नव्हता; कारण तो तृतीय व चतुर्थ युगांच्या संधिकालांत जन्मला होता व ते प्रालेयप्रलयाच्या आपत्तीमुळें उत्तरेकडून दक्षिणेकडे समोर त्रिष्टपांत उतरले तेव्हां त्यांस त्याची माहिती होऊन ते त्यास वळसा घालून वायव्येकडून गदळानें भरलेल्या जुन्या आर्यावर्तांत अथवा ऐर्यैन वैजोंत आपल्या जातभाईस येऊन मिळाले असले पाहिजेत व त्यांनीं त्या गोंड देशाचा गौड देश केला असला पाहिजे.

---

# भाग चौथा.

## मूळ आर्यावर्त अथवा उत्तर हिंदुस्थान.

( पंचगौडदेश )

आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् । तयोरेवान्तरं गिर्य्योरार्यावर्तं विदु-
र्बुधाः-मनू २-२७.

नानावीर्या ओषधीर्या बिभर्ति—अ. १२-२।
यस्यां समुद्र उत सिंधुरापो यस्यामन्नं कृष्टयः संबभुवुः ॥ अ. १२-३
यस्यां पूर्वे पूर्वजना विचक्रिरे यस्यां देवा असुरा नभ्यवर्तयन् ॥ अ. १२-५
गिरयस्ते पर्वतो हिमवन्तोऽरण्यं ते पृथिविस्यो नमस्तु ॥ अ. १२-१०
भूम्यां देवेभ्यो ददति यज्ञं हव्यमरं कृतम् ॥ अ. १२-१-२२
यस्यां गायन्ति नृत्यन्ति भूम्यां मर्त्यांव्येलवाः युध्यन्ते यस्यमाक्रन्दो यस्यां वदति
दुंदुभिः ॥ अ. १२-१-४

तं देवनिर्मितं देशं ब्रम्हावर्तं प्रचक्षते ॥ मनू २-१७
गायन्ति देवाःकिल गीतकानि ॥ धन्यास्तु ते भारतभुमि भागे ॥
स्वर्गापवर्गास्पदमार्गभूते ॥ भवन्ति भूयः पुरुषाः सुरत्वात् ॥
ज्ञानीम नैतत्कवयं विलीने ॥ स्वर्णप्रदे कर्माणि देहबन्धनम् ॥
प्राप्स्याम धन्याः खलु ते मनुष्याः॥ ये भारतेन्द्रिय विप्रहीनाः ॥ विष्णुपुराण,
२३,२४,२६

The widest geographical extent of Vedic India was the country bounded by the snowy mountains in the north, the Indus and the sea in the south and the valley of the Yamuna and Ganges in the east.—India-What can it teach us ?-P. 168, 174-Max Muller.

" The shape of ( the whole ) India is described as an equilateral triangle divided into four smaller equal triangles, the apex of which is Cape Camorin and the base formed by the line of the Himalaya mountains."—The Mahabharata-Bhishmaparva-Modern Revew-April 1923-P. 457.

" The shape corresponds very well with the general form of the country if we extend the limits of India to Gazni on the north-west and fix the other two points of the triangle at Cape Camorin and Sadia in Assam,-Acient Geography of India-P. 5-Cunningham.

The knowoledge of geography is a special index of the activities of a nation. Mr. M. M. Kunthe.

अर्थ.—भूगोलसंबंधी ज्ञान हें एखाद्या राष्ट्राच्या उद्योगधंद्याचें एक विशेष दर्शक असतें.

The nation must be an idea before it can become an actuality.

अर्थ.-राष्ट्र प्रत्यक्ष बनण्यापूर्वी त्याची कल्पना तयार झाली पाहिजे.

Love stops not for questions of birth, Nor the hungry man for stale food.

अर्थ.-राष्ट्रप्रेम उत्पन्न झाल्यास जातिपातीकडे कोणी पहात नाहीं, ते एक होतात. भाकरी शिळ्या आहेत म्हणून खरी भूक लागलेला मनुष्य त्या खावयास सोडितो काय ?

मागील भागांत उत्तर व दक्षिण आर्यावर्तांचा भेदाभेद दाखविला. आतां या भागांत त्यांतील मूळ वसाहत जें हिंदुस्थान अथवा दक्षिण आर्यावर्त याचें विवरण कर्तव्य आहे. कारण उत्तर आर्यावर्त अथवा सुमेरुखंड याची जेवढी माहिती जलप्रलयानंतर अवशिष्ट राहिली आहे तेवढी सर्व मागील भागांतच उरकण्यांत आली आहे.

राष्ट्रपणा—( आपलेपणा, आत्मप्रेम ).-आपले मनुस्मृतिकाराचें असें म्हणणें आहे कीं, आपलें दक्षिण आर्यावर्त अथवा हिंदुस्थान हें विंध्य व हिमालय, व पूर्व व पश्चिमसमुद्र यांच्यामध्यें आहे. अथर्ववेदाप्रमाणें ह्यांतील लोक शूर, धार्मिक, धाडसी, व्यवहारी, व्यापारी, शास्त्रज्ञ, कलाभिज्ञ, सद्गुणी व महानुभाव, आहेत व ह्यांत अनेक ओषधी वनस्पति व वृक्ष आहेत. ह्या भूमीस समुद्राचा वेढा आहे. ह्यांतून सिंधूसारख्या नद्या वाहत असल्यामुळें हा देश सुपीक झालेला आहे. ह्यांत धान्य विपुल उत्पन्न होतें. ह्यांत आपले वाडवडील पूर्वज राहून कामकाज करीत असत. ह्या भूमींतील सुरानीं असुरांना दातीं तृण धरावयास लाविलें. ह्या भूमींत अत्यंत उंच पर्वत व अत्यंत सुंदर अरण्यें आहेत. ह्या भूमींत यज्ञयाग होतात, व नितान्त सुखसमाधान नांदतें. ह्या भूमींत शौर्यशाली व कीर्तिमान, देशाभिमानी व आत्मयज्ञ करणारे, सदाचारी व दयाशील लोक राहतात. हा देश जमिनीवरील स्वर्लोक होय. फार काय सांगावें जननी व जन्मभूमी असें जें आपलें हिंदुस्थान मूर्तिमंत पूर्वोक्त सुमेरुखंडांतील स्वर्गापेक्षांही श्रेष्ठतम होय.

नद्याः-आपल्या ऋग्वेदांत जें नदीसूक्त आहे, तें आमचें पहिलें राष्ट्रगीत होय. त्यांत आपल्या ऋषींनीं मागील सप्तहिंदूंतील अथवा सप्तसिंधु पंजाबांतील मुख्य नद्यांची स्तुतिस्तोत्रें गाऊन आपल्या मायभूमीस सजीवता आणिली आहे. ती अशी कीं त्या मायभूमीची मूर्ती आपले डोळ्यांपुढें उभी राहिल्यावांचून राहत नाहीं. ह्या नद्या आपले पूर्वजांस अन्नपाण्याचा पुरवठा करीत असत. त्या आपल्या उरापोटावरून आपल्या वाडवडिलांच्या मालटालाच्या भरलेल्या होड्या व नावा वागवीत असत. त्या त्यांस ऋतुपरत्वें व स्थानपरत्वें वस्तुपाठांचे प्रत्यक्ष देखावे दाखवून सुसंस्कृत व ज्ञानसंपन्न करीत असत. पुढील अवतरणांतील त्या प्रेमळ स्तुतिस्तोत्राचा पाठ म्हणून त्या सृष्ट मायाळू मायभूमीचें

चित्र गोचर होतें कीं नाहीं ? याचा अनुभव आमच्या वाचकांनीं ध्यानयोगानें स्वतः घेऊन पहावा.—

इमं मे गंगे यमुने सरस्वति । शतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या ॥
असिन्कया मरुद्धते वितस्तयार्जीकिये । शृणुह्या सुषोमया ॥

ह्या नदीसूक्ताचें नित्यपठण हें त्या वेळच्या आपल्या हिंदू आर्यांचे राष्ट्राची गोजिरी मूर्ती म्हणजे उत्तरेस बर्फाळ हिमालयपर्वत, पश्चिमेस सिंधू नदी, व सुलैमान पर्वत दक्षिणेस सिंधू अथवा समुद्र, पूर्वेस गंगथडी, व यमुना थडी, एवढ्या मूळ आर्यावर्ताच्या खालवर प्रदेशाचा जिवंत नकाशा दृक्प्रत्ययास आणून व त्यांच्या मनांतील देशाभिमानाच्या भावना तीव्र संवेगाच्या व दृढमूल करून त्यांच्या धर्मास योगशास्त्राप्रमाणें आसन्न करीत असत ! असें होत असतांनाही कोणता सहृदय मनुष्य असें होत नव्हतें असें म्हणेल ? ह्या विंध्य व हिमालय पर्वतांतील वैदिक दक्षिण आर्यावर्ताचें प्रतिबिंब महाभारताच्या कर्णपर्वाच्या चोवेचाळिसाव्या अध्यायांत असें आलें आहे:—

शतद्रुश्च विपाशा च तृतीयेरावती तथा
चंद्रभागा वितस्ता च सिंधुः षष्ठा बाहिर्गिरेः ॥

ह्या दक्षिण आर्यावर्तांतील आर्यांच्या वसाहती हळूहळू पसरत पसरत दक्षिणापथानें सर्व दक्षिणभर पसरल्या तेव्हां वरील नदीसूक्ताचा विकास पुढील पौराणिक प्रार्थनेंत अथवा दुसऱ्या सुधारलेल्या राष्ट्रगीतांत त्या वेळच्या आर्यावर्ताच्या अथवा सगळ्या हिंदुस्थानच्या सरहद्दीप्रमाणें असा झाला:—

गंगे, च यमुने चैव गोदावरि सरस्वति ।
नर्मदे सिंधु कावेरि जलेस्मिन् संनिधिं कुरु ॥

हा पवित्र नद्यांचा धावा लक्षावधी भाविक हिंदुस्थानाच्या व पूजेच्या वेळीं आपल्या ह्या हिंदुस्थानभर आपल्या पाण्याचें शुद्धीकरण करण्याकरितां प्रत्यहीं ह्मणतात. तेव्हां त्यांतील सुज्ञ व मर्मज्ञ पुरुष भवभय विसरून इंद्रियातीत वृत्तीनें आपल्या मायभूमीशीं एका कुटुंबांतील इसमांप्रमाणें समरस होत असत ह्यांत काय संशय आहे.

पर्वतः—ह्या पवित्र नद्यांप्रमाणेंच पवित्र पर्वत हेही धारणा, ध्यान व समाधी यांस लायख असतात. त्यांतलें पुढील सात नगांचें राष्ट्रस्तोत्र नद्यांच्या सूक्ताप्रमाणेंच आपल्या ह्या दक्षिण आर्यावर्तांतील झाडून सर्व भाविक लोकांच्या मनांस एकाकार करून उन्नत प्रेमाचे पाझर फोडण्यासारिखें हृदयंगम आहे.—

महेन्द्रो मलयः सह्यः शक्तिमानृक्षपर्वतः । विंध्यश्चपारिपात्रश्च सप्तैते
कुलपर्वताः ॥ म. भा. भी. प. अ. ९

पुरी—याप्रमाणेंच आपल्या आर्य राष्ट्रांतील प्रत्येक इसमाच्या मनाचा स्वतःपुरता, स्वतःच्या कुटुंबापुरता, स्वतःच्या गांवापुरता, स्वतःच्या प्रांतापुरता व

स्वतःच्या इलाख्यापुरता विचार करण्याचा कोता कल मोडून त्यास झाडून सर्व राष्ट्राच्या हिताहिताचा विचार करण्यास लावणारें पुढील मोक्षदायक पुरी-स्तोत्र अत्यंत चटकदार आहे—

अयोध्या मथुरा माया काशी कान्ची अवन्तिका ॥
पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥

या स्तोत्रांत असें दाखविलें आहे कीं ह्या आपल्या हिंदुस्थानांत सात पवित्र पुऱ्या आहेत, त्या सर्व हिंदुस्थानांत पसरल्या आहेत, व त्यांची यात्रा प्रत्येक मुमुक्षूनें केली पाहिजे.

धामें.—आपल्या शृंगेरीच्या आद्य शंकराचार्यांनीं याप्रमाणेंच यात्रेची चार धामें, शृंगेरी, द्वारका, जगन्नाथ व बदरीकेदार–हीं नेमिलीं आहेत. त्यांची पायीं यात्रा करीत असतां झाडून सर्व हिंदुस्थानच्या रंगारूपाचें सार त्या यात्रेकरूंच्या सहजीं ध्यानीं यावें अशी त्या विधीमध्यें गुप्त योजना आहे.

ज्योतिर्लिंगें:—

सौराष्ट्रे सोमनाथंच, श्रीशैलेमल्लिकार्जुनम् ॥ उज्जयिन्यां तु महाकालं ओंकार ममरेश्वरे ॥ केदारं हिमवत्पृष्ठे डाकिन्यां भीमशंकरम् ॥ वाराणस्यां च विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे ॥ वैश्वनाथं चिताभूमौ नागेशं द्वारकावने ॥ सेतुबन्धे च रामेशं घुष्मेशं च शिवालये (?) ॥ एतानि ज्योतिर्लिंगानि सायंप्रातः पठेन्नरः ॥ सप्तजन्मकृतं पापं स्मरणेन विनश्यति ॥

आम्ही हें स्तोत्र आमच्या दक्षणी लोकांच्या सुप्रभातीं म्हणावयाच्या वहिवाटीप्रमाणें लिहून टाकिलें. पण तें स्तोत्र प्रत्यक्ष लिहून काढीत असतां तें सकाळ संध्याकाळ पठल्यास त्या ज्योतिर्लिंगाच्या स्मरणानें त्या पाठकाच्या सात जन्मांतील पापें विनाश पावतील असें दिलेलें आढळलें. शिवाच्या सहधर्मचारिणी सतीनें आपल्या पित्यानें केलेला अपमान सहन न होऊन दक्षाच्या यज्ञाच्या भडाडणाऱ्या दोन कुण्डांत अकस्मात उडी टाकिली तेव्हां तिच्या शरिराचे तुकडे होऊन उडाले. ते आपल्या ह्या मायभूमींत बावन ठिकाणीं जाऊन पडले. त्या ठिकाणीं आपल्या हिंदूंच्या यात्रेचीं क्षेत्रें आहेत. त्यांपैकीं दोन क्षेत्रें आपले महाराष्ट्रीय लोकांच्या परिचयाचीं पुढील दोन ठिकाणीं आहेत. तिचा डावा हात काशींत पडला. तें स्थळ अन्नपूर्णा म्हणजे अन्नदात्या देवीचें म्हणून प्रसिद्ध आहे, व तिची जिभ पंजाबांत कांगा येथें पडली, तेथें ज्वालामुखी म्हणजे जमिनीखालील ज्वाळांच्या रूपाच्या जिभांनीं चटाचट खाणाऱ्या देवीचें म्हणून सुप्रसिद्ध आहे.

यात्राजत्रा.—पूर्वी गंगेचीं ६०० मुखें होतीं. तेथून आमचे यात्रेकरू कलिंगांतील वैतरणी[1] नदीपलीकडे जात असत. तेथें महेन्द्रपर्वत आहे. त्यावर जामदग्न्य अथवा परशुराम रहात असे. ( एपिक इंडिया, पा. २९८ ) नारद तीर्थयात्रेला अर्बुदला ( अबुला ) गेला होता [ सदर पा. २९९ ] अशा प्रकारें आमच्या या

---

1 हिची तुलना पूर्वोक्त अमेरिकेंतील वेतरणा नदीशीं करा.

देशांत मातृपितृभूमींची आठवण सकाळ संध्याकाळ प्रत्येकानें म्हणावयाच्या नामस्मरणानें व हंगामी यात्राजत्रा करून आपल्या भारतराष्ट्राच्या मूर्तीची अनन्य भक्तीची ज्योत जागती ठेवण्याची अमोघ योजना आपल्या दूरदर्शी पूर्वजांनीं जशी करून ठेविली आहे तशी ती इतरत्र कोठेंही त्रैलोक्यांत आढळत नाहीं. ती इतकी कार्यक्षम आहे कीं, आमचे लोक स्वयंस्फूर्तीनें आपल्या ज्ञानदेव प्रस्थापित आषाढी कार्तिकीच्या वाऱ्या करणाऱ्या पंढरीच्या वारकऱ्यांप्रमाणें आसेतुहिमाचलापर्यंत प्राचीन काळापासून अखंड यात्राजत्रा करीत राहिले आहेत! त्यांत ते आपलें तन, मन व धन यांच्या व्ययाची बिलकुल पर्वा करीत नाहींत ! असे ते हें काम–आत्मनिरपेक्ष–पाहिजे ती झीज सोसून करितात ! पण हें आमचें निरर्थक वेड पाहून अर्वाचिन अर्थलोलुप जडवाद्यांस मोठा अचंबा वाटतो !

---

२ ही योजना हल्लींच्या मनूंत पुढील कारणांनीं निरुपयोगी होऊं पहात आहे: ( १ ) अज्ञान, ( २ ) आगंतुक पीडा व ( ३ ) मतिभ्रामक शिक्षण.

( १ ) **अज्ञान**—ज्या उद्देशानें पवित्र स्थळांचें नामस्मरण व त्यांच्या यात्राजत्रा प्रथमारंभीं चालू करण्यांत आल्या, त्याची जाणीव सध्याच्या लोकांस बिलकुल राहिली नाहीं. तो उद्देश कोणता ? त्या नामस्मरणानें व त्या यात्राजत्रांनीं तीं करणारांस आपल्या भारत भूमीची अथवा हिंदुस्थानाचीं अथवा मायभूमीची पक्की माहिती व्हावी, त्यांचा अरबटपणा दूर व्हावा, त्यांचें भौगोलिक वगैरे ज्ञान वाढावें, त्यांचा आपसांतील तेढी नाहींशा व्हाव्या, दूरदूच्या लोकांत दळणवळण वाढावें, त्यांचे व्यापारधंदे वाढावे, सगळ्यांस–आपल्या पितृमातृभूमीच्या आठवणीनें–आपण एका हाडामांसाचे आहों, आपण एका भूमींत जन्मलों आहों–आपली सुखदुःखें एका गलबतांतील पॅसेंजर्सप्रमाणें एक आहेत, आपण एकच हवापाण्याच्या सुखसोई अनुभवणारे आहों, आपण एकच देवधर्म पाळणारे आहों, आपण एकच सार्वभौम राजाच्या अमलांत आहों–वगैरे गोष्टींची जाणीव उत्पन्न व्हावी. सारांश, सगळ्यांस आपला देश, जात, पात, रीती, भीती वगैरे आपल्या प्रत्येक गोष्टीचा अभिमान उत्पन्न होऊन त्यांचें मातृभूमीचें व परस्पर बंधुत्वाचें प्रेम वृद्धिंगत व्हावें. पण ह्या उद्देशाची जाणीव सध्या जागरूक राहिली नाहीं.

( २ ) **आगंतुक पीडा**—या यात्राजत्रा चालू केल्यापासून आपल्या पूर्वजांनीं तीर्थयात्रेच्या स्थळीं सच्छील व विद्वान ब्राह्मण पाहून त्यांस आपले तीर्थोपाध्ये केलें. कारण त्यांत त्यांचा धर्म व व्यवहार साधत होता. तो असा कीं विद्वान ब्राह्मणांस आश्रय दिल्याचें पुण्य त्यांना पदरीं पाडतां येत असे, व त्यांच्या घरीं यात्रेकरूंच्या अन्नाच्छादनाची सोय होत असे. त्या उपाध्यांची त्यांचा शिष्य म्हणविणाऱ्या यात्रेकरूंस कोणत्याही प्रकारची पीडा होत नसे. कारण ते उपाध्याय यदृच्छालाभसंतुष्ट असत, किंबहुना, ते आत्मसंतुष्ट असत. पण त्या तीर्थोपाध्यायांचे पुढील वंशज ह्याचा अगदीं उलट होत चालले व ते अक्षरशत्रू व दुर्जन होत चालले ! तशी त्यांच्या शिष्यांनीं त्यांस टाकून

याप्रमाणें यात्रांची संस्था ही भारतवर्षांतील लोकांस भूगोलसंबंधी ज्ञान वाढविण्यास कारणीभूत होते. ती अशी कीं तें ज्ञान त्यांस हें राष्ट्र निरनिराळे लोकरूप निर्जीव विंध्याचें आहे असें यापुढें वाटूं देत नाहीं. तर त्यांत नखशिखांत जीवात्मा घमघमत आहे अशा निरनिराळ्या सजीव अवयवांच्या बनलेल्या राष्ट्रपुरुषाचें तें शरीर आहे अशी त्यांची खात्री करून टाकितें. यात्रा करणें हें कर्तव्य आबालवृद्धांच्या मागें लाविल्यामुळें ह्या राष्ट्रांतील लोक आगगाड्या व आगबोटी ह्यांच्या सोई होण्यापूर्वींपासून पायीं यात्राजत्रा करणारे आहेत, व तेणेंकरून हल्लींच्या मोटरी व फ्लाइंग मशिन्स यांच्या योगानें उडत उडत पृथ्वीस हां हां म्हणतां प्रदक्षिणा घालणाऱ्या लोकांपेक्षां त्यांस या राष्ट्रांतील लोक व चोहोंकडचीं स्थळें याची खडानखडा माहिती असते. अशी ही यात्राजत्रा करण्याची संस्था अगदीं देशी व गांवठी आहे. तिच्या योगानें जागोजागचे लोक लांब लांब स्थळीं फिरत राहतात, व त्यांत परस्पर हृद्गत कळण्यासारखें व तेणेंकरून ऐक्य होण्यासारिखें दळणवळण चालू राहतें व त्यांस भाग व पोटभाग यांच्या सविस्तर ज्ञानावरून त्या पदार्थाच्या सर्व भागांचें पुरें ज्ञान होतें. आपली मातृपितृभूमी मोठी अफाट आहे. पण त्याच्या सगळ्या भागाच्या ज्ञानास आपलें प्रांतिक किंवा

---

दुसरे तीर्थोपाध्ये करण्याची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हां त्यांच्या उपाध्यांनीं त्यांस धोंबाळून केवळ मारवाडी व गुजराथी वाण्याच्या व्यवहारासारिखीं आमचे वंशज तुह्मांसच पुजतील अशा अर्थास पोषक शिव्या श्रापांनीं बांधिलेलीं खातीं त्यांच्या स्वदस्तुरचीं आपल्या चोपडींत लिहून घेणें चालविलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं त्यांचे वंशज ह्या भटांचे व त्यांच्या दरम्यान असलेले क्षौर करणारे न्हाव्याचे आपले हात बांधून घेतलेले दासानुदास बनले, तसा ह्या भटन्हाव्यांच्या लोभास पारावार राहिला नाहीं ! तो असा कीं यात्रेला येणें म्हणजे सर्वस्वाला मुकणें—यापरतें कांहीं नाहीं अशी लोकाची सार्वत्रिक समजुत होत चालली आहे ! अशा प्रकारें ह्या न्हाव्याभटांच्या आगींत आपल्या झाडून सर्व जुन्या चालीच्या यात्राजत्रांबद्दल असलेली लोकांची हौस जळून जात चालली आहे ! म्हणून चाणाक्ष पण कोणास न दुखविण्याच्या व्रताच्या आपले तुकाराम बुवांचे तोंडून ॥ आली सिंहस्थ पर्वणी ॥ न्हाव्याभटां झाली धणी ॥ असे सहजोद्गार निघाले आहेत व त्यास सारासार विचार लोकांची साक्षरता भर घालीत आहे! आम्हांस हरद्वाच्या यात्रेंत असे काळेकभिन्न अक्षरशत्रू पंडये भेटले होते. त्यांचें नांव विचारतां त्यांनीं तें कुंभकर्ण असें सांगितलें. त्याबरोबर आम्हांस ते नकोसे वाटले. पण त्यांनी आमची पिच्छा शेवट पर्यंत सोडिली नाहीं ते असे लोचट होते कीं माझे निषेधास न जुमानतां ते माझें ओझें उचलून न्यावयास श्रीशंकराचार्यांचे मठापर्यंत लागले ! व तेथील दक्षणी मनुष्याशीं भागीचे खलबत करून गेले ! नाहीं तर ते त्यास मारतील असें ते दक्षणी गृहस्थ तपासाअंतीं म्हणाले !

( ३ ) **मतिभ्रामक शिक्षण**—ह्यांत काय आहे ? त्यांत काय आहे ? हें पाहाण्याच्या हल्लींच्या सार्वत्रिक चौकस शिक्षणानें वरील तुकाराम बुवांच्या खऱ्या

इलाख्याचें ज्ञान आड येत नाहीं. आपल्या मायभूमीचें ज्ञान मिळविण्यास पायीं यात्राजत्रा करण्यांत जीं दुःखें भोगावीं लागतात, त्यांची जाणीव आड येत नाहीं. लहान लहान टप्यावरील पवित्र स्थळीं मुक्काम करीत जाण्याच्या वहिवाटीनें यात्रेकरूस खांद्यावर पडशी व हातांत पताका घेऊन जुन्या प्रकारें प्रवास करण्याच्या कामांतील जागोजाग येणाऱ्या अडचणी कमी होतात. ह्या फायद्याकरितां आम्हांस पायीं केलेली पंढरीची व चारी धामांची व कुंभादी मेळयांची यात्राजत्रा अत्यंत स्तुत्य व पुण्यकारक वाटते. फार तर काय पण नुक्ती ज्ञानोबाची पालखी पायीं काशीस नेण्याची भक्तिपरायण साखरेबुवांनीं काढिलेली टुम जरी लोकांचा कालापव्यय करणारी आहे तरी ती न्हाव्याभटांच्या हावरेपणाच्या अग्नींत देशाभिमानाचा अंकुर होरपळवणारी होणार नाहीं तर ती राष्ट्रदृष्टीनें पुष्कळ हितावह होईल; कारण आपल्या समाजांतील कांहीं लोक अजून अशा योजनेशिवाय आपला चुलकोंबडेपणा टाकणारे नाहींत, व त्यांस जागें करण्यास एवढाच अचूक उपाय आहे.

अशा प्रकारें प्रचारांत आलेलीं यात्राजत्रांचीं देशाभिमानोत्साहक अगणित स्थानें आपल्या सर्व हिंदुस्थानभर जाळयासारिखीं पसरलीं आहेत. ह्या स्थळांची एक यादी भारताच्या वनपर्वांत आहे. तीं स्थानें आपल्या देशाच्या राष्ट्रीयत्वाची

---

बोलांचा रोखठोक अनुभवापलीकडील मायभूमीचा अमोलिक अभिमान वाढविणारे यात्राजत्रांचें महत्व वनभोजनें व प्लेझरट्रिपस व फिरत्या राष्ट्रीय, सामाजिक, धार्मिक वगैरे सभा यांपेक्षां कमी केलें आहे ! तें इतकें कीं साक्षर म्हणविणारे लोक स्वतः यात्राजत्रा करीत नाहींत व ते वरील आगंतुक पीडा दाखवून इतरांस यात्राजत्रा करण्याच्या प्रवृतीपासून इतरांस निवृत्त करितात.

म्हणून त्या राष्ट्राभिमान उत्पन्न करणाऱ्या यात्राजत्रा तर काय पण तें पूर्वोक्त नामस्मरणही मागें पडत चाललें आहे ! तेणेंकरून आमच्या पंचजनांचें ऐक्य व स्वाभिमान वाढविणाऱ्या अमोघ ज्ञानाचा अंकुर खुरटत चालला आहे ! व आमच्या तेहतीस कोटी लोकांची घनता ढिली पडत चालली आहे ! वाळूच्या किंवा भुस्कटाच्या कणांत जेवढें परस्पर स्नेहाकर्षण असतें तितकेंही आपल्या हिंदूंच्या संघांतील व्यक्तीव्यक्तींमध्यें मिळणें कठीण होत चाललें आहे ! हें ठीक नाहीं. बाकी आमचा स्वाभिमान व स्नेह वर्द्धिंगत करण्याचा इष्टार्थ तडीस नेण्यास आमचीं तीर्थक्षेत्रें ह्या आमच्या मायभूमींतच आहेत-तीं मुसलमान व किरिस्तांव यांच्या तीर्थक्षेत्रांप्रमाणें काळयापाण्यापलीकडे परदेशीं अरबस्थान व पालेस्टाईन यांमध्यें दूरवर्ती नाहींत ! मात्र वरील हक्कदार म्हणविणाऱ्या पण नुसत्या खानावळयांच्या योग्यतेस येऊन पोहोंचलेल्या तीर्थोपाध्यांच्या अक्षरशत्रुत्वाच्या हक्कास आळा घालून त्या मूर्त सृष्टींतून त्या अमूर्त सृष्टिकर्त्याकडे आपल्या मनाची प्रवृत्ती सर्वांगांनीं वाहूं लागेल असें वळण सुज्ञ व मर्मज्ञानीं लावण्याचा अट्टाहास केला पाहिजे ! कारण अशा कृत्यांत आपले ज्ञानेश्वरास पंढरीच्या वारकरी पंथांत अचूक यश मिळालें आहे !

कल्पना लोकप्रिय व दृढमूल करीत राहिलीं आहेत. त्यांतील एक वर्णन त्रैलोक्यांत सदैव फिरणाऱ्या नारदानें व दुसरें धौम्यानें केलेलें आहे. या स्थानांच्या याद्या अनेक सांपडतील. तंत्रचूडामणींत ह्यांची संख्या बावन्न आहे. देवी भागवतांत ती एकशें आठ आहे. ( ७–३० ) ह्या हिंदूंच्या यात्राजत्रांच्या जाळ्याबरोबर बौद्ध व जैन यांनीं आपल्यांतील सिद्ध पुरुषांचीं जीं स्मारकें उभारलीं व जीं त्या धर्मांचा सगळा किंवा अंशतः जोम मोडल्यावर हिंदूधर्मांत अंतर्भूत झालीं त्यांची नोंद येथें करणें जरूर होतें. पण तें आम्हांस आमच्या पुढील बौद्ध व जैन खंडांकरितां शिलकेंत ठेवणें भाग आहे.

आधारः—आपल्या मायभूमीचा प्रदेश जरी रशियाशिवायकरून सगळ्या युरोपखंडाएवढा अफाट आहे तरी त्याच्या सगळ्या भागाचें ज्ञान व त्याच्या विशेष ऐक्याचें ज्ञान आपल्या लोकांस फार प्राचीन काळापासून झालें होतें व तें वरच्या प्रकारें झालें होतें असें म्हणावयाचें तर ती पुष्कळ कालावधीची गोष्ट असली पाहिजे व त्याप्रमाणें ह्या देशाच्या भूभागाच्या ज्ञानाची उत्क्रांती उत्तर हिंदुस्थानांतून दक्षिण हिंदुस्थानांत कशी क्रमशः होत गेली हें पाहत जाणें हें मोठें सुरस व चित्ताकर्षक आहे. कारण येथें ती उत्क्रांती अनन्यसाधारण जमातींस धरून झाली आहे हें पूर्वी सांगितलें आहेः—

( १ ) वैदिक काळः—( इ. स. पूर्वी सुमारें १०,०००–८,००० वर्षें )–स्थळ उत्तर हिंदुस्थान–काबूलपासून गंगेपर्यंत व विंध्य व हिमालयपर्यंत पसरलेल्या पूर्वोक्त दाशराज्ञ सुदासाच्या दक्षिण आर्यावर्तास एक राष्ट्रीयत्व प्राप्त झालें. ह्यांत वैदिक सारस्वताप्रमाणें नऊ पर्वत, व एकुणतीस नद्या व सदुसष्ट जमाती अथवा पंचजन होते असें ठरलें आहे. त्याचा तपशील कांहीं मागें व कांहीं पुढें वर्णनाच्या सोईस योग्य स्थळ पाहून दिला आहेः—

पर्वतः—१ क्रौंच हें नांव अर्वाचीन वैदिक सारस्वतांत आढळतें–तैतिरीय आरण्यक ( १–३२–२ )

२ त्रिककुदः—तीन शिखरांच्या या पर्वताचा उल्लेख अथर्ववेदांत आला आहे. ( अ. ४–९–८ ) व शथपथ ब्राह्मण ( ३१-३-१२ ) ह्याचें दुसरें नांव त्रिककुभ.

नांव प्रभ्रंशनः—जलप्रलयाचा पूर उतरल्यावर मनूचें गलबत एका उत्तरेकडील मनोवसर्पण नामक पर्वतावर उतरलें. त्या पर्वताचें हें दुसरें नांव आहे असें कांहीं पण्डितांचें मत आहे, कारण ह्या शब्दाचा अर्थ गलबताचें घसरत जाणें असा आहे. [अ. १९-३९-८] पण हा अर्थ इतरांस मान्य नाहीं.

४ पारियात्र —हें विंध्य पर्वताच्या एका भागाचें नांव. हा पर्वत माळव्यामध्यें आहे. ह्याच्या उत्तरेस मध्यदेश होता.

५ मनोरवसर्पण.–जलप्रलयाचा पूर उतारल्यावर मनूचें गलबत ज्या पर्वतावर लागलें त्या पर्वताचें हें नांव होतें–असें शतपथ ब्राम्हणांत दिलें आहे. [ १-८-

१-८ ह्या पर्वताचा उल्लेख रामायण व महाभारत ह्या वीररस प्रधान काव्यांत नौबंधन या नांवानें केला आहे. अथर्ववेदांत नावभ्रंशन नांवाच्या पर्वताचा निर्देश आहे. तो ह्याच पर्वत असावा असें कांहीं पंडितांचें मत होतें, पण तें हल्लीं त्याज्य ठरलें आहे.

६ महामेरू.—ह्यास मोठा मेरू म्हटलें आहे, त्या अर्थीं लघुमेरू कोठें तरी दुसरा आहे ही समजून त्यावेळीं होती तर तींत उत्तरध्रुव अभिप्रेत असला पाहिजे व हें असें असेल तर ह्या उत्तर ध्रुवापेक्षां हा महामेरू किंवा सुमेरू हरप्रकारें महत्वाचा आहे हें सिद्ध होय. ह्याचा उल्लेख तैतिरीय अरण्यकांत आला आहे. [ १-७,१-३ ]

७ मुजवंत.—हें एका पर्वताचें व त्याजवर राहणाऱ्या लोकांचें नांव आहे. या पर्वताचें दुसरें नांव यास्काप्रमाणें मुंजवत असें आहे. महाभारतांत [ १०·७८५; २४·१८० ] हें हिमालयांतील एका ओळीचें नांव म्हणून प्रत्यक्ष दिलें आहे. हें लोकांचें नांव आहे असा अर्थ घ्यावा तेव्हां अथर्ववेद [ ५-२२,५,७ ८-१४ ] व बौद्धायन श्रौतसूत्र [ २-५ ] प्रमाणें त्यांबरोबर महावृष, गांधार, व बल्हिक लोकांचा उल्लेख आहे. ते फार दूर रहात होते व त्यांकडे ज्वरानें जावें अशी त्यांतील मंत्रांत प्रार्थना आहे. यजुर्वेद संहितेप्रमाणें [ तै. स. १-८,६,२; काठक सं. ९·७;२६-१४; मैत्रायणी सं. १-४,१०-२०; वाज. सं. ३-६१; शत. ब्रा. २-६,२,१७ ]. मूजवंत हें दूरच्या एका लोकांचें नांव आहे. त्यांच्या पलीकडे आपलें धनुष्य घेऊन जाण्यास रुद्रास प्रार्थना केलेली आहे. ऋग्वेदांत सोमास मौजवत म्हणजे मूजवत पर्वतापासून येणारा असें म्हटलें आहे. या अर्थास आधार यास्काचा आहे.

८ मैनाक.—ह्याचा अर्थ मेनकेचा वंशज असा आहे. तैतिरीय अरण्यक [ १-११-२ ] प्रमाणें हें हिमालयांतील एका पर्वताचें नांव आहे. ह्याचें पाठांतर कोठें मैनाग असें आढळतें.

९ हिमवंत.—ह्या शब्दाचा अर्थ बर्फाळ असा आहे. अथर्ववेद (२२·१-११) प्रमाणें हें एका पर्वताचें नांव आहे. अथर्ववेदांत [ ६-९५·३ ] ( ५ ४-२-८ ) [ २५·७ ], ( ६·२४-१ ) ( ह्यांत हिमालयांतील नद्यांचा उल्लेख आहे; १९·३९ १ ) व ऋग्वेदांत [ १० १२-४ ] व पुढील ग्रंथांत [ तै. सं. ५-५-११-१; वाज. सं. २४-३०; २५-१२; ऐ. ब्रा. ८-१४·३ ] [ ह्या पलीकडे उत्तर कुरू व उत्तर मद्र आहेत असें दिलें आहे ]. याचा नामासारिखा उपयोग केलेला आहे. ह्या वाक्यांत सहरहू शब्दाचा उपयोग हल्लीं हिमालय नांवानें ओळखल्या जाणाऱ्या पर्वतासच उद्देशून केला आहे असें दिसतें. त्यांत अंतर्भाव सुलेमान पर्वताचाही होण्याचा संभव आहे. मूजवंत त्रिक्कद किंवा त्रिक्कुभा पहा.

नद्या १ अमितमा.—ऋग्वेदाप्रमाणें [ ५-५३-९ ] हें एका नदीचें नांव आहे [ मेक्स म्यूलर. ]

२ आर्जीकीया,—हें सिंधू किंवा वितस्ता [ झेलम ] नदीचें नांव

असावें असें एक पण्डित म्हणतो, व तें विपाशा [वियास] नदीचें नांव असावें असें दुसरा पण्डित म्हणतो, व तें अर्धनव नदीची पोटनदी जी अर्धेसन हिचें नांव असावें असें तिसरा पण्डित म्हणतो.

३ ऊर्णावती.—ह्या शब्दाचा अर्थ पुष्कळ मेंढ्यांची असा आहे. हें सिंधू नदीचें नांव आहे. असें एका पण्डिताचें मत आहे. हें नांव ऋग्वेदांत [ १०-७५-८ ] आलें आहे.

४ क्रुमू.—हें ऋग्वेदांत [५ ५३-९; १०-७६ ६] ह्या दोन ठिकाणीं नदीचें नांव म्हणून आलें आहे. हें सिंधू नदीच्या पश्चिमेस एका तिच्या पोटनदीचें नांव आहे. तीस सध्या कुरूम नदी असें म्हणतात.

५ गंगा.—ह्या नदीचा उल्लेख ऋग्वेदांत (१०-७५-५) नदीस्तुतींमध्यें फक्त एकदां आला आहे. पण उरुकक्षाच्या गांग्य या विशेषणाच्या धातूंत तिचाच संबंध आहे असें दिसतें. ह्या नदीचा नामनिर्देश दुसऱ्या संहितांत आला नाहीं. पण शतपथ ब्राह्मणांत (१३-६,४,११) तो आला आहे. त्यावरून भरताच्या अथवा कुरूच्या अमलाची दूरची मर्यादा निश्चित होते. ऐतरेय ब्राह्मण ८-२३ व वैतान-सूत्र २४-९ यांत आणखी सरस्वती नदीचा उल्लेख आहे. ) भरत दौषंती याचे गंगा व यमुना ह्या दोन्ही नद्यांवरील जयाचा उल्लेख आहे व तैतिरीय आरण्यकांत ( २-२० ) या दोन नद्यांच्या मध्यें राहणाऱ्या लोकांची स्तुती आहे.

६ गोमतीः—ह्या नदीचा उल्लेख ऋग्वेदाच्या दहाव्या मण्डळांत नदीस्तुतींत [ १०-७५-६ ] आला आहे. या सूक्तांतील संदर्भावरून ही सिंधूस मिळणारी नदी असावी असें दिसतें. हिचें हल्लींचें नांव गोमल असें आहे—ह्यांत संशय नाहीं. ह्या नदीचा निर्देश वेदाच्या आणखी एक दोन वचनांत आला आहे. वैदिक सुधारणेचें केन्द्र जें कुरुक्षेत्र यांत ती आहे.

७ तृष्टामाः—ह्या नदीचा निर्देश ऋग्वेदांतील नदीस्तुतींत [ १०-७५-६ ] करण्यांत आला आहे. ही ओळखून काढण्यास कांहीं साधन नाहीं.

८ परुष्णीः—हिचा उल्लेख पुढील ठिकाणीं आहे.–(१) ऋग्वेदांतील नदी स्तुतींत [ १०-७५-९ ] व [२] सुदासाच्या दहा राजांवरील जयाच्या स्तुतिपर कवनांत [ ८-१८-८-९ ]. या लढ्यांत सुदासाचे शत्रू हे–ही नदी वळवून नेण्यास पाहत होते. पण त्यांत त्यांस अपयश आलें; एवढेंच नाहीं तर ते तिच्या पुरांत बुडालेही. तेणेंकरून सुदासाच्या जयाची कमाल झाली. ह्या वचनांत व ऋग्वे-दाच्या आठव्या मण्डळांत [ ८-७४-१५ ] तीस महानदी म्हणून संबोधिलें आहे. यास्क आपले निरुक्तांत [ ९-२६ ] तीस रवी ऊर्फ इरावती म्हणतो. ऋ. ४-२२-२ व ५-५२-९ यांत ह्याच नदीचा व तिच्या कांठच्या पोसणाऱ्या ऊर्णा म्हणजे लोकर पुरविणाऱ्या मेंढ्यांच्या कळपांचा ध्वन्यर्थ आहे असें एक पण्डित म्हणतो.

९ मरुवृधाः—ह्या नदीचें ऋग्वेदांत नदीस्तुतींत [ १०-७५-५ ] असिक्नी [ अकेशिनी–शेवाळ नाहीं अशी ] व वितस्तता ह्या नद्यांबरोबर आलें आहे. ह्या शद्वाचा अर्थ पावसाच्या वाऱ्यांनीं फुगून तुडुंब होणारी असा आहे. ह्या नदीची ओळख कोणत्याही पण्डितास नीट करितां आली नाहीं.

१० मेहत्नूः—ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत नदीस्तुतींत [ १०-७५-६ ] आलें आहे. ती क्रुमू ( कुरुम ) व गोमती [ गोमल ] वर मिळणारी सिंधूची एक पोट नदी दिसते. ही क्रुमूचीही पोट नदी असण्याचा संभव आहे.

११ यमुनाः—म्हणजे जुळी. ही नदी गंगा नदीस समान्तर वाहते. हिचें नांव ऋग्वेदांत [ ५-५२-१७७-१८-१९ व १०-७५-५ ] या तीन ठिकाणीं व पुढील सारस्वतांत अनेक ठिकाणीं आलें आहे. ऋग्वेदाप्रमाणें [ ७-१८-१९ ] तृत्सू व सुदास यांनीं या नदीवर आपल्या शत्रूंवर जय मिळविले. तृत्सूचें राज्य यमुना व सरस्वती या दोन नद्यांमध्यें पूर्वपश्चिम होतें. अथर्ववेदांत (४-९-१०) यमुनाथडीचा दास आंजन व त्रिककुद हीं नांवें महत्वाचीं आहेत. ऐतरेय [ ८-२३ ] व शतपथ ब्राह्मण ( १३-५-४-११ ) यांत भरतांचा यमुनेवर जय झाल्याचें दिलें आहे. पंचविंश ब्राह्मण ( ९४ ११;२५-१०-२४;१३-४; ) श्रौत सूत्र [ १३-२९,२५-३३ ]; कात्यायन श्रौत सूत्र [ २४-६,१०-३९ ]; लाट्यायन श्रौत सूत्र [ १०-१९,९-१० ]; आश्वलायन श्रौतसूत्र [ २२-६,२८ ) ह्यांत ह्या नदीचें नांव आलें आहे. मंत्रपाठ [ ११-११,१२ ] यांत या नदीच्या कांठीं साल्व राहतात असें दिलें आहे. [ वाडियाच्या–जिऑलजी ऑफ इंडिया–यांत सरस्वती अंतर्धान पावून यमुना जोरावली असें दिलें आहे ].

१२ यव्यावतीः—ह्या नदीचें नांव ऋग्वेद ( ६-२७,६ ) व पंचविंश ब्राह्मण [ २५-७-२ ] यांत आलें आहे. पण त्या नदीची ओळख पटत नाहीं.

१३ रसाः—ह्या नदीचा उल्लेख ऋग्वेदांत(१-११२-१२;५-५३ ९;११-७५-६) या तीन वाक्यांत सुस्पष्ट आहे. वैदिक प्रदेशाच्या अथवा आर्यावर्ताच्या अगदीं वायव्य भागीं असलेल्या एका नदीचें हें नांव आहे. दुसऱ्या ठिकाणीं ( जैमिनी ब्राम्हण. २-३४८;१२१-४) पृथ्वीच्या शेवटीं असलेल्या व वातावरणाचा अंतर्भाव करणाऱ्या एका गूढ प्रवाहाचें नांव आहे. हें मानणें सयुक्तिक दिसतें कीं हें सरस्वती नदीप्रमाणें मूळांत खऱ्याखुऱ्या नदीचें नांव होतें. ते अरक्षी किंवा यक्षार्त्ती नदीचें नांव असावें; कारण वेन्दीदादमध्यें ह्या नदीस रंहा असें म्हटलें आहे. व रंहा हे रसा शब्दाचें झेंदावेस्तांतील रूप होय. रसा ह्या शब्दाचा मूळ अर्थ पाण्याचा खुषबो असा होतो म्हणून तो सरस्वतीसारख्या कोणत्याही नदीस लावितां येईल.

१४ रेवा.—हें नर्मदा नदीचें नांव होय. हें नांव रेवोत्तर या शब्दांत शत. ब्रा. ( १२-८,१,१७;९-३,१ ) यांत आलें आहे. हें एका मनुष्याचें नांव आहे. ( वाडियाची जिऑलजी ऑफ इंडियाप्रमाणें तापी नदी ही नर्मदेची पूर्वी पोट नदी होती. पुढें धरणीकंपाच्या योगानें ती जेथें निराळी राहूं लागली तेथें जवल-

पूर मुक्कामीं मोठा धबधबा उत्पन्न झाला आहे व त्या दोन्हीं नद्या विंध्याशीं समान्तर पडलेल्या स्वाभाविक तळ्यांतून सध्यां पश्चिमेकडे वाहत आहेत. पान १७)

१५ वरणावती.—ह्या नदीचें नांव अथर्ववेदांत (४-७-१) एका वाक्यामध्यें आलें आहे. पण या नदीची ओळख पटत नाहीं.

१६ वितस्ता.—हें पंजाबांतील पांच नद्यांपैकीं अगदीं पश्चिमेच्या नदीचें नांव आहे. ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत नदीस्तुतींतील (१०-७५-५) निरुक्तांत (१०-२५) एकदां आलें आहे. हें नांव क्वचित आलें आहे. म्हणून वैदिक आर्यांचा मुख्य कारभार पंजाबांत चालत नव्हता, तो कोठें इतरत्र चालत होता. टालमीनें ह्या नदीस विडास्पी व शिकंदर बादशहाच्या इतिहासकारांनीं हिला बिहत अथवा विहत असें नांव दिलें आहे. आर्वाचीन भाषेंत हीस वेथ म्हणतात.

१७ विपाशः—ह्या नदीचा नामनिर्देश ऋग्वेदांत दोन ठिकाणीं [३-३३.१ ३;४-१०.११. यास्क निरुक्त ११-४८ ) आला आहे. ही पंजाबांतील सध्यांची बिया होय. हीस ग्रीक लोकांनीं हिकासी, अथवा बियासी ह्मटलें आहे. तिचें महत्व वैदिक आर्यांस फारसें वाटत नव्हतें. म्हणून तिचा उल्लेख ऋग्वेदाच्या दोन सूक्तांशिवाय प्राचीन वैदिक सारस्वतांत कधींही आलेला नाहीं. निरुक्तामध्यें तिचें जुनें नांव उरुंजिरा असें दिलें आहे व गोपथ ब्राह्मणांत तिच्या मध्यभागीं वशिष्ठशिला आहे असें ह्मटलें आहे. पाणिनींत [४.२,७४] तिचें नाव आलें आहे. पण वेदांच्या पुढच्या सारस्वतांत तिचें नांव विपाशा असें आढळतें. हिचा प्रवाह प्राचीन काळापासून बदलला आहे.

१८ विबालीः—हें नांव ऋग्वेदांत एका ठिकाणीं [४-३०,१२] आलें आहे. हें एका अप्रसिद्ध नदीचें नांव आहे.

१९ शिफाः—हें नदीचें नांव ऋग्वेदांतील एका वाक्यामध्यें (१-१०४,३) आलें आहे.

२० शुतुद्रीः—हें नांव ऋग्वेदांत दोनदां ( ३-३३.१;१०-७५,५; निरुक्त ९-२६ ) आलें आहे. हें पंजाबांतील एका अगदीं पूर्वेच्या नदीचें नांव आहे. हिचें हल्लींचें नांव सतलज असें आहे. हीस टालमी व एरियन यांनीं झरद्रुस असें म्हटलें आहे. वेदाच्या पुढील काळांत ह्या नदीच्या नांवाचें रूपान्तर शतद्रु (शंभर शाखांनीं धावणारी ). या नांवांत झालें आहे ऐतिहासिक काळांत तिचा प्रवाह पुष्कळ बदलला आहे. एरियनच्या काळांस सतलज कच्छच्या रणास स्वतंत्रपणें मिळत असे.

२१ श्वेत्याः—ऋग्वेदांतील नदीस्तुतींत ह्या नदीचें नांव एकदां [१०-७५,६] आलें आहे. ही बहुधा सिंधूस मिळणारी नदी असावी.

२२ सदानीराः—( निरंतर पाणी असणारी ) हें एका नदीचें नांव आहे. शतपथ ब्राह्मणाप्रमाणें (१-४;१,१४) ही नदी कोसल व विदेह या दोन देशांच्या सीमेवर होती. ही नदी करतोया होय. असें कांही पण्डित म्हणतात, पण ती गण्डकी होय असें दुसरे पण्डित म्हणतात.

२३ सरयू.—ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत तीनदां आलें आहे. तुर्वश व यदू यांनीं या नदीपलीकडे जाऊन चित्ररथ व कर्ण यांचा पराभव केला [४-३०,१८] शरयूचा उल्लेख एका ठिकाणीं सरस्वती व सिंधूबरोबर [१०.६४.९] व दुसऱ्या ठिकाणीं रसा, अनितमा व कुंभा यांबरोबर [५.५३,९] करण्यांत आला आहे. वेदापुढील काळांत हें नांव अयोध्येंतील एका नदीस आहे—असें आढळतें. बहरामघाटाखालीं गोग्रेला सरजू हें नांव आहे. छोट्या गोग्रेस उजव्या बाजूस एक शाखा फुटते. ती गोग्रेच्या जुन्या पात्रांतून वहाते व बलियाच्या पुढें गंगेस मिळते. तिला छोटी सरजू असें म्हणतात [इंपेरियल ग्याझिटीअर ऑफ इंडिया, २२-१०९; १२-३०२ गोग्रा] वैदिक वाक्यांत दिलेली ही नदी नव्हे. ही पश्चिमेस कोठें तरी असली पाहिजे. कारण त्यांत पश्चिमेकडील व ईशान्येकडील पावसाच्या मोसमांचा उल्लेख आहे.

२४ सरस्वती.—ह्या नदीचें नांव ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आलें आहे. हिचा अर्थ पुष्कळ डबक्यांची असा आहे. हिचें उच्चारसादृश्य इराणांतील हरकैती [म्हणजे अर्वाचीन हेलमण्ड] या नदीच्या नांवाशीं आहे. वेदाच्या पुढील पाठांत [तै. सं. ७.२,१,४; पंच. ब्रा. २५-१०,१; कौ. ब्रा. १२-२,३; शत. ब्रा. १२-२-३; शत. ब्रा. १-४,१,१४, ऐ. ब्रा. २-१९,१२,] ज्या नदीचें नांव आढळतें, ती नदी पतियाळाच्या वाळवंटांत लुप्त होणारी होय. सरस्वती व दृषद्वती मिळून ब्रम्हावर्ताची पश्चिम सीमा झाली होती. दृष्द्वती ही अर्वाचीन ठाणेश्वराच्या पूर्वेची चौटंग असावी. प्राचीन वैदिक हिंदुस्थानांत सरस्वती ही पवित्र नदी होऊन बसलेली आहे. सूत्रकाळांत [कात्यायन श्रौत सूत्र, १२-३, २०; २४-६, २२; लाट्यायन श्रौतसूत्र, १०,१५,१;१८,१३; १९,४; आश्वलायन श्रौतसूत्र, २२,६,२,३; शांखायन श्रौतसूत्र, १३-२९] यांत असें म्हटलें आहे कीं हिच्या कांठीं केलेले यज्ञ फार महत्वाचे व पवित्र होत.

कांहीं पाश्चात्य पण्डित ही नदी सिंधूच असावी असें म्हणतात व त्यास असें कारण देतात कीं वेदांतील सूक्तांत हीस नदीतमा असें म्हटलें आहे व समुद्रास मिळते असें आलें आहे. तिच्या कांठीं अनेक राजे व पंचजन राहत होते असें दिलें आहे. ऋ.८९.३;१६४-१९;२-४१,१६;३०-८;३२-८;३.५४,१३;५-४२ १२;४३-११;४६-२; ६-४९-७; ५०.१२; ५२—६; ७.९,५; १६—६; ३९-५ ४०—३;८.२१-१७;५४—४;१०-१७,७;३०-१२;१३१,५;१८४—२; अ.वे— ४-४,६;५—२३-१;६-३,२:८९—३-७-६८,१;१४ २,१५;२०;१६—४,४;१९ ३२,९; तै. सं १-८,१३,३; वा सं. १९-९३;३४ ११; शत—ब्रा. १-६,२,४ ११-४-३,३; १२-७,१-१२;२.५; बृह. उप. ६-३.८; नदी तमा, ऋ. २-४१ १६; महासागरास मिळणें, ऋ. ६-६१,२,८;७-९६,२; पुष्कळ राजे, ऋ. ८-२१,१८; पंचजन, ऋ-६-६१ १२ पण कांहीं पाश्चात्य पंडित ती हल्लींची सरसुती नदीच असावी असें म्हणतात, व असें कारण दाखवितात कीं ती वैदिक काळांत सलज एवढी मोठी नदी होती, व ती स्वतः मूर्तिमंत किंवा परंपरया

सिंधूला मिळून समुद्राला मिळत असे. पूर्वेकडून पश्चिमेकडे नद्यांची गणना करीत असतां ऋ. ७६.५ त त्या अशा दिल्या आहेत:-गंगा, यमुना, सरस्वती, शतुद्री यांत सरस्वती नदी यमुना व सतलज यांच्यामध्यें म्हणजे सरसुतीच्या हल्लींच्या ठिकाणीं येते. ही नदी ठाणेश्वराच्या पश्चिमेस वहात जाते, व तीस घग्गर नांवाची पश्चिमेकडील नदी पतियाळा संस्थानांत येऊन मिळते व ती सीर्श जवळून जाऊन भटनेरच्या वाळवंटांत गुप्त होते. पण ह्या नदीचें सुकें पात्र ( हक्र अथवा घग्गर ) ह्या स्थळापासून सिंधू नदीपर्यंत हुडकल्यास सांपडते (इ. म. ग्या. ऑफ इंडिया पान २६ ). राव. ब. वैद्य म्हणतात कीं ही नदी द्वारकेजवळ कच्छच्या रणांतून येऊन आरबी समुद्रास मिळत होती ( ए. इं. ३७८ ). पण ऋग्वेदाच्या सहाव्या मण्डळांतील सूक्तें इराणांत रचलीं गेलीं आहेत असें मानण्यास कांहीं जागा आहे. ती बरोबर असेल तर सरस्वती ही अवेस्त्यांतील वेन्दिदादमधली हरहवैती ( हरुत ) असूं शकेल [ सुमेरुखंड अथवा उत्तर आर्यावर्ताच्या कोड्याचा उलगडा पहा ] व असें झालें तर हा सरस्वतीचा सर्वच बेतबात बदलेल. [ शिवाय हें मागें सांगितलेलें आठवत असेलच कीं वाडियाच्या जिऑलजीप्रमाणें ही सरस्वती कमजोर होऊन यमुना नदी जोरावत गेली आहे तर त्या बदललेल्या बेतबातांत आणखीं फेरफार करावा लागेल. ]

२५ सीलमावती:—हें नांव ऋग्वेदांत १०-७५.८ मध्यें एका नदीचें आहे असें एक पाश्चात्य पण्डित म्हणतो. सायनाचार्य याचा अर्थ आंबाडी-पूर्ण असा करितात.

२६ सुदामन:—पंचविंश ब्राह्मणांत ( २२-१८-१ ) हें एका नदीचें नांव म्हणून आलें आहे.

२७ सुवस्तू:—( चांगल्या घरांची )—हें ऋग्वेदांतील ( ८-१९-३७; निरुक्त ४-१५ ) एका नदीचें नांव आहे. ही आरिआनची सु अस्तस नदी होय. हिचें हल्लींचें नांव स्वात असें आहे. ही कुमेस म्हणजे काबूल नदीस मिळते व ती काबूल नदी सिंधू नदीस मिळते.

२८ सुषोमा:—हें नांव ऋग्वेदांतल्या नदीस्तुतींत ( १०.७५-५ ) आलें आहे. पण तिची ओळख पटत नाहीं.

२९ सुसर्तू:—हें नांव ऋग्वेदांत ( ६-२७,५ ) आलें आहे. हें एका नदीचें नांव आहे. ती सिंधूस मिळत होती ह्यांत संशय नाहीं. पण तिची ओळख पटत नाहीं.

३० हरियूपिया:—हें नांव ऋग्वेदांत ( ६-२७,५ ) आलें आहे. येथें अभ्यावर्ती चयमान यानें वृचिवंताचा पराभव केला. पण हें नांव एखाद्या नदीचें आहे किंवा एखाद्या स्थळाचें आहे हें निश्चयानें सांगतां येत नाहीं असें पाश्चात्य पण्डित म्हणतात.

समुद्रः—ऋग्वेदांत [ ७-९५-२ ] समुद्राचा व अथर्ववेदांत [४·१०-८] मोत्यांच्या शिंपाचा;(६-१०६-३)महासागराच्या विस्तराचा[भरतीचा;][१९-३८·२] तैतिरीय संहिता (७-४, १३, १) यांत उल्लेख आहे. ऋग्वेदांत सिंधूच्या मुखांचा उल्लेख नाहीं व मत्स्य (मासे) हें लोकमान्य खाद्य नाहीं, तरी त्यावरून त्या लोकांस समुद्राची माहिती नव्हती असें म्हणतां येत नाहीं. कारण ऋग्वेद १०-१३६-५; अ. ११-५-६ वरून आर्यांस महासागराचची माहिती होती असें ठरतें, व त्या· प्रमाणें ( ऋ. १-१६-१;४-२०-३;५-५५-६;७-६-२९ यांत समुद्र व जमीन यांची तुलना आहे व ऋ. १-४७-६;७·६-७;९-९७-४४ प्रमाणें महासागरांतील मोत्यें वगैरे रत्नें व त्यावर चालणारा धान्याचा वगैरे व्यापार यांची त्यास माहिती दिसते व त्यास भुग्वी भुज्यूच्या कथेनें आली आहे. कारण तींत नौकानयनाचे व त्यांतील संकटांचें प्रत्यक्ष उदाहरण आहे. तैतिरीय संहितेंत ( ११-४,८,२;७-५-२ ) समुद्राचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (५-१६-७;३ ३९-७;८-२५ १ ) महासागराच्या पृथ्वीभोवतालच्या वेष्टणाचा व शतपथ ब्राह्मणांत ( १-६-३-११;१०-६·४-१ ) पूर्व व पश्चिम महासागरांचा उल्लेख आहे.

१ अरित्रः—म्हणजे गलबतें वल्हविण्याचें वल्हें. ऋग्वेदांत ( १-११६-५ ) व वाज. संहितेंत ( २१-७ ) शंभर वल्ह्यांच्या गलबताचा उल्लेख आला आहे व गलबत [ नौ ] वल्ह्यांनीं [ अरित्रपर्णांनीं ] वल्हविण्यांत येतें असें ऋग्वेदांत [१०-१०१;२] व शतपथ ब्राह्मणांत [४·२-५-१०] म्हटलें आहे. गलबत वल्हविणारा अरितृ [ वल्हेवाला ] असें म्हणत असत.

२ द्युम्नः—ऋग्वेदांतील एका वाक्याप्रमाणें ( ८-१९-१४ ) ह्या शब्दाचा अर्थ तराफा असा होतो.

३ नावप्रभ्रंशनः—म्हणजे नावेचें खालीं घसरत जाणें. जलप्रलयाचें पाणी ओसरल्यावर मनूचें गलबत ज्या उत्तरेच्या पर्वत शिखरावर लागलें, त्या मनोरवसर्पण पर्वताशीं ह्या शब्दाचा संबंध आहे.

४ नावाः—हा शब्द ऋग्वेदांत (१-९७-८) एकदां नाव या अर्थी आला आहे.

५ नावाजः—शत. ब्राह्मणांत [ २-३-३-५ ] हा शब्द वल्हेवाला या अर्थानें योजिला आहे.

६ नाव्यः—ऋग्वेदांत [ १-३३-११;८०-८;१२१-१३ ] व पुढील सारस्वतांत [ अ. ८-५-९; काठक संहिता, २३-६; शत. ब्राह्मण, १०-५-४-१४ वगैरे ] अनेक ठिकाणीं हा शब्द गलबतें चालविण्यासारिखी नदी ह्या अर्थी योजिलेला आहे.

७ नौः—ऋग्वेदांत [ १-१३१-२;२-३९-४;८-४२·४;८३-३ वगैरे व पुढील सारस्वतांत [ अ. २-३६-५;५-१९-१८; तै. सं. ५-३-१०-१; वा. सं. १०-१९; ऐ. ब्रा. ४-१३;६·६-२१; शत. ब्रा. १-८-१-४;४-२-५-१० वगैरे] हा शब्द गलबतवाचक आहे. बहुतेक नद्या ओलांडण्यास नावा लागत. पण पंजा-

बांतील रुंद नद्या व गंगा व यमुना ओलांडण्यास मोठ्या नावा लागत असल्या पाहिजेत. अनेक वेळां नाव ही कोरलेला लाकडाची दारू म्हणजे होडी असे [ ऋ. ५५-३ ]. वैदिक काळांत [ विल्सन ऋग्वेद १-४१ ] समुद्रावर मोठा व्यापार चाले. पण अरित्र ह्मणजे वल्हें याशिवाय गलबताच्या दुसऱ्या भागाचा उल्लेख कां नाहीं हें समजत नाहीं. पण नद्यांवर चालणाऱ्या होड्या नावांपेक्षां मोठ्या गलबतांनीं चालणाऱ्या व्यापाराचे उल्लेख आहेत. अथर्ववेदांत [५-१९-८ व ऋ. १-३२-८—नदं न भिन्नम् हे शब्द गलबतासंबंधाचे आहेत]. ज्या राज्यांत ब्राह्मणांवर जुलूम होतो, त्या राज्याची तुलना *गंमत पडलेल्या [ भिन्ना ] नावेशीं केली आहे. शिवाय, ऋग्वेदांत ( १-५६ २;४-५५-६ ) फायदा मिळविण्यास उत्सुक (सनिष्यव) होऊन समुद्रावर जाणाऱ्या लोकांचा उल्लेख आहे. ऋग्वेदांत [ १-११६-३ ] शंभर वल्ह्यांच्या ( शतारित्र ) गलबतानें अश्वी देवांनीं महासागरांतून भुज्यूस तारल्याची कथा आहे. यावरून हें कोणासही नाकबूल करितां येणार नाहीं कीं वैदिककाळीं महासागरावरील सफरींस योग्य अशीं मोठालीं गलबतें आपल्या मायभूमींत होतीं. बौद्धायन धर्मसूत्रांत [ १-२-४;२-२-२ ] महासागरावरील नौकानयनाचे उल्लेख आहेत.

८ प्लवः—ऋग्वेदांत व त्यापुढील सारस्वतांत ( १-१८२-६;अ-१२-२-४८;तै. सं. ५-३-१०-२;७-३-५-२; पंच ब्रा. ११-१०-१७ वगैरे ) हा शद्ब होडी या अर्थी योजिला आहे—असें आढळतें.

९ मंडः—शत. ब्राह्मणांत ( २-३-३-१५ ) नौमण्ड या समासांत दोन सुकाणांच्या गलबतांचा निर्देश आहे.

१० शंवीः—अथर्ववेदांत ( ९-२-६ ) ह्या शद्बाचा अर्थ तऱ्या, नावाडी असा आहे.

११ समुद्रः—अनेक पाश्चात्य पण्डितांचें असें मत आहे कीं आपले आर्य लोक व्यापार समुद्रांवरून फार प्राचीन काळापासून करीत असत. पण तो इ. स. पूर्वी ७०० वर्षांपासून फार जारीनें सुरू झाला.

१२ द्वीपः—हा शद्ब ऋग्वेदांत व त्या पुढील सारस्वतांत ( ऋ. १-१६९-३-का. सं. १३-२;श. ब्रा. १२-२.१-३; ला. श्रौ. सू- १-६-१० ) आला आहे. पण त्यांत मेरू भोंवतालच्या चार, सात अथवा तेरा द्वीपांच्या पृथ्वीचा उल्लेख नाहीं. परिष्यंद ( श. ब्रा. १०-२-१-१९;१४-३-१-१-१४) व परिसारक ( ऐ. ब्रा. २-१९ ) ह्या बेटांची स्थळें कळत नाहींत.

निष्कर्षः—याप्रमाणेंच सुदासानें (ऋ. ७-१८) दाशराज्ञ युद्धांत आपल्या भोंवतालचे राजे—[१] शिम्यू, [२] यदू, [३] तुर्वश [४] अनू [५] द्रुह्यू, [६] मत्स्य, [७] पक्थ, [८] भलानस, [९] अलिन, [१०] विकराणिन् [११]अज,

* गंमत हा शब्द पाझरणाऱ्या गलबतांस कोकण किनाऱ्यावरील नावाडी लोक नेहमीं लावितात.

[१२] शिव, [१३] शिग्रू, [१४] यक्षू, [१५] भेद, [१६] वैकर्ण, [१७] कवष, [१८] मन्यू वगैरे पूर्वोक्त सदुसष्ट जमातींपैकीं कांहीं जमातींस व व्यक्तींस पृथू, पर्शू, तृत्सू व भरत ह्यांच्या साह्यानें जिंकून कुरू देशांत आपल्या साम्राज्याची स्थापना केली. त्या साम्राज्याच्या गादीवर पुढें आलेल्या भरत राजाच्या सत्तेची वाढ उत्तर हिंदुस्थानावर अशी लोकोत्तर झाली कीं त्याच्या नांवावरूनच त्या प्रदेशास भारतवर्ष हें नवें नांव पडलें; एवढेंच नाहीं तर त्या सत्तेची वाढ दक्षिण हिंदुस्थानभर अशी झाली कीं त्या प्रदेशाचाही अतर्भाव भारतवर्ष ह्या संज्ञेंत होऊं लागला व त्याच्या इतिहासास भारत हें नांव पडलें; कारण त्याचें भारतीकरण अंशत: दक्षिणेंतील द्रविड जमातींच्या सामुदायिक धर्मांतरानें किंवा अंशतः भरतांच्या दिग्विजयानें झालें होतें; मग उत्तरेंतील पंचगौडांची सुधारणा व दक्षिणेंतील पंचद्रविडांच्या सुधारणा ह्या कितीही भिन्न असोत, त्यांच्या राष्ट्रीय संघटनेचे कार्यास फक्त एका आत्म्याचें अद्वैतपणानें अत्यंत सहाय्य करून ह्या सर्व राष्ट्रास पूर्वीं एकदां अग्रगण्यत्व दिलें होतें !

---

## भाग पांचवा.

### धर्मांतरविशिष्ट आर्यावर्त अथवा दक्षिण हिंदुस्थान.

( पंचद्रविडदेश )

अयि भुवन मनमोहिनी ॥
अयि निर्मल सूर्यकरोज्वलधरणी ॥
जनक जननि जननी ॥
१ नीलसिंधुजलधौत चरणतल ॥
अनिलविकंपित श्यामल अंचल ॥
अम्बरचुम्बितभाल हिमाचल ॥
शुभ्रतुषार किरिटिनी ॥
अयि भुवनमनमोहिनी ॥
२ प्रथम प्रभात उदय तव गगने ॥
प्रथम सामरव तव तपोवने ॥
प्रथम प्रचारित तव वनभवने ॥
ज्ञान धर्मकत काहिनी ॥
अयि भुवनमनमोहिनी ॥

३ चिरकल्याणमयि तुमि धन्य ॥
देशेविदेशे बितारिछे अन्न ॥
जान्हवि यमुना विगलित करुणा ॥
पुण्य पियुषस्तनवाहिनी ॥
अयि भुवनमनमोहिनी ॥
बंगाली—श्रीरविन्द्रनाथ ठाकूर.

The will, the consciousness, the senses, desire, the passions, all these combined make what we call the "Soul."—Vivekananda's Works, Vol. VII. P. 72.

एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ।—

यतः—

पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना । रूपं रंगं तथैवच ।
खण्डे खण्डे तथा भाषा । अन्नं वस्त्रं तथैवच ॥

Soul has no caste and to think it has is a delusion.–P. 32× ×

The best interest of the country demanded that leaders of public opinion should emphasise points of agreement instead of magnifying points of divergence.–Times of India 15-10-24.

Sacrifice indeed is the nave of the world. It is not the whole truth that fortune favours the enterprising man; behind there must be the strength that comes of the Divine mother—But I also admit that it is the enterprising man unto whom Mother gives strengh.—Vivekanand–Vol. VII. P. 311.

While military power dominates, meat eating will prevail, but with the advance of science fighting will grow less and then the vegiterians will come in–The same–P. 27.

हिमाद्रिकन्ययोरन्तर्गतोदेशस्तु भारतः ॥ शिल्परत्न—श्रीकुमार.

मागील भागांत मूळ आर्यावर्ताचें विवरण आटोपलें. आतां या भागांत धर्मांतरित आर्यावर्त याचें विवरण कर्तव्य आहे.

आर्यानार्यः—वैदिककाळामध्यें मुख्य लक्षांत ठेवण्यासारिखी मोठी ऐतिहासिक गोष्ट म्हटली म्हणजे दाशराज्ञयुद्धावांचून दुसरी कोणती ही झाली नाहीं. त्याचे परिणाम एवढे सर्वांगीण व सर्वव्यापी झाले कीं त्यानें आर्य व अनार्य यांची संघटना [ जूट ] अनेक प्रकारें केली. त्या प्रकारांत जाती, श्रेणी व संघ यांचा, प्रामुख्येंकरून, अंतर्भाव झाला. संहिता, ब्राह्मण व उपनिषदें वाचलीं तर त्यांवरून त्या उत्तरेकडील गौड आर्यांचें पाऊल हळुहळू द्रविड दक्षिणेंत पडत होतें असें दिसतें. ह्या प्रगतीचे तीन भाग पाडितां येतात. पहिल्या प्रगतीच्या वेळीं उत्तरेस लोक अगदीं थोडे होते व त्यांची वस्ती गंगा नदीपर्यंत झाली होती. दुसऱ्या प्रगतीच्यावेळीं त्यांची संख्या बरीच वाढली होती व त्यांची वस्ती दक्षि-

णेंत गोदावरी नदीपर्यंत झाली होती. त्यांच्या तिसऱ्या प्रगतीच्या वेळीं त्यांच्या आर्यीकरणाच्या पुराची लाट मोठ्या नदीच्या लोंढ्याप्रमाणें दक्षिणेंत शिरली व ती गोदावरी नदीच्या पुष्कळ पुढेंपर्यंत फोफावत गेली. त्यांच्या पहिल्या लाटेनें गंगा व यमुना ह्या नद्यांमधील सुपिक चिमस्याचा प्रदेश व्यापिलेला दिसतो [ऋ. ३-५३-९ ]. असें ह्मणतात कीं विश्वामित्रानें शोध करून सिंधूनदी सगळया आर्यां ओलांडली. दुसरी लाट यजुर्वेद्यांची होती. ती दक्षिणेंत जोरानें घुसून बसली. [ तै. ब्रा. ३-१२-९-१ ]. उत्तरकुरू व मद्र यांत सुव्यवस्थित राज्यें होतीं. [ ऐ. ब्रा. ८-१४ ], तशीं पुढें उत्तर हिंदुस्थानांत त्यांचीं राज्यें संस्थापित झालीं होतीं हें आपणांस निराळें सांगावयास नकोच. ह्यावेळीं पुंड्र, शबर, मुतीब वगैरे आर्येतरांच्या तेथें जाती होत्या. त्यांवर कुरूंनीं चाल केली व त्यांवर आपली सत्ता प्रस्थापित केली. ऐ. ब्रा. [ ७-१८ ] प्रमाणें विश्वामित्रानें प्रथम आर्येतरांस आपल्या मुलांप्रमाणें मानिलें व त्यांपैकीं देवरात नांवाच्या एका पुत्रास दत्तक घेतलें. पण तें त्याच्या औरस मुलांस आवडलें नाहीं, व त्यांनीं मोठा दंगा केला. तेव्हां त्यानें आपल्या औरस मुलांचा आपल्या मालमत्तेवरील वारसा साफ काढून टाकिला. ते अनार्य लोकही पुष्कळ सुधारलेले होते. पण ते आर्यांच्या धर्माप्रमाणें वागणारे नसत. तिसऱ्यावेळीं आर्यांचीं राज्यें वाढलीं व भरभराटीस आलीं व त्यांत साम्राट व मांडलीक हा संबंध प्रचारांत आला व त्यांस आर्येतर चांगला मान देऊं लागले व ते सुमुदायानें आर्यांचीं धर्मकर्में, रीतिभाती उचलूं लागले.

**( २ ) रामायण व महाभारत यांचा काल:–इ. स. पू. २००० ते ९०० वर्षें.** ह्या दोन वीररस प्रधान काव्यांत त्याचा काळ समजण्यास कांहीं विश्वसनीय आधार सांपडत नाहीं. पाश्चात्य पण्डित असें वृथा अट्टहासानें म्हणणारे आहेत कीं भारत हें रामायणापेक्षां जुनें आहे. पण आमच्या झाडून सर्व लोकांची समजूत अशी आहे कीं आपलें रामायण हें आपल्या भारतापेक्षां, हमखास, जुनें आहे, व ह्या समजुतीस पोषक एक दोन सबळ प्रमाणें अशीं आहेत.—

[ १ ] रामायणांत दक्षिणापथाचें अथवा दक्षिण हिंदुस्थानचें ज्ञान महाभारतापेक्षां पुष्कळ कमी आहे. त्यांत दक्षिणेकडील पुढील स्थळांचा निर्देश आहे:– उत्कल, कालिंग, दशार्ण [भिलसा] , अवन्ती, व विदर्भ. ही माहिती विंध्यपर्वतापलीकडे फारशी येते असें नाहीं. हे देश व चोल, पाण्ड्य व केरल ह्या देशांमध्यें दण्डक अरण्य होतें. त्यांत गुन्हेगार लोकांस आणून सोडीत म्हणून त्यांस दण्डक म्हणत. त्यांत आर्यांची बिनी गोदावरीवरील जनस्थान ऊर्फ नाशकापर्यंत आली होती. तर हें भूभागाचें ज्ञान वैदिक सारस्वतांतील आर्यावर्ताच्या किंवा आर्यराष्ट्राच्या फारसें बाहेरचें नाहीं.

( २ ) वृद्ध चाणाक्याच्या अर्थशास्त्रांत रामायण व महाभारत ह्यांचा उल्लेख याच क्रमानें आहे:–"मानात् रावणः परदारान प्रच्छन् दुर्योधनो राज्यादंशंच ॥" म्हैसूर प्रत पा. ११

रामानें लंकेवर स्वारी केली त्यापूर्वी दक्षिणेमध्यें कोठें कोठें नद्या व सरोवरें यांच्या आश्रयानें आपल्या आर्य ऋषींचे कांहीं आश्रम होते व त्यांतील ऋषिवर्य महंतांनीं दाक्षिणेंतून लंकेवर जाणाऱ्या रामाच्या स्वारींत त्यास शस्त्रास्त्रें व सल्ला-मसलत देऊन इतकी मदत केली कीं त्यांच्या असल्या मदतीचा पाया आपल्या दाक्षिणेंत घडलेला नसता तर रामाला लंकेवर स्वारी करितां आली नसती व ती त्यानें अशा लढाईच्या पायाशिवाय केली असती तर इंद्रजीत व रावण यांच्या सुधारलेल्या शस्त्रास्त्रांपुढें हा सत्पक्षी रामलक्ष्मणांचा टिकाव लागला नसता व त्यांस त्या पतिव्रता सीतेस त्यांच्या कचाटींतून सोडवून अयोध्येस आणितां आलें नसतें अशी आमची खात्री रामायण वाचून बालंबाल झाली आहे. ते ऋषी तेथें अनार्य नरमांस भक्षक राक्षसांच्या जणू जबड्यांत लहान मोठ्या वसाहती करून सरस्वती, शास्त्रें, तत्वज्ञान व पंचमहाभूतें यांच्या आराधनेंत आपल्या आयुष्याचा काळ कसेबसे कण्ठित होते ! असें म्हणण्याचें कारण असें कीं त्या राक्षसांनीं खाऊन टाकिलेल्या आर्यांच्या हाडांच्या ढिगांनीं दाक्षिणेंतील त्यांच्या आश्रमाजवळच्या अनेक जागा पांढऱ्या झाल्या होत्या ! तेव्हां रामाचा वनवास व सीतेचें हरण सदरहू आश्रमवासियांस अत्यंत हितकर होतें ! म्हणून त्यांचे हातून जागोजाग रामाचें स्वागत दाक्षिणेमध्यें लोकोत्तर झालें आहे ! (रामायण पहा)

**तात्पर्यः**—" ज्या इसमाच्या पोटांत आपल्या जन्मभूमीचें खरें कल्याण साधावयाचें असेल, त्यानें आपल्या जन्मभूमींत जे अद्वैताचे ( मेळ ) मुद्दे असतील ते आग्रहपूर्वक वानावे पण तीमध्यें जे द्वैताचे मुद्दे असतील त्यांचें नांवही कधीं घेऊं नये " ह्या सर्वमान्य नीतितत्वास योग्य मान देऊन आपण आपल्या श्रौतभूमीचा विचार करूं.

( १ ) **मूळची श्रौतभूमीः**—आमची उत्पत्ती प्रथम गोंडवनांत झाली. तें गोंडवन गोदावरीपासून हिमालयाखालील भूमध्यसमुद्रापर्यंत पसरलें होतें. आम्ही सदरहू भूमी आपल्या वसाहतीनें भरली व आम्ही ह्या मायभूमींतून भूमध्यसमुद्र ओलांडून पराक्रमानें वसंताच्या उत्तरेकडील गमनाप्रमाणें उत्तर कुरूकडे सुमेरु-खंडांत चाल करून भरभराटीस येऊं लागलों, तेव्हां आह्मी आपल्या वसाहतीस सापेक्षतः देव देश व आमच्या त्या दक्षणच्या मायभूमीस पितृदेश ह्मणूं लागलों.

( २ ) **वसाहतीची श्रौतभूमीः**—आह्मी सदरहू पितृदेशांतून उत्तरेस पुत्रदेशांत शिरून उत्तर एशिया अथवा सुमेरुखंड हें यांतील तीस दिवसांच्या उषेच्या ( ८६०३ अक्षांशावरील ) साम्राज्यापर्यंत व्यापिलें तेव्हां मागील आर्यावर्ताशीं सापेक्षतः तीस उत्तर आर्यावर्त किंवा सुमेरुखंड ह्मणूं लागलों.

( ३ ) **संकोच पावलेली श्रौतभूमीः**—दहा बारा हजार वर्षांपूर्वीं वरील भूमध्य-समुद्रांतून हिमालयसंभवानंतर महाजलप्रलय झाला असतां उत्तर आर्यावर्तांतील आमचे लोक दक्षिण आर्यावर्तांत घरच्या मुलाप्रमाणें तेथील मूळच्या लोकांत आले व त्यांतील सुदासादी भरतांनीं दाशराज्ञ युद्धांत द्रुह्यू वगैरे दहाबारा राजांस जेर केलें व विंध्य व हिमालय यांतील संकुचित मूळ पितृदेशावर तीन हजार फूट सिंधू

व गंगा यांच्या थड्यांवर हिमालयावरील गाळ घसरत येऊन झालेल्या ब्रम्हावर्तांत ते पुन्हां वसाहत करून सदानीरापर्यंत स्थायिक रहिवासी झाले व त्यांचें पुढें सुसंघटित राष्ट्र बनलें.

(४) पुन्हां प्रसरण पावलेली श्रौतभूमीः—श्रीरामाच्या व पांडवांच्या वेळीं त्या उत्तर राष्ट्रांतील श्रौतधर्मी लोकांनीं आपल्या युद्धाचा पाया सदरहू उत्तर हिंदुस्थानांत ठेवून दक्षिण हिंदुस्थानांतील राष्ट्रांवर अनेक दिशांनीं—धर्म, अर्थ, काम व मोक्ष या दृष्टींनीं—चढाई करून त्यांस आत्मसात केलें म्हणजे आपल्यासारखें श्रौत धर्मी केलें. पण दक्षिणेंतील जमाती मोठ्या प्रबळ असल्यामुळें त्या सगळ्या झाडून सर्व त्या उत्तरेकडील आर्यांच्या अंकित झाल्या नाहींत. पण त्यांनीं आत्मौपम्यबुद्धीनें त्यांचा श्रौत धर्म व विचार, उच्चार व आचार, अधिकउणे उचललेले–ते त्यांचेबरोबर व्यापार धंद्याचें दळणवळण ठेऊं लागले–ते त्यांच्याशीं शरीरसंबंध करूं लागले–व त्यांच्याबरोबर स्वातंत्र्यसुख अनुभवूं लागले ! त्यांत दक्षिणेंतील त्या पंचद्रविडांच्या संस्कृतीचा परिणाम त्या उत्तरेंतील त्या पंचगौडांच्या संस्कृतीवरही तसाच झाल्यावांचून राहिला नाहीं ! तो असा कीं हिमाद्रीपासून कन्याकुमारी भूशिरापर्यंतच्या प्रदेशास तर काय पण रामानें रावणास जिंकून घेतलेल्या लंकेच्या दक्षिण टोंकापर्यंत पसरलेल्या निरक्ष प्रदेशासही भारत अथवा भरतराष्ट्र हें नांव पांडव प्रभृती अनेक साम्राटांच्या परंपरेनें आपल्या वेळोवेळीं केलेल्या राजसूययज्ञांनीं सार्थ आणिलें ! (मॉडर्न रिव्ह्यूंतील मि. लॉचे लेख पहा.) ह्यांतील पुढील सारखेपणाचे मुद्दे तत्पोषक होतेः–(१) त्यांतील झाडून सर्व वर्णांचे लोक संस्कृत वेदास प्रमाणभूत मानणारे होते; मग त्यांचे आराधना—प्रकार थोडे भिन्न का असतना; (२) ते वेदांप्रमाणें पुढें दिलेले संस्कार व हीनाहीन याग गळ्यांत शुभ्र यज्ञोपवीतें घालून करणारे असत; (३) ते विवाहादी संस्कार शास्त्रसिद्ध गोत्रप्रवरांच्या पद्धतीनें करून मांडीसमांडी व हातास हात लावून सारख्या दर्जाच्या दांपत्यभावानें धर्म व व्यवहार यांतील कर्में नित्य उरकीत असत; (४) ते शेंड्या, मिशा, वेण्या, वस्त्रालंकार, वहाणाजोडे प्रांतानिहाय एक पद्धतीचे ठेवीत; (५) ते जवळच्या आचार्यांच्या जंगलांतील स्वतंत्र गुरुकुलांत शारिरिक, मानसिक व नैतिक शिक्षण सारखें संस्कृत भाषेंत घेत; (६) त्यांचे वर्णाश्रमधर्म सारखे असत; (७) त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या धंद्यांचीं कामें गुणकर्मविभागशः सारखीं वांटलेलीं असत; (८) त्यांवर मन्वादी स्मृतींचा अंमल सारखा चाले; (९) त्यांत पाडीं, खेडीं, कसबे, प्रांत, शहरें, हीं सारख्या ग्रामपंचाइतींच्या अमलांत असत; (१०) जे ते गांव एकसारखे कुशांच्या बेटाप्रमाणें आत्मपोषक व आत्मसंरक्षक प्रजासत्ताक राज्याच्या तोडीचे असत; (११) पंचमहाभूतें कांहींही करोत, पण राजास तर काय पण मोठ्या साम्राटासही त्यांच्या गृहरूप गडकिल्ल्याचे स्वातंत्र्यास धक्का लावण्याची छाती नसे (१२) ह्या राजव्यवस्थेमधील सर्वोत्कृष्ट प्रकार कोणास सांगावयास नकोच कीं आपल्या मनुच्या स्मृतीप्रमाणें येथें तर काय पण इतरत्र पूर्वोक्त मनु-

जात ईजिप्त, रोम, व पेरू यांपैकीं रोम व पेरू ह्या देशांत तेथील राम्युलस व इनका यांच्या ताब्यांतील सर्व जमिनीचे तीन भाग केलले असत. त्यांपैकीं एक भाग धर्मास अग्रहार म्हणून अर्पण केलेला असे, दुसरा भाग राजाकरितां काढून ठेविलेला असे व तिसरा भाग चार वर्णांच्या प्रजांमध्यें प्रत्येक कुटुंबाच्या गरजे-प्रमाणें ग्रास म्हणजे खावटी म्हणून यथान्याय वांटण्यांत येत असे. तो असा कीं त्याची बरोबरी हल्लींच्या समाजशास्त्राच्या ध्येयास करितां यावयाची नाहीं, मग त्याच्या व्यवहाराची कशी करितां येणार ? अर्थात्, त्यांतील मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे धर्म व राजा यांच्या करग्रहणाच्या बोजाची लडथड प्रजेच्या ह्या माल-मत्तेच्या शिरावर हल्लींप्रमाणें जुलुमजबरदस्ती करण्यास बिलकुल नसे. आपलें गुरु-कुलच पहाना. तें अगदीं स्वतंत्र असे. त्याचीं ध्येयें मनुष्याचा स्वभाव, समाज व सरकार यांच्या गरजांच्या पायावर समान दृष्टीनें उभारलेलीं असत. त्यांत गुण-कर्मशः शिरण्यास कोणासही मज्जाव नव्हता. त्यांच्या खटाखटीच्या यज्ञयागाच्या धर्मांत अस्पृश्यतेस वाव नव्हता; कारण अजून कपटाची शौर्यावर सरशी झालेली नव्हती व मांसखाऊ प्रमुख होते. सर्व जमाती त्यांच्या बऱ्याकरितां निरपवाद एक दिलानें झटत असत. मागले लोक मत्सरानें पुढल्यांचे पाय ओढीत नसत. ते देहास आत्मा म्हणत पण त्याच्या देहाच्या वर्णास मायामय समजत. ह्या बीजा-पासून एक मोठा वृक्ष वाढला. त्याच्या शाखांपासून पारंब्या फुटून आर्यावर्ताच्या इतर जमिनींत घुसल्या व त्यांपासून नवीन अनेक वृक्ष प्रादुर्भूत झाले. त्यांतून तयार झालेले उदारमनस्क व सदाचारी पुरुष हे स्वतःच्या महत्वाकांक्षा व स्पर्धा एकीकडे सारून आपला लोकसमाज व देश यांच्या कल्याणार्थ कोणत्याहि वर्णा-दिकांच्या अडचणीस न जुमानतां झटूं लागले. ते असे कीं ह्या देशांतील मूळ आर्य व अनुगृहीत कानडी, तेलगू, तामिळ व मलियालम सुद्धां आर्य यांचा लोकसमाज अनेक प्रकारांनीं व दिशांनीं आवळला गेला व त्याचें त्रैलोक्यललाम-भूत राष्ट्र बनलें ! व त्याची छाप बाहेरील तदितर राष्ट्रांवर अधिक उणी पडली ! फार काय सांगावें पण त्या इतर देशचे लोक सध्यां कितीही आत्मप्रौढी मारणारे असोत, किंवा आगळिक करणारे असोत, त्या देशांतील लहान मोठ्या धार्मिक व व्यवहारीक संस्था ह्या येथिल मूळच्या असल्या संस्थांच्या केवळ शिष्यवृत्तीनें करून घेतलेल्या ( मुनस्मृती पहा ) नकला आहेत असा डोळे उघडून पाहील त्याची खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. त्यांच्या मुळाशीं उकरून पहावयास जावें तों आमचा आत्मौपम्यनीति प्रयुक्त राष्ट्रधर्म जागत्या ज्योतिसारखा विशेष चमचमून तदितर धर्मांपासून आपला स्वतंत्रपणा दाखवितो. उदाहरणार्थ, आपल्या उद्दालक ऋषिप्रस्थापित विवाहसंस्थेचा विकास खिस्तीधर्मांत कसा झाला आहे तो पहा. ह्या दोहोंतील करारमदार –अर्थेच कामेच नातिचरामि–व अक्षता व करवल्या वगैरे संस्कार बहुतेक सारखे आहेत. पण खिस्ती विवाहाचा शेवट जोडप्यावर पादत्राणें फेकण्याच्या विधींत होतो ! तो खऱ्या आर्यास कसासाच वाटतो ! या-प्रमाणेंच आपली गीता व बायबल यांची तुलना करा. बायबलानुयायांच्या

व्यवहारांत हल्लीं चोहोंकडे उपयोगवाद बोकाळला असो, पण त्या दोन्हीही ग्रंथांमध्यें जुना आत्मौपम्य नीतीचा गाभा इतका सारखा आहे कीं एक दुसऱ्याची म्हणजे बायबल गीतेची हुबेहूब नकल आहे हें हर कोणास कबूल करावें लागतें.

यावरून सिद्ध काय कीं ज्या विंध्यहिमाद्री यांतील श्रौतभूमीची पडझड पूर्वी क्रान्तिप्रदेशभर पूर्वपश्चिम आढळली होती, तिचीच आणखीं पडझड ८६° ½ अक्षांशावरील उत्तर कुरूपासून ०° अक्षांशावरील लंकेपर्यंत व मसाल्याच्या बेटांत, आफ्रिकेंत, युरोपांत, व अमेरिकेंत पसरली आहे. ती थोडक्यांत अशीः—

[ १ ] इन्द्र व तदनुयायी आपला आहिताग्नी घेऊन गोंडवनांतून उत्तर एशियेंत वसाहत करण्यास गेले व जलप्रलयकालीं त्यास घेऊन उत्तर हिंदुस्थानांत व दक्षिण हिंदुस्थानांत परत आले, व त्यांत ते प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष पसरले आहेत;

[ २ ] उत्तर एशियेंतील वरुण व तदनुयायांनीं ज्याप्रमाणें उत्तर अमेरिकेंत वसाहती केल्या, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील इक्ष्वाकू व तदनुयायांनीं दक्षिण अमेरिकेंत वसाहती केल्या व त्यांतील सुमेरियन द्रविडांनीं आफ्रिकेंत व युरोपांत जाऊन वसाहती केल्या आहेत व

[ ३ ] ह्या अनंत लोकरूप पक्षांनीं आपल्या अनादी वेदांचे अनंत सेतिहासिक भाग अनंत ठिकाणीं चोंचींतून बियांप्रमाणें धरून नेऊन तेथील जमीनींत पेरले आहेत !

उपसंहार–रहाटगाडगें:—'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण–' म्हणजे चाकाच्या धावेप्रमाणें मनुष्याच्या परिस्थितीचा वरचेवर पालट होत असतो. म्हणजे ती अर्थात्, लाटांप्रमाणें एकदां खालीं जाते व ती पुन्हां एकदां वर जाते. आमच्या सुमेरुखंडासारखें राष्ट्र, आंगिरस ऋषीसारखें औत्तर कुळ, व इंद्रासारखा पुरुष आज भाग्याच्या परम उच्च शिखरावर चढलेला असतो तोच उद्यां पाहावा तो जलप्रलयांत व दाशराज्ञयुद्धांत एकाएकीं डबघईस येतो ! व त्याच्या पडझडीवर दुसरें असिरिया राष्ट्र, वशिष्ठ ऋषी व सुदास पुरुष जोरावतो ! ज्याप्रमाणें ( कबीर ) वडासारखें अत्यंत विस्तार पावलेलें झाड एकाएकी वठून जातें व त्याच्या मुळांपासून नवीन सोट उत्पन्न होतात किंवा [ कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें ] त्याप्रमाणें आपलें सुमेरुखंडांतील व जंबुद्वीपांतील सगळें उत्तर व दक्षिण आर्यावर्त बुडून उध्वस्त झालें व त्याच्या मुळापासून ( विंध्यहिमालयांतील पितृदेशापासून ) दक्षिण आर्यावर्त २००० फूट चिखलावर पुन्हां उद्भवलें व त्यामध्यें झाडून सर्व प्रकारचीं शास्त्रें व कला यांची भरभराट होण्यास व त्यांतील आर्यांचीं मनें मोहोरण्यास म्हणजे विचारशील होण्यास अत्यंत जरुरीची गोष्ट जी सुरक्षितता व सवड यांची सोय करणाऱ्या स्वस्थ समाजव्यवस्थेची तजवीज हिमालयसंभवानें लागली व त्यामध्यें ईजिप्तमधील 'पिरमिड' नामक मनोरे आपल्या उच्च शिखरांनीं नील नदीच्या दऱ्याखोऱ्यांतून आपली दृष्टी फेकूं लागण्यापूर्वीं आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचें उगमस्थान जे ग्रीस व इताली देश, यांमध्यें केवळ उघड्यानागड्या रानटी मानव प्राण्यांची वस्ती होत होती तेव्हां आपलें

भारतवर्ष कालिदासाच्या म्हणण्याप्रमाणें 'स्वभावलोल' ठरलेल्या–लक्ष्मीचें व सुवैभवाचें कायमचें वसतिस्थान झालें. सदैव उद्योग करणाऱ्या लोकांनीं ही आपली आर्यभूमी आपल्या उद्यमांच्या चिन्हांनीं पुरी झाकून टाकिली, कृषीवलांच्या परिश्रमाची परिणती गौडादी प्रांतांत दरवर्षीं निसर्गाच्या ऊस, गहूं, तांदुळासारख्या अत्यंत लोभनीय पिकांमध्यें होऊं लागली, कसबी कारागीर हे येथील कापसासारख्या कच्च्या मालाचें अप्रतिम नयनसुख व सुबक मलमल हें कापड करूं लागले, व अगस्त्य, कश्यप, मय वगैरे संहिताकारांच्या तालमींत तयार झालेले सूत्रधार, पाथरवट, गवंडी, सुतार वगैरे शिल्पज्ञ लोक आपले लेण्यासारख्या अशा टिकाऊ इमारती व्यवहारांत प्रत्यक्ष उभारूं लागले कीं त्यांची मजबुती हजारों वर्षांच्या क्रांतींतही बालाग्र ढळली नाहीं. इकडे शेजारच्या देशांतील उडाणटप्पू लोकनायक जंगलोजंगलीं उघडे नागवे भटक्या मारीत फिरत असतां आपल्या भारतवर्षांतील रामकृष्णासारिखे मुत्सद्दी राजेरजवाडे मोठमोठ्या टोलेजंग हर्म्यांत राहून रत्नें जडविलेले जरतारी किनखापाचे कपडे वापरूं लागले व हरयेक प्रकारचें सौख्य भोगूं लागले. या वेळीं वाल्मीकी व व्यास यांसारिखे मोठे सहृदय व प्रतिभासंपन्न कवी, भट व भाट आपल्या महापराक्रमी पूर्वजांचीं अद्भुत कृत्यें वर्णन करण्यास निर्माण झाले. याप्रमाणें तात्विक वादविवादाचें गूढ चक्रव्यूह हे शुद्ध व सूक्ष्म तर्कांनीं उकलून त्यांच्या धाग्यांचे सुंदर व तलम पट विणणारे, उद्दालकयाज्ञवल्क्यासारखे उपनिषत्कार व कपिलचार्वाकासारिखे षड्दर्शनकार होऊन गेले ! यास प्रमाणः—

Ere yet the Pyramids look down upon the valley of the Nile–when Greece and Italy, those cradles of modern civilization, housed only the tenants of the wilderness, India was the seat of wealth and grandeur. A busy population had coverd the land with marks of its industry; rich crops of the most coveted productions of Nature annually rewarded the toils of the husbandman; skilful artizans converted the rude produce of the soil into to fabrics of unrivalled delicacy and beauty, and architects and sculptors joined in contributing works, the solidity of which has not in some instances been overcome by the revolution of thousands of years. The princes and nobles of India, unlike the wandering chieftains of the neighbouring countries, already dwelt in splendid palaces and clothed in the gorgeous products of its looms and glittering with gold and gems, indulged a corresponding luxury in every act and habit of their lives. Poets were not wanting to celebrate the exploits of their ancestors, nor philosophers to tread the mazes of metaphysical inquiry and weave the net ingenious speculation, with as much subtelty, and perhaps with not less success than has attended the researches of subsequent inquiries.—Thornton's History of India.

प्रस्ताव—उत्तरार्धाचा:—ह्या दिग्दर्शित स्थितीचें यथाशक्य सविस्तर वर्णन ह्या ग्रंथाच्या उत्तरार्धांत येणार आहे; त्याचा अभ्यास जिज्ञासूंस ऐहिक व पारलौकिक जन्ममृत्यूचा फेरा चुकविण्याचा खरा मार्ग दाखविणारा आहे. कारण हें वर्णन आरबी भाषेंतील काल्पनिक अल्लाउदिनाच्या गोष्टीप्रमाणें अवास्तव नाहीं; तर तें आपल्या मराठ्यांच्या इतिहासांतील शिवाजी महाराजांच्या खऱ्या, चमत्कारिक व उद्बोधक चरित्राप्रमाणें अगदीं वास्तविक घडलेलें आहे, व त्याच्या अभ्यासाच्या मशालीनेंच प्रत्यक्ष एकदां शिवाजी महाराजांस अंधारांत रखडणाऱ्या महाराष्ट्रचंद्रास मुसलमान राहूच्या जबड्यांतून सुरक्षित बाहेर काढण्याचा मार्ग आपल्या प्रकाशानें दाखविला. पूर्वार्धांत अतिमानुष गोष्टींनीं ज्याप्रमाणें मानुष गोष्टींवर मात केली आहे, त्याप्रमाणें पुढील उत्तरार्धांत मानुष गोष्टींनीं अती मानुष गोष्टींवर मात केली आहे. पूर्वार्धामध्यें ज्याप्रमाणें उत्तर दक्षिणआर्यावर्तांतील आर्यांच्या पराक्रमाच्या पडझडीचें रूपरेखन करण्यांत आलें आहे, त्याप्रमाणें ह्याच्या उत्तरार्धांत पर्वतसागर-रक्षित पितृदेशाच्या भूभागांतील शुद्ध व धर्मपरिवर्तन विशिष्ट आर्यांच्या पराक्रमाचा आराखडा दाखविण्यांत आला आहे. पूर्वार्धांत वसंतप्राबल्य होतें तसें उत्तरार्धांत कटिबंधप्राबल्य आहे. त्यांत पूर्वसंचिताचा अभिमान व क्रियमाणाविषयीं आशा उत्पन्न होऊन प्रारब्ध चालू असतां ते आर्य आपल्या हिंद मातेच्या भजनीं हल्लींच्या—वंदेमातरम्—सारख्या नामस्मरणांत रोज सकाळ संध्याकाळ अभेदभावानें लागले. त्यांतील महापराक्रमी राजांस प्राचीन राजसूययज्ञाची प्रथम स्फूर्ती उत्पन्न झाली. त्या यज्ञयागांच्या व्यापक उत्सवांनीं त्यांच्या मनांत पुढें उद्भवलेली एक राष्ट्राची कल्पना सगळ्या पृथ्वींत येथें अपूर्व प्रकारें प्रथम मूर्तस्वरूपांत चमचमूं लागली. हें अत्यंत सुचिन्त्य म्हणजे विचार करण्यासारिखें आहे कीं त्यांत हल्लीं येथें हा हिंदू, हा मुसलमान, हा पारशी, हा ख्रिश्चन अशा वैयक्तिक वर्णभेदाचा विचार प्रथम करितात, व मग देशाचा करितात तसा तो तेव्हां करीत नसत. त्यावेळीं येथें आत्मौपम्यनीतीचें निरपवाद साम्राज्य होतें. त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या वर्णभेदाचा विचार त्यांतील भेदांतल्या अभेद किंवा द्वैतांतील अद्वैत( युनिटी इन व्हरायटी )याचे चित्राची विचित्र खुलावट साधण्यास प्रामुख्येंकरून त्यांतील त्या केवळ नानाविध वर्णांच्या रंगांचा गौरव करीत असत व त्या पूर्वोक्त सुमेरुखंडांतील स्वर्गापेक्षां आपल्या पितृदेशांतील ( जंबुद्वीपकल्प ) जननी म्हणजे जन्मदाती आई व जन्मभूमी म्हणजे जन्मदातें हिंदुस्थान यांची थोरवी त्यांतल्या गोडामध्यें उत्पन्न होणाऱ्या गुडाच्या म्हणजे गुळाच्या गोडीनें पुढील सुभाषितांच्या रूपानें नेहमीं अशी गात असत:—

जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥

व पुढील वेदोक्तीचें रहस्य आपले आचरणांत आपल्या देवांप्रमाणें तंतोतंत आमरण उतरून देहबुद्धीनें तिचे दास, जीवबुद्धीनें तदंशक व तत्वबुद्धीनें तद्रूप होऊन आत्मनिरपेक्ष तिची थोरवी वाढविण्यास रात्रंदिवस झटत असतः—

यज्ञेन यज्ञ मयजन्त देवा स्तानि धर्माणि प्रथमा न्यासन् ॥

भावार्थः–( हव्याचा व आत्म्यांचा ) यज्ञ करून देव सृष्टिदेवतेस प्रसन्न करीत असत–हा अनादी धर्म होय. कारण–केवळ–साहसे श्री प्रतिवसति स्म–असें कोणी म्हणणारे असतील तर खुशाल म्हणोत. पण तिचीं योग्य फळें सृष्टिदेवतेची प्रसन्नता साधल्याशिवाय निःशेष चाखतां येत नाहीं. असें आमचें प्रामाणिक मत आहे व त्यास श्री विवेकानन्दाच्या सदरींच्या अवतरणाचा पुरा आधार आहे. शिवाय–

। ईशावास्यमिद ँ सर्वम् । ईश्वराधीन हें सर्व आहे तर । तेन त्यक्तेन भुंजीथाः । त्यानें दिलेलें घेऊनच आपणास रहावयास पाहिजे. पण । मा गृधः कस्यचिद्धनम् । कोणाच्या धनाचा गैरहक्कानें लोभ धरूं नको. पण नाशिबावर हवाला ठेऊन व निष्कर्म राहून अल्पायुषांत मरून जायचें काय? नाहीं, नाहीं. । कुर्वन्नेवह कर्माणि जिजीविशेच्छत ँसमाः ॥ अखंड जिवापाड मेहनत करून शंभर वर्षे वाचण्यास पाहा–अशी आज्ञा ईशोपनिषत् । करीते.

यादी–ह्या ग्रंथकरणास आधारभूत ग्रंथांची—

१ इंडो इराणियन्स–रविन्द्रनाथ ठाकूर.
२ आर्यलोकांचें मूळ वसतिस्थान–मि. के. ल. ओगले.
३ गणितानें श्रौतभूमीचा अक्षांशनिश्चय–कै. प्रो. आठवले.
४ ऋग्वेदिक इंडिया–मि. अ. चं. दास.
५ लॅपवर्थस जिऑलजी
६ ऋग्वेद, सायणभाष्य सहित.
७ श्रौतभूमीच्या मूलस्थानाचा निश्चय–श्रीयुत नानासाहेब पावगी.
८ मनुस्मृती.
९ विष्णुपुराण.
१० मॉडर्न रिव्ह्यू–एप्रील १९१३.
११ एन्शन्ट जाग्रफी आफ इंडिया–मि. कनिंगहॅम.
१२ धि कंप्लीट वर्क्स ऑफ स्वामी विवेकानंद, व्हा. ७

---

# पुरवणी

## ( १ )

### अज्ञात ब्राझील.

Col. Fawcett's main objective is an ancient city where it is believed discoveries may be made which will revolutionise our knowledge of the history of civilisation. This city is reported to be inhabited by a people of fairish colour who possess a "light that never goes out." Col Fawcett also aims at visiting tribes ruled by women, his contention being that the Amazons were not a myth.—Times of India–17–2–25.

Trouessart considered that Brazil was an island at the close of the Tertiary epoch. Lund asserts that Brazil is the most ancient

land on the face of the planet. Agazzis, one of the expert geologists of the time, commits himself to the statement that the eastern Pacific once formed a portion of South America.—The same p. 8–(9–2–25.)

The Pro. Orton says–The Amazon formed a wide channel between two islands, one the Brazilian and the other the Guiana plateaw at a time when the Andis had no existence.–The same.

सुधारणेचा पाळणा—आमच्या वेदांच्या काळाच्या इतिहासांत आम्ही अनेक वेळां तुपी ऊर्फ स्तुपी लोकांचा उल्लेख करून त्यांचा संबंध हिंदुस्थानांतील किंवा आमचे अनुग्रहीत ब्रम्हदेश वगैरेंतील स्तूपवाल्या बौद्ध लोकांशीं लावून दाखविला. पण त्यासंबंधें आणखीं कांहीं माहिती उपलब्ध नव्हती. ती नुकतींच कर्नल फॉसेट ह्यांच्या वरील शोधांसंबंधी लेखांच्या द्वारें परिपोष पावत आहे. त्यावरून असें निर्विवाद सिद्ध होतें कीं आमोझोन नदीच्या थडीवरील ह्या तुपी वगैरे लोकांच्या सुधारणेंविषयीं आमचे असलेले आप्तपणाचे विचार बिलकूल अवास्तव नाहींत. त्या लोकांच्या वसाहतीचा प्रदेश रायओडी-जानीरोपासून १५०० मैल लांबीवर ब्राझीलच्या हृदयांतरीं आहे. ह्या अज्ञात भूमीकडे रस्ता जंगल, निर्जन प्रदेश व दलदलींतून जातो. त्या भूमीचे क्षेत्रफळ सुमारें २०,००,००० चौरस मैल आहे. ह्यांत माणसें व इमारती ह्यांचे अमोलिक अवशेष आहेत. त्यांत एक प्राचीनतम शहर आहे. तें सुधारणेचें आदिकेन्द्र आहे असें जें म्हणतात, तें खरें दिसतें; कारण ब्राझीलचा तो भाग आस्ट्रेलिया व हिंदुस्थान यांशी जलप्रलयाच्या पूर्वीं एकमेकांस जोडिलेला होता हें पूर्वीं दाखविलें आहे. ह्या प्रदेशांत इजिप्तच्या सुधारणेच्या १०,००० वर्षें पूर्वीं कांहीं विशेष सुधारणा विद्यमान होती.

मौल लोकः–हा प्रदेश आमाझोन नदीच्या दक्षिण पाणलोटावर झिंगू व तपोझॉझ ह्या नद्यांमध्यें आहे. येथील लोकांचा रंग काळा आहे. त्यांची उंची फार थोडी आहे. ते जमिनीस भोकें पाडून त्यांत राहतात. ते त्या विवरांवर पानें व काठ्या यांची शाकारणी करितात. ह्यांच्या आंत तांबडे इंडियन लोक तपोजाझ व पराजातिंगा ह्या नद्यांमध्यें राहतात. ह्यांचें पुढारीपण अन्यत्र दाखविल्याप्रमाणें स्त्रियांकडे आहे. ह्या लोकांच्या पलीकडे आमाझोन लोक राहतात. त्यांच्या पूर्वेस पांढरे असुरिनी इंडियन लोक राहतात. त्यांच्या आणखीं पूर्वेस एक मोठें शहर आहे व त्यांत मोठ्या राक्षसी [ सायक्लोपियन ] इमारती आहेत.

आगंतुक लोकः–ह्या मूळच्या लोकांवर तुपी लोकांनीं पासिफिक महासागरावरून नैऋत्य दिशेकडून क्यारिब व तपुया लोकांनीं उत्तरेकडून स्वाऱ्या केल्या. ह्यांपैकीं तुपी लोकांचा संबंध आपल्या बौद्धांशीं त्यांच्या इतिहासगर्भ स्तूप या नांवावरून सिद्ध होतो व क्यारीब ह्या लोकांचा संबंध कारिब ह्या क्यारिबोआ म्हणजे पांढरे लोकांचे वंशज या मूळ शद्बावरून पांढऱ्या लोकांशीं ठरतो. तपुया शद्ब संस्कृत दिसतो. पण त्याचा संबंध कोणाशींही आम्हांस जोडितां येत नाहीं.

दन्तकथा.—आम्ही इक्ष्वाकू त्रिशंकू ह्यास विश्वामित्रानें दक्षिण अमेरिकेंत नेऊन ठेविलें असें दक्षिण ध्रुवाच्या तारकापुंजावरून ठरविलें. त्याप्रमाणें तिकडे गेलेल्या पाश्चात्य लोकांस असें आढळलें आहे कीं, येथील सर्व जमातींवर संस्कृतीच्या सर्व कलांत निष्णात गोऱ्या लोकांचा अमल चालत असे. ह्या दन्तकथेचा उलगडा असा करितां येतो कीं इतिहासपूर्वकालीं आपल्या देशांतून साहसी व्यापारी जातां जातां तेथें मालक म्हणून वसाहत करून राहिले व त्यांच्या दिग्दर्शनाप्रमाणें तेथील मूळच्या जमातींतील लोक त्यांच्या सहवासानें सुधारले. तदनुरूप आमाझोनच्या प्रदेशामध्यें पुष्कळ वणिग्जनांच्या ( फिनिशन ) भाषेपासून उत्पन्न झालेलीं कित्येक स्थळांचीं नांवें आहेत. तेथील कांहीं शहरांच्या वैभवावरून व सधनतेवरून परदेशांशीं दळणवळण असल्याशिवाय तें वैभव व ती सधनता त्यांस आली नाहीं असें दिसतें. त्या शहरांस कमानींच्या वेशींच्या भिंती होत्या व त्यांत मूर्ती व उठावदार वेलबुट्टी आहे. ह्या प्रदेशाच्या पासिफिक किनाऱ्यावर सतत धरणीकंप होऊन एकीकडे आंडिस पर्वत वाढला व दुसरीकडे हीं शहरें पाण्यांत गडप झालीं आहेत. ह्यांचा पुरा शोध करण्यास त्यांपैकीं तियाहुआनाको शहर खोदून मोकळें केलें पाहिजे.

इन्कांच्या इमारती.—आम्ही आमचे मनुज क्रान्तिप्रदेशांत पूर्वपश्चिम फिरत होते असें म्हटलें आहे, त्याप्रमाणें तेथें घटना आढळते. येथील इमारती मोठ्या राक्षसी आहेत. त्या पुढील ठिकाणीं आहेत. पासिफिक बेटें, मेक्सिको, मध्य अमेरिका, ग्रीस, थ्रेस, स्पेन, एशिया, एशिया मायनर, क्रिम, टार्टरी, इटली, क्रीट, फिनिशिया, क्रिमिया. ह्या इमारतींस ३० ते १२० टनांचे दगड घडून कामास लाविले आहेत. असल्या इमारती तियाहुआनाको, बोलिव्हियर, व पेरू येथें आहेत.

शिलालेख.—येथील धातूच्या हत्यारांनीं खोदलेले शिलालेख मोठें कौतुक करण्यासारखे आहेत. त्यांचें सादृश्य आम्हांस माहित असलेले पुढील ठिकाणच्या लेखाशीं आहेः—सुमेरियन, जुनें ग्रीक, मागध, फिनिशन, समारातन, इराणी, मिसर वगैरे, वगैरे.

संकटें—येथील लोकांत जाणें मोठें धोक्याचें आहे. ह्या लोकांच्या प्रदेशभर रानटी व क्रूर लोकांचे जमातींचा खडा पहारा आहे. निबिड अरण्यें, रोगांच्या साथी, जंगली काळे चित्ते, व रांगणारे व सरपटणारे व उडणारे प्राणी व ओसाड निर्जल प्रदेश व उंच उंच पर्वतशिखरें त्यांचें रक्षण करितात. असुरिणीच्या उत्तरेस रणकेदार नांवाचे ज्वालामुखींच्या विस्तवावर शेंकडों शतकें झोपेंत घोरत पडलेले पर्वत आहेत! ह्या लोकांजवळ सात ते आठ फूट लांबीची धनुष्यें आहेत. तीं शान्त नांवाच्या ताडाच्या रज्जुमय ( दोरकट ) लांकडाचीं केलेलीं असतात. त्यांनीं मारलेला बाण मनुष्याच्या अंगांत शिरून पलीकडे लगत एखादी दणगट फळी असली तर तींतही फसकन एक इंच घुसतो. त्यांच्या बाणांस विष फासलेलें असतें. त्यांतील एखाद्या बाणाच्या योगानें मनुष्याच्या अंगावर ओरखडा उठला

तर तो लगेच उभरतो ( हावरतो ). पण ह्यांत चमत्कार हा कीं ह्या बाणांच्या योगानें सावजें मारिलीं तर त्यांचें मांस मनुष्याच्या खाण्यास अयोग्य होत नाहीं.

भोळेपणाः—पण हे लोक अत्यंत भोळे व भाविक आहेत. ते इतके कीं ह्यां-मध्यें डोक्यांस स्वयंप्रकाश विद्युच्छलाका लावून युरोपियन लोक गेले असतां ते त्यांस देवदूत समजून त्यांच्या केसासही धक्का लावीत नाहींत ! व ते त्यांच्या सेवेस लागतात !

लोभनीय गोष्टी—पण ह्या लोकांजवळ इतर लोकांस हरण करण्यासारिख्या प्राचीन सुधारणेंतील अवशिष्ट राहिलेल्या कांहीं अद्भुत वडिलार्जित गोष्टी आहेत.—ह्यांच्याजवळ अधिष्ठानभूत ( वैधिक ) परमाणुजात शक्तीवर [ एटॉमिक फोर्स ] लाविलेल्या दीपकांची युक्ती आहे. तिच्या योगानें ते आपल्या घरांमध्यें अल्ट्रा व्हायओलेट रे [ निळीं किरणें ] यांचा उपयोग करून रोषनाई करितात. त्यांची ही रोषनाई आमच्या हल्लीच्या रोषनाईप्रमाणें ज्वलनमूलक [ कंपश्चन ] दीपकांची नसते. त्यांना ज्योतिष उत्तम येतें. त्यांना ध्वनि—कंपांचें विशेष ज्ञान आहे. ह्या कंपांचा उपयोग करून त्यांस संदेश फार दूरवर पाठवितां येतात. एका पोकळ तक्त्यावर आघात करून त्यांस जंगलांतून बिनतारी टेलिफोनप्रमाणें पंचवीस मैल संदेश पाठवितां येतात ! ह्यांजवळ दोन गुप्त मत्स्य (?) होते त्यांपैकीं एक पोर्तुगीजांनीं काढून नेऊन ४०,००,००,० पौंडांस विकला व दुसरा आहे तो हातीं लागला तर त्याची किंमत २,००,००,००० पौंड येईल असें म्हणतात.

शहरः—असुरिणांच्या दक्षिणेस आमच्या हिंदुस्थानांतील तक्षशिलेसारख्या नांवाचें टक्सीलो हें प्राचीन शहर आहे ! मग त्यांचा कांहीं परंपरागत संबंध वरील शहराशीं आहे कीं काय नकळे. पण आमची तक्षशिला ही एक प्रसिद्ध युनिव्हरसींटी पेशावराकडे होती व तींतच आमच्या मुद्राराक्षस नाटकांतील प्रम्बंतरास (क्रान्ती) कारण झालेला वृद्धचाणाक्ष शिकावयास होता. ती नगरी हल्लीं मोडकळीस आलेली आहे !

सिद्धान्तः—यावरून असें दिसतें कीं ह्या लोकांची संस्कृती अत्यंत प्राचीन ( इजिप्तच्या सुधारणेपूर्वीं १०,००० वर्षांची ) आहे.

भौगर्भिक ज्ञानः—प्राचीन काळीं दक्षिण ब्राझील व उत्तर ग्वायना हे दोन्ही प्रदेश स्वतंत्र द्वीपरूप होते व ते पूर्व पासिफिकमध्यें दूरवर पसरले होते. त्यांचें एक द्वीप म्हणजे बेट आंडिस पर्वताच्या उत्पातानें होऊन त्यांच्या मधून अफाट आमाझोन नदी पूर्वींच्या खाडीच्या ठिकाणीं वाहूं लागली !

हेतूः—पूर्वोक्त दीपकांचीं वगैरे शास्त्ररहस्यें समजावीं म्हणून कर्नल फॉसेट याची आत्मनिरपेक्ष धडपड चालली आहे व लंडन व न्यूयार्क येथील दोन भौगोलिक संस्था (जिआग्राफिकल सोसायटीज) हे शोध करण्यास पैसे वगैरेची मदत सढळ हातानें करीत आहेत. क्रप नांवाचा जर्मनींतील लोहराज यानें कांहीं दिवसांपूर्वीं ८०,००० पौंड असल्याच स्वारी कारणें खर्चीं घातले. पण त्या स्वारींतील

लोकांचा नाश तेथील इंडियन लोक व रोग यांनीं समूळ केला ! सदरहू इंडियनांच्या बाणांच्या पावसानें माणसें व त्यांच्या ५० फूटीच्या अनाकोंडा नांवाच्या इत्यारानें खेंचरें हां हां म्हणतां चित व जमीनदोस्त होतात ! म्हणून फासेट हा आपलेबरोबर आपली मण्डळी न वाढवितां आपला २१ वर्षांचा एक मुलगा व एक इंग्रज अशीं दोनच माणसें नेत आहे; कारण, जास्त माणसें तेथील लोकांच्या डोळ्यांत येऊन ते त्यांचा तावडतोब विध्वंस करावयास सोडणार नाहींत !

---

## ( २ )

### अत्यंत प्राचीन पुस्तकसंग्रह.

"This Library contains numerous valuable and rare ancient books and manuscripts written on palmyra leaves, dealing with Religion, Philosophy, Arts, Science, History, Medicine, Fortune-telling, Astrology, Astronomy, Palmistry and various other subjects. They are written in almost all the languages of India. **Some of them seem to be the works of the hoary Vedic period.** It is believed that in no other Library in India could such rare works be found. The subject matter treated in many of them is simply wonderful"–Bombay Chronicle–26th April 1923.–Mr. Moizuddin Ahmad, B. A. ( Alig ).

It is a very ancient Library having had its origin **long before the advent of the Bijapur Royal Family.**—The same.

पुस्तकसंग्रह:—हा पुस्तकसंग्रह सध्यां डॉ. सय्यद महंमद कासम, जहागीरदार व मुख्य, पास्टूर हॉल, निझामचें राज्य, पाथरगट्टी, हैदराबाद [ दक्षण ] यांजवळ आहे. ही फार प्राचीन लायब्ररी आहे. हिच्या संग्रहास प्रारंभ विजापूरचें राज्य स्थापन होण्यापूर्वीं झाला असें मोइझिउद्दीन अहंमद म्हणतो. याचा अर्थ तज्ञ असा करितात कीं हा ग्रंथसंग्रह प्रथम विजयानगर येथें वेदभाष्यकार सायन विद्यारण्य स्वामी ह्यांचा होता. विजापूरच्या राज्याचा पाडाव तालिकोटच्या लढाईंत विजापूर आदिक पांच जुडलेल्या ब्राम्हणी बादशहांनीं केल्यावर तो सर्व विजापूरच्या बादशहांनीं विजापूर येथें आणिला व तो वरील जहागीरदारांच्या पूर्वजांच्या ताब्यांत दिला; कारण त्यांचे हे पूर्वज विजापूरच्या राजघराण्याचे मौलवी [ प्रीस्टस ] होते; एवढेंच नाहीं तर ते मोठमोठे लष्करी हुद्देदार होते. त्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं सदरहू ग्रंथसंग्रहास वेळोवेळीं भर घातली आहे. सदरहू डाक्तर साहेबसुद्धां बहुश्रुत व बहुदृष्ट गृहस्थ आहेत व त्यांनीं ही आपल्या पुस्तकांची भर सदरहू संग्रहास घातली आहे.

वर्णन:–ह्या संग्रहांत अगणित मोलवान व विरळ व प्राचीन पुस्तकें व पोथ्या आहेत. त्या ताडपत्रावर लिहिलेल्या आहेत. त्यांत विषय पुढील आहेत:–धर्म, तत्वज्ञान, कला, शास्त्रें, इतिहास, औषधी, भविष्यकथन, फलज्योतिष, ज्योतिष,

हस्तसामुद्रिक वगैरे. हे ग्रंथ हिंदुस्थानांतील बहुतेक भाषांत लिहिलेले आहेत. फार तर काय सांगावें पण त्यांतील कांहीं ग्रंथ अनादी वैदिक काळचे आहेत. असें मानितात कीं हिंदुस्थानांतल्या दुसऱ्या कोणत्याही लायब्ररींत असल्या विरळ ग्रंथांचा संग्रह सापडत नाहीं. त्यांतील विषय मोठे लोकोत्तर आहेत. त्यांतील कांहीं चमत्कारिक गोष्टींचें येथें विवरण करितोंः—

१ शवकोथनाशन [एम्बामिंग]ः—ह्यांत ह्या प्राचीन कलेचें सुस्पष्ट वर्णन दिलें आहे, व असें म्हणतात कीं या प्रकारें प्रेतास मीठमसाला घातल्यास तीं न सडतां हजारों वर्षें जशाचीं तशीं राहूं शकतात. प्राचीन मेसरी लोक प्रेतें राखण्याच्या कामीं ह्याच क्रियेचा अवलंब करीत असत.

+ २ बिनतारी तारायंत्र [ वायरलेस टेलिग्राफी ]ः—दोन दगडांचे तक्ते कांहीं विशेष प्रकारें तयार करावयाचे व त्यांत तारा घातल्याशिवाय ते पुष्कळ अंतरावर ठेवावयाचे. म्हणजे असें म्हणतात कीं ह्या तक्त्यांच्या साह्यानें एका स्थळाहून हजारों कोश दूर स्थळीं संदेश पाठवितां येतात.

+ ३ कार्पासोत्पादन ( कॉटन ग्रोइंग )—तांबडा, काळा, निळा, पिवळा वगैरे रंगाचा कापूस उत्पन्न करण्याच्या कांहीं विशेष क्रिया ह्या ग्रंथांत दिल्या आहेत.

+ ४ भूगर्भशास्त्र (जिऑलजी)—ह्या ग्रंथांत कांहीं क्रिया अशा सांगितल्या आहेत कीं तेणेंकरून पृथ्वीच्या पोटांत कोठें हिरे, धातू, खडक, गुप्तधन, प्राचीन गडप झालेलीं शहरें वगैरे आहेत ह्याचें ज्ञान होतें.

५ अद्भुत काच ( वंडरफुल ग्लास ).—ह्यांत एका प्रकारची काच करण्याच्या अशा क्रिया दिल्या आहेत कीं ती काच समुद्राच्या पृष्ठभागावर धरिली असतां तेणेंकरून त्याच्या तळचे सर्व पदार्थ सुस्पष्ट दिसतात.

६ प्रालेयपात ( स्नोफॉल )—ह्यांत कांहीं मार्ग असे दाखविले आहेत कीं तेणेंकरून बर्फ उष्ण प्रदेशांत पडतें व तें थंड प्रदेशांत पडत नाहीं.

७ पर्वतसमीकरण ( माउंटन लेव्हलिंग )—ह्यांत कांहीं क्रिया अशा दिल्या आहेत कीं तेणेंकरून पहाड जमीनदोस्त करून त्याचा मलमा ( मळखळ ) शेतीस खत म्हणून वापरतां येतो.

ह्या ग्रंथांत दुसऱ्या पुढील क्रिया दिल्या आहेत—

(१) पाणी खालच्या पातळीपासून ( लेव्हल ) उंच पर्वतावर नेणें

(२) लोखंडाचा द्रव करणें.

(३) पाणी हजारों वर्षें उष्णच्या उष्ण अखंड राखणें.

(४) हलक्या धातूंचें सोनें व रुपें करणें.

(५) मोलवान जवाहीर व मोत्यें वितळवून त्यांस इष्ट आकार व रंग देणें.

(६) मनुष्याचें जीवित हजारों वर्षें वाढविणें.

( ७ ) रत्नें, हाडें, लोखंड वगैरेस विशेष प्रकारची जिल्हई देणें.

+ ( ८ ) गहूं आदिक धान्यें न सडूं देतां जशींच्या तशीं हजारों वर्षे राहूं देणें.

( ९ ) आरोग्य व जीवित नष्ट होऊं न देतां सहा किंवा अधिक महिने एखाद्या मनुष्यास उपवास करूं देणें.

( १० ) कुपरिणाम न होऊं देतां एखाद्या मनुष्यास नेहमींच्या आहारापेक्षां कित्येक पट अन्न खावयास घालणें.

( ११ ) प्राचीन लिप्या वाचून त्यांचा अर्थ सांगणें.

+ ( १२ ) काळ्या इसमास गोरें करणें.

+ ( १३ ) वाकडे दांत सरळ व सुंदर करणें.

+ ( १४ ) वृद्ध मनुष्यांचे पडलेले दांत पुन्हां वाढावयास लावणें वगैरे.

सोनें, रुपें, तांबें वगैरेचीं निरनिराळ्या रंगांची ऐतिहासिक नाणीं ह्या ठिकाणीं संग्रहीत केलेलीं आहेत.

+ सदरहू डाक्तरांनीं चाळीस भाषांत वनौषधिप्रकाश रचून परवरदिगार निजामसाहेब सरकार यांस अर्पण केला आहे.

हा ग्रंथसंग्रह महाराजा सर कृष्ण प्रसाद बहादूर मुख्य प्रधान, राजा फत्ते नवाझवन्त बहादूर आदिक महाशयांनीं पाहिला आहे.

ह्या डाक्तरांस जलसंत्रास ( हायड्रोफोबिया ), नागविष, वृश्चिकविष, व दुसरीं विषें ह्यांवर हातखंडेपणानें उपचार करितां येतात. ह्यांस भाळी न बांधतां पोटांत औषध देऊन रोग्यांस बरें करितां येतें.

टीपः—फुल्या दिलेले ग्रंथ तपासून पाहिले पाहिजेत. कारण ते महत्वाचे दिसतात.

वेदः—उद्धार—हा अनादिवेदगर्भ ग्रंथसंग्रह विजयनगराहून विजापुरास तालिकोटच्या लढाईनंतर आणिला असावा हें तज्ञांचें अनुमान बिनचुक असेल तर त्यापुढें असा तर्क करण्यास हरकत नाहीं कीं तो संग्रह मूळचा विजयनगरचे मुख्य आधारस्तंभ, तेथील बुक्कसाम्राटाचे मुख्य प्रधान, व वेदभाष्यकार सायणाचार्य व शृंगेरी येथील श्रीशंकराचार्यांचे गादीवर पुढें बसलेले नवीन नांवाचे विद्यारण्य यांचा असला पाहिजे व तो तेथील बुक्कराजापासून शेवटच्या रामराजापर्यंत वाढत गेला असला पाहिजे व तो पुढें मुसलमानांच्या हातीं गेला असला पाहिजे तर हा हिंदुधर्माचा केवळ जीव कीं प्राण सायण भाष्यसह वेदप्रभृती ग्रंथसंग्रह आपल्या सांप्रतच्या हिंदू लोकांनीं हर प्रकारें मिळवून राष्ट्राभिमानानें त्यांचें स्मारक म्हणून छापून चिरंजीव केला पाहिजे हें कोणीही कबूल करील.

— समाप्त. —